## अनुक्रम



* * *

प्रीतिकथा लिहायच्या भानगडींत मी कधींच पडलें नाहीं. आणि माझ्या नजरेसमोर लेखनाचें जग म्हणून मी नेहमींच बहुजनसमाजातील व खेड्यातील वातावरण प्रामुख्यानें राहील हें पाहिलें. तसेंच जीवनातील सर्व प्रकारचें प्रेम रंगविण्याचा माझ्या कथालेखनांतून मी प्रयत्न केला. उपेक्षिताच्या अंतरंगाला हात घालण्याचीहि कोशीस केली.

त्यामुळें लेखिका म्हणून मला म्हणावें तसें अन्यापहि आजच्या जगात नाव मिळविता आलेलें नाहीं. मागणी तसा पुरवठा मी करू शकलें नाहीं. त्याचप्रमाणें वाचकाना आवडेल तेंच लिहायचा सोस मी केव्हाच मनाशीं बाळगला नाहीं. अर्थात् त्याचा बरा वाईट परिणाम मला नेहमींच भोगावा लागलेला असला, तरी मी त्याची फारशी खत कधींहि केलेली नाहीं. माझ्या मनात येईल तें मी लिहीत राहिलें व त्याचें प्रकाशनहि होत गेलें.

कथा, कादंबरी, काव्य, निबंध व प्रबंध या साहित्याच्या माध्यमातून मी आजवर पुष्कळसें लेखन केलें आहे. याखेरीज बालवाङ्मय व नभोवाणींचें लेखन या प्रांतातहि भरपूर लिहिलें आहे. परंतु लोकगीताच्या माझ्या अभ्यासानें त्यासंबंधींच्या लेखनानें मराठी रसिकाना माझी खरी ओळख करून दिली याचा मला विशेष अभिमान वाटतो. नभोवाणीवर वेळोवेळीं मीं सादर केलेली मूळच्या गावरान चालींतील सुंदर लोकगीतें सर्व थरातील मंडळींना विशेष आवडलीं. त्याचप्रमाणें लोकगीतावर आधारित अशा लिहिलेल्या माझ्या कथाहि विशेष लोकप्रिय झाल्या आणि " मराठींतील स्त्रीधन " ह्या माझ्या लोकगीतावरील प्रबंधाची पहिली आवृत्ति देखील अल्पावधींत संपली. त्यामुळें माझ्या पीएच्. डी. च्या प्रबंधाचाच हा विषय असा सर्वत्र गैरसमज पसरला गेला आहे ! !

एकपरीनें ही गोष्ट तशी वाईट नाहीं. कारण पीएच्. डी.करिता अभ्यास करण्यासाठीं म्हणून 'मराठींतील लोकसाहित्य' हाच विषय मला पाहिजे होता. परंतु त्यावेळीं विद्यापीठाने ( इ. स. १९४८ मध्यें ) या विषयाला मान्यता दिली नाहीं आणि म्हणून " स्त्रियानीं मराठींत लिहिलेलें वाङ्मय " ( The Contribution of women writers to Marathi Literature ) हा विषय माझ्या पीएच्. डी.च्या पदवीसाठीं अभ्यासाला म्हणून मीं मान्य केला. आणखी इ. १९५१ च्या मार्चमध्यें मला या विषयावर संशोधन केल्याबद्दल पीएच्. डी. ची पदवीहि मुंबई विद्यापीठानें बहाल केली.

पण " वनिता सारस्वत " ह्या नावानें माझ्या पीएच्. डी.च्या ह्या प्रबंधाचें आता प्रकाशन होते आहे. म्हणजे जवळ जवळ दहा वर्षांनीं माझा हा प्रबंध पुस्तकरूपानें वाचकाच्या हातीं येतो आहे; तसेंच त्यामुळें लोकसाहित्य हा माझ्या संशोधनाचा स्वतंत्र विषय आहे व पीएच्. डी च्या पदवीशीं त्याचा संबंध नाहीं हेंहि खात्रीलायकरीत्या आता सर्वांना कळून चुकते आहे.

वास्तविक ह्या प्रबधाचें प्रकाशन या पूर्वीच होणें अगत्याचें होतें. परतु एक तर मला स्वत.लाच त्याचें प्रकाशन करणें जमले नाहीं आणि माझी आपली मना-पासून ही इच्छा कीं, पीएच्. डी. साठीं नाकारलेला विषय आपण या प्रबधाचे प्रकाशनापूर्वी शक्य तर सर्वमान्य करता आला तर पहावा योगायोगानें माझी ही अपेक्षा पुरी झाली आणि दरम्यानच्या काळात माझ्या अनेक सन्मित्रानीं केलेल्या तगाद्याचा परिणाम म्हणून ' वनिता सारस्वत 'चेंहि प्रकाशन आता होतें आहे.

मराठी साहित्याच्या प्रातामध्यें स्त्रीच्या लेखणीनें केव्हा केव्हा व कसकसा प्रवेश केला व हातभार लावला हे ठरविताना कालमर्यादा कोणती ठरवावी ह्या फार मोठा प्रश्न माझ्यापुढें होता. परतु मराठींतील एक प्रसिद्ध लेखक व आमचे स्नेही प्रा. न. र. फाटक यानीं या विषयाची चर्चा करताना " From महदबा To सरोजिनी " असें उत्तर दिलें व चटकन् या विषयाचें कालमर्यादेचें क्षेत्र निश्चित होऊन गेलें. माझ्या अभ्यासासाठीं विद्यापीठानें मार्गदर्शक म्हणून मान्यता दिलेले गु. डॉ. के. ना. वाटवे यानींहि या गोष्टीस समति दिली व त्याप्रमाणें माझा अभ्यासहि सुरू झाला

या माझ्या अभ्यासाच्या प्रारभाच्या काळात गु. डॉ. वाटवे याच्याखेरीज श्री. वि. स. खाडेकर, प्रा. न. र. फाटक, श्री. के. नारायण काळे, प्रा. डॉ. नि. भि. कोल्हते, गु प्रा. रा. श्री. जोग, गु. म. म. दत्तो वामन पोतदार, कै. साने गुरुजी, कै. रियासतकार सरदेसाई इत्यादींची मला वेळोवेळीं विशेष मदत झाली. त्याचे मार्गदर्शन मला फारच उपयोगी पडलें. याखेरीज पुणें शहरातील केसरी ग्रथालय, महाराष्ट्र ग्रथालय, स. प. महाविद्यालयाचें ग्रथालय, फर्ग्युसन महाविद्यालयाचें ग्रथालय, पुण्याच्या ट्रेनिंग कॉलज फॉर मेनचें ग्रथालय, व गु. दत्तो वामन पोतदाराचें खाजगी ग्रथालय याचाहि मला बराच उपयोग झाला. शिवाय श्री. ग ल. ठोकळ याच्या लेखन वाचन भाडाराची देखील मला अमोल मदत झाली. त्याचबरोबर अनेकदा माझ्या परमपूज्य वडिलाचेंहि मला विशेष मार्गदर्शन झालें आहे. हें मी मुद्दाम सागू इच्छितें

माझ्या या अभ्यासाला आणखी चागली दिशा लाभावी म्हणून मी इ स. १९४९ सालीं पुणे येथें भरलेल्या मराठी साहित्य समेलनाचे वेळीं एक खास कार्यक्रम घडवून आणला होता मराठींतील प्रसिद्ध लेखिकाना व कवयित्रींना बोलावून " मी व माझें लेखन " या विषयावर त्याचे विचार त्यानीं माडावेत म्हणून डॉ. चद्रकला हाटे याच्या अध्यक्षतेखालीं एक स्वतत्र समेलन भरविलें होतें. याखेरीज अनेक लेखिकाशीं मीं समक्ष व पत्राद्वारेंहि या विषयावर चर्चा केली होती. त्यावेळीं सर्वांनीं मला विशेष आपुलकीनें सहकार्य दिलें होते हे मी येथें मुद्दाम नमूद करू इच्छितें. कित्येकींनीं तर आपलें प्रकाशित व अप्रकाशितहि

डॉ. सरोजिनी बाबर

# यांचें प्रकाशित वाङ्मय

**प्रबंध**

वनिता सारस्वत

मराठीतील स्त्रीधन

**कादंबरी**

कमळाचं जाळं

अजिता

हिरवा चुडा

तूं भेटायला नको होतास–

आठवतंय तेवढं सांगतें

आणि इथं गोष्ट संपली

**कथासंग्रह**

नव्याची पुनव

चिंचेची पत्रावळी

डोंगरची मैना

झालं गेलं सांगतें

देवदर्शन

रुखवत

सुंबरान मांडीलं—

**निबंध**

साहित्य दर्शन भाग १

मंगलाक्षता

मराठी लोककथा

निबंधलेखन

काँग्रेस स्त्री-संघटना

**शब्दचित्रें**

वडीलधारी माणसें

**बालवाङ्मय**

मानवी प्रवास

भारतीय स्त्रीरत्नें, भाग १ ते ४

बाल-नाटिका, भाग १ ते ४

काचेची पेन्सिल

खेळ आणि गाणीं

निळे डोळे

**समाजशिक्षण**

जात्यावरील गोड गाणीं

मीहि माणूसच आहें

माझं नाव गिरजा

उखाण्याचें वैभव

सांग सांगतें

विठ्ठला, तूं असा आहेस का रे ?

खुतनीचा झोळणा

आईचीं पत्रें

माझ्या आवडीची जनाई

पूजा

दोन पाव्हण्या

आठवणींतल्या गोष्टी

भानुमति

लोकगीतांतील आनंद

घराची शोभा

आपलें आरोग्य

महाराष्ट्राचे शिल्पकार

चोळी बांगडी

लोककला

मायबोलीचा नवस

वगैरे वगैरे

भगिनीशिक्षण

आमचीं गाणीं

शुभमंगल

० ० ०

# स्त्रीच्या व्यक्तिमत्वाचा वाङ्मयीन आविष्कार

भारतीय संस्कृतीच्या उच्चतम आदर्शांचा विचार करीत असतांना आजवर अनेक विद्वान् लोकांनीं वैदिक कालाचा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आहे; आणि या गौरवपूर्ण उल्लेखाचें प्रमुख कारण म्हणून अनेक प्रकारच्या ग्रंथांमधून त्या कालामध्यें स्त्रियांना व पुरुषाना मिळालेल्या समान सामाजिक दर्जाचा आवर्जून उल्लेख आलेला आहे. ह्या कालांतील सामाजिक जीवन निरोगी व प्रसन्न होतें याची साक्ष वैदिक वाङ्मयांत सापडते; आणि त्यावेळच्या सामाजिक जीवनाचा बौद्धिक विकास करण्यांत पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांनींहि भाग घेतलेला आहे असें आढळून येतें.

त्यावेळच्या स्त्रियांचें शिक्षण बालपणापासूनच मुलांच्या बरोबरीने होत असे. तसेंच यज्ञोपवित धारण करून वेदाध्ययन करण्याची व अग्निहोत्र चालविण्याची मुभाहि त्यावेळच्या स्त्रियाना पुरुषाच्या बरोबरीनें असावयाची. त्यामुळें स्त्रियांच्या मध्ये घोषा, सूर्या, लोपामुद्रा, विश्ववारा इत्यादि सूक्तकार ब्रह्मवादिनी सांपडतात. ऋग्वेदामध्यें सव्वीस सूक्तांच्या प्रणेत्या स्त्रिया असून त्याचें लेखनहि अव्वल दर्जाचें झालेलें दिसून येतें. त्यावेळच्या समाजानें या स्त्रियांच्या सूक्तांचा दर्जा वरच्या प्रतीचा असल्याचें गौरवानें नमूद केलेलें आहे, असें वैदिक वाङ्मयावरून लक्षांत येतें.

तथापि या संदर्भात एक गोष्ट जरूर लक्षांत घ्यावयास पाहिजे, ती अशी कीं, या कालांतहि स्त्रीजीवन विशिष्ट मर्यादेपलीकडे जाऊन वाटेल त्या प्रकारचें स्वातंत्र्य उपभोगूं शकत नव्हतें !

" अधः पश्यस्व मोपरि संतरा पादकौ हर ।
मा ते कशप्लकौ दृशन् स्त्रीहि ब्रह्मा बभूविथ ॥ " ( ८-३३-१९)

ऋग्वेदाच्या आठव्या मंडलामधील तेहेतिसाव्या सूक्तांतील एकोणिसाव्या क्रमांकाच्या या ऋचेमध्यें स्त्रियाच्या आचारासंबंधीं प्लायोगीस इंद्रानें केलेली सूचना आलेली आहे. देवतेच्या शापामुळें प्लायोगी स्त्री झाला, त्यावेळीं ही सूचना इंद्रानें केली आहे. या सूचनेंत इंद्र म्हणतो कीं, " हे प्लायोगे, खालीं पहा. वर पाहूं नकोस. पावलें हळूच टाक. पायाचे घोटे दिसूं देऊं नकोस. कारण, तूं पुरुष नसून आतां स्त्री झाला आहेस. "

याच सूक्तामध्यें इद्रानें स्त्रीचें मन ताब्यात ठेवण्यास कठीण असते आणि तिची बुद्धि हलकी असते, असा या सूक्तनेपूर्वीच निर्वाळा देऊन टाकला आहे ! * म्हणजे पुरुषाच्या बरोबरीनें समाजामध्यें वावरणाऱ्या स्त्री जीवनालाहि विशिष्ट मर्यादा होत्या, असें यावरून अनुमान काढता येईल.

परतु या मर्यादा स्वीकारूनहि त्यावेळच्या स्त्रियानीं वेगवेगळ्या प्रकारच्या कार्यक्षेत्रामध्यें जी अपूर्व कामगिरी केली आहे, तिचा जरूर विचार केला पाहिजे. तसेच त्या त्या विशिष्ट कार्यक्षेत्रामध्यें स्त्रियानीं अधिकारी बनून केलेल्या कार्याचाहि याच सदर्भात अवश्य विचार झाला पाहिजे.

वेदकालीन समाजाप्रमाणेंच उपनिषत्कालीन स्त्रियाचें जीवनहि वरच्या दर्जाचें होतें. ऋग्वेदकालीन स्त्रीजीवन त्याच्या पाठीशीं होते. त्याच्या जोडीला तत्त्वज्ञानाची भर पडत गेली. यावेळीं ब्रह्मविद्या समाजाच्या सर्व थरात पोचलेली होती त्यामुळें सम्राट जनकाच्या ब्रह्मवादी सभेमध्यें याज्ञवल्क्यास अनेक तात्त्विक व गहन प्रश्न विचारून जेरीस आणणारी गार्गी वैदिक काळातील स्त्रियाच्या सास्कृतिक पातळीची उत्कृष्ट निदर्शक म्हणून लक्षात घ्यावयास हरकत नाहीं याज्ञवल्क्याची पत्नी मैत्रेयी भौतिक वैभवाची वाटणी बाजूस झुगारून देऊन अमरत्वास पोंचविणाऱ्या तत्त्वचर्चेत गुतलेली बृहदारण्यकोपनिषदात वर्णिलेली आहे त्यावरून असा निष्कर्ष काढता येईल कीं, वैदिक कालातील भारतीयाचे कौटुबिक व सामाजिक जीवन बौद्धिक सस्कृतीच्या निकोप वाढीस कारणीभूत झाले होतें. स्त्री व पुरुष याच्यात सपूर्ण मानसिक फारकत दाखविणारी सामाजिक विकृति त्यावेळीं अस्तित्वात आलेली नव्हती.

वादविवादामध्यें पुरुषानाहि माघार घ्यावयास लावण्याची बौद्धिक शक्ति कमावलेल्या स्त्रिया उपनिषत्कालात जन्माला आल्या होत्या, तरी देखील त्याच्या स्त्रीजीवनाला म्हणून काहीं वेगळ्या मर्यादा समाजानें जरूर घालून दिल्या होत्या ! ज्या स्त्रीचा पति देशातरीं गेला असेल त्या स्त्रीनें क्रीडा, न्हाणें, माखणें, उत्सवादिक पहाणें, हास्य करणें आणि दुसऱ्याच्या घरीं जाणें ह्या गोष्टी करू नयेत असें जाणते लोक सुद्धा बोलून दाखवीत असत ! ‡ तरी देखील त्या वेळच्या स्त्रियानीं ज्ञान व धर्म याच्या साहाय्यानें स्वत चा सर्वांगीण विकास करून घेण्याची सधि भरपूर प्रमाणात साध्य करून घेतलेली आहे हें विशेष होय त्याचबरोबर या कालातील स्त्रियानीं सामाजिक जीवनाच्या सर्वांगीण विकासाला मोठ्या अभिमानानें हातभार लावला आहे, ही गोष्टहि लक्षात घेणे अत्यावश्यक आहे

---

* इद्रश्चिद्घ तदब्रवीत्स्त्रिया अशास्य मन । उतो अह क्रतु रघुम् ॥८-३३-१७

‡ क्रीडा शरीर सस्कार समाजोत्सवदर्शनम् ।
हास्य परगृहे यान त्यजेत् प्रोषितभर्तृका ॥—याज्ञवल्क्य

वेदकालीन स्त्रियांचा व पुरुषांचा दर्जा कशा प्रकारचा होता याची कल्पना उपनिषदापूर्वी अस्तित्वांत आलेल्या " शतपथ ब्राह्मणा " मध्ये जी महावचास मिळते ती अशी आहे—

" अर्धो ह वा एष आत्मनो यज्जाया ।
यावन्नविन्दते जायां तावद् अर्धो भवेत् पुमान् ॥
नार्धं प्रजायते सर्वं प्रजायेयेति च श्रुतिः ॥ "

(५, १, ६, १०)

म्हणजे स्त्री व पुरुष मिळून एकाच संपूर्ण मानव्याचीं दोन अंगें आहेत व त्यांपैकी एक दुसऱ्यावांचून पूर्ण होऊं शकत नाहीं; म्हणजेच तीं परस्परांना पूरक आहेत अशी ही कल्पना आहे. यावरून उपनिषदकालीन स्त्रियांचा दर्जा कोणत्या पार्श्वभूमीवर उभारला गेला होता याची कल्पना येते.

' मनुस्मृती ' मध्यें त्यावेळच्या स्त्रियांच्या संबंधीं मोठे गौरवपूर्ण उद्गार आलेले आहेत:—

" यत्र नार्यस्तु पूज्यन्ते । रमन्ते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते । सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ "

(३, ५६)

म्हणजे ज्या ठिकाणीं स्त्रियांना मानानें वागविलें जातें त्या ठिकाणीं प्रत्यक्ष देवताहि खूष होतात. आणि जेथें त्यांना मानानें वागविलें जात नाहीं तेथें सर्व कामें निष्फळ होऊन जातात !

आजच्या काळांतहि या गौरवाचा उल्लेख जाणते लोक आनंदानें व अभिमानानें करीत असल्याचें दिसून येतें. या गौरवाबरोबरच मनूनें स्त्रीजीवनांतील एका कटुसत्याचाहि उल्लेख ' मनुस्मृती ' मध्यें केलेला आहे. त्याचें म्हणणें असें कीं—

" पिता रक्षति कौमार्ये भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ "

म्हणजे स्त्री ही बालपणीं वडिलांचेकडून, तरुणपणीं नवऱ्याकडून व उतार वयांत नवरा ह्यात नसल्यास मुलाकडून रक्षण केली जाते; आणि त्यामुळें स्त्री ही स्वतंत्र राहाण्याला योग्य असत नाहीं. निसर्गामुळें स्त्रीच्या जीवनांत एक प्रकारची अशी अवस्था निर्माण झालेली आहे कीं, तिला कोणा ना कोणाच्या तरी आधारावर जगावें लागतें. संरक्षणाची तिला आवश्यकता आहे. आणि तें मनूनें म्हटल्याप्रमाणें घरचीं, प्रेमाचीं माणसें आपुलकीनें देतातहि. परंतु त्याचा अर्थ असा नव्हे कीं, स्त्रीला स्वातंत्र्य हें नसतेंच. ती जरूर स्वतंत्रपणें जगूं शकते. एरव्हीं त्यानेंच तिचा गौरव केला नसता ! परंतु त्याच्या या म्हणण्याचा नेमका काय अर्थ घ्यावयाचा

हा वादाचा मुद्दा असल्यानें, त्याच्या ह्या म्हणण्यामुळे स्त्रीजीवनाला एक प्रकारचा थोडा कमीपणाचा दर्जा प्राप्त झाला आहे, असा सर्वसामान्य समज रूढ झालेला आहे !

तथापि आपला प्राचीन धर्म हा यज्ञप्रधान असल्यामुळें यजमानाबरोबर त्याच्या पत्नीलाहि फार मोठा मान मिळत असे, ही गोष्टहि तितकीच खरी आहे. पाणिनीनें पत्नी शब्दाची व्याख्याच मुळीं " पत्युर्नो यज्ञसंयोगे " ( IV, I, 33 ) अशी केलेली आहे. स्त्री ही गृहिणी, भार्या किंवा जाया या नात्यानें कुटुंबातील एक जबाबदार व मोठ्या योग्यतेची व्यक्ति आहे, ही जाणीव वरील ग्रंथांतून पदोपदीं व्यक्त झालेली आहे.

" विष्णु पुराणा " मध्ये स्त्री आणि पुरुष यांच्यामधील परस्परांना पूरक होणारी अशी मोठी सुंदर कल्पना सांगितलेली आहे—

" पुरुष विष्णु है, स्त्री लक्ष्मी. पुरुष विचार है, स्त्री भाषा. पुरुष धर्म है, स्त्री बुद्धि. पुरुष तर्क है, स्त्री रचना. पुरुष धैर्य है, स्त्री शान्ती. पुरुष हट है, स्त्री इच्छा. पुरुष दया है, स्त्री दान. पुरुष मंत्र है, स्त्री उच्चारण. पुरुष अग्नि है, स्त्री इन्धन. पुरुष सूर्य है, स्त्री आभा. पुरुष विस्तार है, स्त्री सीमा. पुरुष समुद्र है, स्त्री किनारा. पुरुष धनी है, स्त्री धन. पुरुष युद्ध है, स्त्री शक्ति. पुरुष दीपक है, स्त्री प्रकाश. पुरुष दिन है, स्त्री रात्रि. पुरुष वृक्ष है, स्त्री फल. पुरुष संगीत है, स्त्री स्वर. पुरुष न्याय है, स्त्री सत्य. पुरुष सागर है, स्त्री नदी. पुरुष स्तम्भ है, स्त्री पताका. पुरुष शक्ति है, स्त्री सौन्दर्य. पुरुष आत्मा है, स्त्री शरीर."*

* * *

अभिजात संस्कृताच्या काळात, विशेषतः ललित वाङ्मयामध्यें स्त्रीकडे पहाण्याची पुरुषाची दृष्टि ही प्रायः शृंगारप्रधान असल्याचे दिसून येते. त्यावेळच्या लेखकांनीं स्त्रीची केलेली स्तुति ही बहुधा तिच्या शरीर सौष्ठवावरच आधारलेली होती. त्यामुळे स्वाभाविकच अतिरंजितपणाचा दोष त्या स्तुतीमध्यें निर्माण झालेला आहे.

याच काळामध्यें याच्या अगदीं उलट अशी विचाराची एक जबरदस्त लाट काहीं लोकांच्या विचारप्रणालीमध्ये उसळलेली दिसून येते. तापसी, ब्रह्मचिंतक वगैरे विरागी लोकांनी स्त्रियांच्याबद्दल अतिशय अनुदाराचे उद्‌गार काढलेले आहेत. त्यांच्या मते स्त्री ही स्वैरिणी, निसर्गतः चतुर, अधिक बोलणारी, आतून क्रूर परंतु बाह्यतः सौम्य दिसणारी अशी आहे !† आणि त्यावेळच्या समाजानेंहि

---

* ' दुखी भारत ' से

† अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभिता ।
अशौचं निर्दयत्वं च स्त्रीणां दोषाः स्वभावजाः ॥ ( सुभाषितम् )

अशाच प्रकारचा समज करून घेतल्यामुळें स्त्रियांची परिस्थिति मोठी चमत्कारिक झाली होती एवढेंच नव्हे तर ' केवळ दर्शनानें चित्त वेधून घेणारी, स्पर्शानें धनाचा नाश करणारी, संगमानें सत्त्व हरण करणारी नारी ही प्रत्यक्ष राक्षसीच आहे '* अशा कल्पनाहि त्यावेळीं समाजात रूढ झालेल्या होत्या !

युद्धकाळामध्ये मात्र स्त्रियांना शिक्षणाच्या व धर्मप्रसाराच्या दृष्टीनें बरीच मुभा मिळत गेली स्त्री शिक्षणाकडे त्यावेळच्या समाजानें उदार बुद्धीनें लक्ष दिलें या काळातील स्त्रियांनीं बरेच ग्रंथलेखन केल्याचाहि उल्लेख आढळतो

महानुभाव पंथातील लोकांनीं स्त्रियांच्याबद्दलची पूर्वापार रूढ असलेली कल्पना जवळ बाळगलली असली, तरी देखील स्त्री ही मोक्षाला पात्र असल्याची आपली कल्पना मधून मधून आपल्या लेखनात मांडलेली दिसून येते.

संतवाङ्मयावर प्राय वैराग्याची छाप पडलेली असल्यामुळें स्त्रीविषयक दृष्टि जेवढी साफ असावयास हवी तेवढी असलेली त्यामध्यें दिसत नाहीं गृहिणी किंवा धर्मपत्नी या नात्यानें स्त्रीबद्दलची काहीं गौरवपर वचनें संत-वाङ्मयात आढळून येत असलीं, तरीहि पुरुषाला विषयकर्दमात गुंतवून ठेवणारी एक अडचण याच दृष्टीनें स्त्रीचा वारवार उल्लेख आलेला दिसून येतो

इंग्रजी आमदानीनंतर मात्र पाश्चात्यांच्या सुधारलेल्या कल्पनांच्यामुळ समाजातील कर्त्या लोकांचा स्त्रीविषयक दृष्टिकोण बराच निवळलला दिसतो. पाश्चात्य देशामध्यें मिल् अगर इब्सेन सारख्या समाज सुधारकांनी स्त्री कैवाराची चालविलेली मोहीम, व्हिक्टोरियन युगाचा परिणाम आणि त्यांच्या समाजामध्यें स्त्रीला प्राप्त झालेला समानदर्जा लक्षात घेऊनच आमच्या समाजसुधारकांनीं स्त्रीचा दर्जा उचावून घेण्याचा प्रयत्न केला त्याचा परिणाम असा झाला कीं, आमच्या कडील लेखकांनीं स्त्रियांच्या बद्दलची अनुदारवृत्ति सोडून दिली लोकहितवादी, महात्मा फुले, विष्णुशास्त्री पंडित, आगरकर इत्यादींच्या प्रयत्नानें स्त्रीच्या न्याय्य हक्काला चागलेंच सहाय्य मिळत गेले आणि याच विचारसरणीचा पडसाद केशवसुत, हरीभाऊ आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या लेखनात उमटत गेला केशवसुतांनीं हरीभाऊच्या स्त्री कैवाराबद्दल पुढील धन्योद्गार काढले—— " भूपृष्ठस्थित आद्य दैवत जणू त्या वाटली भामिनी " आणि हरीभाऊ आपट्यांनीं तर आपल्या कादंबऱ्यांच्यामधून अतिशय सहानुभूतीनें स्त्रीजीवनाचा आविष्कार केला आहे.

* * *

---

* दर्शनाद् ग्रसते चित्त स्पर्शनाद् ग्रसते धनम् ।
संगमाद् ग्रसते सत्त्व नारी प्रत्यक्ष राक्षसी ॥ ( सुभाषितम् )

अगदीं पुरातन कालापासून तों आतां पावेतों स्त्री जीवनामध्यें कशा प्रकारचीं स्थित्यंतरें घडत गेलीं आणि त्यामुळें स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वाची घडणहि कशी होत गेली, याचा हा अगदीं त्रोटक असा इतिहास पाहता, एक गोष्ट ठळकपणें लक्षात येते ती अशी कीं, स्त्रियांच्या व्यक्तिमत्त्वाचा वाङ्मयीन आविष्कार अजमावण्यापूर्वी स्त्री-पुरुषांची नैसर्गिक स्वभावभिन्नताहि जरूर विचारात घेतली पाहिजे. एरव्हीं त्या आविष्कारानें वैशिष्ट्य तितकेंसें नजरेंत भरणें सहजसुलभ होणार नाहीं.

वास्तविक एक गोष्ट अगदीं सत्य अशी आहे कीं, स्त्री-पुरुषामधील नैसर्गिक परस्पराकर्षण हें पूर्वी होतें तसेंच ते आताहि आहे आणि अनंतकाल तें तसेंच राहीलहि. कारण मानवी मनाचा तो एक नैसर्गिक असा स्थायीभाव आहे. असें असूनहि स्त्री व पुरुष यांच्यामधील समान भूमिकेबाबत वारंवार चर्चा केली जाते. वास्तविक अशी चर्चा व्हावयाचें कारण नसावें. परंतु वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, ही चर्चा मोठ्या प्रभावानें झालेली दिसून येते आहे, आणि त्यासाठीं आधारभूत म्हणून सद्भिरुचि, सौंदर्यदृष्टि, संयम व समता या कल्पना पुढें आलेल्या दिसतात. त्यामुळें ज्या समाजामध्ये स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीची, त्याच्या सारखीच सुसंस्कृत आणि गुणानीं युक्त व स्वतंत्र अशी मानली जाते, त्या समाजामधील शृंगाराच्या आविष्कारांचें स्वरूप वरच्या दर्जाचें असते. आणि याच्या अगदीं उलट स्थिति उरलेल्या समाजामध्यें दिसून येते. तेव्हा यावरून एवढेंच फार तर म्हणता येईल कीं, स्त्री पुरुषाच्या सामाजिक भेदाभेदाविषयींच्या कल्पना ह्या काहीं अंशीं तत्त्वज्ञानात्मक, काहीं अंशीं सांसारिक जबाबदारींतून व्यक्त होणाऱ्या, तर काहीं अंशीं शृंगारिक अगर वैराग्याच्या दृष्टीमधून निघालेल्या अशा आहेत. मात्र हें सारें विवेचन शास्त्रीय दृष्ट्या बरोबर आहे असें म्हणता येणार नाहीं. ह्या केवळ कल्पना आहेत. शास्त्राचा आधार त्यांना नाहीं. कारण खरे शास्त्रीय विवेचन हे शरीर विज्ञानशास्त्र, जीवशास्त्र आणि मानसशास्त्र या शास्त्रांच्या आधारानेंच झालें पाहिजे.

स्त्री आणि पुरुष यांच्या जन्माच्या वेळच्या भूमिकेबद्दल अमेरिकेमधील रटजर्स विद्यापीठातील मानवशास्त्र शाखेचे प्रमुख मि. अॅशले माटेग्यू यानीं एक शास्त्रीय आधार पुढे आणला आहे. "जीवनशास्त्र आणि अनुवंशशास्त्र यांचे शोध आता सूक्ष्मतर जीवाणूंचें गमन आणि पृथक्करण करण्यापर्यंत पोंचलेले आहेत. मनुष्यबीजाच्या लहानात लहान पेशीमध्यें एकदर चोवीस जीवाणु असतात. या चोवीस जीवाणूंच्या पेशींत एकच जीवाणु काय तो स्त्री किंवा पुरुष उत्पन्न होण्याच्या कामीं प्रभावी असा असतो. चोवीसांपैकी लिंगभेदनिर्णायक असा एक जीवाणु 'अ' वर्गाचा असला तर मुलगी जन्माला येते आणि 'ब' वर्गाचा असला म्हणजे मुलगा जन्माला येतो. 'अ' आणि 'ब' वर्गांच्या एकेक अणु

असणाऱ्या पेशी या सख्येने समान असतात. म्हणून स्त्रीजन्म लाभणार का पुरुष-जन्म लाभणार याचा संभव सारखाच म्हणजे पन्नास टक्के असतो.

"यावरून निसर्गानें स्त्री पुरुषाची निर्मितीपासूनच समानता मानली आहे असें दिसेल. पण ती वरवरची आहे. सख्येनें समसमान स्त्री-पुरुष निर्माण व्हावे इतकीच निसर्गाची योजना त्यात दिसते. पण आता या सूक्ष्म 'अ' आणि 'ब' वर्गाच्या निर्णायक जीवाणूंचेंहि सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानेंच सांगोपांग संशोधन झालेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं, 'अ' वर्गाचा सूक्ष्म जीवाणु (ज्याच्या योगानें स्त्रीजन्म निर्णीत होतो तो) हा एक वाढीच्या दृष्टीनें पूर्णत्वाला गेलेला जीवाणु आहे तर 'ब' वर्गाचा सूक्ष्म जीवाणु (ज्याच्या योगानें पुरुष जन्म निश्चित होतो तो) हा 'अ' वर्गाच्या जीवाणूचा एक तुकडा आहे ज्याची वाढ खुरटली आहे असा 'अ' वर्गाचा जीवाणु म्हणजेच 'ब' वर्गाचा जीवाणु होय! म्हणजे परि-पूर्ण वर्धित जीवाणूपासून स्त्री निर्माण होते तर खुरटलेल्या अंशात्मक अशा त्याच्या तुकड्यापासून पुरुष निर्माण होतो...

"वर्धित आणि अवर्धित जीवाणूच्या या मूळातील सूक्ष्म भेदामुळें पुरुषांना मूल उत्पन्न करणें शक्य नाहीं किंवा मुलासाठीं दूध उत्पन्न करणें शक्य नाहीं. स्त्री आणि मूल यांचा संबंध हा पुढेंहि स्त्रियांवर मानवजातीला हितावह असे चांगले संस्कार उत्पन्न करतो. तसे संस्कार पुरुषांच्या मनावर उत्पन्न होत नाहींत. स्त्री आणि बालक यांचे परस्पर प्रेमाचे आणि सहकारितेचे संबंध हेच सर्व मानवी संबंधामध्यें मूलभूत आणि महत्त्वाचे आहेत." *

परंतु असें असूनदेखील स्त्री श्रेष्ठ कीं पुरुष श्रेष्ठ हा मोठ्या विवादाचा प्रश्न "न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति" असें म्हणणाऱ्या मनूपासून तो "अधिकार, अधिकार" म्हणून स्त्रियांच्या स्वातंत्र्यासाठीं झगडा करणाऱ्या कै. वामनराव जोशांच्या 'रागिणी' तील उत्तरपर्यंत अनेकांनीं सोडविण्याचा प्रयत्न केलेला आहे. स्त्री आणि पुरुष हीं संसाराचीं दोन चाकें आहेत, अशी कल्पना करून त्यांची समान-भूमिका काहीं लोकांनीं प्रतिपादिलेली आहे, तर काहींनीं त्यांच्या मानसिक व शारीरिक अशा विविध प्रकारच्या गुणदोषांवर भर देऊन त्यांच्यावरील भिन्न भिन्न सांसारिक जबाबदाऱ्यांची चर्चा केलेली आहे.

अपत्य निर्मिति आणि बालसंगोपन ही महत्त्वाची कामगिरी स्त्रीवर निसर्गानेंच सोंपविलेली आहे. त्या दृष्टीनें विचार करता स्त्री व पुरुष यांच्या कार्य-क्षेत्रामध्यें आढळून येणारा फरक हा मानवजातीच्या सुरुवातीपासूनचा असा अगदीं जुना आहे. जुन्या काळच्या अगदीं रानटी अवस्थेंतील समाजामध्यें देखील हेंच

---

* स्त्रियांच्या श्रेष्ठत्वास आधार. ग. वि. केतकर, केसरी, २७ जुलै १९५२.

दिसून येते त्यावेळच्या पुरुषानीं शिकारीची व युद्धाची बाजू साभाळिली आणि समाजाच्या सास्कृतिक व औद्योगिक विकासाचा भाग स्त्रियानीं साभाळला "रानटी समाजातील पुष्कळ स्त्रिया पुरुषाच्या इतक्याच सशक्त असत त्यामुळें वेळप्रसगीं युद्धातहि त्याना भाग घ्यावा लागत असे, आणि अभिमानानें त्याहि हा भाग घेत असत, हें विशेष होय युद्धात पाडाव झालेल्या कैद्यावर पहारा करण्याचे काम पुष्कळ वेळा स्त्रियाच करीत आपली सर्व शक्ति एकवटून, एकाच स्थानावर ती केंद्रीभूत करून, तिचा एकदम उपयोग करण्याचें सामर्थ्य पुरुषाच्या असतें स्त्रिया आपली सर्व शक्ति शातपणें खर्च करितात व शक्तीवरील दाब फारसा वाढू देत नाहींत. स्त्रियाची शक्ति अफाट पसरलेल्या समुद्रासारखी असते तर पुरुषाच्या शक्तीला उच उभारलेल्या जलस्तभाची उपमा देता येईल स्त्री पुरुषाचे शारीरिक सामर्थ्य सारखेंच असलें तरी जीं कामें करताना शक्ति एका स्थानावर केंद्रीभूत करून मोठ्या आवेगानें तिचा व्यय करावा लागतो, अशीं कामें पुरुषानीं पत्करिलीं आणि शक्ति शातपणें खर्च करून कमी दाबानें करावीं लागणारीं कामें स्त्रियाच्या वाटणीस आलीं " *

स्त्री पुरुषाच्या या नैसर्गिक स्वभाव-भिन्नतेचा विचार करीत असताना इग्लडसारख्या पुढारलेल्या देशामध्ये पुरुषाच्या बरोबरीनें हक्क प्राप्त करून घेण्यासाठीं जोराची चळवळ करणाऱ्या स्त्रिया प्रत्यक्ष वेळ आली असता कशा वागल्या, हे या सदर्भात जरूर लक्षात घेण्यासारखें आहे

१८७० सालीं सौ ग्रे नावाच्या एक बाई लडन स्कूल बोर्डच्या सभासद म्हणून जेव्हा पहिल्यादाच समाजापुढें भाषण करण्यासाठीं उभ्या राहिल्या, त्यावेळीं आवर्जून त्या असे म्हणाल्या कीं, 'स्त्रियाना अतिशय मोलाची अशी वाटणारी व्यक्तिगत व खाजगी मोकळीक आता माझ्या बाबतींत तरी नाहींशी झाली आहे "†

म्हणजे सामाजिक जीवनामध्यें भाग घेण्यासाठीं घर बाजूला सारून पुढे येत असताना, त्याना स्वत च्या खाजगी जीवनातील मौलिक स्वातत्र्य गमावल्या सारखें वाटलें ! याचा अर्थच असा कीं, स्त्रियानीं देखील निसर्गानें आपणावर सोंपविलेल्या जबाबदारी पलीकडे आपलें कार्यक्षेत्र वाढवून आपला विकास करून घेण्याची गरज आपल्याला कितीक पिढ्या फारशी भासू दिली नाहीं ! अगदीं आजच्या जगात देखील सामान्य स्त्रियाच्या जीवनामध्यें हीच भावना दिसून येते पिढ्यान् पिढ्या जणु त्यानीं या मर्यादित क्षेत्रालाच आपले सर्वस्व मानलं आणि त्यातच आनदहि उपभोगला

---

* श्री न ल आठवले, *स्त्रीपुरुषाची स्वभावभिन्नता, सह्यादि,* नवबर १९३५

† "I lose the privacy which is most precious to woman "
Women and a new Society P 12

त्यामुळें जगप्रसिद्ध असलेले एक नामवत मानसशास्त्रज्ञ श्री हॅवलॉक एल्लिस यानीं आपल्या Man and Woman या ग्रथामध्ये म्हटल आहे कीं—

" स्त्री आणि पुरुष याना एकमेकाचें अनुकरण करण्याचें स्वातत्र्य जरी असलें तरी त्या स्वातत्र्याचा उपयोग ते आपल्या जीवनात करू इच्छित नाहींत. त्याना आपल्या म्हणून असलेल्या स्वतत्र भावनाचाच वापर करण अधिक आवडत कारण तसें करण्यामुळें उच्च प्रकारच्या व सुखी सुधारणेची बाधणी केली जाते असे त्याना वाटतें व म्हणूनच कोणत्याहि एकाच–स्त्री वा पुरुष–व्यक्तित्वाच वैशिष्ट्य सर्वांनीं पत्करण्याकडे त्याच्या मनाचा कल झुकत नाहीं " *

स्त्री आणि पुरुष याच्यामध्यें निसर्गानें केवळ शारीरिक दृष्ट्याच वेगळी ठेवण केली आहे असें नसून मानसशास्त्र दृष्टयाहि त्याच्यामध्य फरक असलेला दिसून येतो वस्तुस्थिति अशी आहे कीं, मानसिक सवेदनाचे आघात स्त्रीवर अधिक तीव्रतेनें होत असतात हर्षशोकादि भावनाचे परिणाम स्त्रियाच्या मनावर फार जल्द होतात, आणि त्या त्या वेळच्या या भावनाचा आविष्कारहि त्याच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित व्हावयास वेळ लागत नाहीं पुरुषाचे बाबतींत तसें होत नाहीं मुख्यदु खाच्या होणाऱ्या भावना ताब्यात ठेवून त्याचा आविष्कार चेहऱ्यावर होऊ न देण्याची ते खबरदारी घेत असतात अर्थात् या सर्वसामान्य नियमाला काहा अपवादहि असू शकतात एवढच नव्हें तर प्रत्येक मानवामध्य स्त्रीत्वाच्या व पुरुषत्वाच्या काहीं बाबी कमीजास्त प्रमाणात असलेल्या आढळून येतात ! मग तो मानव स्त्री या पुरुष कोणीहि असो

स्त्रीची व पुरुषाची आयुष्याकडे पहावयाची दृष्टीच वेगळी असते त्यामुळें त्याच जीवन एकमेकाना पूरक होणाऱ्या कर्तृत्वानें परिपूर्ण झालेलें दिसून येत त्या कारणानें स्वाभाविकच स्त्री आणि पुरुष याची तुलनाच होऊ शकत नाहीं अशी वस्तुस्थिति आहे. यासबधीं अधिक खोलात जाऊन विचार करावयाचा तर असें म्हणता येईल कीं —

"स्त्री आणि पुरुष याची समस्या ही दोघाच्या प्रभावर अवलबून राहू शकत नाहीं मानव म्हणून ते एकच आहेत. म्हणने स्त्री आणि पुरुष हे एकमेकाना पूरक असे आहेत परतु परस्पराहून सर्वस्वीं भिन्न असे ते असले तरीहि त्याच्या एकत्वामुळं

---

* " The sexes do not play their part in life by their freedom to imitate each other even though they are entitled to possess that freedom, but by liberating their own native impulses, and in that way, building up a richer and more joyous civilization than can ever be founded on the instincts of one sex alone "

मानव तयार होतो. एकाच नाण्याच्या त्या दोन भिन्न बाजू आहेत व एकतत्वा-चेहि ते दोन वेगळे भाग आहेत. "*

तथापि असे असूनहि स्त्रिया ह्या पुरुषाच्या मानानें कमी बुद्धिवान् असतात, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न मात्र अनेकदा झालेला आहे! आणि त्यासाठीं कुणीं कुणीं स्त्रीचा मेंदू हा पुरुषाच्या मेंदूपेक्षा दिसायला ल्हान व वजनानें हलका असतो ही गोष्ट प्रामुख्यानें आधारभूत धरलेली आहे!! पण खरी परिस्थिति अशी दिसून येते कीं, हा आरोप निराधार व्हावा. कारण शरीरशास्त्राच्या दृष्टीनें शरीराची उंची व वजन यांचें मेंदूच्या आकारमानाशीं जे प्रमाण असते तें लक्षात घेता हा आधार सपशेल चुकीचा ठरण्याची शक्यता आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, स्त्रीच्या मेंदूची जडण घडण ही स्त्रीला प्रजोत्पादनाचें जें कार्य करावें लागतें त्या कार्याला पोषक व आवश्यक अशीच झालेली असते. बुद्धिमत्तेचा प्रश्न इथें त्यामुळें येऊच शकत नाहीं. तेव्हा यासंबंधीं फार तर एवढेंच म्हणता येईल कीं, दोघांचीहि जन्मत च बौद्धिक उंची सारखी असली तरी त्या बुद्धीचा विकास करण्याची संधि दोघाना सारखी मिळत नसल्यानें, तिच्या आविष्कारामध्यें फरक दिसून येतो इतकेंच काय तें. त्यामुळें स्त्री व पुरुष यांच्या बौद्धिक सामर्थ्याचा उघड उघड जो फरक दिसून येतो तो असा कीं—

पुरुषत्वाचे व स्त्रीत्वाचे गुणधर्म हे अगदीं वगवेगळे असे आढळून येतात. जीवनाकडे पहावयाचा त्याचा दृष्टिकोणच कसा परस्परांहून भिन्न असा दिसून येतो. म्हणजे असें की, सर्वसामान्य तत्त्वाचा साकल्याने व दूरगामित्वाने विचार करणें पुरुषाला आवडलें, तर स्त्रीला भावनाप्रधान होऊन एखादा प्रश्न निकालात काढणें सोईचे वाटलें कोणत्याहि प्रश्नाची तार्किक व वैचारिक बाजू लक्षात घेऊन जीवनातील महत्त्वाच्या घटनाना धिटाईनें तोंड देणें हा प्रश्न पुरुषाचा स्वभावधर्म होऊन बसतो, तर एकतानतेनें व निग्रहाने जीवनातील सौंदर्याचा शोध घेत नाजूक म्हणून जीं वैचित्र्यें आढळतील तेवढींच घोळवीत रहाणे हा स्त्रीचा स्वभावधर्म होतो.‡

---

* "The problem of man and woman cannot be a question of the comparitive merits of the two sexes Mankind is one whole, man and woman are two complementary opposites forming together one unity They are the obverse and reverse of one coin – two aspects of one essence ' हॅवलॉक एलीस.

‡ " The masculine qualities comprehend a broad grasp of general principles, a logical constructive power, and a falcuty for dealing largely and sanely with the big issues of life The feminine qualities, on the other hand, lie in subtlety

वास्तविक तसें पाहिलें तर स्त्रियांची स्मरणशक्ति बरीच तल्लख असलेली दिसून येते. परंतु नवेनवे शास्त्रीय शोध लावण्यासाठीं लागणारी जिज्ञासू वृत्ति किंवा सृष्टींतील गूढ तत्त्वांची उकल करण्याचें कौशल्य व त्यासाठीं कराव्या लागणाऱ्या परिश्रमाची तयारी ही पुरुषाच्या मानानें स्त्रीजवळ फार कमी पडते. आणि ती जर एखाद्या हुषार बाईनें चुकून माकून दाखविलीच तर तिला ' ही बाई कसली ? हा पुरुषच आहे ' असा शेरा चटकन् मिळतो ! त्यामुळें ही बाई धीट नसेल तर गांगरून जाते. कच खाते. निराश होते. आणि असें झालें म्हणजे मग लक्षात येतें कीं, हा तिचा दोष नसून समाजानें स्त्री जीवनाला आज-पर्यंत ज्या दृष्टिकोणामधून वागविलें आहे त्या दृष्टिकोणाचा तो दोष आहे. ज्या समाजामधील पुरुषांनीं स्त्रीकडे केवळ उपभोगाची व हक्काची एक वस्तु याच भावनेनें पाहिलें, आणि आपल्या लहरीप्रमाणे एखाद्या भावलीसारखी तिला तिच्या भावनेचा विचार न करता वागविलें, त्या समाजातील स्त्रीलाहि आपलें म्हणून वेगळें वैशिष्टय दाखविण्याइतपत बडखोरी करायची हिंमत झाली नाहीं ती बिचारी रूढींनीं व चालीरीतींनीं तिच्यावर केलेले विध्वान् विध्वाचे कठोर प्रहार सहन करीत राहिली ! इतकेंच नव्हे तर तिच्या मनाचा पिंडच असा तयार होत गेला कीं, आपण कांहीं वेगळे केलें तर तें माणुसकीला धरून होणार नाहीं, अशी वेडी समजूत ती उराशीं बाळगून राहिली ! आणि त्याचा परिणाम तिच्या उभ्या आयुष्यावर झाला. तिचे व्यक्तिमत्त्व देखील याच चाकोरींतून घडत गेलें. तिची भावना त्या पद्धतीनें तयार झाली. त्यामुळें स्वाभाविक जीवनापेक्षा आपल्या वैयक्तिक जीवनाचाच तिनें अधिक विचार केला, आणि तेवढयावरच ती थांबली नाहीं तर पुरुषापेक्षा आपला दर्जा कमी प्रतीचा आहे हें मुर्दाडपणें रुजीत धरून तिनें स्वखुशीनें आपलें जग मर्यादित करून घेतलें ! आपण व आपलें कुटुंब यापली-कडच्या जगाची तिला कधींच फिकीर वाटली नाहीं. उलट तिच्याविषयीं अशीच कल्पना समाजानें स्वीकारली कीं—

"एखाद्या शहाण्या स्त्रीला कोठेंहि अधिकार गाजविण्याची इच्छा असत नाहीं. प्रेम करावें, मानानें जगावें, व आज्ञा पाळावी या कल्पनेंत तिला परा-कोटीचें समाधान मिळतें. तसेंच निसर्ग आणि परमेश्वर याच्यामुळें प्रस्थापित झालेल्या दंपतिधर्माला आनंदानें संमति देताना तिला एक वेळ माघार घ्यावी लागली

---

rather than vigour of perception, an intuitive insight into the delicate complexities of character, and an intensity and tenacity of passion "

History of English Literature P 259

( by Arthur Compton Rickqett )

तरी देखील ती डगमगत नाहीं तिला मनापासून असे वाटतें कीं, तिची निर्मिति ही आज्ञेसाठीं झालेली नाहीं त्यामुळें स्वाभाविकच ज्याचेकडून प्रेम, दया आणि न्याय यासंबंधीत चोख वागणूक मिळेल, त्याच्यापुढें मान वाकविण्यात किंवा त्याची आज्ञा मानण्यात तिला परमकोटीचें समाधान मिळते ” *

* * *

आजचा काळ अगदी बदलेला आहे, स्त्रियांचें शिक्षण वाढलेले आहे, आणि पुरुषाच्या बरोबरीने स्त्रिया आता विविध प्रकारच्या कार्यक्षेत्रातहि भाग घेऊ लागल्या आहेत त्याचबरोबर बदललेल्या व आजच्या सुधारलेल्या जगामध्ये स्त्रियांच्या घरकामातहि फरक पडत चालला आहे वेदकालीन स्त्रीप्रमाणें गाईची वा म्हशीची धार काढणे, दही घुसळणे, घडा घेऊन पाणी आणणे, सोमरसाच्या निर्मितीसाठीं त्या विशिष्ट झाडाच्या फांद्या आणून रस काढणें, कपडा विणणें, शेतीवर नजर राखणें इत्यादि घरगुती कामें आजच्या सुधारलेल्या पांढरपेशा स्त्रीला करावीं लागत नाहींत. अर्थात् शेतकरीवर्ग ह्या गोष्टीला अपवाद आहे

वेदकालीन स्त्री ही सर्व प्रकारच्या हस्तकौशल्यामध्यें, गायनवादनामध्यें आणि नृत्यकलेमध्यें निपुण होती एवढच नव्हे तर नव्या नवरीला सार्वजनिक सभेमध्यें कलापूर्ण असें व्याख्यान देता आलें पाहिजे व सभा जिंकता आली पाहिजे अशी अपेक्षा बाळगली जात असे ! आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यावेळची स्त्री घरगुती उद्योगाबरोबरच औद्योगिक क्षेत्रामध्यें आवडीनें लक्ष घालून बाण तयार करणे, धनुष्य तयार करणें, कपडा विणणे, टोपल्या बनविणें व शेती करणें इत्यादि गोष्टीमध्यें वाकबगार होत असे ! म्हणजे त्यावेळच्या समाजाला सर्वांगीण रीतीनें विकास पावण्यासाठीं स्त्रिया हातभार लावीत असत यासबधीं थोडक्यात सांगावयाचें व साराशाने बोलावयाचें तर असे म्हणता येईल कीं,

“ सामाजिक जीवनाच्या विकासाच्या दृष्टीनें त्यावेळच्या स्त्रीपुढें असा आदर्श असे कीं, शांततेच्या काळामध्ये स्वास्थ्य निर्माण करण्यासाठीं व युद्धामध्यें विजय

---

* “ A good woman has no desire to rule where she feels it to be her duty, as it is her highest pleasure to love, honour and obey, and she submits with cheerful acquiescence to that order in the conjugal relation which God and nature has established Woman feels that she is not made for command, and finds her truest happiness in submitting to those who wield a rightful sceptre in justice, mercy and love ”

Mrs Graves, The Feminine Character P 11

संपादण्यासाठीं आपली मदत व्हावी. युद्धातील यशासाठीं फार मोठ्या सैन्याची आवश्यकता असल्यामुळे स्त्रिया स्वखुशीनें प्रत्येकीला दहा पुत्र होण्यात व फार मोठ्या कुटुंबाच्या पोषणाची जबाबदारी पत्करण्यात धन्यता मानीत ! खेरीज जगभरच्या स्त्रियाना करावें लागणारें घरकाम सांभाळून फावल्या वेळीं त्या आपला उपयोग शेती करणें, सूत कातणें, कापड विणणें आणि युद्धाचीं अवजारें तयार करणें इत्यादि कामीं होईल हें पहात ! त्याचप्रमाणें धार्मिक जीवन व साहित्याचें क्षेत्र यामध्येंहि आपला वाटा उचलण्यांत त्या आवर्जून लक्ष घालीत. पुरुषांच्या बरोबरीनें त्याना शिक्षण मिळे. त्याच्यापैकीं काहींनीं तर आपल्या उच्चतम सांस्कृतिक जीवनाचा उपयोग लेखनासाठींहि केला असून कित्येकींचे काव्य वैदिक ऋचामधूनहि उपयोगात आणलें आहे. एवढेंच नाहीं तर वेदकालीन यज्ञयागामधून त्यानीं मोठ्या हिरीरीनें भाग घेतला असून, त्यायोगें सामाजिक जीवनाच्या विकासाला आवश्यक असलेल्या दैवी साक्षात्कारासहि आपण जिंकूं शकूं अशी त्याची भावना असे ! *

आजच्या काळामध्येंहि याच भावनेनें स्त्रिया आपलें घर सांभाळून सार्वजनिक जीवनामध्यें भाग घेत आहेत. परंतु हें प्रमाण फार कमी आहे. तथापि त्या दिशेनें पावलें पडायला अभिमानानें व चिकाटीनें सुरवात झाली आहे, असें निश्चितपणें म्हणतां येईल. तरी पण एक गोष्ट खरी कीं, आमच्या जुन्या काळच्या स्त्रियाचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून आजच्या बदलत्या काळानुसार स्त्रियानीं

---

* " The ideal before women in social life was to help society in procuring prosperity in peace and victory in war. The war of expansion required a numerous army; women cheerfully accepted the responsibility of rearing a large family with ten sons for each mother. Besides doing the household work, as women have got to do all over the world, they used to devote their spare time to agriculture, spinning, weaving and manufacturing war materials. They were keen to make their own contribution to the literary and religious life. They did not lag behind men in education; many women in cultured classes were also authers, some of whose poems have been included in the vedic canon. They enthusistically performed the vedic sacrifices, hoping thereby to secure divine favour, so necessary for the prosperity of society. "

( Great women in India. P. 29. )

आपलें कार्यक्षेत्र वाढवावयास सुरवात केलेली असली, तरी कांहीं जाणत्या स्त्रियानाच असें वाटतें आहे कीं, स्त्रीनें पुरुषाचें अनुसरण करण्यापेक्षा आपलें स्त्रीत्व वैशिष्ट्यानें टिकून धरलें पाहिजे, ते फार अगत्याचें आहे. कारण अद्यापहि प्राचीन संस्कृतीचा पगडा त्याच्या मनावर भरपूर आहे.

बदलत्या काळाच्या ओघाबरोबर स्त्रीजीवनाचा हा आदर्शहि बदलत गेला. कार्यक्षेत्र विकसलें. शिक्षणात वाढती प्रगति झाली. जीवनाकडे पहावयाची हिंमत वाढली. त्यामुळें स्त्रीजीवनाचे म्हणून खास वेगळे असे मानले गेलेले स्वभावभेद आता केवळ निसर्गसिद्ध मानून मागणार नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली. स्त्रीजीवनात आमूलाग्र बदल घडविणारी सुधारणा अस्तित्वात येत चालली. त्या कारणानें श्री. रिचर्ड कर्लमारख्या विचारवताना आवर्जून म्हणावेसें वाटलें कीं—

"स्त्रीस्वभावाची पारपारिक अशीं जीं वैशिष्ट्ये आहेत त्यासबधींच्या आपल्या कल्पनाना स्त्रियाच्या सामाजिक जीवनात घडून आलेल्या अलीकडच्या फरकानी एक प्रकारें आव्हानच केलेले आहे !"*

* * *

स्त्रीच्या अशा प्रकारच्या बदलत्या व्यक्तिमत्त्वाचे चित्रण आजवर प्रामुख्याने अनेक पुरुष लेखकानींच केलेलें आहे. त्याचा परिणाम मात्र असा झाला आहे कीं, स्त्रीच्या म्हणून ज्या विशिष्ट भावना त्यानीं रगविल्या आहेत, त्याचें स्वरूप दत्तक घेतलेल्या मुलासारखें झालें आहे ! स्त्रीच्या अत.करणातून प्रकट होणाऱ्या त्या सच्या भावना नव्हेत. स्त्रीला काय वाटत असेल याची कल्पना करून माडल्या गेलेल्या त्या कल्पना आहेत. त्यामुळे स्त्रीच्या जीवनाचें खरें चित्रण यथें झालें आहे असे म्हणता येणार नाहीं. अर्थात् हरीभाऊ आपट्याच्या सारख्या कांहीं लेखकानीं स्त्रीजीवनाचा बारकाईनें अभ्यास करून व जास्तींत जास्त मेहनत घेऊन आपल्या लेखनातून स्त्रीजीवन रगविण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला आहे. परतु हा प्रयत्न एक तर अल्पसा आहे, आणि दुसरें असें कीं, तो कांहीं झाले तरी पुरुषाच्या दृष्टिकोणामधून झालेला आहे. त्या कारणानें अशा कलाकृतींचें सानद स्वागत करीत असताना, एक विचार मनाला असा स्पर्श करून जातो कीं, हेच एखाद्या बाईनें लिहिलें असतें, तर आणखी चागले झालें नसतें कशावरून ? कारण

* "Recent changes in the Social position of women have challanged our views concerning the so-called eternal traits of the feminine character."

Foreword, The feminine character.

एखाद्या बाईने आपल्या अनुभवामधून रगविलेले स्त्रीजीवन आणि एखाद्या पुरुषाने आपल्या अनुभवामधून रगविलेले स्त्रीजीवन यात बराचसा फरक असणे स्वाभाविक आहे पण जोपर्यंत स्त्रियानीं हातात लेखणी घेऊन आपल्या भावनाना वाचा फोडली नाहीं, तोपर्यंत पुरुषानीं चित्रित केलेल्या स्त्री जीवनावरच विसबून रहाणे भाग आहे आणि तें देखील ज्या वाङ्मय प्रकारामध्यें ज्या पद्धतीनें स्त्रीजीवनाचा आविष्कार झाला असेल तो प्रातिनिधिक स्वरूपाचा आहे असें मान्य करून ! कारण पुरुषाच्या लेखणीतून उतरलेली स्त्री ही त्याना पाहिजे होती, दाखवायची होती, तशीच ती शब्दचित्राच्या किंवा स्वभावरेखेच्या रुपाने समाजापुढे आलेली असते * पण खरी स्त्री रगविलेली पहायची असेल तर ती एखाद्या कुशल स्त्रीच्या लेखणीतून उतरलेलीच असावयास पाहिजे कारण वस्तुस्थिति अशी आहे कीं, आपल्या शरीरातील जीवनरसानें आपल्या अपत्याचें पोषण करीत असताना जी त्यागवृत्ति स्त्रियाच्या अत करणात विकास पावत, तिचा यथार्थ अनुभव हा तिनेंच सागितला तर तो जिवत वाटेल एरव्ही पुरुषानी केवळ कल्पना करून अगर ऐकीव माहितीवर विसबून ही कल्पना माडली, तर तिला म्हणावा तसा जिवतपणा येणार नाहीं फार तर एखाद्या विषयावरील रुक्ष निबधासारखें तें विवेचन होईल किंवा एखाद्या डॉक्टरनेंच तो प्रश्न हाताळला तर त्यास शास्त्रीय विवेचनाचें श्रेय द्याव लागल परतु ह्या भावनेची खरी ह्द्यता स्त्रीच्या लेखणीमुळेंच वैशिष्ट्यानें पहा वयास मिळेल कारण हा भावनाविष्कार तिच्या अनुभवानें रगलेला असतो ती आपलें म्हणून काहीं अशा वेळीं बोलत असते असें हें जें तिचें आपलें म्हणून वेगळें वैशिष्ट्य आहे, हा जो तिचा स्वतत्र असा आविष्कार आहे, त्याचेंच मूल्यमापन ह्या प्रबधामध्यें करावयाचें आहे म्हणजेच प्रस्तुत प्रबधामध्ये स्त्रियानीं निर्मिलेल्या मराठी साहित्याचें परिगणन व मूल्यमापन करावयाचें आहे. त्यासाठीं मराठीच्या प्रारभ कालापासून ता अगदीं आजतागायत प्रसिद्ध झालेल्या स्त्रियाच्या काहीं निवडक ग्रथाचा इथें उपयोग करण्यात आलेला आहे हें वाङ्मय प्रामुख्यानें लक्षित आहे त्यामुळें स्त्रीच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्वाचा आविष्कार कसा झालेला आहे

---

* " She has been repeatedly portrayed in plays and novels and we can sense her peculiar influence in lyric poetry which so often celebrates her She figures in myths and legends, but she is always shown from the main point of view A mass of literature has grown up about them, but the explanation is always based on the man's idea of the woman, it is never the woman's interpretation of herself "

( The way of all women P 4 )

हें पहाणें अर्थातच सोईचें होईल कारण विशेषत ललित वाङ्मयामध्येंच लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार झालेला असतो हें तत्त्व आता सर्वमान्य झालेलें आहे

* * *

अगदीं सुरवातीच्या काळामध्यें आपलें म्हणणें इतरांच्यापुढं मांडाव आणि इतरांचं म्हणणें आपल्याला समजावें या भावनेनें मनुष्यप्राणी गोष्टी सागणे व गोष्टी ऐकणें यांत विलक्षण आनंद मानीत असे, आणि अगदीं आजच्या काळामध्ये देखील मानवाच्या या स्वभावामध्ये खंड पडलेला नाहीं मानवी मनांतील हा एक स्थायीभाव आहे. त्यामुळें आपल्यासह व आपल्या व्यतिरिक्त असे जगाचें ज्ञान करून घेण्यासाठीं गोष्टींचा वापर करण्याची ही मानवाची कला त्याच्या हृदयांत खोल जाऊन रुजलेली आहे आणि ती मानवी जीवनाच्या अंतापर्यंत अखंड राहील यात शंका नाहीं.

या गोष्ट सांगण्याच्या व ऐकण्याच्या कलेमध्यें आजवर पुरुषांच्याप्रमाणेंच स्त्रियांनींहि भाग घेतलेला आहे. जुन्या काळच्या बायका पुरुषांच्याप्रमाणेंच आपल्या मुलाबाळांना व नातवंडांना परंपरेनें चालत आलेल्या लोककथा सांगताना अद्यापहि कुठें कुठें दिसून येतात मात्र त्यांची ही गोष्ट स्मरणशक्तीच्या बळावर पिढ्यान् पिढ्या तग धरून राहिलेली असते, आणि तिची जोपासना मानवाच्या ओठावर अखंडपणें झालेली असते हें विशेष होय.

स्त्रियांनीं सुरवातीला गोष्ट ऐकण्याच्या व सांगण्याच्या कलेचा मोठ्या प्रमाणावर विकास केला आणि नंतर जेव्हा त्यांना अक्षर ओळख झाली व त्या लिहायला शिकल्या तेव्हा त्यांनीं येत असलेली गोष्ट प्रथम लिहायला आरंभ केला.

त्यांनीं आपल्या ललित लेखनाला प्रारंभ केला तो एखाद्या लहानशा गोष्टीचा विकास करण्यासाठीं आणि त्या गोष्टीचा गाभा जो ठेवला तो देखील प्रीतिरसाला आळविण्यासाठी असाच ठेवला * तसेंच आपल्या लेखनाला त्यांनीं आधार घेतला तो स्वत ला माहीत असलेल्या जगाचा व आलेल्या अनुभवाचा असाच घेतला.

त्यामुळें एक गोष्ट प्रामुख्यानें या संदर्भात लक्षात घ्यावी लागेल ती अशी कीं, स्त्रियांच्या या साहित्याचें मूल्यमापन जें करावयाचें तें त्यांना मिळालेल्या संधीवर अवलंबून राहील असेच किंवा ती संधि लक्षात घेऊनच करावयाचें.

---

* "Women make their entrance into fiction with the development of the short tale such as novella, which had love interest as its pivotal point"

(Women Writers P 12)

एरव्हीं त्याना योग्य तो न्याय मिळेलच असे नाहीं. कारण त्याचें जगच पुरुषाच्या मानानें वेगळें व मर्यादित असें असते; आणि याची चर्चा मागें आली आहेच.

स्त्रियानीं आपल्या स्वतःच्या भावना आपल्या शब्दामध्यें व्यक्त करायला सुरवात केली, म्हणजे त्या आविष्कारात कांहीं वेगळेपणा येऊ शकतो किंवा काय, हे पहावयाचे म्हणजे काही उदाहरणें लक्षात घेणें अगत्याचें आहे. या संदर्भामध्ये अगदीं जुन्या काळचे उदाहरण म्हणून वेदकालीन स्त्रीनें केलेला खास आपल्या अशा भावनेचा पुढील आविष्कार पहाता येईल—

"इमा खनाम्योषधिं वीरुधं बलवत्तमाम् ।
यया सपत्नीं बाधते यया संविन्दते पतिम् ॥ १ ॥
उत्तान पर्णे सुभगे देवजूते सहस्वति ।
सपत्नीं मे धम पतिं मे केवलं कुरु ॥ २ ॥
उत्तराहमुत्तर उत्तरेदुत्तराभ्यः ।
अथा सपत्नी या ममाऽधरा साधराभ्यः ॥ ३ ॥
न ह्यस्या नाम गृभ्णामि नो अस्मिन् रमते जने ।
परामेव परावतं सपत्नीं गमयामसि ॥ ४ ॥
अहमस्मि सहमानाऽथ त्वमसि सासहिः ।
उभे सहस्वती भूत्वा सपत्नीं मे सहावहै ॥ ५ ॥
उपतेऽधां सहमानामभि त्वाधां सहीयसा ।
मामनु प्र ते मनो वत्सं गौरिव धावतु पथावारिव धावतु ॥ ६ ॥*

[ अर्थः—१. जीमुळें सवतीला त्रास होतो आणि तिला पति प्राप्त होतो, ती ही बलवानातली बलवान् असणारी लतारूप ओषधि मी खणतें.

२. हे उताणी पानें असलेले, भाग्यदाते, देवानीं निर्माण केलेले आणि पराभव करणारे ओषधि, माझ्या सवतीला घालव आणि नवरा केवळ माझा कर.

३. हे उत्कृष्ट ओषधि, मी उत्कृष्टातले उत्कृष्ट व्हावें आणि जी ( माझी ) सवत आहे ती निकृष्टातील निकृष्ट व्हावी.

४. मी ह्या सवतीचें नावहि घेणार नाहीं. तिच्याबरोबर कोणी खेळत नाहीं. मी सवतीला अत्यंत दूर देशालाच घालवितें !

५. हे ओषधि, मी पराभव करणारी आहें. तू पराभव करणारी हो. आपण दोघीहि पराभव करणाऱ्या होऊन सवतीचा पराभव करू.

६. हे पतिदेवा, सवतीचा पराभव करणारी ही वनस्पति तुझ्या ( डोक्या )-जवळ मी ठेवतें. पराभव करणाऱ्या ओषधीनें तुला धारण केलें आहे. गाय वासराकडे किंवा पाणी उतरत्या मार्गानें जातें, त्याप्रमाणें तुझें मन माझ्याकडे धावो.]

---

* ऋषिका इंद्राणी, ऋग्वेद, मंडळ १०, सूक्त, १४५, ऋचा १ ते ६.

सवतीच्या कल्पनेमुळें स्वतःच्या मनाला पोंचणारा धक्का या प्रकारें इंद्राणीनें व्यक्त केलेला आहे. सवतीमत्सर हा स्त्रीस्वभावाचा एक विलक्षण धर्म आहे ! त्याचाच हा आविष्कार होय. त्यामुळें असं म्हणता येईल कीं, ही भावना केवळ स्त्रीच्याच मनात विशेषत्वानं उद्भवणारी आहे आणि म्हणूनच एवढ्या उत्कटतेनें तिचा आविष्कारहि झालेला आहे.

वेदकालीन वाङ्मयातील स्त्रीच्या लेखणीचा हा आविष्कार तिच्या व्यक्तिमत्त्वाचें निःसंशय वेगळें वैशिष्ट्य दर्शवीत आहे. तेव्हा या दृष्टीनें वेगवेगळ्या कालखंडातील व वाङ्मयप्रकारातील स्त्रियांच्या साहित्याचें स्वरूप पुढं पहावयाचें आहे. त्यापूर्वी ठोकळमानानें स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वाबद्दलचा पुढील निष्कर्ष काढता येण्यासारखा आहे.

नैसर्गिक भेदामुळें असो किंवा परिस्थितिजन्य संस्कारामुळें असो, वाङ्मयात आविष्कृत होणारें स्त्रीचें सर्वसामान्य व्यक्तिमत्त्व निदान मराठीपुरतं तरी पुढील विशेषांनीं युक्त असलेलें दिसून येतं.

स्त्री ही पुरुषापेक्षा अधिक प्रेमळ, भावनाप्रधान व त्यागी आहे. तिची दृष्टि वैयक्तिक, मूर्त व नजीकच्या प्रश्नाकडे अधिक वळलेली असते. अधिक खोलवर जाऊन एखाद्या प्रश्नाचा दूरवरच्या दृष्टिकोणामधून ती विचार करूं शकत नाहीं. ती धार्मिक प्रवृत्तीची असून तिच्या मनाचा कल हा परंपरेच्या उच्छेदापेक्षा तिच्या रक्षणाकडेच अधिक झुकलेला असतो. वात्सल्य, सौम्यपणा, विनय, भौतिक वैभवाची आवड, मानीपणा व व्यवहारचतुरता हे तिचे विशेष गुण आहेत. मानवाच्या संसाराला सौंदर्य आणि स्थैर्य तिच्यामुळेच प्राप्त झालं आहे. परानुनय, चातुर्य किंवा दुसऱ्याचें मन आपल्याकडे वळविणें हा गुण स्त्रीमध्येच विशेषेंकरून दिसून येतो. ध्येयवादापेक्षा व्यवहाराकडे, उलथापालथीपेक्षा अनुसंधानाकडे आणि गतीपेक्षा स्थितीकडे तिच्या मनाचा ओढा अधिक असतो.

शीलसंरक्षण, पातिव्रत्य व कुलाभिमान हीं स्त्रीचीं मानस्थानें आहेत. एखाद्या विषयाबाबत तिचे ग्रह लौकर बनतात हे खरं असलें, तरी एकदा बनलेले ग्रह ती लौकर सोडीत नाहीं ही गोष्टहि तितकीच खरी आहे. स्वतःचें वर्चस्व गाजविण्याची प्रवृत्ति क्षणभर बाजूला ठेवून दुसऱ्याच्या कलानें घेणें, आपण पुढाकार घेण्यापेक्षा पुढाकार घेणारास सहाय्य करणें, आणि बाह्य संस्काराचा परिणाम मनावर झटकन् करून घेणें इत्यादि इतरहि कांहीं विशेष तिच्या बाबतींत सांगता येतील. अर्थात् हे सर्व विशेष सर्व सामान्य स्त्रीच्या ठायीं दिसून येणारे असे आहेत.

याखेरीज प्रत्येक स्त्रीचें स्वतःच असें निराळें व्यक्तिमत्त्व आढळून येतें तें वेगळेंच. त्याचप्रमाणें स्त्रियांचे म्हणून मानले जाणारे कांहीं स्वभावविशेष कांहीं पुरुषांत आणि पुरुषांचे कांहीं स्वभावविशेष कांहीं स्त्रियांत असलेले कितीतदा

आढळून येतात ! पण तें केवळ अपवादात्मक आहे, हें मात्र जरूर ध्यानांत घ्यावयास हवें आहे.

शेवटीं भारताच्या एक दिवंगत पण श्रेष्ठ कवयित्री सौ. सरोजिनीदेवी नायडू यांच्या कल्पनेप्रमाणे सध्यां इथे एवढेच सांगतां येईल कीं, भारताच्या आधुनिक स्त्रीजीवनानें प्रभावीपणें घातलेला हुंकार या प्रबंधाच्या पानापानांवर ऐकायला मिळतो आहे. आणि या हुंकारानें मानवी मूल्यांचा अतिशय जिव्हाळ्यानें इथें विचार केलेला आहे.*



* "The voice of modern Indian womanhood speaks through these pages that treat of topics of the most divine human value and interest."

Sarojini Naidu. "Women in Modern India."

.२.

## प्राचीन मराठी काव्य

सात शतकांची उज्ज्वल परंपरा लाभलेली मराठी कविता पहिल्यांदा जेव्हां लोकांच्या नजरेला पडली, तेव्हा तिने त्या लोकांच्या अंतःकरणावर असामान्य प्रभुत्व गाजविलें. मनाचा निर्भेळपणा, स्वभावातील मार्दव, अंतःकरणांतील प्रौढ भाव आणि संस्कृतीचें अभिजात वळण या गुण-समुच्चयामुळें तिने तेव्हाच मराठी मनाची पकड घेतली. मनात आलें ते तिने बोलून दाखविलें. सभोवतालच्या क्रांतिकारी जीवनाचा तिनें आविष्कार केला. तसेंच त्या वेळच्या समाजाची वृत्ति निवृत्तिपर आणि अध्यात्माभिमुखी असल्यामुळें तिने याच मनोवृत्तीला आपल्या वतीनें वाचा फोडली. अशी ही मराठी कविता सुरुवातीला जी मिळाली, ती यादवकालीन महानुभावाची होती. मराठींतील सर्वांत प्राचीन अशी ग्रंथरचना यादवकालीन महानुभावी कवींनीं केली आहे आणि त्यांच्या या ग्रंथरचनेपासून मराठीचा प्रारंभकाल असे निदान आज तरी मानलें जाते आहे. तसेंच त्यावेळच्या प्रारंभीच्या कालखंडास मराठी कवितेचा आध्यात्मिक कालखंड असेंहि समजण्यात येते.

सामान्यतः मराठीचा हा पहिला कालखंड ज्ञानदेव ते तुकाराम असा मानण्यांत येतो. या कालखंडांतील कवितेने प्रामुख्यानें ओंवी छंद हाताळलेला आहे. ज्या छंदामध्यें सर्व प्रकारचें वाङ्मय सुलभतेनें ओंवता येतें, ती ओंवी होय. ओंवी म्हणजे मराठीची जणुं गायत्रीच होय! " ॐ! म्हणजे ईश्वरतत्त्व. विराट्, व्यापक, विशाल, सर्वांचा समावेश करणारें असें ब्रह्माचें सगुण स्वरूप. ॐ! हें अक्षर आहे आणि शब्दहि आहे. शब्द या नात्यानें ॐ! चा अर्थ ' होय ' असा आहे. ॐ! हें ईश्वराचें ' होय ' रूप आहे.. .अक्षर या नात्यानें तो वर्ण मात्रांचें प्रतीक मानला जातो. त्याची सुरवात ' अ ' पासून आहे आणि शेवट ' म ' मध्यें आहे. या दोहींना जोडणारा ' उ ' साधा आहे...वर्णांचा उगम कंठातून होतो आणि समाप्ति ओंठात...कंठ व ओष्ठ यांच्या मधल्या स्थानातून उत्पन्न होणाऱ्या वर्णांचा प्रतिनिधि म्हणून ' उ ' उभा आहे. ' उ ' म्हणजे उभय, इकडला व तिकडला साधा जोडणारा. मिळून सर्व सारस्वत, सर्व साहित्य, सर्व शुभाशुभ वाङ्मय ॐ! मध्यें येऊन गेले. ही उपपत्ति काल्पनिक खरी, पण अशा प्रकारें सगळ्या वाणींचें एक प्रतीक कल्पिण्यांत व्यापक, विश्वरूप, ईश्वर-

तत्त्वाचें चिन्ह म्हणून ते चिंतनाला उपयोगी पडतें. "* आणि म्हणूनच सर्व वाङ्मय ज्या छंदात सुलभतेनें ओंवता येतें ती ओंवी होय. तेव्हा अशा या ओंवी छंदाचा वापर या अध्यात्मिक कालखंडातील कवींनी मोठ्या कौशल्यानें केलेला आहे.

काव्यलेखनाच्या दृष्टीने विचार करता असें दिसून येतें कीं, या कालखंडातील कवींची मनापासून अशी श्रद्धा होती कीं, त्यांच्या हातून होणाऱ्या काव्यलेखनाचें कर्तेपण हें त्यांचेकडे जात नव्हतें ! कारण त्यांची अशी समजूत होती कीं, खुद्द परमेश्वरच तें अंत प्रेरणेनें आपणाकडून निर्माण करवीत असतो ! स्वतः-कडे फक्त त्यानीं निमित्तमात्र म्हणूनच पाहिलें.

या कवींच्या काव्यलेखनाचें दुसरें एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे त्यानीं आपली "काव्यसृष्टि केवळ काव्यासाठीं म्हणून उभारलेली नाहीं. तर भक्तीचा प्रचार करून सारें जग परमार्थाच्या वाटेस लावणे हा ही वाङ्सृष्टि निर्माण करण्यात त्याचा 'परभाव' आहे." ‡

आपल्या काव्यनिर्मितीबाबत खुद्द तुकोबानीं असें स्पष्टपणें सांगितलें आहे कीं—

" संतांचे सेविलें तीर्थ पायावणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ॥
वचनें मानिलीं नाहीं सुहृदाचीं । समूळ प्रपंचीं वीट आला ॥
सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥
यावरीया झाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिलें चित्तीं विठोबाचें ॥ "

म्हणजे आपल्या काव्यलेखनाची पार्श्वभूमि सांगताना इथें तुकोबानीं आपल्या मनाची अवस्था बोलून दाखविली आहे. आणि अखेरीस असा निर्वाळाहि देऊन टाकला आहे कीं—

" तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल—पांडुरंगें । " तेव्हा " या उद्गारावरून एक पक्षीं या कविवर्यांची निरहंकार व विनयपूर्ण वृत्ति जशी प्रकट होते, तशीच दुसऱ्या पक्षीं त्यांच्या ठायीं—

आम्ही वैकुंठवासी । आलों याच कारणासी ।
बोलिले जें ऋषी । साचभावें वर्ताया ॥

---

* स्थितप्रज्ञ-दर्शन. आचार्य विनोबा भावे.

‡ रा. द. रानडे. प्रस्तावना. पाच संतकवी.

आपलें कवित्व हें जीविताचें इतिकर्तव्य असल्याची भावनाहि दिसून येते. " *

या कालखंडातील कवींनीं अशा प्रकारची आपली मनोभूमिका स्पष्ट करताना महाराष्ट्रातील मराठी मनाची भूमिका तयार केली. तिच्यामध्यें धर्माभिमानाचें बीज रुजविण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यावेळच्या महाराष्ट्राला अध्यात्माची व निवृत्तिपर भक्तीची उत्तम शिकवण मिळत गेली. अर्थात् या शिकवणुकीला पोषक असें साहित्यहि त्यामुळें स्वाभाविकच या कालखडानें निर्माण केलें आहे.

"वाचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्व। स्पर्शु जैसा॥" ज्ञानदेवानीं सत्काव्याची व्याख्याच मुळीं अशा प्रकारें केली आहे. त्यांच्या मतें सत्काव्य हे जसें रसात्मक असलें पाहिजे, तसेंच ते परतत्त्वाला स्पर्श करणारें अगर जीविताचें रहस्य उकलून दाखविणारेंहि असले पाहिजे

"काव्य प्रभावशाली होण्यास प्रसाद, माधुर्य इत्यादि काव्य गुणाची आवश्यकता आहे. निर्मल व शात जलाशयात पाहणाऱ्यास आपलें प्रतिबिंब स्पष्ट उमटलेलें दिसतें, त्याचप्रमाणें प्रासादिक ग्रथात प्रतिबिंबित झालेलें प्रमेय वाचकाच्या स्पष्ट अनुभवास येतें. गहन विषय सहज सुदर भाषेत सागणे, हे कार्य कठीण आहे त्यानून प्रसाद गुणास नादमाधुर्याची जोड मिळाल्यास पहावयासच नको. असें उभयगुणयुक्त काव्य म्हणजे ज्ञानदेवाचाच दृष्टान्त द्यावयाचा तर 'सहजें मऱ्यानिलु मदु सुगधु। तया अमृताचा होय स्वादु। आणि तेथेंचि जोडे नादु। जरी दैवगत्या॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी। स्वादें जिव्हेतें नाचवी। तेवींचि कानाकरवीं। म्हणवी बापु माझा॥ (अ. ४। २२०-२२१ ज्ञानेश्वरी) ज्ञानदेवाना असे प्रसन्न मधुर काव्य निर्मावयाचे होतें." † आणि त्याच्या प्रसारासाठीं त्यानीं ज्ञानदेवी सारखा महान् ग्रथ लिहिला. गीतेसारख्या मूळ संस्कृत ग्रथावर ज्ञानदेवी ही टीका त्यानीं लिहिली. एवढेच नव्हें तर मूळचें संस्कृतातलें सर्व धार्मिक भावाचें ब्रह्मविद्येचें भाडार त्यानीं बहुजनसमाजाला आपल्या टीकेच्या रूपानें उघडे करून दिलें. नामदेवासारखा उत्तम कीर्तनकार हाताशी धरून टाळमृदगाच्या निनादात ज्ञानदेवानीं आपल्या विचाराची आम मराठी मनात पेरणी केली

आणि अशा प्रकारच्या ज्ञानसवर्धनाचा व ज्ञानदानाचा महान् प्रयोग त्यावेळच्या थोर कवींनीं केला. तसेच त्यांच्या या महान् कार्याला त्यावेळच्या काहीं कवयित्रींनीहि हातभार लावला, ही विशेष उल्लेखनीय गोष्ट होय. ह्या कवयित्री कुणी मोठ्या विदुषी नव्हत्या तरी त्या भगवताच्या एकनिष्ठ उपासिका

---

* मराठी साहित्य समालोचन पा. ३३.

† श्री. श. वा. दाडेकर. सार्थ ज्ञानेश्वरी प्रस्तावना. पा. ३६

होत्या भगवंतावर त्याची जगी मनोभावें भक्ति होती तशीच दृढ निष्ठाहि होती. भगवंताशीं त्या एकरूप होऊं पहात होत्या. भगवंताच्या जीवनात आपलें जीवन विलीन करण्यासाठीं त्यांची धडपड चालली होती त्यामुळें त्यांची कविता अतिशय प्रेमळ झाली तिनें हृदयाची भाषा केली. " शिवाय तींत स्त्री स्वभावातील मार्दव, भावनांची उत्कटता आणि भावनेचा साधेपणा हीं वैशिष्ट्यें असल्यामुळें संतकवींच्या कवितेपेक्षा ही संतकवयित्रींची कविता पुष्कळ बाबतींत अगदीं स्वतंत्र आणि पृथगात्म अशी झाली आहे. "*

## मराठीच्या प्रभात कालातील कवयित्री

### महदाइसा ऊर्फ महदंबा

यादवकालीन समाजामध्यें चातुर्वर्ण्यामुळें जन्मजात उच्चनीचतेच्या कल्पना रूढ झालेल्या होत्या. त्या कारणानें लोकांच्या मनात निर्माण झालेली असंतोषाची भावना समाजरचना विस्कळित करण्यास कारणीभूत झालेली होती. समाजाची ही स्थिति सुधारावी आणि समानतेच्या भूमिकेवर लोकांना जगतां यावें, म्हणून या काळात एका मोठ्या पंथाची नव्यानें स्थापना झाली. ह्या पंथाचें नाव महानुभाव पंथ असें होतें, आणि हा पंथ स्थापण्याचा प्रयत्न त्यावेळीं श्री चक्रधर स्वामींनीं मोठ्या धडाडीनें केला होता प्राचीन काळातील धार्मिक विचारसरणीस अनुसरून श्री चक्रधरस्वामींनीं ह्या पंथाचा धर्मग्रंथ म्हणून श्रीमद्भगवद्गीता या ग्रंथास मान्यता दिली त्याचबरोबर त्यांनीं श्रीकृष्ण व दत्तात्रय या दोनच देवता आपल्या उपासनेच्या देवता म्हणून ठरविल्या.

महानुभाव पंथातील क्रांतिकारी विचारसरणीमुळें चातुर्वर्ण्यातील विषमतेची तीव्रता त्यावेळच्या समाजामध्यें कमी होत गेली म्हणजे सर्व वर्णांचे घटक मानवी प्राणीच व सर्व पापपुण्याचे ते सारखेच साधक, असें असता एक श्रेष्ठ व दुसरा कनिष्ठ असे मानणें चुकीचें या विपरीत असल्याची शिकवण महानुभवानीं समाजाला दिली तसेंच या महानुभाव पंथानें स्त्रियांना उदार दृष्टीनें चांगल्या प्रकारची वागणूक दिली. "पुरुष देहाला हा पंथ ज्ञानप्राप्तीचे दृष्टीनें अधिक महत्त्व देत असला, तरी स्त्री देहात मुक्ति मिळू शकत नाहीं, असें त्याचें मत नव्हतें "$ या स्त्रीविषयक उदार धोरणामुळे ह्या पंथाच्या प्रचाराचे कार्यासाठीं काहीं स्त्रियाहि आघाडीच काम करू लागल्या, आणि त्याचें ठळक उदाहरण म्हणजे महदंबा हें होय.

---

* श्री आजगावकर. प्रस्तावना महाराष्ट्र संतकवयित्री.

$ डॉ. कोल्ते. महानुभाव तत्त्वज्ञान. पान ४८८.

श्रीचक्रधर स्वामींनीं आपल्या कल्पनांचा प्रसार करतांना जे अनेक शिष्य मिळविले, त्या शिष्यांमध्यें महदाइसा ऊर्फ महदंबा हिचाहि समावेश होतो. महानुभावांच्या प्रसिद्ध व ठळक ग्रंथांच्यामध्यें या महदंबेच्या 'धवळ्यां'चाहि समावेश झालेला आहे.

ह्या महदंबेचें मूळचे नांव 'रूपाई' किंवा 'रूपाबाई' असे होतें. 'महदाईसा' व 'महदंबा' हीं तिचीं नंतरचीं नांवें आहेत. महानुभाव वाङ्मयात महदाइसा हें नांवच विशेष प्रचारांत आल्यानें याच नांवावरून जगाला तिची ओळख झालेली आहे. श्रीचक्रधरस्वामींनीं तिच्या पणजीवरून तिचें हे नांव ठेवलें. 'लीलाचरित्रा'च्या एका पोथींत पूर्वार्धामध्यें यासंबंधींची हकीकत आली आहे, ती अशी—

"माहादाइसे नामकरणः ॥ एक दीं गोसावीयांसी (चक्रधराला) उदयाचा पूजावसर जालेयानंतरें रुपाबाईसीं म्हणितलें : जी जी वायनायकाची (महदाइसेच्या बापाची) आजी तथा नावं माहादाइसे : तीयें कैसी जी प्राज्ञे : काहीं याचीलें होतें जी : आन तयातें म्हाळाइसे प्रसन्न होती : तयासि प्रत्यक्ष बोले जी : तीयें महादेवरायाची पुरोहितेः राजा तयातें भलते होइक (= भविष्य) पुसे जी : ते तयासि भवीस (ष्य) स्फुरे जी : आन एक वेळ तेहीं विद्वांस जीतीले जी : ऐसीया जी प्राज्ञः बाइला : परि आपण (स्वतः रूपाई) कांहींचि नेणींजे जी : यावरि गोसावींयें म्हणीतलें : बाइ माहादेवरायाचीए ठाइ तीए माहादाइसें : आन तुम्ही एथीची (चक्रधराची) माहादाइसें : तीए तयासि बोलत : तुम्ही यासी (चक्रधरासी) बोलावें : हें काइ जी : मी काइ बोलों जाणें : मग गोसावीयें म्हणितलें : तरि हेंचि (चक्रधरच) तुमसीं बोलेल की ; जी जी म्हणौनि श्रीचरणा लागली : ॥ २५० ॥" *

या महदाइसेचें महदंबा हें संस्कृत भाषेंतील रुपांतर होय. केसोबाच्या 'रत्नमालास्तोत्रम्' या संस्कृत काव्यांत हें नांव आढळतें. तेव्हां महदाइसेचें महदंबा नांव करणारा तोच पहिला ग्रंथकार असावा.

महदाइसेची चरित्र विषयक माहिती 'इतिहास', 'लीलाचरित्र', 'ऋद्धिपुरलीला' व 'स्मृतिस्थळ' या ग्रंथांतून प्रामुख्यानें आलेली आहे. त्यावरून तिच्याबद्दल असें म्हणता येईल कीं, "महदाइसा जशी अत्यंत विरक्त होती तशीच ती जिज्ञासूहि होती. स्वामींना नाना प्रकारचे प्रश्न विचारून ती आपली जिज्ञासा तृप्त करीत असे. त्याचमुळें "स्वामींनीं तिला निरय (उत्त. १०२), ब्रह्मानुभूति (उत्त. २७७), कलिधर्म (उत्त. ३०९), संन्यास (उत्त. ४४१), जीवप्रपंच व ईश्वर (उत्त. ४८९, ४९०) इत्यादींचें निरुपण केलें. अशा निरुपण

---

* प्रस्तावनाः—आद्य मराठी कवयित्री वा. ना. देशपांडे.

प्रसंगींच स्वामींनीं महदाइसेला ' डोळेयाचा ' (उत्त. २७८), दीक्षित कन्येचा, धर्म चांडाळाचा (उत्त. १२५) वगैरे अनेक दृष्टांत सांगितले. नागदेवाच्या खालोखाल अधिक दृष्टांत स्वामींनीं महदाइसेलाच निरूपण केले होते. या जिज्ञासू वृत्तीमुळेंच तिनें स्वामींना एकांकीच्या अनेक लीळा विचारून घेतल्या. किंबहुना चक्रधर स्वामींचें पूर्वचरित्र त्यांच्या मुखावाटे आपणाला उपलब्ध करून देण्याला महदाइसेची जिज्ञासाच कारणीभूत झालेली आहे, असें म्हटलें तर चुकीचें होणार नाहीं. ती जशी जिज्ञासू होती तशीच चर्चकहि होती. पुराण वगैरे ऐकल्यावर ती स्वामींबरोबर नेहमींच चर्चा करीत असे. म्हणून स्वामींनींच ' म्हातारी जिज्ञासकः म्हातारी चर्चकः म्हातारी एय काही पुसतचि असे : ' (उत्त. ४९१) असे उद्‌गार तिच्याविषयीं काढलेले आहेत. "*

या महदंबेला काव्यस्फूर्ति अगदीं सहज होत असे. त्यासबंधींचें उदाहरण म्हणून श्रीचक्रधर स्वामी पैठणला असताना त्यांच्या उपाहारासाठीं सोजी काढताना तिनें गाइलेल्या पुढील ओव्या लक्षात घेण्याजोग्या आहेत.

> गोमतीए तीरीं : निळेया गुढरा : राजेया गुजरा : कृष्णराया
> नीळा गुढरु : राजा गुजरु : माणीकी मडपीं . श्रीचक्रधर
> गोमटें माजीटें : आखरुडीचें : राजेया डोंडीचें : चक्रधरा
> गोरे अंग बाहीया : डवरीया चदनें : श्रीचक्रधरा झणे : दीठी होए
> बापु म्हणे की भाइया : माझेया साजणी : गोत तों साजणीचाही यावो.

" यात ' बापु म्हणे की भाइया ' असा उल्लेख असल्यामुळें हें कर्तृत्व महदाइसेचें नसावें असें वाटण्याचा संभव आहे. पण या ओव्या ऐकून ' बाइः ऐसिया वोविया बापा भाऊवाणि गाइजति की ' या स्वामींच्या प्रश्नाला जी जीः गोसावीचि बापु : गोसावीचि भाऊ : गोसावीचि साजणी गोत ' हें तिनें दिलेलें उत्तर पाहिलें म्हणजे या ओव्या महदाइसेनेंच रचल्या असल्या पाहिजेत असें दिसतें. शीघ्र काव्यरचना करून चक्रधरस्वामींचें आर्ततेनें चिंतन करणें हा महदाइसेच्या स्वभावाचा विशेष स्वामींच्या प्रयाणानतरहि दिसून येत होता. ' नागदेवाचेया खांदावरि कर : राजा चक्रधरु बीजे करीं सोनेसळीं शेला · नेसला मालगंठी · म्हाइया आला भेटी : प्रभूचीये ' (स्मृ. स्थ. १२३) अशी चक्रधराची काव्यात्मक स्मरणें ती नेहमीं करीत असे ",† यापैकीं उत्तरोक्त असलेल्या ओव्या ऐकून नागदेव म्हणाला, " नाथाची नाथवाणि · आणि रूपैची सिद्धवाणि : "‡

---

* डॉ. कोलते श्रीचक्रधर चरित्र. पा. ८०

† डॉ. कोलते, श्रीचक्रधरचरित्र. पा. ८१

‡ ' स्मृ. स्थ ' क. १२३. पा ४१.

म्हणजे नागदेवासारख्या समकालीनास महदंबेच्या कवित्वाबद्दल गाढ आदर होता हे या स्मृतीवरून व्यक्त होते!

आजपर्यंत उपलब्ध झालेल्या मराठी वाङ्मयातील प्रथरचनेचा आद्य मान यादवकालीन महानुभाव पंथातील कवींच्याकडे जातो, हें मागे सांगितलें आहेच. तेव्हा या संदर्भात एक गोष्ट ठळकपणे लक्षात येते ती अशी की, आजच्या मराठीत साहित्यसेवा करणाऱ्या लेखिकांच्या दृष्टीनें परंपरा प्रवर्तक या नात्यानें महदंबा हीच सर्वात पहिली अशी कवयित्री होय. म्हणूनच मराठीच्या प्रभातकालातील लेखिकांच्या मध्ये तिला अग्रस्थान दिले जातें.

* * *

" महदंबेचे धवळे " या नावाने महदंबेचें काव्य प्रसिद्धीस आलें आहे. या काव्यामध्यें तिनें भगवान् श्रीकृष्णाची कथा सांगितली आहे. श्रीचक्रधरस्वामींना ज्यानीं पहिल्यांदा दीक्षा दिली त्या गोविंदप्रभूंच्या मनात एकदा श्रीकृष्णाचा विवाहोत्सव करण्याची कल्पना आली त्यामुळे नवरदेव श्रीकृष्ण हे आपल्या विवाहास तयार झाले आहेत, अशी कल्पना करून त्यानीं, महदंबेस नवरदेवाच्या करवलीचा मान दिला चक्रधरस्वामींनींहि महदंबेला तशी आज्ञा केली त्यावेळीं महदंबेनें श्रीकृष्णाची करवली होऊन त्या विवाहाच्या निमित्तानें जीं गीतें स्वतः रचून म्हणून दाखविलीं, तींच गीतें " धवळे " या नावान प्रकाशित झालीं आहेत.

' धवळे ' हा शब्द मूळच्या ' धवल ' या संस्कृत शब्दावरून आलेला आहे आणि त्याचा अर्थ लग्नात गावयाचे वरविषयक गीत असा होतो हा धवळ शब्द एकनाथाच्या ' रुक्मिणीस्वयंवरा 'मध्यें " सभा बैसली निज बोधें। ढवळे गाती आनंदें " ( १६ ४६ ) असा आलेला असून नरेंद्रानेंहि आपल्या ' रुक्मिणी-स्वयंवरा 'त त्याचा अनेकदा वापर केलेला आहे ( ओवी २७५३ इ. ) मूळ ' धवल ' शब्द हेमचंद्राचें ' छंदोनुशासन ' सोमेश्वराचा ' मानसोल्लास ' व शार्ङ्गदेवाचा ' संगीत रत्नाकर ' यात आला असून गुजराती भाषेतील ' धोळ ' शब्द त्याच शब्दावरून निर्माण झाला आहे,* या सर्व ठिकाणीं या शब्दाचा अर्थ विशिष्ट गीतप्रकार असाच अभिप्रेत झाला आहे

या धवळ्याच्या निर्मितीबाबत मूळ ऋद्धिपुर चरित्रामध्ये जी हकीकत आली आहे ती अशी —

" म्हाइंभटीं केसोबानायक विठ्ठल नायक परमेश्वर नायक रूपनायक मुख्य अवघे लोक पाचारिले ते सर्वेशातें पाहात माढवात नेले सर्वेश तयातें अवलोकिती मग म्हाइंभटीं अनेकांसि गद्यारत केलें विडे दीधले बाहीरि

* डॉ. ना. ग. जोशी, ' मराठी छंदोरचना ' पा. १८४–१४.

माडवाचा द्वारीं मगळतुरें: वाद्यतरें वाजति' मग ऐसा अवसरीं लोकु धवळ गाति: रुपदेवोबा चाग बोल्ा. म्हणे तें जवळीं नसताचि तेव्हाळि. सर्वज्ञ काकोसातें भणितलें. आमेली ( महदाइसा ) चाग बोला म्हणेना चाग बोला म्हण मग तेहि चाग बोला म्हणीतला: आन सर्वज्ञ बाइसातें भणितलें' आमेली गायेना भणे. गाये गाये भणे: भा: वाळिवाचा अवसरीं भणितलें आमेली गाये म्हणे: गायेना म्हणे: बाइसीं भणितलें गाये गाये जी. आवो काहीं गा: तरी धवल गावो जी: नागदेवो भागवताचे पाच धवळ गाइले. सर्वज्ञ भणितलें आमेली हें ना म्हणे आणिक काहीं गायें म्हणे तरी काये गाये जी. आमेली कृष्णरुक्मिणी गजरथतुरें या वाट ऐसें गाये म्हणे: वैगे गायेजी: चक्रधराचे सीरीं धरुनिया चरण ऐसें गाये: म्हणे: ऐसा वरु दीधला: मग बाइसा स्फूर्ति जाली' बाइसीं: श्रीचक्रधराचे सीरी धरुनिया चरणु. या पहिलीया कडवेया पासौनि लागला नीरुता जीरीं हे कडवेपर्येत भणितलें. "...

धवळे हे सयमक असून दर कडव्यात चार चरण येतात. सुप्रसिद्ध कन्नड कवि प्रा. य. रा. बेंद्रे यानीं धवळ्याच्या छंदाचा उगम हा द्राविड 'अक्कर' जातीच्या छंदात गवसत असल्याचे म्हटले आहे. * त्यानीं "श्रीकृष्ण रुक्मिणी गरजथ करे" वगैरे महदंबारचित धवळ्याची तुलना इ. स. ९०० च्या सुमारास पपकवीच्या 'मृगमगाळियं निर्वेय पक्केय गणिदम कडिय मार्कंडीय "...ह्या वृत्ताशीं केली आहे.

धवळे हा छंदप्रकार तेलगु वाङ्मयात आहे असेहि त्यानीं म्हटलें आहे.

डॉ. ना. ग. जोशी यानीं आपल्या मराठी 'छंदोरचने' ‡ मध्यें धवळ्याच्या छंदाबाबत बरेंच विवेचन केले आहे. त्याच्या मतें धवळ्याच्या रचनेत अष्टमात्रक आवर्तनें आढळतात. परतु " धवळ्याची रचना काहींशी ग्राथिक ओंवीसारखी असून तींत कसलींहि आवर्तनें शोधणें व्यर्थ आहे . त्यात काहीं स्थळीं अष्टमात्रक आवर्तनाचा आभास होत असेल, हे खरें. पण तें त्याचें व्यवच्छेदक लक्षण खचित नव्हे. धवळे गाताना मीं ऐकले आहेत व गाताना त्यात अक्षराची फारच ओढाताण होते ! म्हणून धवळ्यात गण, मात्रा, अक्षरसख्या याची अपेक्षा करणें निरर्थक आहे ! " † लोकसाहित्यात विखुरलेलीं कितीक विवाह विषयक गीतें ऐकताना देखील हाच अनुभव येतो. घरात लग्न निघालें म्हणजे होणाऱ्या आनदाला अशा वेळीं उधाण येतें, आणि बायका मनातील भावना गीताच्या रूपानें साकार करीत असतात. छदशास्त्राची त्याना कल्पना

---

* ज्ञानेश्वरपूर्वकालीं कानडी वाङ्मय. म सा. पत्रिका ७।५.

‡ पा. १८४–२०२.

† वा. ना. देशपांडे. आद्य मराठी कवयित्री. पा. १७. प्रस्तावना.

नसते. मनात आलें तें गाइलें एवढेंच त्याना माहीत. मात्र आपल्या शब्दाला व गीताला भरपूर लयबद्धता प्राप्त झाली पाहिजे, या बाबतीत कटाक्षानें त्या लक्ष घालीत असतात. महदंबेच्या बाबतींततहि असेंच झालें असलं पाहिजे.

महदंबेचे "धवळे" हे विलंबितोच्चारी सरणीचीं चतुष्पाद गीतें आहेत. त्यात तीव्र प्रयत्न म्हणजे दीर्घ उच्चारणाचें प्राबल्य आहे, आणि 'पतितपावन' व 'लवंगलता' यांच्या रचनेला जवळची अशी ती मात्रागणी, तीव्रोच्चारी रचना आहे. उदाहरणार्थ—

श्री सर्वेश्वराचे सारीं धरनिया चरण
मग धवळीं गाईन गोविंदु राणा।
जेणें रुक्मिणि हरीयेली, तेणें पवाडे केले अतिअद्भुत
पाविजे परमागति भक्ती आयिक्ता कृष्ण चरित्र ॥ १ ॥

प्रसिद्ध महानुभाव कवि नरेंद्र यानें आपल्या 'रुक्मिणी स्वयंवरा'त 'धवळ्या'चा उल्लेख अनेकदा केलेला दिसून येतो.

महदंबा ही ज्याप्रमाणें मराठींतील आद्य कवयित्री म्हणून प्रसिद्धीस आली आहे, त्याप्रमाणे श्रीकृष्णाच्या चरित्रावर तिनें रचलेलें हें काव्य (धवळे) देखील या विषयावरील मराठींतील आद्यकाव्य म्हणूनच प्रसिद्धीस आलें आहे. म्हणजे श्रीकृष्णाच्या चरित्राला वाङ्मयीन स्वरूप देण्याच्या दृष्टीनें महदंबेनें केलेली ही कामगिरी अपूर्वाईची तशीच विशेष उल्लेखनीयहि होय मराठी वाङ्मयात श्रीकृष्णाच्या चरित्राने नटलेला जो बराचसा भाग आहे, आणि ज्यामुळें मराठीच्या वैभवात काहीं अशी का होईना चांगली भर पडली आहे, त्या वाढीला वा विकासाला महदंबेचे धवळेच प्रथम कारणीभूत झाले असले पाहिजेत असें यावरून अनुमान काढता येईल.

रुक्मिणी स्वयंवरासारख्या विषयावर महदंबेने पहिल्यादाच काव्यरचना केली असल्या कारणानें, तिच्या ह्या काव्याचा थाट एकदरीनें अतिशय साधा पण हृदयंगम झालेला आहे. ऐनवेळीं सुचलें तें महदंबेने इथे योजून दाखविलें असल्या-मुळें, विचाराचे वैभव किंवा कल्पनेची भरारी तिच्या काव्यात तितकीशी आढळत नसली, तरी तिच्या या साधेपणानेंच तिच्या काव्याला निराळें वैशिष्ट्य मिळवून दिलें आहे...

* * *

महदंबा ही एक साधी भोळी स्त्री होती. त्यामुळें अगदीं सामान्य स्त्रीच्या ठायीं असणाऱ्या स्त्रीस्वभावाचीं वैशिष्ट्यें तिच्या काव्यामध्ये व्यक्त झालीं आहेत. घरातील लग्नसमारंभ म्हणजे स्त्रियांच्या आवडीचा व कोडकौतुकाचा विषय.

बारीक सारीक चालीरीतींची अमलबजावणी करून घेणें हें त्याचें समाधान. महदंबेनें कृष्णाच्या लग्नातील बारीकसारीक गोष्टीहि मोठ्या बारकाव्यानें रंगविलेल्या आहेत. श्रीकृष्णाला पाठविलेला रुखवत देऊन विद्याधरी परत आल्या, त्यावेळीं 'श्रीकृष्ण तुम्हाला कसा काय दिसला?' असा प्रश्न रुक्मिणी जेव्हा मोठ्या उत्सुकतेनें त्याना विचारते, तेव्हा त्या सागतात—

" तिया म्हणती देवी साटा हे मातु :
लागलें प्रेमपिसे जेव्हाळि देखिले श्रीजगन्नाथु :
रुक्मिणी पुढा बाळा सागती वृत्तातु .
सर्वांगीं न देखो तुमचा वो कातु :
देखिअले जें आग तेथोनि न टळतीचि लोचन :
जाणती भक्तजन रुपें अगाधु गोविंदराणा :
कांई रुपें वानू नदाचा कुमरु :
तुझा पति आम्हा पीता दुजा नाठवे विचारु :*

"श्रीकृष्ण किती सुदर आहे हे शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे. कारण ज्यावेळीं आम्हीं त्याला पाहिलें त्यावेळीं आम्हीच प्रेमवेड्या होऊन गेलों! पण तुझ्या पतीचें आम्हाला सर्वांगीण दर्शन घडलें नाहीं. परतु त्याला आम्ही जेवढें पाहिलें तेवढाहि तो इवढा सुदर होता कीं, त्याला पहाताक्षणींच आमची नजर त्याच्यावर खिळून राहिली." रुक्मिणीला तिच्या भावी पतीचें वर्णन असें करून सागितल्यानतर आपण एखादीच्या पतीबद्दल अशी भाषा करणें बरें नाही, कदाचित रुक्मिणी आपणाबद्दल गैरसमज करून घेईल अशी शका विद्याधरींच्या मनात येते. म्हणून त्या पुन्हा सागतात, " बाई ग, तुझा पति आम्हाला आमच्या वडिलासारखा आहे. त्याच्याबद्दल आमच्या मनात या शिवाय दुसरा कोणताहि भाव नाहीं."

महदंबेनें स्त्रीस्वभावाची केलेली ही उकल तिच्या सूक्ष्म ज्ञानाची निदर्शक अशीच आहे. तसेच तिनें केलेला हा भावनाविष्कार म्हणजे स्त्रीनें स्वत:च्या मनातील आपल्या कल्पना आपल्याच शब्दांनीं आपल्या परीनें व्यक्त केल्याचें हे पहिलेंच उदाहरण होय! या दृष्टीनेंहि या काव्याचें वैशिष्ट्य अपूर्वाईचें आहे.

या काव्याचें आणखी एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे गतिशीलता. या काव्यात सर्वत्र एक प्रकारचें प्रवाहित्व आलेले दिसून येतें. वर्णनें तशीं साधींच आहेत. पण भाषा ओघवती आहे. प्रसगाचें चित्रण चित्तवेधक आहे. या सदर्भात कृष्ण दर्शनानें बेभान होऊन रुक्मिणी माडीवरून उडी टाकावयास जाते, तो पुढील प्रसग उल्लेखनीय ठरेल—

* धवळे पूर्वार्ध, ६०, ६१, ६२।२.

" आगवळे सवे बहुत दळभारु :
तव तिया सवे भाट पढती कैवाडु :
वाद्यत्रें सुडाविलीं तव विप्रु दावी खुणा :
हा पैल देखे तुझा वल्लभ गोविंदुराणा : ॥
अंबिके भुवनीं प्रविष्ट सुदरी :
पूजा केली देवी पचमा उपचारी :
दोन्ही कर जोडूनी बोले रुक्मिणी सुललित वाचा :
तु मज वरद होइ वेगी मेळवी यादव राजा . ॥
अंबिके रायागणीं उभी ठेली बाळी :
तव वीप्रें येतु देखिला वनमाळी :
सावळा कमळनयन देवी पाहे पा लावण्यसिंधु .
तव तीया रुक्मिणी दोन्ही करीं जोहारिलें गोविंदु : ॥
हसगती चाले बाळा :
आनदे आसुवें न्हाहीं न देखेचि डोळा :
कंपित सासकित अगीं रोमस्वेद ल्हाटीं :
तव तिया रुक्मिणी यादवरावो श्रीकृष्ण देखिला थाटी : ॥*

धवळ्यामध्ये महदंबेच्या काहीं साध्याच पण सुदर कल्पनाहि पुढीलप्रमाणें आटळतात—

(१) घातला करीं वेगीं पातला परमानदु :
तें सुख काइ वानु जैसा मीनला प्रीयो गोविंदु : (पू. ५९।३)
(२) जुझे बळीभद्र जसा प्रळयाचा काळु: (उ. ५।१)
(३) वाताहते पत्रें तैसी भेणें रुखमीणी. (उ. ८।१)
(४) सुदर गोपीनाथ देखूनी पारुखलें नक्षेत्राच भ्रमण ' (उ. ५६।४)

विशिष्ट प्रसगीं तात्कालिक स्फूर्ति झाल्यानतर महदंबेनें तावडतोब ह्या काव्याची रचना केली असल्यामुळें, गुणाबरोबरच या काव्यामध्ये काहीं दोषहि आढळून येतात "वृत्तशैथिल्य, विस्कळित रचना (उ. ४६।४), पुनरुक्ति (पू. ४३।२ व ७९।२), यमकभाव (पू. ३०।३, ४) व ढिलाईचीं यमकें (पहिलेच कडवें)–हे "‡ या काव्यातील ठळक दोष होत. तथापि केवळ सुचेल तसे गादलेलें हें गीत या प्रकारचें पहिलेंच असल्यानें त्यास त्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे.

---

* धवळे, पूर्वार्ध. ७६–७९.
‡ वा. ना. देशपांडे. प्रस्तावना. आद्य मराठी कवयित्री. पा. २२

गोविंदप्रभूंच्यासमोर महदबेनें धवळ्याचा पूर्वार्ध रचला. त्यानंतर उत्तरार्धाची रचना तिच्या उतारवयात झाली. ह्या उत्तरार्धनिर्मितीचा इतिहास 'स्मृति स्थळां 'तं‡ आला आहे तो असा—

" म्हाइभटीं रुक्मिणीस्वैवर करणे : ।। एकुदीसु म्हाइभटीं : लक्ष्मीधरभटीं महादाइसातें म्हणितलें : समोरें रुक्मिणीस्वैवर का न करा : महादाइसीं म्हणितलें : मज काइ करवैल : तें गोसावीं वरुदीधला म्हणोनि स्फुरलें ' म्हाइभटीं : लक्ष्मी-धरभटीं म्हणितलें : तरि आन्ही शब्द घडउनि : तुम्ही गा : महादाइसीं मानिलें : तेंहीं शब्द घडउ घडउ पदें बांधिलीं : आणि महादादसीं गाइलीं यापरी दुसरी माळ केली : "

ही आख्यायिका जर खरी मानली तर उत्तरार्धाच्या रचनेच्या श्रेयाचा निदान निम्मा तरी वाटा म्हाइभट व लक्ष्मींद्रभट याना द्यावयास पाहिजे. परंतु या दोघानी इथें सांगितल्याप्रमाणें केवळ महदबेसाठींच उत्तरार्ध केला, त्यामुळे तो तिच्याच नावानें ओळखला जाणें वाजवी आहे. तथापि केवळ महदबेचेच काव्य म्हणून त्याचा उल्लेख इतरत्र न आल्यानें त्याचा इथें अधिक विचार केलेला नाहीं.

धवळ्याच्या रचनाकालाबाबत निश्चित अशी माहिती अद्याप उपलब्ध झालेली दिसत नाहीं. तथापि " त्याचा पूर्वार्ध ज्ञानेश्वरीपूर्वी निर्माण झाला, असे म्हणता येते. 'ऋद्धिपुरलीळे' वरून गोविंदप्रभूंच्या हयातींत पूर्वार्ध रचिला गेल्याचें दिसतें. या ग्रंथाच्या एका पोथींत* गोविंदप्रभूंचा निधनकाल 'शके १२०७ व्ये सवत्सरे भाद्रपद शु।। अष्टमी जेव्हा नक्षेत्र अवसी पहारा आतु " असा दिला आहे.† तेव्हा यापेक्षा अधिक बळकट पुरावा हातीं येईपर्यंत शके १२०८ पूर्वी केव्हातरी धवळ्याचा पूर्वार्ध निर्माण झाला असला पाहिजे, आणि धवळ्याचा उत्तरार्ध हा १२३४ पूर्वी केव्हातरी जन्मास आला असला पाहिजे, असें स्थूलमानानें म्हणता येईल.

महदबेनें लिहिलेलें दुसरें काव्य म्हणजे " मातृकी रुक्मिणी–स्वयंवर " हें होय. या काव्याचा विषय तिच्या धवळ्याचाच असला तरी इथें नीटनेटकेपणा बराचसा आढळतो. तिच्या भाषेला अधिक सुटसुटीतपणा आला असून रचना-सौष्ठवहि उठावदार झालें आहे. या काव्याची रचना ओवी छंदात झालेली आढळून येते. महदबेनें हाताळलेला हा नवा छंद असल्याचा उल्लेख नागदेवाचार्यांच्या १३८ व्या स्मृतींत आलेला आहे. खेरीज या काव्याच्या अखेरीस खुद्द महदबेनेच या नव्या ओंवी छंदाबद्दल पुढील उद्गार काढले आहेत—

---

‡ स्मृ. स्थ क १७४ पा ५७.

* डॉ. य. खु. देशपांडे–संपादित 'ऋद्धिपुर वर्णन' पा. १४०

† वा. ना. देशपांडे. प्रस्तावना. आद्य मराठी कवयित्री. पा. १५

"जालें हे संपूर्ण रुक्मिणी स्वैंवर :
मातृकी नागरः बांवीवर्धी : "

या काव्यामध्यें महदंबेनें केलेलें श्रीकृष्णस्वरूपाचें पुढील वर्णन फारच बहारदार झालें आहे—

" नासे पीतांबरु कटीं कुंदमाळा :
कांतु शोभे सावळा : रुक्मिणीचा :
सादावरि कावडी पडिभरें : चालतु :
तो खेळे वनातु : दत्तु मए :
गावो द्वारावती गोमतीए प्रातीं :
गोदरीयें क्रीडती : चक्रपाणी :
धावो देउनि अविप्रे घाली निजपदीं :
खेळे कृपानिधि : रिध पुरी :
चापे गौर कांती चापयाच्या इति :
चापौलीं साजती : चक्रपाणी : "

या दोन्ही काव्यांच्या खेरीज " गर्भकांड ओव्या " या नावाचें आणखी एक काव्य महदंबेनें लिहिलें आहे. शिवाय आणखीहि कांहीं तिची रचना असणें शक्य आहे. परंतु अद्याप हें सारें अप्रकाशित असल्यामुळे त्यासंबंधीं कांहीं विचार करणें अशक्य आहे.

महदंबेनें रचिलेल्या या काव्यांतून तत्कालीन समाज परिस्थितीची बरीच माहिती मिळते. त्या वेळच्या वाद्यांच्यामध्यें " निशाण, ढाल, शंख, तुरें हीं असत. वाहनांत घोडे, पालख्या, अंबाऱ्या होत्या. 'दुसे' म्हणजे तंबू होते. भांडारी अधिकारी असत. राजे लोक 'आगंवळे' बाळगीत. पुरुषाच्या अलंकारांत बुगडिया ( कडीं ), सांखळिया ( गोफ ), झलुनके ( कुंडलें ), तोडर ( तोडा ) यांचा आणि स्त्रियांच्या अलंकारांत कांकण, अंदु ( चाळ ), रत्नहार यांचा समावेश होई. अंगास चंदनाची उटी व कपाळावर कस्तुरीचा टिळा लावीत. अभ्यागतांना कापराचा मुखास देत–(उ. ६२।३). स्त्रिया नवऱ्याचें उष्टें खात (पृ. ५८।३). मेव्हणा थट्टेचा विषय असे (उ. १०।३)

लग्नामध्यें औक्षण करण (पृ. ६८।२), तैलादि मर्दणें (पृ. ६८।१), न्होणवाण-केळवाण-मूळनहाण करणें (पृ. ७४।३), रुखवत देणें (पृ. ४८।२), वरास बांशिंग बांधणें (पृ. ६९।४), त्याला मंडपांत शिरतांना वधुमाय व वरमाय यांनीं ओवाळणें (उ. २७।१,२), नर्तकींचा नाच होणें (उ. २९।३) इ. इ. सोहळे होत."*

* वा. ना. देशपांडे. आद्य मराठी कवयित्री. पा. १९-२०.

महदंबेच्या काव्याची भाषा अगदी जुन्या वळणाची आहे. ह्या काव्यात बऱ्याच जुन्या शब्दांचा भरणा आहे. उदाहरणार्थ, 'दायपसाय' हा शब्द शके १०७९ च्या पळसगावच्या शीलालेखात आलेला आहे. महदंबेनें आपल्या काव्यात त्याचा वापर केला आहे. तसेंच तिनें "मातु, वोगर, वोणें" असे काहीं कानडी शब्द व "वलिये, आरोगणें (आरोगवू)" असे गुजराथी शब्दहि आपल्या काव्यासाठीं उपयोगात आणिले आहेत. ज्ञानेश्वरींत सापडणारे शब्द तर या काव्यात नित्तीतरी दृष्टीस पडतात.

साध्या विचारांची हृदयंगम मांडणी आणि ओघवती भाषा हा महदंबेच्या काव्याचा प्रमुख विशेष होय. महदंबेच्या 'धवळ्या'मुळें मराठीस एक नवा छंद वा वृत्तप्रकार मिळाला हाहि तिच्या काव्याचा आणखी एक विशेष आहे. ह्या धवळ्याचें वृत्त काहींसें अभंगाच्या स्वरूपाचें असून त्याच्या प्रत्येक कडव्याचे चार चरण आहेत दोन दोन चरणाचे शेवटीं यमक आहे. या वृत्ताला गणमात्रांचा किंवा अक्षर संख्येचाहि निर्बंध नाहीं *

मराठी सारस्वतास महदंबेनें ही प्रत्यक्ष देणगी जशी दिली आहे, तशीच काहीं अप्रत्यक्ष देणगीहि दिलेली आहे. आजच्या मराठींत 'चरित्र' म्हणून जो वाङ्मयप्रकार रूढ झालेला आहे, त्याचें मूळ महदंबेच्या काव्यामध्यें सापडतें! श्रीचक्रधरस्वामींच्या सहवासात महदंबा नेहमीं असल्यामुळें त्याना ती अनेक प्रश्न विचारीत असे. त्यामुळें या प्रश्नाना उत्तर देण्याच्या हेतूनें श्रीचक्रधरस्वामी जे बोलत, तें त्यांच्या आयुष्यातील अनेक गोष्टींचा उलगडा करीत बोलत असत. त्या कारणानें गद्यवाङ्मयास यावेळीं नकळत आरंभ झाला व लोकांच्या समोर श्रीचक्रधर स्वामींचें चरित्र आपोआप आलें! चक्रधरांच्या सिद्धांतसूत्र पाठात अशीं प्रश्नोत्तरें बरींच सापडतात. या संदर्भात लीलाचरित्रातील पहिल्या भागामधील एकांकातील पुढील माहिती पहाण्याजोगी आहे—

"का उरळीची का पारव्या :

प्रसिधि आइकौनि : रतीचीया चाड तिथें आली : देवतेची आज्ञा लघौनि साउमेया व ब्रचवे तेथ ब्रह्मचर्याची प्रवृत्ति . म्हणौनि बाहेरी बीजें न करीति : ऐसी मास अहोरात्रें उभी होती : तिएचा आग्रह देखोनि ते पुरत्यजीलें तिए समई गुजरातेचेया प्रधानाचिया कुमराचें देह गेलें : तें समसाना आणिलें होतें : तेव्हळिं ते स्वीकारीलें :॥ आणि महादाईसीं गोसानियातें पुसीलें : हा जि : आमचे गोसावी काइ हें गुजराथेचेया प्रधानाचे कुमरु : हा जि : मग : निगो वैसें दीधलें · या उपरि रामयातेचि गोष्ट सांगीतली .."

---

* श्री आजगावकर. 'महाराष्ट्र संत कवयित्री' पा. १३.

महदबेच्या काळ निर्णयाबद्दल अद्याप निश्चित पुरावा हातीं न आल्या कारणानें मतभेद आहेत तथापि तेराव्या शतकामध्य तिचं वास्तव्य असाव असं दिसत.* नागदेवाच्यार्यांच्या स्मृतींत महदबेबद्दल आणि तिच्या काव्या बद्दलहि पुढील गौरवपर उद्गार आलेले आहेत—

"एकादा महादाइसीं काइसेया प्रकरणावरुनति धोंवीया गाइलीया त नेणीजे. तीया धोवीया ऐसीया। नागदेवाचेया खादानरि श्रीद्रकर। राजा चक्रधर राज्य करी॥ सोनमळा सेना नेमन मालगठी। म्हाइया आला भेटी प्रभुराया॥ ऐसीया धोंवीया आइकुनि भटोबासी नागदेवानें म्हणीतले नाल्चीया तीया नाथ वाणी' आन रुपैचीया तीया आमुचीया सीधवाणी" (क्र १२८)

"आन म्हातारी धर्मरक्षक' प्रीतिरक्षक: सद्ददत्व (रक्षक) ऐसा दुखपूर्वक आळापी भटाबासी सोखु केला" (क्र २४८)

शेवटीं श्री. वा. ना देशपांडे यांनीं म्हटल्याप्रमाण साराशानें महदबेबद्दल सांगावयाचें झालें तर असें म्हणता येईल कीं, "ज्याचें कर्तृत्व एका स्त्रीकडे जात, व ज्याचा पूर्वार्ध ज्ञानेश्वरापूर्वीं निदान चार वर्षे म्हणजे कमीतकमी साडेसहाशे वर्षांमागें निर्माण झाला, असं हें काव्य (धवळे) मराठी भाषाभक्तास अपूर्व वाटेल!" महदाइसेच मातृभी रुक्मिणी स्वयंवर चांगल्यापैकीं काव्य आहे, व पुढे मागें तिचीं कदाचित् आणखींहि काही चांगली काव्य उपलब्ध होतील पण मराठी साहित्यात महदाइसेच्या काव्यकीर्तीची द्वारकानगरी वैशिष्टय संपन्नतेमुळ धवळ्यांच्याच एका खांबावर स्थिर राहील, यात शंका नाहीं.

० ० ०

# मुक्ताबाई

तेराव शतक म्हणजे एक प्रकारें सामाजिक क्रांतीचाच काळ होय. महानु भाव पंथाची स्थापना होऊन देखील चातुर्वर्ण्यांमुळें समाजाची विस्कटलेली घडी आटोक्यात येऊ शकली नव्हती. त्यामुळ ज्ञानदेवानीं हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान सर्व-सामान्य लोकाना समजावून देण्यासाठीं म्हणून नव्यानेंच भागवतधर्माची स्थापना केली या नव्या क्रांतीमुळ माणसाच्या विचारात आणि आचारातहि बदल होन गेला ज्ञानदेवानीं श्रीकृष्णाला आपल्या भागवत धर्माची मुख्य देवता मानल्या-कारणानं भक्तिमार्गांना अवलंब सर्वत्र होऊ लागला मनोभावानें देवाची भक्ति

---

* महदबेचे "हे धवळे शके १२०८ पूर्वीच्या सुमारास लिहिलेले आहेत."
—डॉ. कोलते भास्करभट्ट बोरीकर. पा. १६६.

करणाऱ्या लोकांची जात ही एकच समजली जावी, हें तत्त्व अस्तित्वात येऊ लागलें त्याच्या अमलबजावणीसाठीं भक्तमंडळींनीं पंढरीच्या विठोबाचें देऊळ हेंच पवित्र क्षेत्र ठरविलें तेथील विठोबा त्यांचा पाठीराखा झाला ! याच ठिकाणीं सर्वांठायीं आत्मा एकच आहे हें पटवून घावें म्हणून ज्ञानदेवांनी ज्ञानदानाचे नवें विद्यापीठ स्थापन केलें. या विद्यापीठाच्या व्यासपीठावरून त्यांनीं सर्वांना प्रेमानें एकत्र आणावें म्हणून लोकांना आपली ज्ञानदेवी गाऊन दाखविली भगवान् श्रीकृष्णांनीं माणुसकीचा महान् धर्म सांगितलेली भगवद्गीता ज्ञानदेवांनीं सोपा अर्थ लावून, आपल्या मराठी मायबोलींत सर्वसामान्य लोकांच्या समोर ज्ञानदेवीच्या रूपानें ठेविली सामान्य मनाला माणुसकीची शिकवण सांगितली त्यासाठीं त्यांनीं नामदेवासारखा प्रख्यात कीर्तनकार हाताशीं घेतला. टाळमृदंगाच्या निनादात पंढरीचें राउळ दुमदुमून गेलें ज्ञानदेवांच्या कार्याला जोरानं आरंभ झाला

> " टाळ मृदंग विणे सुस्वर । नादें दुमदुमलें अंबर
> त्यातहि टाळियाचा गजर । अपरंपार ओढवला ॥ "

भगवताच्या नामोच्चाराच्या खालोखालच ज्यांच्या नामोच्चारानें सामान्य लोकांची वाणी पवित्र झाली, त्या ज्ञानदेवांना मुक्ताबाई नावाची एक धाकटी बहीण होती, व निवृत्तिनाथ व सोपानदेव हे भाऊ होते या चारी भावंडांचें आयुष्य समाजाशीं झगडण्यात गेलें वास्तविक या भावंडांच्याविषयीं अद्याप भरपूर माहिती उपलब्ध झालेली नसल्यानें त्यांच्या कर्तबगारीची थोरवी मापणें त्या मानानें अशक्य झालें आहे परंतु आजवर उपलब्ध झालेल्या त्यांच्या वाङ्मया वरून मात्र असें म्हणता येईल कीं, " या चार अलौकिक व्यक्तींनीं महाराष्ट्र वाङ्मय मंदिराचा पाया घातला व तो इतका बळकट घातला कीं, त्यावर उभारलेल्या महाराष्ट्र-वाङ्मय-मंदिरास कालत्रयींहि धोका येण्याचा संभव नाहीं "* म्हणजे त्यांचें वाङ्मय एवढें वैशिष्ट्यपूर्ण आहे तसेंच अल्पवयातहि या भावंडांनीं जी अलौकिक कामगिरी केली व सामाजिक आणि धार्मिक क्षेत्रात क्रांति करून आपलें स्थान अमर केलें, त्यामुळें त्या सर्वांना त्यांच्या समकालीन व नंतरच्या महाराष्ट्रातील बहुतेक सर्व संतकवींनीं गुरुस्थानीं मानलें

आईबापाविना पोरकीं झालेलीं हीं भावंडे समाजानं त्यांना आपल्यापासून दूर केल्यामुळें अपमान गिळून रानोमाळ भटकत होतीं पदोपदीं समाजाविरुद्ध बंड पुकारून व परिस्थितीला जिंकून स्वाभिमानानें कसें जगावें याचा धडा घेत होतीं. यापैकीं मुक्ताबाई ही सर्वांत लहान तरीदेखील तिच्या रक्ताचा अणुरेणू बंडखोर वृत्तीनें भारून गेला होता.

---

* श्री. आजगावकर, महाराष्ट्र संतकवयित्री पा २४.

मुक्ताबाई ही आपल्या भावांच्या प्रमाणेंच विद्वान् होती. त्याच्याप्रमाणें विरक्त वृत्तीनें ती रहायची. तिनें आजन्म कौमार्यव्रत पाळलें होतें. मरणसमयीं ती अवघी अठरा वर्षांची होती. परंतु तेवढ्या लहान वयांतहि तिनें अभंग, पदें, कल्याणपत्रिका, हरिपाठ, ताटीचे अभंग अशी काव्यरचना केली. आज ती विशेष प्रसिद्ध आहे. मुक्ताबाईची ही सर्वच रचना गोड आहे; व स्त्रियांच्या कोमलपणाची छटा तींत पसरली आहे. सूर्योदयापूर्वी पक्षी चिलबिल करूं लागले म्हणजे जो आनंद होतो तोच हिचे अभंग वाचतांना होतो हिचे 'ताटीचे अभंग' तर विशेषच गोड आहेत. एक दिवस ज्ञानेश्वरांस पाहून कोणी टवाळानें या संन्याशाच्या पोराचें दर्शन घडलें, हा आपणास मोठा अपशकुन झाला असे म्हटल्यावरून, ज्ञानेश्वर आपल्या मनात फार खिन्न होऊन खोलींत जाऊन बसले; व खोलीची ताटी किंवा दार उघडून मुक्ताबाईस आंत घेत ना. यावेळीं ताटी उघडून आपणांस आंत घेण्याविषयीं मुक्ताबाईनें विणवणी केली. हेच अभंग हल्लीं ताटीचे अभंग म्हणून प्रसिद्ध आहेत."* या अभंगाच्या कांहीं ओळी अशा आहेत —

मजवरी दया करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।
संत जेणें व्हावें । जग बोलणें सोसावें ॥
तरीच आर्गीं थोरपण । जया नाहीं अभिमान ।
थोरपण जेथें वसे । तेथ भूतदया असे ॥
रागें भरावें कवणाशीं । आपण ब्रह्म सर्व देशीं ।
ऐशी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
योगी पावन मनाचा । साहे अपराध जनाचा ।
विश्व झालीया वन्ही । संतमुखें व्हावें पाणी ॥
शब्दशस्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ।
विश्व परब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
लडिवाळ मुक्ताबाई । बीज मुद्दल ठायीं ठायीं ।
तुम्ही तरोन विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥

मुक्ताबाईचे हे अभंग पाहिले म्हणजे एवढ्या लहान वयांत तिनें ही रचना केली कशी याबद्दल मन थक्क होऊन जातें! तसेंच एवढ्या लहान मुलीच्या ठायीं अशी दांडगी भक्ति आणि विरक्ति कोठून आली आणि तिला जगाचें एवढें ज्ञान तरी कसें प्राप्त झालें, याबद्दल अचंबा वाटतो!

या ताटीच्या अभंगासारख्या कवनांतून 'मुक्ताई' असा इतरत्र आलेला उल्लेख न येतां 'मुक्ताबाई' असा अखेरीस उल्लेख आल्यामुळें हे अभंग तिचेच आहेत किंवा कसे याबद्दल मतभेद आहेत.

---

* महाराष्ट्र सारस्वत. पा. १५५-५६.

मुक्ताबाई ही काव्य आणि अध्यात्म या दोन्हीहि बाबतींत ज्ञानदेवाच्या अगदी जवळ येते. ज्ञानदेवाच्या सहवासात तिच्या स्फूर्तीला उजाळा मिळाला. आपल्या आध्यात्मिक अनुभवाचें चमत्कृतिपूर्ण वर्णन करताना ती किती पदाईत होती हें पुढील वर्णनावरून दिसून येतें—

" मुंगी उडाली आकाशीं । तिनें गिळिलें सूर्यासी
थोर नवलाव झाला । वांझे पुत्र प्रसवला
माशी वियाली घार झाली । देखोनि मुक्ताई हासली "

मुक्ताबाईंचा 'हरिपाठ' हि काव्यमधुर आहे. तिच्या चांगदेवावरील अभंगातून तिचा अध्यात्माधिकार अधिक स्पष्ट दिसतो. हे अभंग काव्यदृष्ट्याहि रम्य आहेत. " त्यात चांगयास आपलें बाळ कल्पून ती त्यास ज्ञानामृतानें न्हाऊ घालते, अव्यक्तानें विणलेल्या अविनाशी पाळण्यात टाकते, त्याचें 'नाम' करण करते, अनुहात टाळी वाजवून त्याला स्वस्वरूपीं निजविते व मनपवनाची दोरी हातीं घेऊन त्याचा डोळा अरूपीं स्थिर करते. ही रूपकपद्धति मुक्ताबाईनें ज्ञानेश्वरापासून उचललेली दिसते. "*

एका प्रसंगीं मुक्ताबाई आणि जनाबाई या सारख्या वयाच्या व सारख्या अधिकाराच्या कवयित्रींनीं एकत्र बसून म्हटलेल्या ओव्यातील मुक्ताईची ओवी जशी काव्यमय तशीच ज्ञानमयहि आहे.

पहिली माझी ओवी । परतूनि पाहिलें
दृष्टीन देखिलें । निजरूपीं

येथून प्रारंभ करून योगमार्गातील एकेक खुणा सांगत हा स्वानुभव चित्रपट तिनें पुरा केला आहे †

आपल्या भावंडाच्याप्रमाणेंच मुक्ताबाईला योगविद्या अवगत होती. योग विद्येचा अभ्यास करून लेखन करणारी मराठींतील ही पहिलीच कवयित्री होय

" नामबळें देहीं असोनिया मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनें
दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं
माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्वत्र पें मुक्ति नाम पाठें
मुक्ताईचें धन हरिनाम उच्चार । अवघाचि संसार मुक्त केला "

म्हणजे अशा प्रकारची कल्पना बाळगूनच मुक्ताबाईनें आपलीं देवाविषयींचीं मतें बनविलीं होतीं असें दिसते. एकनाथानीं ही मुक्ताबाई म्हणजे " मुक्तपणें मुक्त अशी योगियाची विश्रांति " † असें तिचें मोठें मार्मिक वर्णन केलें आहे.

---

* डॉ. तुळपुळे महाराष्ट्र-सारस्वत पुरवणी. पा ९००
† डॉ. तुळपुळे पांच संतकवि पा. २१५

मुक्ताबाई जशी स्वाभिमानी तशीच सडेतोड विचाराचीहि होती. तिला चावगे खपत नसे. एकदा ती आपल्या भावाच्याबरोबर पंढरपुरास गेली असता सर्वांनीं विठोबासमोर बसलेल्या नामदेवासहि प्रदक्षिणा घालून नमस्कार केला. त्यामुळे आपण इतरांच्यापेक्षा श्रेष्ठ असल्याची जाणीव नामदेवाला झाली ! त्यानें तसें बोलून दाखविलें ! त्या कारणानें मुक्ताबाईला राग आला. म्हणाली—

अखंड जयाला देवाचा शेजार । का रे अहंकार नाहीं गेला ?
मान अपमान वाढविसी हेवा । दिवस असता दिवा हातीं घेसी
परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ । आंधळ्याचे डोळे का बा झाले ?
कल्पतरु तळवटीं इच्छिली ते गोष्टी । ऐसा द्वाड आहे जगामाजी

कारण तिची अशी समजूत होती कीं, (माणसाला ज्ञान असल्याशिवाय भक्ति जमणार नाहीं, आणि ज्ञान मिळविल्याशिवाय अहंकारहि जाणार नाहीं !)

मुक्ताबाईच्या या मर्मभेदक बोलण्यानें नामदेवाला वाईट वाटलें. पण तिनें त्याची फिकीर केली नाहीं. शेवटीं ज्ञानदेवाच्या युक्तीत गोरा कुंभार याजकडून सर्व संताची परीक्षा करावी असें ठरलें. त्याना गुरुपदेश देण्याचें घाटलें. त्यावेळीं गोरोबाला बोलाविण्याची कामगिरी मुक्ताबाईकडेच आली, " मुक्ताबाई म्हणजे प्रत्यक्ष आदिमायेचा अवतार ! ज्ञानेश्वरापेक्षाहि तिची वृत्ति बमुखोर. तेव्हा ती गोरोबाकडे जाताना कशी दिसली याचे वर्णन असें केलें आहे—

मोतियाचा चुरा फेंकिला अंबरीं । विजूचियापरी कीळ झालें ॥
जरी पीतांबरें नेसविलीं नभा । चैतन्याचा गाभा नीलबिंदु ॥
तळींपरी पसरे शून्याकार जालें । सर्पोचींही पिलें नाचू लागे ॥
कडकडोनि वीज निमाली ठायींचे ठायीं । भेटली मुक्ताबाई गोरोबाला* ॥

सुरवातीला मुक्ताबाई व तिचीं भावंडे हीं संन्याशाचीं मुलें म्हणून देवाच्या दारीं येण्याची त्याना मुभा नव्हती. त्यामुळें देवाचें खरें स्वरूप जाणून घेण्याची उत्कंठा त्याना लागली त्यासाठीं त्यानीं आपल्या समाजातील धर्ममार्तंडाच्या विरुद्ध जातीचें रणशिंग फुंकलें मुक्ताबाईनेंहि या लढ्यात भाग घेतला.

देउळाच्या कळशीं नादे एक ऋषि । तया घातली पुसी योगेश्वरी ॥
दिवसा चांदिणें रात्रीं पडे उष्ण । कैसेनि कठिण तत्त्व जालें ॥
ऋषी म्हणे चापेकळियाला पैं कापे । प्रकाश दीपें निघोन जाय ॥
ठायींच्या ठायीं असें पहाता न दिसे । मनाच्या धारसें एक होय ॥
एकट एकलें वायाचि पैं गुंफिलें । मुक्त पैं बरिलें सहज असे ॥
वैकुंठ अविट असोनि प्रकट । वायानि आडवाट मुक्ताई म्हणे ॥

---

* महाराष्ट्र संतकवयित्री पा. ३४

त्यावेळीं अशा प्रकारचें काहींतरी गूढ तिच्या मनात एकप्रकारचें खळबळ निर्माण करीत होत प्रचीति वादाचा तिला अनुभव आला होता गोरोबानें सर्वाची परीक्षा करीत असता नामदेवास 'कचा घट ' ठरविलें, त्यावेळीं मुक्ताबाईनें जें वर्णन केलें त देखील अगाच प्रकारचें गूढ दर्शवित म्हणजे यावरून असं दिसून येतें कीं, आध्यात्मिक ज्ञानाची कल्पना आल्यामुळें खरें सत्य शोधण्याकडे तिची दृष्टि लागलेली होती

मराठीमध्ये अलिकडे गूढगुंजन म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो व त्या गूढवादाची चर्चा केली जाते त्याचें मूळ स्त्रियांच्या लेखनाच्या दर्शनें पहाता पहिल्यादा मुक्ताबाईंच्या काव्यामध्यें गवसतें असें म्हणता येईल. ज्ञानेश्वरासारख्या महान् व्यक्तीच्या सहवासात मुक्ताबाईंच्या मनात गूढविचार चालणं अस्वाभाविक दिसत नाहीं. या भावडाचें सारेंच वेगळें होतें, वरच्या दर्जाचें होतें त्या कारणानें त्याच्या कल्पनाना येणाऱ्या मूर्त स्वरूपामुळ होणारा भावनाविष्कारहि वेगळा होता त्याचें तेंच वैशिष्टय होतें. त्यामुळें "दळिता कांडिता । तुज गाईन अनंता।" अशी जनाबाईप्रमाणे मुक्ताबाईची कल्पना नव्हती परिस्थितीच्या प्रखर ज्वालामधून आपलें वैशिष्टय टिकवीत तिला सहीसलामत बाहेर पडावयाचं होतें त्या कारणानें तिचें काव्यहि तिचा पारमार्थिक अधिकार दर्शविणारें झालें आहे

मुक्ताबाईनें आपल्या लहानग्या जीवनात सुखदुःखाचे जे अनुभव मिळविले, आणि जगाचें खरें दर्शन घडवून घेण्याचा जो प्रयत्न केला, त्या सर्वाचा पडसाद तिच्या कवितेतून उमटला आहे एक प्रकारच्या स्वाभाविक व प्रामाणिक भावना विष्काराने तिची कविता सजली आहे या संदर्भात उदाहरण म्हणून तिची पुढील रचना पहाण्याजोगी आहे—

देउळींचा देवो घरभरी भावो । कळमेंरीण वाया जातु असे ।।
जाताती वाउगे नटनाच्य सोंगें । चित्त अनुरागें भक्तीना ।।
असोनि न दिसे उगेयाचिपिसें । घेती वाया वसे सज्जनेंरीण ।।
रावोरंक कोह न म्हणेचि सोह । संसारलें अह न कळे तया ।।
भ्रातीचेहि भुली वायाचि घरकुली । माया आड ठेवी अरे रया ।।
मुक्ताई परेसी दुमतें चहूसीं । सत्रावी सर्व रसीं एका देवें ।।

मुक्ताबाईंचे आणि तिच्या भावडाचें आयुष्य सामान्य लोकाच्यापक्षा निराळें होतें त्याचें जीवन उदात्त, थोर, भव्य आणि भगवद्भक्तीच्या गाभाऱ्यातून निनादणारें असें एक चित्ताकर्षक भावगीत होतें त्या भावगीताच्या स्वरलहरींतून मुक्ताबाईनें छेडलेली ही वीणेची तार देखील त्या सर्व उदात्ततेला शोभेल अशीच भावमधुर आहे

सामाजिक अन्यायाविरुद्ध बंड पुकारून काव्यलेखन करणारी पहिली कवयित्री म्हणून मुक्ताबाईची थोरवी मराठी मनाला मोठी आहे तसच तिनें

अन्यायाची चीड येऊन निर्भयपणें आपल्या मनाचा आवेग समाजापुढें व्यक्त करण्याचं धाडस दाखविलें, हें तिचें कृत्यहि त्या वेळच्या परिस्थितीच्या दृष्टीनें अपूर्वाईचें आहे.

मुक्ताबाईच्या काव्यामध्यें आलेलीं 'ससारु, उचारु, पुरुषोत्तमु' वगैरे अशीं अकारान्त शब्दांचीं उकारान्त रूपें आणि "पैठा, पैसु, बरळ, रया, आरावो" इत्यादि जुने शब्द हे ज्ञानेश्वरीच्या भाषेशीं सहज जुळते आहेत. त्यावरून ही मुक्ताबाई म्हणजे ज्ञानदेवाची बहीण मुक्ताई आहे याबद्दल साशकता रहाण्याचें कारण नाहीं. उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून मुक्ताबाईचा जन्मकाल "शके १२०१ प्रमाथि सवत्सर, आश्विन शुद्ध १, मध्यान्ह" असा आढळतो आणि "शके १२१९ वैशाख वद्य १२ रोजीं" तिचा प्रयाणकाळ सापडतो * म्हणजे तेराव्या शतकाचा अखेरीचा काळ हा मुक्ताबाईचा काळ असें मानण्यास हरकत नाहीं.

चागदेवाच्या अभगातून मुक्ताबाईसबधीं आलेला उल्लेख असा आहे—

वऱ्हाडी आले ससार नगरा । चागा तो नोवरा केळवला
हातीं काकण उभा वटेश्वरीं । शाति नोवरी पर्णावया
पर्णिली शाति बैसला पाटीं । मुक्ताई करवली हळदुली वाटी

मुक्ताबाईचा आध्यात्मिक दर्जा ओळखून तिच्या प्रयाणाविषयीं नामदेवानें म्हटलें आहे की—

टाळविणे मृदग सुस्वर गायन । कोंदलें गगन दाहीदिशा ॥
प्रळयींच्या विजा वर्षती आपार । झाला धुधकार दाही दिशा ॥
ऋषि म्हणति हरि पातलेसें विघ्न । आता कैसें प्राण वाचतील ॥
कोणाचिया शुद्धि नाहींचिया कोणा । म्हणती नारायणा मृत्यु आला ॥
कडाडली वीज निरजनीं जेव्हा । मुक्ताबाई तेव्हा गुप्त झाली ॥
वैकुठीं लक्ष घटा वाजती एक घाई । झाली मुक्ताबाई स्वरूपाकार ॥
एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं । जेव्हा निरजनीं गुप्त झाली ॥
गेलें निवारुनी आकाश आभुट । नामा म्हणे कोठें मुक्ताबाई ॥

मुक्ताबाईचें जीवनच भव्य होतें. तिचे विचारहि तसेच भव्य तिच्या अभगातील तिचे विचार वाचताना कित्येक ठिकाणीं अर्थ लावणें कठीण होऊन बसते। तिच्या काव्याचा थाट एकदरीनें वेदातपर असाच आहे. तथापि त्यामध्यें तिचा अनुभव, काव्याचें तेज, आणि प्रेमळ अनुभूति याचा मोठा सुदर त्रिवेणी सगम पहावयास सापडतो त्यामुळें त्यास आलेला जिवतपणा अभव्य राहील यात शका नाहीं या काव्यामध्यें पाठातर आणि 'लेखक प्रमाद' यामुळें आलेली

---

* महाराष्ट्र सतकवयित्री. पा २९

अशुद्धता तिच्या मूळच्या लेखनाची शुद्धता दाखवू शकत नसली, तरीहि ज्या स्वरूपात आज हें काव्य प्रकाशित झालें आहे, तेंहि विशेष उल्लेखनीय व भव्य विचार प्रकट करणारें आहे यात शंका नाहीं.

• • •

## जनाबाई

मोक्षप्राप्तीचें एक साधन म्हणून ज्ञानेश्वरादि भगवद्भक्तानीं भक्तिमार्गाचा अवलंब केला होता. येथें भक्ति म्हणजे मानवी मनात देवाविषयीं वसत असलेली आदराची उत्कट भावना आहे. संत काव्याचा स्थायीभाव त्यामुळेच भक्ति आहे असें मानतात. हे सर्व कवि भागवत धर्मानुयायी भक्त होते व काव्य हें त्यांच्या भक्तीचें एक साधन होतें. "त्यानीं आपले अभंग काव्य म्हणून इतरासाठीं लिहिले नसून आपल्या अंतःकरणातील तळमळ देवापुढें व्यक्त करण्यासाठीं लिहिले होते. मनाची एकाग्रता करून समाधि लावण्यात त्याना परमोच्च आनंद मिळे."* भक्तीच्या ह्या आविष्कारामध्ये स्त्री पुरुष हा भेद मुळींच आड येत नव्हता. देवाच्या दारात जमतील ते सारे एका भूमिकेवरून विठ्ठल दर्शनासाठीं जात असत. तेथें कोणत्याहि प्रकारचा भेदभाव मानण्यात येत नसे.

ह्या भक्त मंडळींत नामदेवाला बरेंच वरचं स्थान प्राप्त झालेलें होतें. तो एक उत्तम कीर्तनकार होता. त्याच्या घरीं जनाबाई ही एक त्यानेंच सांभाळलेली मुलगी होती. मूळची ती गंगाखेडची परंतु नामदेवाच्या सहवासानें तिला देखील विठोबाबद्दलच्या भक्तीची आवड वाटू लागली त्यामुळें आपला हा भोळा भाव व्यक्त करण्यासाठींच जनाबाईनें अभंगरचनेस आरंभ केला. भगवंताच्या नामसंकीर्तनात स्वतः तल्लीन होऊन जाणें तिला समाधानाचें वाटू लागलें तिच्या मधुर वाणीला अंकुर फुटला. आणि तिनें यासंबंधींची आपली भूमिका सर्वांना पुढील प्रमाणे सांगून टाकली—

पक्षी जाय दिगंतरा । बाळकासी आणी चारा ॥
घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिल्लापाशीं ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥
तैसि आम्हासी विठ्ठल माये । जनी वेळोवेळीं पाहे ॥

जनाबाईनें नामदेवाचें कीर्तन अनेकदा ऐकिलें होतें त्यावेळीं तिला अनेक पौराणिक कथाहि ऐकावयास मिळाल्या होत्या. नामदेवाच्या हरिनामाच्या जपावर

---

* श्री. ग्रामोपाध्ये, संत काव्य समालोचन.

तिची श्रद्धा बसत गेली होती. देवाचे गुण गाण्याचें तर तिला जणुं वेडच लागलें होतें ! वास्तविक आपल्या आईवडिलाना सोडून जनाबाई नामदेवाकडे रहात होती आणि म्हणूनच तिला आपण पोरकें आहोंत असें वाटे. पण ज्ञानेश्वर आणि नामदेव यांच्या सहवासामुळें तिला प्रत्यक्ष परमेश्वरच आपल्या आईच्या ठिकाणीं दिसूं लागला ! त्यासाठीं

येग ये ग विठाबाई । माझे पंढरीचे आई

असें म्हणत ती देवाला मनापासून आळवूं लागली. तिच्या यात्र भावनेचें प्रत्यंतर पुढील अभंगांत दिसून येतें.

माय मेली बाप मेला । आतां सांभाळी विठ्ठला ॥
मी तुझें गा लेकरूं । नको मजशीं अव्हेरूं ॥
मति मंद मी तुझी दासी । ठाव द्यावा पायांपाशीं ॥
तुजविण सखे कोण । माझें करील संरक्षण ॥
अंत किती पाहासी देवा । थोर श्रम झाला जीवा ॥
सकळ जीवाच्या जीवना । म्हणे जनी नारायणा ॥

जनाबाईच्या मनामध्ये अहोरात्र विठ्ठलाचाच विचार चालल्यामुळें त्याचें गुणगान गाण्यांतच ती स्वतःला धन्य मानूं लागली.

जनाबाईच्या मनामध्यें देवाविषयीं चाललेली ही भावना आणि त्यामुळें तिच्या अंतःकरणांत होणारी खळबळ एका स्त्रीच्या हृदयाची होती. सामान्यतः कोण-त्याहि आवडणाऱ्या व्यक्तीवर स्त्रीचें सारें प्रेम एकवटून जातें ! ती व्यक्ति म्हणजेच तिचें सर्वस्व होऊन बसतें. त्या व्यक्तीच्या चिंतनांत तिला जगाचा विसर पडतो. अशा प्रकारची स्त्रीच्या हृदयात चालणारी सर्व प्रकारची मृदु भावना जना-बाईच्याहि हृदयात निर्माण झाली होती. तिचें सारसर्वस्व पांडुरंग होऊन बसला होता. त्यामुळें तिच्या सर्व भावना पांडुरंगाभोंवतीं एकवटून गेल्या होत्या. त्या भावनांचा आविष्कार करतांना जनाबाई म्हणते,

वाट पाहतें मी डोळां । कां गा न येसी विठ्ठला ॥
तूं बो माझी निज जननी । मज कां टाकियलें वनीं ॥
धीर किती धरूं आतां । कव घालीं पंढरीनाथा ॥
मला आवड भेटीची । धनी घेईन पायांची ॥
सर्व जीवांचे स्वामिणी । म्हणे जनी मायबहिणी ॥

जनाबाईच्या या आत्यंतिक जिव्हाळ्यानें तिला अखेर देवाची भेट झाली. आतां देव आपणावर प्रसन्न होऊन नेहमीं आपल्याजवळच राहूं लागला आहे असें तिला वाटूं लागलें !

जनाबाईला सर्वठायीं विठ्ठल दिसत होता आणि त्यामुळें तिच्या श्रांत देहाला विठ्ठलानें घेऊन क्षीणभाव उतरल्याचा अनुभव येत होता. "जेथें जातो तेथें

तूं माझा सांगाती " अशी तुकारामाप्रमाणेंच तिचीहि देवावर भक्ति होती. मनाला अंगें यावं लागावें व अंत:करणाला असा अनुभव येऊं लागावा, हीच भक्तिसुखाची अत्युच्च पायरी आहे. भोळ्या भाबड्या जनीला ती लाभली होती. तिचें दर्शन जनाबाईनें पुढील अभंगांत केलेलें दिसून येतें.

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी ॥
पाटी घेऊनिया शिरीं । नेऊनियां टाकी दुरी ॥
ऐसा भक्तिमी भूलला । नीच कामें करूं लागला ॥
जनी म्हणे विठोबाला । काय उतराई होऊं तुला ॥

साळी सडायासी काढी । पुढें जाउनि उखळ झाडी
कांडितां कांडितां । शीण आला पढरिनाथा ॥
सर्वांगीं घाम आला । तेणें पितांबर भिजला ॥
पायीं पैंजण हातीं कडीं । कोंडा पाखडोनि काढी ॥
हातां आला असे फोड । जनी म्हणे मुसळ सोड ॥

धुणें घेऊनि कांखेसी । जनी गेली उपवासी ॥
मागें विठ्ठल धावला । म्हणे कां टाकिलें मला ॥
कां गा धावोनि आलासी । जाय जाय राउळासी ॥
च्यहूं हातें धुणें केलें । जनी म्हणे बरें झालें

देव खातें देव पितें । देवावरी मी निजतें ॥
देव देतें देव घेतें । देवासवें व्यवहारितें ॥
देव येथें देव तेथें । देवाविणें नाहीं रितें ॥
जनी म्हणे विठाबाई । भरूनि उरलें अंतरबाहीं ॥

" जनाबाईच्या उपलब्ध असलेल्या अभंगांपासून हें स्पष्ट दिसतें कीं, ती पांडुरंगाची अगदीं निःसीम उपासिका होती व पांडुरंगाचीहि तिजवर पूर्ण कृपा होती. कारण तसें असल्याशिवाय, दासीवृत्तीनें रहाणाऱ्या जनीसारख्या शेतकरी वर्गांतल्या निरक्षर स्त्रीच्या कवितेंत इतका प्रसाद आणि इतका प्रेमळपणा येणें शक्य नाहीं."*

स्वतःच्या मनात येणारी प्रत्येक कल्पना आपल्या व देवाच्या परस्परावरील श्रद्धेच्या द्वारा व्यक्त करण्याची ही पद्धति जनाबाईनें नव्यानेच सुरू केली होती. मनात येईल ते ते तिनें निर्भयपणें सांगून टाकलेलें आहे. पण तिच्या या आत्माविष्काराकडे पहाताना श्री. आजगावकर म्हणतात कीं, " देवानें मला

* महाराष्ट्र संत कवयित्री, पा. ४९, ५३.

न्हाऊ घातलें, माझें दळणकांडण केलें, माझ्याबरोबर गाणं गाइलं, इत्यादि गोष्टींचा ज्या अभंगात उल्लेख आलेला आहे ते अभंग जनाबाईंचे असतील असें मला वाटत नाहीं. " परंतु रात्रंदिवस पांडुरंगाची उपासना करणाऱ्या जनाबाईंच्या मनात अशा कल्पना येणें समवनीय नाहीं, असें कसें म्हणता येईल ? कारण, विठ्ठलाशीं तिनें एवढा जिव्हाळ्याचा संबंध जोडला होता कीं, स्वत आणि विठ्ठल यामध्यें दुजाभावच मुळीं तिला दिसत नव्हता ! विठ्ठलाला तिनें आई मानल्या मुळें विठ्ठल आणि ती जणु एकरूप होऊन गेली होती ! ! त्यामुळें तिनें आपलें सर्व काम विठ्ठलानें केलें असें म्हटलें, तर त्यात वावगें असें काय होणार आहे कळत नाहीं

पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥
दुसरी माझी ओवी दूजा नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥
तिसरी माझी ओवी तीजा नाहीं ठाव । अवघाची देव पांडुरंग ॥
चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निदान पांडुरंग ॥
पाचवी माझी ओवी माझिया माहेरा । राहे निरंतर पांडुरंग ॥
सहावी माझी ओवी सहाही गिळले । दुरमतीं भेटले पांडुरंग ॥
सातवी माझी ओवी आठवे वेळोवेळा । देखिलें म्या डोळां पांडुरंग ॥
आठवी माझी ओवी अठ्ठाविसी युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥
नववी माझी ओवी सपलें दळण । चुकवी मरण पांडुरंग ॥
दहावी माझी ओवी दहा अवतारीं । यावें संसारीं पांडुरंग ॥

विठ्ठलाकडे पहायची जनाबाईंच्या मनाची ही कल्पना होती.

आणखी—

विठोबा मला मूळ धाडा । (मी) धावत येईन दुडदुडा ।
चरणीं लोळेन गडगडा । माझा जिव झाला वेडा ॥
नामदेवाचें कौतुक । मला सापडलं माणिक ।
विठोबा पाहुन तुझें मुख । हारपली माझि तहानभूक ॥
विठोबा तुझी संगत बरी । जैमा चंदन मैलागिरी ।
संत चालले पंढरी । निशाण पताका जरितारी ॥
जसि मोहळासि लुब्ध मासी । तसी तू सखी माझि होसी ।
सुखदु ख सागेन तुजपाशी । माझा जीव होइल खुषी ॥

तिच्या मनात विठ्ठलाबद्दलच्या या श्रद्धेनें ठाण मांडलें होतें.

त्यामुळें ज्याच्या पदरीं जनाबाई होती, त्या नामदेवाच्या अभंगातहि जनाबाईचें चरित्र पुढीलप्रमाणें आलें आहे —

" नामयाच घरीं असे दासी जनी । तिनें चक्रपाणी वश केला ॥
करिता कामधदा ध्यानीं नारायण । करीत चिंतन अहोरात्र ॥
देखोनिया भाव तिचा पाडुरग । काम करू लागे जनी लागी ॥
रात्रीं येऊनिया जनीचिया घरीं । दळू लागे हरी तिजलागी ॥
दळिता काढिली माळ वैजयती । ठेविली परती शालजाडी ॥
जनीचें आनदें देवाजीस गाण । झालासे तल्लीन पाडुरग ॥

म्हणजे जनाबाईंचे थरीत काहीं अभग तिनें रचलेले नसावेत अशी शका मनात असेल, तर मग नामदेवाचा हा अभगहि असाच त्याचा नसावा असं म्हणावें लागेल !

अभगाच्या कर्त्यांची ही शका मनातून बाजूस काढून जर जनाबाईंच्या अभगाकडे पाहिलें तर एक गोष्ट प्रामुख्यानें आढळून येते कीं, जनाबाईंची दृष्टि फार अतर्मुख होती. मनाला वाटेल तें प्रामाणिकपणें लिहिण्याची प्रथा तिनं सुरू केली. तिचे लेखन अर्थातच त्यामुळें वास्तववादी झालें तेव्हा या सदर्भात तिचा पुढील अभग जरूर पहाता येईल

डोईचा पदर आला खाद्यावरी । भरल्या बाजारीं जाईन मी ॥
हातीं घेईन टाळ खाद्यावरी वीणा । आता मज मना कोण करी ॥
पढरीच्या पेठे माडीयेले पाल । मनगटावर तेल घालिा तुम्ही ॥
जनी म्हणे देवा मी झालें येसवा । निघाले केशवा घर तुझे ॥

" दळूनदळून हात दुखू लागले आहेत शरीर गळून गेले आहे. तें विश्रातीची वाट पहात आहे पण त्याची पर्वा न करिता धोंगडीला पाठ लागताच डोळे मिटून स्वत शीच गुणगुणत ब्रह्मानदात निमग्न होणारी ही नामयाची दासी

माझिये जननी हरिणी । गुतलीस कवणे वनीं ॥
मुकें तुझें मी पाडस । चुकलें माये पाहे वास ॥

म्हणून ती आपल्या आईला, विठ्ठलाला, आळवीत आहे केवढा गोडवा, केवढी आर्तता, नाजुक भावनेचा आविष्कार करण्याचें केवढें कौशल्य या चिमुकल्या ओळींत प्रकट झालें आहे ! "*

श्री ग्रामोपाध्ये यानीं म्हटल्याप्रमाणे " नामदेव, जनाबाई, चोखामेळा या सारख्या सतकवींचे अभग शुद्ध भावगीतें आहेत तीं त्यांच्या अत करणात अकुरतात, तिथेंच उमलतात आणि अखेर तिथेंच कोमजतातहि पण त्याचा हा मुमनहार अत करणातल्या पाडुरगाला पोहोंचत असे "

जनाबाईप्रमाणे सर्व सत कवींची देवाकडे पहाण्यासाची दृष्टीच भिन्न होती. ज्या ज्या भावनेनें जनाबाईनें देवाकडे पाहिले, ती ती भावना देवापर्यंत पोंचली

---

* वि खाडेकर, तारका प्रास्ताविक.

जाऊन देव तिला वश झाला ! अशा भावनेच्या या उत्कटतेने जनाबाईने लिहिलेले असल्याने आजच्या भावगीताचें मूळ उगमस्थान जनाबाईच्या अभगात सापडते, असे म्हटलें तर वावगें होणार नाहीं.

कोणत्या तरी एका प्रमुख कल्पनेभोंवती भावगीतातील तद्नुषगिक इतर कड्वीं फिरत असतात. त्यात रगविलेली सर्व भावना अतिशय हळुवार आणि हृदयातील भावनाचें दर्शन घडविणारी असल्यानें, तिला एक प्रकारचें गेय स्वरूपहि प्राप्त होतें. भावगीताविषयीं सध्या दृढ असलेली ही कल्पना जनाबाईच्या अभगाला ततोतत लागू पडते. तिच्या भावगीतातून तिचा साधा भोळा भाव तिनें मनाच्या तल्लीनतेंतून व्यक्त केलेला आहे. त्यामुळें श्री. नि. स. खाडेकर यानीं " भावनेलीवर उमलणारें फूल म्हणजे कविता " ही केलेली काव्याची व्याख्या येथे ध्यानात आल्याविना रहात नाही.

जनाबाई एक स्त्री होती. तेव्हा स्त्रीच्या भूमिकेमधून तिच्या हृदयातून उमटलेले सहज सुलभ भाव पुढील अभगात पहावयास मिळतील—

विठो माझा लेकुरवाळा । सग लेकुराचा मेळा ॥
निवृत्ति हा खाद्यावरीं । सोपानाचा हात धरीं ॥
पुढे चाल्ले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुदर ॥
गोरा कुभार माडीवरी । चोखा जीवा बरोबरी ॥
बका कडियेवरी । नामा करागुळी धरी ॥
जनी म्हणे गोपाळा । करीं भक्ताचा सोहळा ॥

किंवा

एकच टाळी झाली चद्रभागे वाळवटीं ।
माझा ज्ञानराज गोपाळाशीं लाह्या वाटी ॥
नामदेव कीर्तन करी पुढे नाचे पाडुरग ।
जनी म्हणे बोला ज्ञानदेवा अभग ॥
अभग बोलिता रग कीर्तनीं भरला ।
प्रेमाचेनि छदें विठ्ठल नाचु लागला ॥
साधु या सतानीं देवाला धरिला मनगटीं ।
काय झालें म्हणुनी दचकले जगजेठी ॥
ऐसा कीर्तन महिमा सर्वांमाजीं वरिष्ठ ।
जडमूढ भाविका सोपी केली पायवाट ॥
नामयाची जनी लोळे सताच्या पायीं ।
कीर्तन प्रेमरस अखड देई गे विठाई ॥

सामान्यतः स्त्रियांचा बराचसा काळ आपल्या मुलाबाळात जात असल्यानें जनाबाईंचे हे उपमा दृष्टांत स्त्री स्वभावाचें वैशिष्ट्य दर्शवीत नाहींत काय? सर्व संत मंडळींनीं देवाची भक्ति केली, आपल्या सर्व कल्पनांत त्यांनीं देवाला बसवला तरी त्या देवाला लेकुरवाळा होण्याचे भाग्य जनाबाईंनेच मिळवून दिलें!

"जनाबाईची तळमळ म्हणजे एका स्त्रीहृदयाची तळमळ होती. हृदयांतील सर्व भावना एकवटून पांडुरंगावर शिंपल्या जात होत्या..."*

जनाबाई स्त्री होती म्हणून तिला आपल्या स्त्रीजीवनाचें दुःख होत नव्हतें. उलट तिनें त्याबद्दल बोलतांना स्पष्ट म्हटलें आहे:—

"स्त्री जन्म म्हणउनि न व्हावें उदास।
साधुसंतां ऐसे केले जनी॥
संताचे घरची दासी मी अंकिली।
विठोबानें दिली प्रेमकळा॥"

जनाबाई स्वतःला नामदेवाची दासी समजत होती. त्यामुळें साहजिकच तिला दासीपदाला योग्य अशीं कामें करावीं लागत, असें तिच्या अभंगावरून पदोपदीं आढळून येतें. म्हणूनच स्वतःविषयीं बोलतांना ती म्हणते—

दळितां कांडितां। तुज गाईन अनंता॥
न विसंबे क्षणभरी। तुझें नाम गा मुरारी॥

परमेश्वराबद्दल आपल्या मनामध्ये जनाबाई असा भाव ठेवीत होती. अशा त्या परमेश्वराचें अखेरीस आपणाला दर्शन घडलें असें ती मानते. त्यावेळीं तिला तो कसा दिसला याचें तिनें केलेलें पुढील वर्णन स्त्री स्वभावाला अनुरूप असेंच असल्याचें दिसून येईल.

वैकुंठींचा हरि। तान्हा यशोदेच्या घरीं
रांगतसे हा अंगणीं। माथा जावळाची वेणी
पायीं पैंजण आणि वाळे। हातीं नवनीताचे गोळे
धन्य यशोदा माय। दासी जनी वंदी पाय

किंवा

पाय जोडुनि विटेवरी। कर ठेवुनि कटीवरी
रूप सांवळें सुंदर। कानीं कुंडलें मकराकार
गळां वैजयंती माळा। तो हा मदनाचा पुतळा
गरुड सन्मुख उभा। जनी म्हणे धन्य शोभा

---

* श्री. ग्रामोपाध्ये, संतकाव्य समालोचन.

किंवा

माझें अचंड बचडें छकुडें ग राधे रुपडें ।
पायर घालिति कुचडें ॥ धृ० ॥
हरि माझा गे सावळा । पायीं पैंजण वाजे खुळखुळा ।
यानें भुलविल्या गोपीबाळा ॥...

जनाबाईच्या नावावर उपलब्ध झालेले सर्व अभग नामदेवकालीन जनाबाईचेच आहेत असें म्हणता येणार नाहीं, अशी काहीं अभगाची रचना झालेली आहे. नामदेवाचे गुरु विसोबा खेचर होते असे खुद्द नामदेवानेंहि म्हटलेलें आहे. परतु जनाबाईनें नेहमीं त्याच्या सहवासात राहूनहि तिनें

" माझ्या नामयाचा गुरु । तो हा सोपान सद्गुरु ॥ "

ह्या अभंगात " सोपान " हे नामदेवाचे गुरु होते अशी चुकीची माहिती कशी द्यावी हें आश्चर्य आहे ! त्याचप्रमाणें नामदेवाचे व आपले स्वत चे अवतार यापूर्वी कोठें झाले याची माहिती देणारा जनाबाईचा जो अभग आहे, तोहि असाच बनावट असलेला दिसून येतो.

" बोढीला ताडिला । देव भक्तीनें पाडिला ॥
एका प्रेमा नामासाठीं । भक्तीं काढियला कठीं ॥
झाला नाम्याचा मजूर । भोळ्या भाबाड्याचा थर ॥
भिंती चादया रचिले । त्याचें छप्पर शेकारिलें ॥
वरी सोडुनिया पाणी । धन्य भक्ता म्हणे जनी ॥ "

ह्या अभगामधील भाषेची रचना अर्वाचीन आहे असें दिसतें. " मजूर, छप्पर " हे येथें योजिलेले शब्द सहाशें वर्षामागें होऊन गेलेल्या जनाबाईच्या अभंगात असणें समवनीय वाटत नाहीं. त्यामुळें जनाबाईच्या नावावर असे काहीं अभग मागाहून कुणीतरी रचिलेले असणे शक्य असावें असें यावरून दिसतें !

जनाबाईच्या अभगामधील असा काहीं भाग सोडून दिला, तरी तिचे स्वत.चे म्हणून जे अभग मागें दिलेले आहेत, त्यामध्यें पाडुरगाबद्दलची तिची नितात भक्ति, सहजसुलभ पण उत्कट भावनाविष्कार, लोकगीताच्या धाटणीची सोपी भाषाशैली, वर्णनातील सहजसौंदर्य व प्रामाणिकपणा ठळकपणें नजरेंत भरतो.

जनाबाईची योग्यता तिच्या समकालीन सत मडळींत फार मोठी होती हें "भक्तविजय, अध्याय २२" मधील "ज्ञानेश्वराचीं शब्दरत्नें । तीं सच्चिदानद लिहील ब्राह्मण।...आणि नामया जनीचें बोल गें। रुक्मिणीरमण लिहितसे" इ० ओव्यावरून दिसून येतें.

" जुन्या ग्रथात जनाबाईचा समाधिकाल आषाढ वद्य १३ शके १२७२ हा दिला आहे. निवृत्ति, ज्ञानदेव. सोपान, मुक्ताबाई, नामदेव, विसोबा खेचर,

चोखामेळा, परिसा भागवत, सावता माळी, गोरा कुंभार, जोगा परमानंद, कूर्मदास हे सर्व संत जनाबाईचे समकालीन होत. "*

० ० ●

## कान्होपात्रा

कान्होपात्रा ही शामा नावाच्या एका गणिकेची मुलगी होती. श्री. वि. का. राजवाडे यांनीं कान्होपात्रेचा अदाजी काल शा. शके १३९० हा दिलेला आहे. ती मूळची मगळवेढे येथील रहाणारी. परतु पांडुरंगाच्या भक्तीने तिचें अंतरंग भरून गेल्यामुळें ती वारकऱ्याचे बरोबर जाऊन पंढरपुरास राहिली. स्वत:ची गणिकेची स्थिति ध्यानात घेऊन, आपला उद्धार व्हावा या हेतूनें, ती पांडुरंगाचें दर्शन घडताच म्हणाली—

दीन पतित अन्यायी । शरण आल्यें विठाबाई
मी तों आहें यातिहीन । न कळे काहीं आचरण
मज अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई
ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी

कान्होपात्रा स्वरूपानें फार देखणी होती. त्यामुळे बेदरच्या बादशहाची तिच्यावर नजर होती. त्यानें जेव्हा कान्होपात्रेस आणावयास म्हणून आपले नोकर पाठविले, तेव्हा कान्होपात्रेने आपलें संरक्षण करावें म्हणून विठ्ठलाची करुणा भाकली. गाभाऱ्यात जाऊन देवाला हात जोडून तिनें सांगितलें:—

नको देवराया अंत पाहू आता । प्राण हा सर्वथा फुटो पाहे
हरिणीचें पाडस व्याघ्रे धरियेलें । मजलागीं जाहलें तैसें देवा
तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं । धावे हो जननी विठाबाई
मोकलोनी आस जाहलें मी उदास । घेई कान्होपात्रेस हृदयात

पतित पावन म्हणविती आधीं । तरी का उपाधि भक्तापाठीं
तुझें म्हणविता दुजे अंगसंग । उणेपणा सांग कोणाकडे
सिंहाचें भातुकें जंबुक पै नेता । थोराचिया माथा लाज वाटे
म्हणे कान्होपात्रा देह समर्पणें । करावा जतन ब्रीदासाठीं

आणि शेवटीं परलोकीं प्रयाण केलें ! आपल्या निःसीम भक्तीनें अशा प्रकारें तिनें आपलें नाम अजरामर करून ठेविलें आहे.

---

* महाराष्ट्र–संतकवयित्री, पान ५५

कान्होपात्रेचे अभंग फार थोडे उपलब्ध आहेत. ह्या अभंगांवरून तिची भाषा बरीच सुधारलेली दिसून येते. स्वत: गणिका असूनहि पांडुरंगाबद्दल तिनें दर्शविलेली उत्कट भक्ति हाच तिच्या अभंगाचा प्रमुख विशेष आहे. सर्व संकटामधून परमेश्वरच फक्त आपली सुटका करील हा तिचा भोळा भाव सगळीकडे दिसून येतो. ऐहिक जीवनामधूनच तिचें काव्य निर्माण झालेलें आहे. या काव्यात करुण रसाचाच उठाव अधिक झालेला आहे. स्वत:च्या उद्धारासाठीं तिनें ही जी काव्यरचना केलेली आहे, तीस एक प्रकारें अधिक वास्तवता आलेली आहे.

• • •

## प्रेमाबाई

प्रेमाबाईची फारच थोडी कविता उपलब्ध झालेली आहे. तथापि तिची जीं चार-पाच पदें उपलब्ध झालेलीं आहेत, तीं इतकीं प्रेमळ आणि रसाळ आहेत कीं, त्यावरून तिचें वैशिष्ट्य उठून दिसावें. उदाहरणार्थ तिचें "गडे हो कृष्ण गडी आपुला" हें पद पहावें.

"गडे हो कृष्ण गडी आपुला। राजा मथुरेचा झाला ॥ धृ० ॥

टाकोनि काळा कांबळा। कासे पीतांबर कसिला।
टाकी मयूर पिच्छाला। जडित मुकुट घातला।
आता काय ओळखिल आपुल्याला। राजा मथुरेचा झाला ॥ १ ॥

टाकुनि गुंजाची दाटी। घातला कौस्तुभ श्रीकंठीं।
टाकुनि मुरली वेताटी। करिं घे आयुधें गोमटीं।
अता काय बागुलभय त्याला। राजा मथुरेचा झाला ॥ २ ॥

गोधनें चारू विसरला। अता तो नृपांमधें शिरला।
नारींनं उरीं धरुनि चुरला। अता तो कुब्जेनें वरिला।
देतसे निज पद प्रेमेला। राजा मथुरेचा झाला ॥ ३ ॥

"वरील कविता म्हणजे एका अशिक्षित भाविक स्त्रीची साधी प्रेमळ वाणी आहे. तिच्या साधेपणामुळेंच तिला एक प्रकारची हृदयंगमता प्राप्त झाली असून प्रसाद तर तींत अगदीं पूर्णपणें भरून राहिला आहे. शिवाय मनुष्य स्वभावाचें सहजसुंदर वर्णनहि तींत उत्तम प्रकारें ग्रथित झालेलें आहे." *

---

* श्री. आजगावकर, महाराष्ट्र संत कवयित्री पान ९३.

अभंग आणि ओवी ही या पूर्वीची छंद रचना सोडून प्रेमाबाईनें पदें रचिलीं. हें तिच्या काव्याचे आणखी एक वैशिष्ट्य सांगता येईल. शिवाय या पदांची रचनाहि अत्यंत चटकदार झालेली असल्यानें त्यांची गोडी कायम टिकणारी आहे, असे त्यांच्या आजहि दिसून येणाऱ्या लोकप्रियतेवरून म्हणतां येईल.

श्री. वि. का. राजवाडे यांनीं प्रेमाबाईचा काळ शके १५८० हा दिलेला असून महिपतीनें आपल्या भक्तलीलामृताच्या ४२ व्या अध्यायांत प्रेमाबाईचें चरित्र अतिशय रसाळ मार्पत दिलेलें आहे.

० ० ०

# संत बहिणाबाई

अगदीं बाळपणापासूनच परमार्थाकडे विलक्षण ओढा असलेली अशी संत बहिणाबाई ही एक अद्वितीय कवयित्री होऊन गेली. संत शिरोमणी तुकाराम महाराज यांच्या नेतृत्वाखालीं बहिणाबाईनें पांडुरंगाचें नामसंकीर्तन गायिलें आहे. आपल्या ह्या गुरुबद्दल बहिणाबाईस अपार भक्ति वाटत असे. जनाबाईला जसा विठ्ठलाचा ध्यास तसाच बहिणाबाईस तुकारामाचा ध्यास. त्यामुळें ध्यानीं, मनीं, स्वप्नीं सदासर्वदा तिला तुकारामच दिसूं लागे. आपला हा गुरुबद्दलचा भाव व्यक्त करतांना, बहिणाबाई लिहिते:—

तूं माझी माउली मी तुझें बाळक । करितसें कौतुक नामीं तुझें
तूं माझी गाउली मी तुझें वासरूं । करितसें हुंकारू नामीं तुझे
तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । करीं रात्रंदिवस ध्यान तुझें
तूं माझा चंद्रमा मी तुझें चातक । सदा हरीस स्मरणीं तुझे
तूं माझा मेघुला मी तुझें चकोर । उल्हास हा थोर देखोनिया
तूं माझा सज्जन मी तुझी सांगाती । अखंड हे चित्तीं ध्यान तुझें
बहेणी म्हणे माझा तैसा प्राण सखा । तुकाराम देखा सर्व धनी

तुकारामाचें आणि आपलें नातें अशा तऱ्हेनें व्यक्त केल्यानंतर तुकोबांविषयींची आपली स्वतःची भावना ती पुढीलप्रमाणें वर्णन करते.

जयाचिया पदें होतसे विश्रांति । त्याची देहाकृति विठ्ठलचि
विठ्ठलासि तया नाहीं भेदभाव । ऐसें माझें मन साक्ष आहे
पांडुरंग तुका पांडुरंग तूं का । वेगळीक देखा कैंचि होय
कलियुगीं बौद्धरूप धरी हरि । तुकोबा शरीरीं प्रवेशला
तुकोबाची बुद्धि पांडुरंग रूप । मन तें स्वरूप तुकोबाचें

तुकोबाचे सर्व इंद्रियें चालक । पांडुरंग देख सत्य आहे
तुकोबाचे नेत्र तेहि पांडुरंग । क्षेत्र ते अभंग रूप त्याचें
तुकोबाचे हात लिहिताती जें जें । त तें ते सहजे पांडुरंग
बहेणि म्हणे रूपें व्यापक तुकोबा । ध्यान माझ्या जीवा हेंचि वाहे

बहिणाबाईच्या ह्या अभंगावरून गुरुभक्तीचें माहात्म्य स्त्रियांनीं लिहिलेल्या साहित्यांत इतक्या उत्कटत्वानें पहिल्यांदाच मुखर झालें आहे, असें दिसून येतें. यापूर्वी विठ्ठलाच्या भक्तीचें माहात्म्य जनाईनें, मुक्ताईनें किंवा कान्होपात्रेनें गाइलें. परंतु देवादिकांना सोडून प्रत्यक्ष मानवाच्या श्रेष्ठपदाचें माहात्म्य गाण्याचें पुण्य बहिणाबाईनेंच आपल्या पदरीं पाडिलें, असें म्हणावें लागेल. तुकारामासारख्या थोर संताचा सहवास आपणाला लाभला याबद्दल बहिणाबाईस वाटणारा आनंद या शब्दांतून व्यक्त झालेला आहे.

बहिणाबाईच्या चरित्रांतील एक विशेष उल्लेखनीय अशी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिनें दिलेलें स्वतःचें आत्मचरित्र. मराठी सारस्वतांतील आत्मचरित्राचें उगमस्थान म्हणून बहिणाबाईच्या या अभंगाचें मोल मोठें आहे. आपल्या आत्मचरित्रास सुरवात करतांना बहिणाबाई म्हणते:—

देवगांव माझें माहेर साजणी । वेरूळ तेथोनी पूर्वभागीं
देवाचा समूह सर्व जये ठायीं । मिळालासे पाहीं देवगांवीं
हिमालयाहुनी चालिला अगस्ती । चातुर्मास्य वस्ती केली जेथें
तेथुनी पश्चिमें शिवनद वहात । तीर्थ हें अद्भुत तीर्थामाजीं
लक्ष तीर्थ जेथें येउनी सर्वदा । लाक्षायणी सदा वास तेथें
तें स्थळ पवित्र देखोनी अगस्ती । अनुष्ठाना येती दिनोदयीं
वर हा दिधला ऋषी अगस्तीनें । लक्ष तीर्थें जाण लावग्रामा
स्नान दान करी जप अनुष्ठान । सिद्धि तेथें जाण होय नरा
अगस्ती राहोनि देवगावीं जाण । शिवनदी स्नान करी सदा
बहेणि म्हणे ऐसें स्थळ देवग्राम । तेथें माझा जन्म झाला असे

अशा रीतीनें आपल्या जन्मापासून तों अखेरीपर्यंतचें सर्व चरित्र बहिणाबाईनें मोठ्या कौशल्यानें आपल्या अभंगांतून चित्रित केलेलें आहे. त्यामध्यें तिच्या जीवनांतील बराचसा भाग मोठा मनोरंजक उतरलेला आहे. जन्मपत्रिका, गोत्र, विवाह, सडासंमार्जन, तीर्थयात्रेचा प्रवास इत्यादि लहानमोठे प्रसंग सविस्तरपणें बहिणाबाईनें दिलेले आहेत. त्याचप्रमाणें आपले आईवडील, नातेवाईक, नवरा वगैरे सर्वांची यथायोग्य ओळखहि येथें चांगल्या रीतीनें घेता येण्यासारखी परिस्थिति बहिणाबाईच्या अभंगांनीं निर्माण केली आहे.

बहिणाबाईच्या चरित्रांतील दुसरी एक विशिष्ट गोष्ट म्हणजे तिनें आपल्याला गाईच्या वासराचा असलेला जो लळा व्यक्त केला आहे ती होय. येथें बहिणा-

बाईच्या स्त्रीमनाची–वात्सल्याची–ओळख सुलभतेनें पटते. बहिणाबाईचें हें वात्सल्य पुढील शब्दातून प्रतीत झालेलें आहे.—

गाईचें तें वत्स तेंही पैं कपिला । माझ्या ठायीं तिला हेत बहू
मीच सोडीं तरी वत्स रिघे दोहा । करिता दोहना सवे माझी
मीच पाणी पाजी तृण घाली मीच । मजवीण काच ( खती ) मनीं वाहे
मी जाय पाणिया ओरडे ते वत्स । गाय वाचा पुच्छ सवें चालें
करुनिया लोक नवलाचें राहतीं । उगेच पाहती वत्स गाई
मोकळेंचि वत्स असोनिया जाण । न वचे ( जाई ) आपण गाईपाशीं
तृण घालीं तरी भक्षिती आपण । पाजिल्या जीवन तेव्हा पिती
रात्रीं का अनमरी वत्स निजे शेजे । पुराणीं तें फुजे (स्फुदित) श्रवण कालीं
कथे पासीं जाय सवे तेही येत । उभेचि निवात कथा ऐके
गाय गोठा घरीं आपण कथेसी । जाता मी स्नानासी सवे चाले

या वासराचें वैशिष्ट्य सागताना बहिणाई आणखी सागते—

आरती झालिया नमस्कार होती । आपणहि क्षिती ठेवी डोकें

येथें हा अद्भुत चमत्कार वाचीत असताना ज्ञानदेवानीं रेड्याला बोलायला लावल्याची कथा ध्यानात येते !

बहिणाबाईनें केवळ देवादिकावरीलच आपले विचार काव्यातून न गोवता प्रत्यक्ष व्यवहाराशीं अधिक जवळचें नातें स्वीकारलें लहानपणापासूनच तिचा ओढा परमार्थाकडे विशेष होता. सर्वसामान्य स्त्रीच्या जीवनात येणारे काहीं प्रश्न तिनें मोठ्या कुशलतेनें आणि विचारप्रवर्तक रीतीनें सोडवलेले आहेत. ती स्वत आपल्या ससारात समोंवताल्च्या चार स्त्रियासारखी रममाण झाली नव्हती. तथापि, सासारिक स्त्रीच्या मनात उचबळणाऱ्या भावना तिच्याजवळ होत्या. यासंबंधीं बहिणाईच्या कवितांचे प्रकाशन केलेल्या प्रकाशकानें आपल्या उपोद्घातात म्हटलें आहे, “ ज्या काळीं स्त्रियाना अभ्यासाची मुळींच गोष्ट न हती आणि हल्लींसारख्या शाळाहि स्थापन झाल्या नव्हत्या, त्याकाळीं स्त्रियानीं केलेले अभग हीच साक्ष पटवीत आहेत कीं, स्त्रियानीं आपला पतिव्रताधर्म सभाळून, राहिलेल्या वेळीं प्रेमानें भगवताचें नामस्मरण करीत असावें म्हणजे त्याच नामस्मरणानें आपली वृत्ति ईश्वराचे ठायीं तल्लीन होऊन जाते. याच प्रत्यक्ष उदाहरण सर्व मनुष्यमानात सत बहिणाबाईनें घालून दिलें आहे. ”

पतिव्रता कोणास समजावें हें सागताना बहिणाबाई म्हणते —

धन्य त्रिभुवनीं त्या पतिव्रता । जे आपुलिया हिता प्रवर्तती
आपुला पति जिन ओळखिला चित्तीं । धन्य ती जगतीं त्रिभुवनीं...

आणि हा पतिव्रता धर्म जो आहे त्याची महती गातांना तिच्या—स्त्रीच्या-अंतःकरणांतून बाहेर पडलेले पुढील बोल विशेष लक्षात घेण्याजोगे आहेत:—

पतिव्रता धर्म ऐका गे साजणी । धन्य जा गर्तिनी पुण्यशील
येणेंचि श्रवणें मुक्ति होय जीवा । पतीवीण देवा नाठविजे
आपणा आपण ओळखिलें जिनें । धन्य तेचि जाण पतिव्रता
प्रपंच परमार्थ चालवी समान । तिनेंच गगन झेलियलें....
साधुसंत सेवा पतीचें वचन । पाळी तेंचि धन्य पतिव्रता
शांति-क्षमा-दया पाळी भूतकृपा । जाणोनि स्वरूपा पतीचिया
पतीचें वचन अमृता समान । धन्य तिचा जन्म माता-पिता
बहेणि म्हणे तिनें जिंकिला संसार । वैकुंठीचा थार केला तिनें
ऐका गे साजणी स्वहिताच्या काहाणी । सांगतां हें मनीं धरा बाई...

सर्वसामान्य स्त्रीला तुळशीचें माहात्म्य विलक्षण वाटतें. एखाद्या भक्ताला देवासंबंधी जसा नितांत आदर वाटतो तसाच स्त्रियाना तुळशीबद्दल नितांत आदर वाटत असतो. बहिणाबाईहि एक स्त्री होती. तिच्याजवळहि ही भावना होतीच. परंतु ती भगवद्भक्त असल्यामुळे तिनें आपली ही भावना पुढील शब्दांत व्यक्त केली आहे:—

जेथे नाहीं वृंदावन । तेचि जाणावें स्मशान
राहूं नये तये ठाईं । एक घडी पळ पाही
जेथे तुळशीचें पान । तेथें असे नारायण
बहेणि म्हणे विष्णु नांदे । तुलसीचे ठाईं बोधे
...सर्व सिद्धि वृंदावनीं । येती तुलसी दर्शनीं
बहेणि म्हणे वृंदावन । कलियुगीं मुक्तिस्थान
गंगा आणि भागिरथी । तुलसीचें ठाईं येती
होय दर्शन जयासी । तोचि देह पुण्यराशी
सर्व तीर्थांचें माहेर । आहे तुलसी साचार
बहेणि म्हणे तुलसि जेथें । तेथें तीर्थांचा सघात
तुलसीचें पत्र । असे देवासी एकत्र
नाही दोघां भिन्न भेद । दोघाचें ते एक पद
तुलसीचें पानीं । वसे राधाकृष्ण दोन्ही
बहेणि म्हणे धन्य देवा । जया तुलसीची सेवा
...देव न सांपडे मना । तरि जावें वृंदावना
तेथें होय समाधान । स्वयें भेटे नारायण...

बाईंच्या स्त्रीमनाची–वात्सल्याची–ओळख सुलभतेनें पटते. बहिणाबाईंचें हें वात्सल्य पुढील शब्दांतून प्रतीत झालेलें आहे:—

गाईचें तें वत्स तेंही पैं कपिला । माझ्या ठायीं तिला हेत बहू
मीच सोडीं तरी वत्स पिये दोहा । करितां दोहना सवें माझी
मीच पाणी पाजी तृण घाली मीच । मजवीण काच ( सती ) मनीं वाटे
मी जाय पाणिया ओरडे तें वत्स । गाय वाया पुच्छ सवें चालें
करूनिया लोक नवलाचें राहतीं । उगेंच पाहती वत्स गाई
मोकलेचि वत्स असोनिया जाण । न वचे ( जाई ) आपण गाईपाशीं
तृण घालीं तरी भक्षिती आपण । पाजिल्या जीवन तेव्हां पिती
रात्रीं का अवसरीं वत्स निजे शेजे । पुराणीं तें फुजे (स्फुदित) श्रवण कालीं
कथे पासीं जाय सवें तेही येत । उभीचि निवांत कथा ऐके
गाय गोठा घरीं आपण कथेसी । जाता मी स्नानासी सवें चाले...

या वासराचें वैशिष्ट्य सांगताना बहिणाई आणखी सांगते—

आरती झालिया नमस्कार होतां । आपणहि क्षितीं ठेवी डोकें

येथें हा अद्भुत चमत्कार वाचीत असताना ज्ञानदेवांनीं रेड्याला बोलायला लावल्याची कथा ध्यानांत येते !

बहिणाबाईंनें केवळ देवादिकांवरीलच आपले विचार काव्यांतून न गोवता प्रत्यक्ष व्यवहाराशीं अधिक जवळचें नातें स्वीकारलें. लहानपणापासूनच तिचा ओढा परमार्थाकडे विशेष होता. सर्वसामान्य स्त्रीच्या जीवनांत येणारे कांहीं प्रश्न तिनें मोठ्या कुशलतेनें आणि विचारप्रवर्तक रीतीनें सोडवलेले आहेत. ती स्वतः आपल्या संसारांत सभोंवतालच्या चार स्त्रियांसारखी रममाण झाली नव्हती. तथापि, सांसारिक स्त्रीच्या मनांत उचंबळणाऱ्या भावना तिच्याजवळ होत्या. याविषयीं बहिणाईंच्या कवितांचें प्रकाशन केलेल्या प्रकाशकानें आपल्या उपोद्घातांत म्हटलें आहे, " ज्या काळीं स्त्रियांना अभ्यासाची मुळींच सोयी नव्हती आणि हल्लींसारख्या शाळाहि स्थापन झाल्या नव्हत्या, त्याकाळीं स्त्रियांनीं केलेले अभंग हीच साक्ष पटवीत आहेत कीं, स्त्रियांनीं आपला पतिव्रताधर्म सभाळून, राहिलेल्या-वेळीं प्रेमानें भगवंताचें नामस्मरण करीत असावें. म्हणजे त्याच नामस्मरणानें आपली वृत्ति ईश्वराचे ठायीं तल्लीन होऊन जाते. याचें प्रत्यक्ष उदाहरण सर्व मनुष्यमानांत संत बहिणाबाईंनें घालून दिलें आहे. "

पतिव्रता कोणास समजावें हें सांगतांना बहिणाबाई म्हणतेः—

धन्य त्रिभुवनीं त्या पतिव्रता । जे आपुलिया हिता प्रवर्तती
आपुला पति जिनें ओळखिला निरुता । धन्य ती जगतीं त्रिभुवनीं...

आणि हा पतिव्रता धर्म जो आहे त्याची महती गाताना तिच्या—स्त्रीच्या-अंतःकरणातून बाहेर पडलेले पुढील बोल विशेष लक्षात घेण्याजोगे आहेत:—

पतिव्रता धर्म ऐका गे साजणी । धन्य ज्या गर्तिनी पुण्यशील
येणेंचि श्रवणें मुक्ति होय जीवा । पतीवीण देवा नाठविजे
आपणां आपण ओळखिलें जिनें । धन्य तेचि जाण पतिव्रता
प्रपंच परमार्थ चालवी समान । तिनेंच गगन झेलियलें ...
साधुसंत सेवा पतीचें वचन । पाळी तेंचि धन्य पतिव्रता
शांति क्षमा दया पाळी भूतकृपा । जाणोनि स्वरूपा पतीचिया
पतीचें वचन अमृता समान । धन्य तिचा जन्म माता-पिता
बहेणि म्हणे तिनें जिंकिला संसार । वैकुंठीचा थार केला तिनें
ऐका गे साजणी स्वहिताच्या काहाणी । सांगतां हे मनीं धरा बाई...

सर्वसामान्य स्त्रीला तुळशीचें माहात्म्य विलक्षण वाटतें. एखाद्या भक्ताला देवासंबंधीं जसा नितांत आदर वाटतो तसाच स्त्रियांना तुळशीबद्दल नितांत आदर वाटत असतो. बहिणाबाईहि एक स्त्री होती. तिच्याजवळहि ही भावना होतीच. परंतु ती भगवद्भक्त असल्यामुळें तिनें आपली ही भावना पुढील शब्दांत व्यक्त केली आहे:—

जेथें नाहीं वृंदावन । तेंचि जाणावें स्मशान
राहूं नये तये ठाईं । एक घडी पळ पाही
जेथें तुळशीचें पान । तेथें असे नारायण
बहेणि म्हणे विष्णु नांदे । तुळसीचे ठाईं बोधे
.. सर्व सिद्धि वृंदावनीं । येती तुळशी दर्शनीं
बहेणि म्हणे वृंदावन । कलियुगीं मुक्तिस्थान
गंगा आणि भागिरथी । तुळसीचें ठाईं येती
होय दर्शन जयासी । तोचि देह पुण्यराशी
सर्व तीर्थांचें माहेर । आहे तुळसी साचार
बहेणि म्हणे तुळसि जेथें । तेथें तीर्थांचा मनात
तुळसीचें पत्र । असे देवासी एकत्र
नाहीं दोघां भिन्न भेद । दोघांचें तें एक पद
तुळसीचें पानीं । वसे राधाकृष्ण दोन्ही
बहेणि म्हणे धन्य देवा । जया तुळसीची सेवा
...देव न सांपडे मना । तरि जावें वृंदावना
तेथें होय समाधान । स्वयें भेट नारायण...

बहिणाबाईच्या काव्यातील हें स्त्रीजीवन जितकें रम्य आहे, तितकीच तिची कोणत्याहि विषयावरची विचारशक्तीहि अभिनव आहे. ती स्वत. स्वतत्र रीतीनें विचार करीत होती आणि म्हणून तिच्या विचारानाहि इतराहून एक वेगळें वळण लागलें होतें. त्यामुळें कोणत्याहि गोष्टीचा अर्थ लावताना ती स्वत चें मत स्पष्टपणें व्यक्त करीत असे.

"बहिणाबाईनें ब्राह्मणाचें महत्त्व फार वर्णिलें आहे, परतु ब्राह्मणाच्या जातींत जन्म पावला तो ब्राह्मण, अशी मात्र तिची ब्राह्मणाची व्याख्या नाहीं, हें लक्षात ठेवले पाहिजे." (आजगावकर) त्यासबधीं ती म्हणते.—

जीव हा ब्राह्मण म्हणावें इत्यर्थ । तरी तेथें अर्थ सापडेना
सर्वां ठायीं जीव सारखाचि एक । पशुपक्षी देख चाडाळादि
पुढें जीव होती मागें बहु झाले । ब्राह्मणत्व आलें नाहीं तया
बहेणि म्हणे जीव प्राणीमात्रीं एक । ब्राह्मणत्व देख म्हणों नये .

इतर लोक समजतात त्याप्रमाणे पाडित्य, मत्रकर्म, इत्यादिकाचाहि ब्राह्मण्याशीं काहीं सबध नाहीं असें स्पष्ट सागून खऱ्या ब्राह्मण्याची व्याख्या बाईनें पुढीलप्रमाणें केली आहे.—

गुणात असोन गुणासी नातळे । कियेसी न कळे अणुमात्र
तोचि रे ब्राह्मण ओळखावा जनीं । द्वैत तया स्वप्नीं आढळेना
षड्‌र्मिरहित षड्‌भाव नातळे । दोषाचेनि मेळे सापडेना
बहेणि म्हणे सत्य न साडी सर्वथा । ब्राह्मण तत्त्वता तोचि एक
निर्विकल्प जया समाधि जोडली । चित्तासी अमोलीं परब्रह्मीं
तोचि एक खरा ब्राह्मण वेदार्थी । आणिक तीं मते पाखडाचीं ..

कोणत्याहि कल्पनेचा अर्थ सत आपापल्या परीतें कोणत्याहि प्रकारानें लावू शकत असत. बहिणाबाईनेंहि काहीं स्वतत्र अर्थ लावले होते. श्रीकृष्ण चरित्रातील रासक्रीडा वगैरे प्रकारामधून व्यभिचार ध्वनित करण्याच्या ज्या काही कथा आल्या आहेत, त्याबद्दल बहिणाबाई म्हणते.—

अष्टधा प्रकृति तेचि ह्या गोपिका । अष्टभाव देखा गोपाळ हे
क्रीडती गोकुळीं सदा या शरीरीं । स्वानदे निर्भरीं परमानद
इद्रिय गोधने विषयतृणचरें । उमती अपारें निजसत्त्वें
गोरसाचे डेरे अखड सचले । सुखें सुखावले स्वानुभवें
तेणें सुखानदे वाचती गोपाळ । करिती गदारोळ गोपिका त्या
बहेणि म्हणे जेथें कृष्णाचा अवतार । तेथें व्यभिचार स्वप्नीं नाहीं

आणि अशा रीतीनें व्यभिचाराची कल्पना तिनें साफ धुडकावून दिली आहे.

सर्व सतांप्रमाणें पढरीच्या विठ्ठलाचें वेड बहिणाबाईसहि होतें. पढरपूरचा विठ्ठल म्हणजे सताना एक विसाव्याची जागा होती हा विठ्ठल म्हणजेच जणु

त्याचें सारसर्वस्व ! आणि म्हणून त्याचें जेवढें गुणगान करता येईल तितकें ते करीत विठ्ठलाशी एकरूप होऊन जाण्यात त्याना अलौकिक आनंद मिळे.

मनात पाहिलें बुद्धीत गाइले । चित्तात ध्याइलें विठ्ठलासी

अशी बहिणाबाईची अवस्था होती त्यामुळ विठ्ठलाचा थोरपणा ध्यानात आल्यावर बहिणाबाई म्हणते —

तुझ्या थोरपणा कोण लावी हात । वाटत मनात धरावेसें
धरोनिया बळें घ्यावें हृदयात । सोडवील तेथ कोण दुजें
विवेक राखण ठेवीन जवळीं । हृदयाची टाळी देऊनिया
बहेणि म्हणे माझें देह माडवल । ऐकोनिया बोल आता तरी

जनाबाई प्रमाणेंच पंढरीच्या विठ्ठलाला बहिणाबाईनेंहि लेकुरवाळा करून ठेविलें आहे —

विठो माझा लेकुरवाळा । सगें लेकुराचा मेळा
तुकोबा तो कडियेवरी । नामा करागुली धरी
एकनाथ खाद्यावरी । कबीराचा हात धरी
गोरा कुभार माडीवरी । चोखा जिवा बरोबरी
पुढें चाले ज्ञानेश्वर । माग मुक्ताई सुदर
बहेणि म्हणे रा गोपाळा । करिसी भक्ताचा सोहळा

जनाबाईच्या अभगात आणि या अभगात स्त्री हृदयाचा आविष्कार सारख्याच रीतीन व्यक्त झालेला आहे. फक्त काळाप्रमाणें त्यात आलेल्या व्यक्तींना वेगवेगळें स्थान मिळालें आहे इतकेंच काय तें.

विठ्ठलाला भेटायला अनेक सत जात असत पण ते सर्वच सत होते कीं नाहीं, याची भ्राती पडून बहिणाबाईनें सताची व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे —

दुसरियाचे दु खें शिणें ज्याचें चित्त । तोचि एक सत ओळखावा
तयासी पुसता हारीन तो शीण । दु ख धे हिरोन रोकडेंची
परोपकार जया आलसे विभागी । शाती हे सर्वांगीं डोलतसे

कृपा जयापाशीं होउनी आदण । आनदी निमग्न सदाकाळीं
बहेणि म्हणे मनीं भूतदया पूर्ण । तेचि ओळखण सतजना

आणि असे हे सत भक्तिमार्गानें जातात, तेव्हा भक्ति म्हणजे त्यान्या दृष्टीनें काय आहे, तर—

सताचे वचनीं दृढ जया भाव । भक्ति अभिनव हेचि खरी
सागितली खूण आदरें जो मनीं । पावेल निर्वाणीं तोचि एक
सतानें वचन शास्त्राचें आधारें । भक्तानें निर्धारें दृढ व्हावें
बहेणि म्हणे सत पायीं जया आर्त । हाचि भक्तिपथ ओळखावा

असें बहिणाबाईस वाटतें. अशा भक्तिमार्गानें जाणाऱ्या संताबरोबर पंढरीला वारीसाठीं जाताना होणारा परमानंद तिनें पुढील शब्दांत गोवून ठेवलेला आहे:—

चालता पाउलीं पंढरीच्या वाटे । ब्रह्म सुख भेटे रोकडेंचि
दिंडी ध्वजा भार चालती अपार । मृदुंग गंभीर स्वर देती
दमामा दुंदुभी घालिती परघटा । होउनी उघडी विष्णुदास
बहेणि म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवाचा देखे डोळा ।

बहिणाबाईंच्या चरित्रामधील सर्वांत अलौकिक अशी गोष्ट म्हणून तिनें सांगितलेल्या आपल्या तेरा जन्मांचा वृत्तान्त होय. बहिणाबाईचा हा तेरा जन्मांचा वृत्तांत म्हणजे आजपर्यंत इतक्या बारकाईनें कोणीहि नमूद न केलेली अशी उल्लेखनीय गोष्ट आहे. वयाच्या ७२ व्या वर्षी बहिणाबाईनें आपल्या मुलास ही गोष्ट सांगितलेली आहे ! तिचें आध्यात्मिक ज्ञान विशेष प्रकारचें होतें, असें या हकीकतीवरून दिसून येतें. याबद्दल कै. प्रा. शिवरामपंत परांजपे यांनीं म्हटलें आहे " संस्कृत आणि मराठी वाङ्मयातून जुन्या भारत भागवतादिकां सारख्या इतिहास पुराणातून आणि नव्या भक्तिरसाच्या भाविक ग्रंथातून पूर्वीच्या जन्माचीं आणि पुनर्जन्माचीं वर्णनें प्रसंगवशात् पुष्कळ आलेलीं आहेत. परंतु बहिणाबाईनीं दिलेल्या वर्णनाइतकीं तीं सविस्तर नाहींत. शिवाय बहिणाबाईचे पूर्वजन्म हें अगदीं अलीकडच्या काळातील असल्यामुळें ते पौराणिक प्रदेशापेक्षा अधिक विश्वासार्ह आणि विचारार्ह वाटणें स्वाभाविक आहे " आपल्या पहिल्या जन्माच्या वेळची हकीकत देताना बहिणाबाई म्हणते—

पूर्वील संस्कार होता काहीं शुद्ध । जन्मता प्रसिद्ध वळी आला
जन्मलिया मज वर्षांचिया कोडी । पाहताचि दृष्टी वदन माझें
जाणिला सद्‌गुरु केदारें आपुला । तयातें दावीला भाव माझा
नाहीं ठाव वह दिधलें आपण । माझा सहजगुण ओळखून
दीधली ते दीक्षा शंकराचा मंत्र । जपे अहोरात्र खेळताहि
खेळता देऊळ शंकराची मूर्ति । करीतसे भक्ति प्रेमरसें

अशा रीतीनें आपण कोठें जन्म घेतला, कुणाच्या पोटीं जन्म घेतला व आपलें आयुष्य कसें गेलें, याची सविस्तर माहिती बहिणाबाईनें दिली आहे. तेरा जन्मांची हकीकत सांगून झाल्यावर शेवटीं ती सांगते—

तीन शतें आणि वरुषे एकावन्न । आयुष्य निर्माण तेरा जन्मीं
घातले स्त्रीरूपे साधने हरीच्या । निमाल्या मनाच्या वृत्ति जव
आता निश्चयानें सांगेन निर्धार । झालें निर्विकार चित्त माझें
बहेणि म्हणे काहीं पुढें नाहीं हेत । स्वरूपी निवांत चित्त माझें

पुष्कळ माणसांचा पूर्वजन्मावर किंवा पुनर्जन्मावर विश्वास असत नाहीं. याच्या उलट त्या गोष्टीवर विश्वास ठेवणारेहि काहीं लोक आहेतच. बहिणाबाईच्या

विविध अभंगावरून प्रा. परांजपे यांनीं एक सविस्तर कोष्टक तयार करून तेरा जन्माच्या बरोबर आराखडा तयार केलेला आहे. त्याचा आधार घेऊन ते म्हणतात, " या कोष्टकात दिलेल्या तेरा जन्मांपैकीं अखेरचा म्हणजे तेराव्या जन्माच्या अखेरीस बहिणाबाई ही मुक्त झालेली आहे; आणि मुक्त होण्याच्या स्थितीला येणें म्हणजे अर्थात् जीवाची आध्यात्मिक उन्नति अत्यन्त परिपक्वतेला येऊन पोहोचणें असाच अर्थ होय, हें उघड आहे. एखादा जीव तावडतोब उद्धरत नाहीं, तर उद्धरण्याच्यापूर्वीं त्याला अनेक जन्म घ्यावे लागतात. अशी आपल्यामधील या विषयासंबंधाची कल्पना आहे. " अनेक जन्म संसिद्धस्ततो याति परां गतिम् " या भगवद्गीतेंतील वचनामध्येंहि हाच भावार्थ सांगितलेला आहे. या आध्यात्मिक उन्नतीच्या वाढीचें चित्र या बहिणाबाईच्या तेरा जन्माच्या वर्णनामध्यें आपल्याला जसें पाहावयाला सापडतें, तसं तें अन्यत्र क्वचितच दृष्टीस पडतें. "

बहिणाईनें सांगितलेल्या या पूर्वजन्माच्या माहितीवर कोणाचा विश्वास बसो अगर न बसो, पण त्यावरून एक गोष्ट मान्य करावयास हरकत नाहीं आणि ती म्हणजे बहिणाबाई ही एक अलौकिक बुद्धिमत्तेची स्त्री होऊन गेली, ही होय. स्वतंत्र रीतीनें विचार करण्याची ताकद तिच्या अंगीं होती हे तिच्या अभंग लेखनावरून स्पष्ट दिसून येते. आपल्या या हकीकतेची सर्व माहिती सांगून झाल्यावर त्याबद्दल खुद्द तिनेंच स्पष्ट शब्दांत लिहून ठेवलें आहे—

अवघेचि ते जन्म आठवती मज । अंतरींचें गुज मृत्युवेळां
आरशांत जैसें प्रतिमुख । तैसे जन्म देख दिसती डोळां
लटिकेची शब्द व्यवहारी मानिती । मूर्ख तयाप्रति बोलो नये ..

तुकारामांसारख्या थोर संतांच्या सांनिध्यांत बहिणाबाईचा बराचसा काळ गेल्यामुळें स्वतःबद्दल प्रामाणिकपणें तिनें सांगितलेली ही हकीकत अगदींच खोटी आहे, असें मानण्याचें काहीं कारण नाहीं. शिवाय या तेराहि जन्मामधून तिनें आपण स्त्रीचाच जन्म घेतला आहे असें निर्विवादपणानें सांगितलेलें असल्यानें, तशी शंका मनांत येण्याचें कारणहि उरत नाहीं.

बहिणाबाईचा ओढा लहानपणापासूनच परमार्थाकडे असल्यामुळें थोरामोठ्यांच्या संगतीचा लाभ आपल्याला घडावा असें तिला फार वाटत असे. एकदां जयरामस्वामी वडगावकर तिला भेटायला आले असतां तिला वाटलें कीं,

कृपा उपजली जयरामस्वामींनी । आले पहावयासी भाव माझा
देखोनी तयासी आनंद वाटला । कथा नेदाटला आनंदानें

आणि तुकारामाबद्दल तर तिला नितांत आदर. तुकारामांची भेट व्हावी म्हणून तिला कोण उत्कंठा लागलेली. त्याबद्दल ती म्हणते—

तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदासी कथेमध्ये ॥
तुकोबाची भेटी होईल तो क्षण । वैकुंठासमान होय मज ॥

तुकारामाबद्दलची बहिणाबाईंची ही निष्ठा बघून पुष्कळांना अशी शंका येते की, त्या काळीं पुष्कळसे विद्वान् ब्राह्मण असताना तुकारामाचें शिष्यत्व ह्या ब्राह्मण स्त्रीनें का पत्करावें? वास्तविक हा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारणच असू नये. कारण स्त्रीची नेहमींची अशी एक दृढ निष्ठा असते की, ज्याच्याजवळ पराक्रम दिसेल त्याची पूजा करावयाची ही सिद्ध होते. तेव्हा तुकारामाचें खरें व अलौकिक तेज बहिणाबाईनें ओळखलें असलं पाहिजे. तुकारामाच्या एकदर जीवनाचा साक्षात्कार तिला घडला असला पाहिजे आणि म्हणूनच तिनें तुकारामास आपले गुरु मानलं असावं.

सद्गुरूचे पाय धरीन हृदयात । राहीन ध्यानस्थ सर्व काळ ॥

अशीच तिची भावना होती. तुकारामानं आपणास उपदेश केला, असें तिनें पुढील शब्दांतून नमूद केलें आहे.

तुकाराम रूपें प्रत्यक्ष बोलत । होई शांतचित्त समाधान ॥
पाहे परतोनी आपुलिया दिठी । सांगितली गोष्ट एक काळीं ॥
तयाचा उच्चार करू नये वाचे । झालेंसे चित्ताचें समाधान ॥
बहेणी म्हणे मना केलासे प्रकाश । असत उदास ठाव नाहीं ॥

बहिणाईचे काहीं अभंग तुकारामाच्या अभंगाशीं अगदीं एकजीव झालेले आढळतात. उदाहरणार्थ,

भक्तिप्रेम सुख न कळे आणिका । पंडिता वाचका वैदिकासी
जीवन्मुक्त जरी झाला आत्मनिष्ठ । भक्तिप्रेम सुख दुर्लभ त्या ...

हा बहिणाबाईंचा अभंग या संदर्भात तुकारामाच्या खालील अभंगाशीं ताडून पहाण्यासारखा आहे—

भक्तिप्रेम सुख नेणवे आणिका । पंडित वाचका ज्ञानियासी
आत्मनिष्ठ जरी जाले जिवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्या .

बहिणाईची एकदर कविता स्फुट स्वरूपाची आहे तिच्या भाषेंत जिव्हाळा आहे, स्फूर्ति आहे, तेज आहे. समजायला ती सोपी आणि साधी आहे. मात्र काहीं ठिकाणीं तिची रचना ओबडधोबड व विस्कळीत झालेली दिसून येते. हा दोष सोडला तर तिच्या एकदर कवितेचा थाट भारदस्त आणि प्रसन्न आहे, व प्रसाद हा काव्यगुण तर सगळीकडे भरपूर प्रमाणात आढळून येतो. तथापि काहीं भाग तुकारामाच्या अभंगाचें रूपांतरित स्वरूप दर्शविणारा आहे हे मान्य करून चालणार नाहीं. त्याचबरोबर मधून मधून स्त्रीजीवनाचा झालेला आविष्कार उल्लेखनीय असाच आहे असें म्हणता येईल. बहिणाबाईची विषयाची निवड भरपूर असून त्यात प्रामुख्यानें भक्ति व वेदांत यानाच मुख्य स्थान दिलें गेलें आहे.

बहिणाबाईनें स्वतःच्या नवऱ्याबद्दल त्याच्याशीं पटत नसताहि कोठें अनादर दाखविलेला नाहीं उलट पतिव्रतेचे माहात्म्यच तिनें विशेष खुलासेवार रंगविलेलें

आहे ! बहिणाबाईच्या तेरा जन्माच्या हकीकतींत बराचसा सामाजिक भागहि आलेला असून तो मनोरंजक आहे.

बहिणाबाईनें स्वतःच्या मृत्यूसंबंधीं उल्लेख केलेला आहे. तिला तुकारामा प्रमाणेच स्वतःचा मृत्युकालहि दिसत होता. आणि म्हणून—

आपलें आपण देखिलें मरण । तो झाला शकुन स्वानंदेंसी
उभारली गुढी मनाच्या शेवटीं । झाली मज भेटी आत्मारामीं ॥

असें म्हणतच ती समाधिस्थ झाली आहे. त्यावेळीं तिचें वय ७२ वर्षांचें होतें आणि तोंपर्यंत तिनें काव्यलेखन केलें ही विशेष गोष्ट आहे. तिचा मुलगा विठ्ठल यानें तिच्यावर रचिलेल्या आरतींत "बाईंचा मृत्यु शक 'शक सोडश वरी द्वाविंशत्' म्हणजे शके १६२२ हा दिला आहे"* त्या काळाच्या मानानें बहिणाबाई ही स्त्री समाजात फारच श्रेष्ठ अशी स्त्री होऊन गेली असेंच म्हणावें लागतें. तिच्या अलौकिक काव्यशक्तीबद्दल कुणाचेंहि दुमत होण्याचें कारण नाहीं. तिच्या कवितेनें मराठी सारस्वतास फार मोठी अशी पारमार्थिक देणगी दिलेली आहे. भागवत धर्माचा इतिहास सांगताना बहिणाबाईनें म्हटलें आहे—

संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥
ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥
नामा तयाचा किंकर । तेणें केलासे विस्तार ॥
जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ॥

० ० ०

## वेणाबाई रामदासी

वेणाबाई ही श्री समर्थ रामदासस्वामी यांच्या शिष्यांपैकीं एक प्रमुख शिष्या होती. तिची पुष्कळशी कविता उपलब्ध आहे. परंतु तिचें चरित्र मात्र वास्तव स्वरूपात स्वतंत्रपणें कोणीं लिहून ठेवल्याचें आढळत नाहीं. तथापि लहानपणातच वैधव्य प्राप्त झाल्यामुळें वेणाबाई शांत स्वभावी व विरक्त वृत्तीची होती अशी माहिती तिच्या "सीता स्वयंवर" या पुस्तकास जोडलेल्या अल्प चरित्रात श्री. देव यांनीं दिलेली आहे.

रामदासांचें शिष्यत्व पत्करीत असताना वेणाबाईस सासरच्या व माहेरच्या लोकांचा अतिशय त्रास झाला. परंतु तो निमूटपणें सहन करून तिनें आपली वृत्ति

* श्री. आजगावकर, महाराष्ट्र संत-कवियत्री पान १४२

दळूं दिली नाहीं. तसेंच रामनामाच्या ठिकाणीं ती किती तन्मय होऊन गेली होती, हें तिच्या पुढील पदावरून दिसून येईल:—

" तुझी तुझी तुझी पावना रामा ॥ धृ० ॥
भावें अभावें कुभावें, परि तुझी, पावना रामा ॥ १ ॥
सुष्ट हो दुष्ट हो नष्ट हो, परि तुझी, पावना रामा ॥ २ ॥
हीन दीन अपराधी, वेणी म्हणे परि तुझी, पावना रामा ॥ ३ ॥

तिची ही वृत्ति पालटून टाकण्याचा तिच्या माहेरच्या लोकांनीं खूप प्रयत्न केला. पण तिनें मुळींच ऐकलें नाहीं. उलट ती म्हणाली—

" राम नामाविण मज करमेना ॥ धृ० ॥
कोणी वदिती कोणी निंदिति ।
वास मी त्याची पाहीना ॥ १ ॥
हृदयीं धरिले सद्गुरुचरण ।
प्राणातींहि विसरेना ॥ २ ॥
वेणीचें निजधन रामचि जीवन ।
होणार तें का सुखें होईना ॥ ३ ॥

समर्थांनीं वेणाबाईची भक्ति ओळखून तिला आपल्या शिष्यवर्गांत सामील केलें. स्वतःच्या मुलाप्रमाणें त्यांचें तिच्यावर प्रेम होतें.

मनींची जीवींची गोष्टी यथार्थ । भक्ति वेणीसी सांगती समर्थ ।
का जे श्रीराम उपास या पासी गुह्यार्थ । आत्माराम निरोपिती ॥
—किता, समास १३, ओ. ४७.

वेणाबाईचा अधिकार समर्थांच्या सर्व शिष्यिणींमध्ये फार मोठा होता. फक्त तिलाच तेवढें सभेंत उभें राहून कीर्तन करण्याची समर्थांनीं अनुज्ञा केलेली होती!

" वेणाबाईवाचूनि कांहीं । इतरा कन्येसी सभेसी कीर्तनाज्ञा नाहीं ।
येकासनीं बैसोनि कीर्तन करणें पाहीं । प्रसंगानुसारें मर्यादें ॥ "
—समर्थप्रताप, अ. २०, ओ. ३१.

वेणाबाईनें लिहिलेल्या " कौल " या प्रकरणामधील भाषेवर रामदासी भाषेची बरीच छाप पडलेली दिसून येते. येथें कौल म्हणजे राजाकडून प्रजेस मिळणारें अभयपत्र आहे. राम सिंहासनावर बसल्यानंतर प्रजेनें त्याजजवळ मागितलेलें एकेक मागणें व रामानें त्याची केलेली पूर्तता हा या काव्याचा विषय आहे. ही कल्पना काव्यांत मांडतांना वेणाबाई लिहिते—

" रघुराज सिंहासनीं सौख्यदाता ।
प्रजा कौल मागावयाला उदीता ।
प्रभू बोलिला रे अपेक्षीत मागा ।
नका हेत ठेऊ समस्तैक सांगा ॥ "

" रामगुह्मवाद " हे वेणाबाईचें दुसरें एक प्रकरण असून त्याची रचना पहिल्या इतकीच चांगली झालेली आहे. वेणाबाईचा पारमार्थिक अधिकार मोठा होता, हें दर्शविणारे तिचे काही अभंग आहेत. परंतु त्यामध्ये तिच्या नावाचा उल्लेख " वेणीस्वामी " असा आलेला असल्यामुळें त्यावरून ते तिचेच निश्चित असावेत, असा काहीं सबळ पुरावा अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. म्हणून त्याबद्दल येथे विचार न करणेंच अधिक बरें.

वेणाबाईचा सर्वांत प्रमुख असा मोठा ग्रंथ " सीतास्वयंवर " हा आहे. रामायणातील सीतास्वयंवर हें आख्यान बऱ्याच जुन्या कवींचें आवडते दिसते. कारण याच आख्यानावर विठ्ठल, नागेश, वामन इत्यादि कवींनीं फार सुंदर अशी श्लोकबद्ध रचना केलेली आहे. परंतु ओवीबद्ध सीतास्वयंवर फक्त वेणाबाईनेंच रचलेलें दिसतें. या ग्रंथात एकूण १४ समास असून १५६८ ओव्या आलेल्या आहेत त्यावरून एकनाथाच्या " रुक्मिणी-स्वयंवरा "पेक्षा हा ग्रंथ काहीं फारसा लहान नव्हे.

वेणाबाईचें भाषाप्रभुत्व आणि काव्यकौशल्य या काव्यात ठळकपणें नजरेंत भरण्यासारखें आहे. या काव्याविषयीं श्री. श. श्री. देव लिहितात, " सीतेचें स्वयंवर, वेणाबाईपूर्वी व नंतर पुष्कळांनीं वर्णिलें आहे. पण वेणाबाईच्या ग्रंथाची योग्यता काहीं निराळी आहे. स्वयंवरासारख्या प्रसंगाची आवड स्वभावतः स्त्रियांना असावयाचीच आणि म्हणून त्यांच्या लेखणींतून तो प्रसंग जसा उतरेल तसा तो इतरांच्या लेखणींतून उतरणार नाहीं...माझ्या म्हणण्याचा भावार्थ इतकाच कीं, हा असला प्रसंग यथासांग वर्णन करण्याचा अधिकार जसा एखादा स्त्रीला असतो, तसा तो पुरुषाला नसतो. श्री एकनाथाचा रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ वेणाबाईच्या सीतास्वयंवरासी ताडून पाहिला म्हणजे माझ्या म्हणण्याची सत्यता वाचकास पटेल.. रुक्मिणीस्वयंवराचा प्रसंग वेगळा आहे. तो सोडून दिला तरी प्रत्यक्ष लग्न सोहळा एकनाथांनीं त्रोटक वर्णिला आहे. तो वेणाबाईनीं साद्यंत वर्णिला आहे व एकनाथांनीं अथपासून इतिपर्यंत आपली अध्यात्मदृष्टि अढळ ठेवली आहे, तर वेणाबाईनीं आपली भक्ति-प्रेमाची दृष्टि कोठेंहि ढळू दिली नाहीं. " *

श्री. देव यांचें हें विधान मान्य करण्यासारखें आहे. त्यांनीं या दोन ग्रंथामधील जो साम्यभेद दर्शविला आहे, तसाच आणखी एक ठळक फरक येथें आढळून येतो. " एकनाथ हे मोठे व्युत्पन्न असल्यामुळें त्यांची भाषा जशी प्रगल्भ आणि संपन्न आहे तशी वेणाबाईची नाहीं. मात्र स्त्रियांनाच ज्या गोष्टींचा अनुभव अधिक अशा गोष्टी विस्तारेंकरून सांगण्यात वेणाबाईनें विशेष कौशल्य दाखविलें आहे " † वेणाबाईचें हें वैशिष्ट्य पहावयाचें असेल तर उदाहरण म्हणून तिच्या

---

* श्री. श. श्री. देव, प्रास्ताविक, " श्रीसीतास्वयंवर "

† श्री. आजगावकर. महाराष्ट्र संत-कवयित्री. पान २०१

ग्रंथामधील सीतेला रामाचे स्वाधीन करताना जनकाची व त्याच्या पत्नीची मनः-स्थिति कशी झाली होती हा प्रसग रगविणारें पुढील वर्णन पहावें.

" करीं दुहिता मिथळापति । जानकी निखी भूपति ।
कन्या स्नेहाची थोर प्रीति । नेत्रोदक चालिले ॥
कनक पुतळी धरुनि हातीं । राजा निखी अयोध्या पती ।
ते समई गोत सपत्ति । सभेसहित गहिवरे ॥
जानकी गुणें हृदय कृपण । राजा निरविता उचारण ।
अष्ट वर्षे केलें म्या पाळण । आता तुम्हीं करावें ॥
माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायक सुसीळा ।
परम स्नेह भूपाळा । ईचे पाळण करावें ॥
सकळ कीर्तीची गजगजा । निरोपम्य हे अवनिजा ।
ईचें पाळण रायें वोजा । बहुप्रकारें करावें ॥
कौसल्यें निरवी जनक बाळा । जळ वाहे नेत्राजळा ॥
म्हणे माझी हे सुसीळा । पाळण तुम्हीं करावें ॥

या वर्णनाप्रमाणेंच सीतेला तिच्या आईवडिलांनीं केलेला उपदेशहि चित्तवेधक झालेला आहे. त्याचप्रमाणें या काव्यात ओघानें आलेलें " सीमात पूजन, हळद, पत्रिकापूजन, देवकप्रतिष्ठा, रुखवत, तेलवण, पायघड्या, कलशपूजा, गणेशपूजा, दागिन्याचें वर्णन, मधुपर्क, लाजाहोम, सुनमुख, उखाणे, हळदी उटणें, अक्षवाणें, भोजन पक्वानाचीं नावें, साडेसमर्पण, वरात, लक्ष्मीपूजन वगैरे लहानमोठ्या सोहळ्याचें वर्णन फार बहारीचें आहे. " *

" वेणाबाईची कविता अगदीं साधी, घरगुती भाषेत रचिलेली आहे. मुक्तेश्वरी उच्च दर्जाचें काव्य या कवितेंत फारसें नाहीं, पण स्त्रीस्वभावसहज मार्दव आणि सहृदयता या दोन गुणाच्या बाबतींत ही कविता दुसऱ्या कोणत्याहि कवीच्या कवितेस हार जाणार नाहीं. " †

वेणाबाईचा पारमार्थिक अधिकार मोटा होता हे तिनें आपल्या शिष्याना गुरुपदेश दिला होता यावरून दिसून येते. तिच्या शिष्याबद्दल गिरिधर स्वामींनीं " समर्थप्रतापा"त तिचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. वेणाबाईचें चरित्र वास्तव-स्वरूपात उपलब्ध नसल्यानें तिचा जन्म अदाजीं शके १५४९ मध्यें झाला असावा असें श्री. देव याचें म्हणणें आहे. तेव्हा अधिक माहिती मिळेपर्यंत तेंच गृहीत धरावयास हवें.

---

* श्री. देव, प्रास्ताविक.

† महाराष्ट्र सतकवयित्री, पा. १८६

समाजातील वेगवेगळ्या थरामधील लक्षावधि लोकाना एकत्र आणण्याची महाराष्ट्रातील सताची मनीषा होती. परतु या कामीं अतरींचा जिव्हाळा जवळ भरपूर असला, तरी प्रत्येकाची कुवत सारखीच होती असें नाहीं. प्रत्येकाची प्रकृति निराळी होती. तथापि जातीभेद न मानता सर्वांना एका विशिष्ट पथाच्या विचारसरणीनें एकत्र आणून एकाच मनोभावाची उपासना करण्याची तीव्र तळमळ प्रत्येकाला होती. म्हणून सर्वांनीं वारकरी साप्रदायाची जोपासना केली. भक्ति-मार्गाचा अवलब केला, समाजात नवे चैतन्य, नवा उत्साह निर्माण होईल, हें आवर्जून पाहिलें.

मराठी सताच्या या वारकरी वा भक्ति साप्रदायानें महाराष्ट्रातील बहुजन समाजाच्या धर्मजीवनाला आध्यात्मिक अधिष्ठान मिळवून दिलें. ग्रामजीवनामध्यें आमूलाग्र बदल घडवून आणण्यासाठीं सकुचित मनोवृत्तीच्या लोकाना अतर्मुख बनविलें. त्याचे ठायीं आत्मोन्नतीची प्रेरणा निर्माण केली. अठरापगड जातीच्या लोकाच्यासरिता ज्ञानदेवादिकानीं मोक्षसुखाच्या प्राप्तीसाठीं मौलिक विचाराचें अन्नछत्र घातलें. त्याद्वारें उदार व प्रगतिशील विचारप्रणाली अस्तित्वात येईल हे पाहिलें. आणि हें सर्व घडवून आणण्यासाठीं काव्याचें माध्यम स्वीकारलें.

मागें सागितल्याप्रमाणें भक्ति हा या सतकाव्याचा स्थायिभाव आहे. म्हणजे हे सर्व सतकवि सुरवातीला भक्त होते. भगवताचें नामस्मरण करणें हा त्याच्या कार्याचा प्रमुख भाग होता, केवळ मोक्षप्राप्तीचें साधन म्हणून त्यानीं आपल्या भक्तीचा पुरस्कार केला आहे. काव्य हें त्याच्या या भक्तीचें साधन होतें इतकेच. या सर्व सतकवींनीं आपले अभग काव्य म्हणून इतरासाठीं केलेले नसून ते आपली अतरींची तळमळ देवापुढें माडण्यासाठीं लिहिले आहेत. त्याचे हे अभग म्हणजे त्यानीं केलेला देवापुढचा धावा आहे.

भक्तिमार्ग हा सर्व वर्णातील सर्व स्त्री पुरुषाना खुला होता. त्यामुळेच त्याचा प्रसारहि झपाट्यानें झाला. परमेश्वराला ज्ञानानें ओळखून भक्तीनें भजण्यातच नवीन भागवत साप्रदायाचें सार साठविलें होतें.

भक्तीचे सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकार असून ती करण्याचे प्रकार नऊ आहेत.

श्रवण कीर्तन विष्णो स्मरण पादसेवनम् ।
अर्चन वदन दास्य सख्यमात्मनिवेदनम् ॥

.. या नवविधा भक्तीनें सत कवींची उज्ज्वल परपरा सुरू झाली, त्या कवींच्या आत्मनिवेदनातून सतकाव्याचा जन्म झाला .. सस्कृत काव्यात जो आत्म निवेदनाचा अभाव होता, तो सत कवींनीं ही नवी परपरा चालू करून दूर केला. पहिल्या दर्जाचें भावगीत सत काव्यानूनच मराठींत प्रथम उतरले ..

नामदेव, जनाबाई, चोखामेळा यासारख्या संत कवींचे अभंग शुद्ध भावगीत आहेत. तीं त्यांच्या अंतःकरणांत अंकुरतात, तिथेंच उमलतात आणि अखेर तिथेंच कोमेजतातहि. पण त्यांचा हा सुमनहार अंतःकरणातल्या पांडुरंगाला पोंहोचत असे.

संस्कृत भाषेची तिजोरी राजरोसपणें व बेधडकपणें फोडून तिच्यामधलें ब्रह्म-विद्येचें भांडार ज्ञानदेवांनीं "मराठीचिये नगरीं" आणून तें सर्वसामान्यांना वाटून टाकलें. म्हणजे जुन्या परंपरेविरुद्ध एक प्रकारचें भलें मोठें बंड करून त्यांनीं जुन्या संकेतांना झुगारून लावलें! त्यासाठीं त्यांना शब्दांची अडचण पडली नाहीं. भाषेचाहि अडथळा झाला नाहीं. उलट—

जैसें बिंब तरी बचकेंचि एवढें ।
परि प्रकाशासि त्रैलोक्य थोकडें ।
शब्दाची व्याप्ती तेणें पाडें । अनुभवावी ॥

या प्रकारे आपले हे मराठी बोल समुद्रापेक्षाहि खोल आणि अर्थभरित असल्याचा त्यांनीं निर्वाळा देऊन टाकला! मराठीच्या प्रारंभ काळच्या तिच्या सामर्थ्याविषयींचा ज्ञानदेवांचा केवढा प्रचंड हा आत्मविश्वास!

सर्व संत कवींच्या काव्याची ही भूमिका आहे. ह्या कवितेनें महाराष्ट्रांत एक मोठी क्रांति केलेली आहे. आपल्या भक्तिमार्गानें समाजाला स्वतःच्या उन्नतीसाठीं झगडण्याचें सामर्थ्य या साहित्यानें निर्माण केलेलें आहे. त्यामुळेच समाजाला आत्मपरीक्षण करणें शक्य झालें होतें. संतकवींनीं निर्माण केलेल्या या अंतर्मुख दृष्टीमुळें बाहेरून येणाऱ्या परक्या संस्कृतीची त्यांना भुरळ पडू शकली नाहीं.

ज्ञानेश्वर, नामदेव किंवा तुकाराम ह्यासारख्या संत कवींनीं समाजाच्या उन्नतीसाठीं बुद्धिप्रधान काव्यें लिहिलेलीं आहेत. स्वतःच्या दुःखापेक्षा सामाजिक दुःखाची आचच त्यांना जास्त तीव्रतेनें जाणवलेली होती. ज्या ज्ञानेश्वरीच्या पायावर मराठी सारस्वताचें मंदिर उभारलेलें आहे असें आपण समजतो, ती ज्ञानेश्वरी लिहीत असतांना मराठीच्या प्रांतामध्यें ब्रह्मविद्येचा सुकाळ करण्याची ज्ञानेश्वरानीं प्रतिज्ञा केलेली होती *

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

या ध्येयासाठीं त्यांना ब्रह्मविद्येचा सुकाळ करावयाचा होता. ब्रह्मविद्येचा "थोर विचार" असा अर्थ होतो. ब्रह्म म्हणजे मोठी वस्तु. क्षुद्र वस्तूचे विचार

---

* मनीक्षण, कृ. पां. कुलकर्णी.

त्याना नको होते. मोठे विचार मांडून समाजातील विषमता, अन्याय, पाप याचा अधार त्याना दूर करावयाचा होता प्रत्येकाला कर्तव्याचा पथ दिसावा म्हणून त्याची ही खटपट होती त्यामुळे त्याची काव्यरचनाहि त्याच मनोवृत्तीस साजेशी झालेली आहे मागें दिलेल्या स्त्रीकवयित्रींची कविता या कवितेपेक्षा निराळी दिसते, याला कारण त्या कवयित्रींची मनाची बैठकच त्याहून निराळी होती बुद्धिप्रधान ज्ञानापेक्षा भावपूर्ण भक्ति त्याना अधिक प्रिय वाटत असावी, असें त्याच्या कवितेवरून दिसून येत त्यामुळें काव्यकल्पनेची त्याची भरारी सत कवींच्या मानान कमी असलेली आढळून येते स्वत च्या भावनामध्येंच त्याची कविता प्रामुख्यानें गुरफटून गेल्यामुळें बाहेरचें जग तिच्यात फार थोडें आलेलें आहे

"माझा मऱ्हाठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंही पैजा जिंके। ऐशीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥ (ज्ञानेश्वरी, अध्याय ६, ओ १४) असें ज्ञानेश्वरा प्रमाणें आव्हान देऊन मराठी भाषेच्या अभिमानाबद्दल बोलण्याचें कारणच या कवयित्रींना कधीं वाटलेलें नव्हतें "दळिता कांडिता तुज गाईन अनंता" अशीच त्याची वृत्ति होती सामाजिक अन्यायाची झळ सोसावी लागली, तरी तिचें स्वरूप त्याना स्वत पुरतेंच जाणवलें, असें कान्होपात्रेच्या अभंगावरून दिसून येईल समाजाला स्वत च्या नवविचारानीं धक्का देऊन जागं करण्याचें काम त्याची कविता करू शकली नाहीं हृदयात उचंबळून येणारी प्रत्येक भावना या कवयित्रींनीं वैयक्तिक भूमिकेवरून पाडुरगावर शिंपडलेली आहे त्यामुळें त्याची कविता उत्कृष्ट भावगीत म्हणून मान श्रेष्ठ दर्जाची झालेली आहे त्याच्या हृदयातील भोळ्याभावड्या बोलानींच त्याच्या भावगीतांचें मोल ठरविलेलें आहे

देहीं देखिली पढरी। आत्मा अविनाश विटेवरी।
तो हा पाडुरग जाणा। शाति रुक्मिणी निजांगना॥

चोखोबानं स्वत च्या हृदयात दिसू लागलेला विठल या रूपकान व्यक्त केला तीच भावना जनाबाईंन "देव खाते देव पिते" या अभंगात मोठ्या हळुवारपण व्यक्त केलेली दिसून येते

या सतस्त्रीचा देवाकडे पहावयाचा एक स्वतत्र व ठराविक दृष्टिकोन होता त्याच्या काव्यात भावनेची उत्कटता होती नामजप करीत असताना भक्तिभावानें मनाची एकाग्रता करावयाची आणि त्यामुळें पाडुरगाशीं तदाकार होऊन त्याची मूर्ति आपल्या अत करणात पहावयाची व अशा रीतीनें सविकल्प समाधीचें परमोच्च सुख अनुभवावयाचें अशी त्याच्या मनाची बैठक होती हा आनद किंवा हें अत्युत्कट सुख प्रत्येकाला अनुभविता येण्याजोगें होतें पण सर्वांना तें मिळविणें शक्य झालें नाहीं जनाबाईसारख्या फार थोड्या भगवद्भक्ताना त्यात यश आलेलें आहे ऐहिकापेक्षानीं बहुधा सारे सत अध्यात्मातच अधिक रगून जात.

संत कवि आणि कवयित्री यांच्या लेखनात जो फरक आढळतो, त्याचें हेंच प्रमुख कारण होय.

तथापि आहे त्या अवस्थेतील संत कवयित्रींची ही कविता त्यांचें म्हणून निराळें वैशिष्ट्य दर्शविणारी खासच आहे.

विठो माझा लेकुरवाळा । संगे लेकुरांचा मेळा

हा जनाबाईचा वत्सल भाव किंवा—

जेथ आहे तुलसीचे पान । तेथ वसे नारायण

हा बहिणाबाईचा भक्तिभाव केव्हाहि वैशिष्ट्यपूर्ण असाच आहे. विठ्ठलाच्या दर्शनासाठीं त्यांच्या मनात प्रकटलेली आर्तता अपूर्वाईची आहे. ब्रह्मानंदात निमग्न होण्याची त्यांची वृत्ति चित्तवेधक आहे. आणि म्हणूनच ज्ञानेश्वर–तुकारामा सारखी अभिजात काव्यप्रतिभा त्यांच्या ठायींहि असल्याचे लक्षात आल्याखेरीज रहात नाहीं.



. ३ .

# स्त्रियांचें अलिखित वाङ्मय

अगदीं प्राचीन काळापासून तो थेट या घटकेपर्यंत सारख्याच आवडीनें निर्माण होत गेलेलें व केवळ पाठांतराच्या बळावर जिवंत राहिलेलें वाङ्मय "अलिखित वाङ्मय" या नांवानें ओळखलें जातें. याच वाङ्मयास 'बायकांचें वाङ्मय' किंवा 'लोकवाङ्मय' वा 'लोकसाहित्य' अशीहि संज्ञा दिली गेली आहे. हें वाङ्मय प्रामुख्यानें स्त्रियांनीं निर्माण केलेलें आहे. या वाङ्मयांत स्त्रियांनीं आपला जीव ओतलेला आहे. त्यामुळें त्याची रचना सहजस्फूर्त तशीच अभिजात सौंदर्यानें नटलेली अशी झालेली आहे. हें वाङ्मय ज्या स्वयंस्फूर्तीनें निर्माण झालें, त्याच स्वयंस्फूर्तीनें केवळ पाठांतराच्या बळावर पिढयान् पिढया टिकून राहिलें ! मनांत आलें तें आणि जसें सुचलें तसें ह्या वाङ्मयांत आविष्कृत झालेलें आहे. एकाला सुचलें आणि दुसऱ्यानें तें ऐकतांक्षणींच त्यांत भर घातली, असें त्याचें निर्मितीचें गमक आहे. एकटया दुकटयाचा असा कोणाचा त्यावर हक्क नाहीं व मुख्य म्हणजे कोणीहि तसें मानीत देखील नाहीं, हें विशेष होय. हे वाङ्मय सर्वांचें आहे. म्हणून तें लोकवाङ्मय लोकांचें वाङ्मय म्हणून ओळखलें जातें. बऱ्याच पिढयांनीं त्याचें जतन पाठांतर करूनच केवळ केलें. त्याचें लेखन केलें नाहीं. म्हणून तें अलिखित वाङ्मय होय. या वाङ्मयाच्या निर्मात्यांना लेखनकलाच अवगत नसल्यानें तें अलिखित स्वरुपांत राहिलें ! असें असूनहि तें लोकप्रिय ठरलें हा या वाङ्मयाचा प्रमुख विशेष होय आणि म्हणूनच त्यास 'अक्षर वाङ्मय' असेंहि म्हटलें जातें.

अशा प्रकारच्या वाङ्मयाबद्दल गौरवानें बोलतांना सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. स. खांडेकर सांगतात, "रणांगणावरील रक्ताचे पूर थोडे पावसाळे गेले नाहींत तोंच धुऊन जातात; पण कागदाच्या कपटयावरील शाईचा थेंब शेंकडों उन्हाळे उलटले तरी ओलाच रहातो. सोन्याची तागडी मालकाच्या पश्चात् माती-मोल होऊन जाते; पण लांकडाच्या लेखणींतून प्रकट होणारें नारसिंहरूप देव्हाऱ्यात जाऊन बसतें ! नांगरांचे तास चार दिवसांत बुजतात आणि त्यांच्या श्रमाचें पीक वर्षांमरात दृष्टिआड होतें. पण लेखणीच्या रेषा कधींच पुसल्या जात नाहींत आणि तिचीं सोन्याचीं पिकें कधींच कमी होत नाहींत. फुलांत सुगंधी गुलाब कीं, निशिगंध, तीर्थांत श्रेष्ठ प्रयाग कीं काशी, हें एकवेळ सांगणें कठीण आहे, पण

मनुष्याच्या बुद्धीनें उभारलेल्या सर्व जयस्तभात काळाच्या जोराला न जुमानणारा एकच आहे आणि तो वाङ्मयाचा होय. "[१]

श्री. भाऊसाहेब ( वि. स. ) खांडेकर यांचे हे म्हणणें प्रामुख्यानें लिखित वाङ्मयातील अक्षर वाङ्मयाला उद्देशून आहे परंतु प्रस्तुत प्रकरणात ज्याचा विचार करावयाचा आहे तें लोकवाङ्मय याहिपेक्षा श्रेष्ठ दर्जाचें आहे. श्रेष्ठ प्रकारच्या वाङ्मयाच्या कोणत्याहि कसोटीला तें उतरतें. एवढेच नव्हे तर त्याहिपलीकडे लावाव्या लागणाऱ्या कसोट्याना तें सहज उतरू शकेल, याची खात्री श्रेष्ठ दर्जाच्या वाङ्मय सेवकाना आता आलेली आहे ! त्यामुळेंच कीं काय अनेक संशोधक मंडळी अलिकडे या लोकवाङ्मयाची जमवाजमव करून त्याचें सौंदर्य पारखण्याची शिकस्त करताना दिसून येत आहेत.

लोकवाङ्मय जमा करावयाचें म्हणजे एक फार मोठे त्रणाचें व जिकीरीचें काम आहे. वृद्ध मंडळींच्या कडून मोठ्या मिनतवारीनें तें मिळवावें लागते. त्याची लहर येण्यासाठीं अनेकदा त्याची मनधरणी करावी लागते. त्याचा विश्वास संपादन करावा लागतो. त्याच्याइतकी मनाची उंची वाढवावा लागते ! ते सांगतील तें त्याच्याच शब्दात टिपून घेतलें पाहिजे असा त्याचा आग्रह असतो, आणि त्याच्या ठायीं असलेला अर्थ हें वाङ्मय गोळा करणाराना माहीत असला पाहिजे अशीहि त्याची इच्छा असते ! त्यामुळें श्रमाच्या मानानें कधीं कल्पनेबाहेर तर कधीं कल्पनेपेक्षाहि फार कमी असा या मौलिक साहित्याचा साठा संशोधकाच्या हातीं येतो त्या कारणानें कधीं धीर खचतो तर कधीं खूप उत्साह येतो. तरीपण संशोधक मंडळी मोठ्या चिकाटीनें या कामीं खपत असतात धीर न सोडता गावोगाव फिरून हे साहित्य गोळा करतात अनेकदा त्याना वाईट अनुभव येतात. कोणी धड सांगत नाहीं, कोणी धड बोलत नाहीं अशी वेळ येते म्हणून निराश होऊन चालत नाहीं. गुण्यागोविंदानेंच सारें घ्यावें लागतं कारण या अभ्यासाचे सारे संदर्भ व आधारभूत ग्रंथ हीं बोलतीं चालतीं म्हातारी मंडळीच असतात ! आणि विशाल जग ही त्यासाठीं लागणारी ग्रंथशाला असते ! त्यामुळें या प्रांतात वावरणाऱ्या सर्वांनाच यश येते असें नाहीं फार थोडी मंडळी या कामात यशस्वी झाली आहेत

अशा कामीं यश मिळवावयाचे म्हणजे मूळची आवड पाहिजे. विषया बद्दलचा जिव्हाळा पाहिजे. सर्वसामान्य लोकाच्याबद्दल मनात आदराची भावना पाहिजे. त्याच्या चालीरीतींचा, संस्कृतीचा अभ्यास पाहिजे. आणि मुख्य म्हणजे ज्याचेकडून हें साहित्य मिळवावयाचें त्याच्याशीं एकजीव होता आलें पाहिजे. त्यासाठीं ह्या लोकाचें मानसशास्त्र अभ्यासावें लागतें. त्याची आपणाला व आपली

---

१ गडकरी व्यक्ति वाङ्मय.

त्यांना पारख होऊन खात्री यावी लागते. तरच हें वाङ्मय थोडेंफार कां होईना हातीं येतें. एरव्हीं नाहीं! कारण हीं म्हातारीं माणसें आपण होऊन कोणाकडे आमच्या जवळचें हें वाङ्मय घ्या व छापून काढा म्हणून जात नाहींत, जाणारहि नाहींत! वाडवडिलांचें हें मौलिक धन आपल्याजवळ आहे एवढ्यांतच तीं समाधान पावतात! कोणी शिकणारा भेटला कीं पोटभर सांगतातहि! उगाच जवळ ठेवून तें कुजवीत नाहीत.

पण गेल्या चारसहा पिढ्यांमध्यें या प्रकारच्या वाङ्मयाची गोडी कमी होत चाललेली दिसून येते! नव्या जगांतील नव्या शिक्षणाच्या आकर्षणामुळें या बाबतींत दुर्लक्ष होत चाललें आहे. 'हे बायकी वाङ्मय, करायचें काय?' अशा रीतीनें त्याची अवहेलना होते आहे! तेव्हां ही आबाळ थांबावी आणि या वाङ्मयाचें अमरत्व कायम टिकवावें, म्हणून कांहीं जाणती मंडळी या वाङ्मयाचें पालनपोषण करायला पुढें आली आहेत! केवळ तोंडातोंडीं प्रचारानें जिवंत राहिलेल्या या वाङ्मयाची जुळणी करून तें छापून सुरक्षित ठेवण्याकडे अशा लोकांचा कल झुकूं पहात आहे. त्या दृष्टीनें जोराचे प्रयत्नहि सुरू झाले आहेत.

अशा प्रकारचा प्रयत्न पहिल्यांदां एकोणिसाव्या शतकामध्यें जर्मनींत झाला. ग्रीक बंधूंनीं या कामाला आरंभ केला. शास्त्र म्हणूनहि लोकवाङ्मयाकडे त्यावेळच्या विद्वानांचें लक्ष गेलें. "याच सुमारास बाप्पप्रभृति विद्वानांच्या तौलनिक भाषाशास्त्र विचारांचाहि उत्कर्ष झाला. पौर्वात्य देश, त्यांतील जुन्या व विविध संस्कृति, तिकडील भाषा, वगैरेंच्या अभ्यासाची गोडी दिवसानुदिवस वाढत गेली आणि शब्दांची वंशपरंपरा कळून आल्यामुळें जसा मानवी इतिहासावर नवीनच प्रकाश पडूं लागला तसाच, लोककथांच्या तौलनिक अभ्यासापासूनहि नवीनच प्रकाश पडून, मनुष्याच्या ज्ञानांत मोठी महत्त्वाची व मनोरंजक भर पडत गेली. आणि गेल्या पन्नास वर्षांत तर लोककथा शोधक व अभ्यासक मंडळें देशोदेशीं स्थापन झालीं आहेत."* तसेंच "शिंपल्याच्या जोडींतील इतस्ततः विखुरलेल्या, अर्ध मौक्तिकावस्थेतील मलीन वालुका-कणिकांवर, चुनखडी सारख्या द्रवांचें संस्करण करून 'काळ' ज्याप्रमाणें त्यांचें तेजदार मोत्यांच्या जाळ्यांत रूपांतर करतो, तीच अव्वल दर्जाची कुशलता, या संकलनकारांनीं दाखविलेली आहे."‡

मराठी भाषेपुरतें बोलावयाचें झालें तर अशा प्रकारच्या लोकवाङ्मयाच्या संकलनाचें काम कै. साने गुरुजी (स्त्रीजीवन), डॉ. कमलाबाई देशपांडे (स्त्रीगीतें), सौ. मालतीबाई दांडेकर (लोकसाहित्याचें लेणें), श्री. पां. श्री. गोरे (वऱ्हाडचीं लोकगीतें), श्री. महादेवशास्त्री जोशी (गोड स्त्री-गीतें), सौ. अनुसया लिमये

---

* म. म. दत्तो वामन पोतदार. प्रस्तावना. लोककथा (शं. ग. दाते)

‡ ना. गो. नांदापूरकर? — *ना. गो. हूड, निवेदन, मऱ्हाडी लोकगीतें.*

(घाटावरील श्रमिकांची लोकगीतें), डॉ. ना. गो. नादापूरकर (माहेरच मराठी, मराठीचा मोहोर), श्री. वामन चोरघडे (लोकसाहित्याचे मूळधन), श्रीमति दुर्गा भागवत (लोकसाहित्याची रूपरेखा), डॉ. सरोजिनी बाबर (मराठींतील स्त्रीधन)' मराठी लोककथा, सुवरान माडील, मगलाक्षता, देवदर्शन, मायव्होलीचा नवस, डॉ.नरेंद्र कवडी, श्री. भानू शिरधनकर, सौ. कुमुदिनी रागणेकर, सौ. लीला दुबे, श्री.सदाशिव माळी, श्री. बोरसे वगैरे अनेक स्त्री-पुरुषांनीं केलेलें आहे. त्याचप्रमाणें "दळताना, कांडताना, पाळणा हालविताना, बाजारहाट करावयास जाताना, तसेंच कापणी पेरणीच्या वेळीं खेड्यातील सर्व वातावरण असल्या वाङ्मयानें दरवळलेलें असतें."‡ याचा सतत अनुभव येत गेल्या कारणानें हें काम आता अधिक नेटानें ही मडळी करीत आहेत. अनेक नवीन होतकरु तरुण मडळी त्याच्या कामास हातभार लावीत आहेत.

यादिवाय सरकारच्या वतीनेंहि या कामीं अलिकडे नाव घेण्याजोगे प्रयत्न सुरु झाले आहेत हे विशेष होय. मराठी पुरतें बोलायचें झालें तर मुंबई सरकारनें व महाराष्ट्र सरकारनेंहि एक खास मडळ या कामासाठीं नेमलेलें आहे. या मडळात या विषयाची तज्ञ मडळी काम पहात आहेत. त्याच्यावतीने लोकसाहित्याचीं चार प्रकाशनें बाहेर पडलीं आहेत. पाचवें प्रकाशन प्रसिद्धीच्या मार्गावर आहे. त्याच प्रमाणे या मडळानें लोकगीताच्या बऱ्याच ध्वनिमुद्रिका (टेप रेकॉर्डिंग) घेतल्या असून, परपरेनें चालत आलेल्या लोकसगीतालाहि जतन करण्याचा प्रयत्न केला आहे.

अलिकडे हा विषय लोकमान्य होत असल्याचा आणखी एक उल्लेखनीय पुरावा म्हणजे निरनिराळ्या विद्यापीठानींहि ह्या विषयास सशोधनाचा एक विषय म्हणून मान्यता दिलेली असून, कांहीं मडळींनीं विद्यापीठाकडून या विषयावर पीएच्. डी.ची पदवीहि मिळविलेली आहे !

लोकवाङ्मयाचे अतरग अनेक प्रकारानीं सजलेले आहे. ओव्या, उखाणे, म्हणी, गाणीं, कहाण्या, लोककथा, कोडीं इत्यादींचा लोकवाङ्मयात प्रामुख्यानें समावेश होतो. या वाङ्मयाच्या सान्निध्यामुळे समाजाची सस्कृति, समाजाच्या भावना, समाजाच्या समजुती वगैरे बाबतची कल्पना निश्चित करणें सोयीचं होतें. त्याचप्रमाणे तत्कालीन सामाजिक स्थितीचा खराखुरा इतिहासहि पहावयास मिळतो. लोककथा व लोकगीते हीं त्या त्या काळच्या अभ्यतर जीवनाच्या शिल्पकृति आहेत. बहुजन समाजाच्या जिव्हेवर या शिल्पकृति कोरल्या गेल्या आहेत हें विशेष होय !

ह्या लोकवाङ्मयाची रचना प्रामुख्यानें स्त्रीवर्गाकडून झालेली असल्यामुळें त्याची भाषा अत्यत घरगुती, साधीभोळी, जिव्हाळ्याची व जुन्या वळणाची अशी

‡ लोककथा व लोकगीतें. वि. वा. जोशी.

राहिलेली आहे. म्हणून अशा प्रकारच्या वाङ्मयास डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं "अपौरुषेय वाङ्मय" असें म्हटलें आहे. त्यांच्यामतें "स्त्रियांच्या जीवनावर आधारलेलें, स्त्रियांचेकडून खेळ, सण, उत्सव इत्यादि प्रसंगीं उपयोगात आणलें जाणारें, स्त्रियांच्या दृष्टिकोनातून व प्रामुख्यानें स्त्रियांनीं रचिलेलें वाङ्मय म्हणजे "अपौरुषेय वाङ्मय" होय. या वाङ्मयाला जुन्या संस्कृत अपौरुषेय वाङ्मयाच्या पाठीशीं असलेलें ईश्वरप्रणिततेचें आवरण, गूढ पावित्र्याचें संरक्षण, व नव्या लेखनमुद्रणादि शक्तींचें अवलंबन जरी मिळालें नाहीं, तरी आवडीनिवडींच्या नैसर्गिक चाळणींतून गळत गळत खालीं उरलेलें व म्हणून एक प्रकारें हें "अक्षर वाङ्मय" आहे असं म्हणता येईल...हें वाङ्मय कागदावर लेखगत झालें नाहीं. पण वाणीवर खेळतें. त्याचप्रमाणें भूर्जपत्रें, शिला इत्यादिकांवर कोरलें गेलें नाहीं, पण स्त्रीहृदयावर कोरलें गेलें व त्यामुळें विस्मृत न होता वाणीवर खेळत खेळत पिढ्यानुपिढ्या चालत आलें म्हणून 'वाङ्मय'—वाचायुक्त—हा शब्द येथें यौगिक अर्थानें लागू पडतो." (स्त्रीगीतें.)

• • •

## ओवी

"ज्या वाङ्मयात स्त्रियांनीं आपला आत्मा संपूर्णपणें ओतला आहे असें वाङ्मय म्हणजे ओवी वाङ्मय. जात्यावर दळताना, पाळणा हालवताना, मुलांना खेळवताना, थोपटताना, झोपाळ्यावर झोंके घेताना या ओव्या सहज स्फूर्तीनें रचल्या गेल्या आहेत. या ओव्यांतील अकृत्रिम सहृदयता अपूर्व आहे. या ओव्यांत वत्सलतेचा सिंधु आहे. कोठें कोठें विनोदाची सुंदर छटाहि आहे. इतरहि रस इतस्तत मर्यादेनें उभे आहेत." (सानेगुरुजी. स्त्रीजीवन).

या ओव्या एकमेकींकडून एकमेकींच्याकडे तोंडोतोंडीं आलेल्या आहेत. मनात येईल तो प्रत्येक भाव त्यामध्यें मिसळलेला आहे. जिव्हाळ्याचें म्हणून जेवढें वाटेल तेवढें त्यात सांगितलेलें आहे. त्या कारणानें ओव्यांचें जग अमर्याद झालें आहे! ओव्या सांगाव्या तेवढ्या थोड्या आणि ऐकाव्या तेवढ्या कमीच अशी परिस्थिति आहे. एका दमात दोनशें अडीचशें ओव्या तरी एखादी सेंद्रत भगिनी सहज सांगू शकते! अशा वेळीं तिचें म्हणणें असतें कीं, जात्यावर नसल्यासेरीज, तान्हुलें मांडीवर आल्यासेरीज अगर घरात मंगलकार्य निघाल्यासेरीज तिला ओवी नीटशी सुचत नाहीं! जात्यावर तर तिचें ईश्वराप्रमाणें प्रेम असतें! या देवाजवळ ती आपलें काळीज उघडें करते. या देवाशीं बोलताना तिच्या जवळची भावगंगा दुभंगी भरून वहाते आणि ती स्वत. गानगंगा होऊन स्वत.लाहि अशा वेळीं विसरून जाते!

महाराष्ट्रामधीऽ स्त्रिया दळताना अगर कांडताना ओव्या गात असत, असे सातव्या आठव्या शतकातील उल्लेख सापडतात. "मराठी पुरतें पाहिलें तर ओवी छंद सर्वांत जुना दिसतो. इतका कीं, त्याचें मूळ काहीं विद्वान् अगदीं वेदापर्यंत किंवा त्याचेंहि पाठीमागें नेऊन भिडवितात. ओवी मराठ्यांच्या अगात इतकी मुरलेली आहे कीं, दळताना कांडताना ती आपोआप प्रकट होते. 'केळीचा साज ग बाई। बत्तीस केळावरी। बयाची माझ्या माया। मर्वो लेकरावरी॥' ही ओवी वाचून मला वाटलें कालिदासहि रचला असता, इतकें हें वायकांचें वाङ्मय सरस आहे. या ओव्यांत पुष्कळशा ओव्या साडेतीन चरणी आहेत. काहीं चार चरणी आहेत. साडेतीन चरणींत दुसऱ्या व तिसऱ्या चरणानें अर्ती यमक असतें. चार चरणींत दुसऱ्या व चौथ्या चरणाचे शेवटीं यमक असतें या ओव्या म्हणण्याचे विशिष्ट प्रकार आहेत. ते बायकांपासूनच शिकावे व ऐकावे." (सानेगुरुजी. स्त्रीजीवन).

स्त्रियानीं आपल्या कवितेसाठीं वापरलेला हा ओवी छंद प्रामुख्यानें आत्म निष्ठ भावना रंगविताना वापरला आहे. स्वतःच्या माहेरच्या व काहीं अर्थी सासरच्याहि नातेवाइकांसंबंधीं स्त्रियानीं फार मोठ्या प्रमाणावर ओव्या रचलेल्या आहेत. त्या खालोखाल देवादिकांच्यासंबंधीं ओव्यांची रचना भरपूर झाली आहे. मनाची शुद्धि व्हावी व जिवाला शांति मिळावी ही ह्या देवादिकांसंबंधीं बोलण्या मागची भूमिका असते. आणि—

देवाच्या देवळांत दिवा जळतो लोण्यायाचा
आत संदूक सोन्यायाचा
देवाच्या देवळांत झाल फुलाच सारवान
रोज हरीच कीरतन
देवाच्या देवळांत देव नक्शीचा उभा
रंगाची बगा शोभा
देवाच्या देवळांत गोड साकरची पुडी
जळ कापराची वडी
देवाच्या देवळांत रोज चढते पायरी
औक्ष मागीते म्हायारीं

अशा प्रकारे देवाबद्दलचा भोळाभाव प्रकट होतो. आपल्या परीने देवघराचें व देवाल्याचें वर्णन केलें जातें, देवापुढे मागणीहि होते.

आई अंबाबाई पाव माझ्या ग नवसाला
सोनियाच लिंबू वाहिन तुझ्या कळसाला
आई अंबाबाई गडावरचें रतन
शोना एवडी देती अठरा भुजाला कांकण

आई अंबाबाई गडावरची पुतळी
शोभा एवढी देती अठरा भुजाला काचोळी
आई अंबाबाई पाव माझ्या नवसाला
सर्पांचे कामरे वाघ जुपीन गाडीला

कुळदेवताबद्दल बायका या प्रकारच्या ओव्या गातात कुलदेवतेनें प्रसन्न व्हावें म्हणून अद्‌भुतरम्य बोलणीं करतात आपलें सामर्थ्य देवीला प्रसन्न करण्याएवढें अनन्त असल्याचें सांगून मोकळ्या होतात! त्यांचें त्यांच कुळ दैवत असेल त्या मानानें ही भाषा वगळी होते या कुल दैवतापेक्षा पंढरीचा विठोबा, राम व सीता, श्रीकृष्ण, तुळस, एकादशी, सूर्यनारायण वगैरेसंबंधीं बायका पुष्कळ ओव्या गातात अशा वेळीं ह्या देवतांना त्यांनीं मानवी रूप देऊन टाकलेलें असतें! आणि तेवढ्यावरच न थांबता मानवाचीं सर्व सुखदुःखें त्यांना चिकटवून टाकलेलीं असतात!

पंढरी पंढरी माज म्हायार साजनी
विठ्ठल शिंपी चोळी हरीनामाची गजनी
रोजी जातीया पंढरीला पैसा देतें भी बुक्क्याला
माझ्या घरची तारांबळ सांगा विठ्ठल सख्याला
मरली चंद्रभागा धोंडा बुडाला म्हानथोर
नऊ लाखाचा पितांबर जनी धुतीया पायावर
विठ्ठल माझा पिता मला म्हायाराला नेतो
गियानाची पोथी हातीं वाचायाला देतो

पंढरपूरच्या विठ्ठलाला आईबाप मानून माहेरचें सारें सुख त्याच्या करवीं उपभोगावयाची स्त्रियांची ही कल्पना मोठी विलोभनीय आहे विठ्ठलावरच्या अशा ओव्या अमाप आहेत. ओव्यांनीं गुंफिलेलें रामायण तर अपूर्वाईचें आहे तें ऐकतांना डोळ्यात पाणी उभें राहतें सीतेचा सासुरवास मनाला झोंबतो

सकाळीचा सग सीताबाईला झाला वनीं
तिन ववसील्या बोरीबाभळी मायाभैनी

आणि असें काहीं ऐकलें कीं, जिवाला चुटपूट लागत. सांगणारानें खूप सांगावं व निवाला रसरसीतच ठेवून चिकार ऐकावें, असा मोह मनाला होतो. तसेंच सीताएवढी रामाची गोष्ट सांगली, तर मग राम किती चांगला याचीहि यात्वना होते—

राम ग म्हणू राम राम माझ्या हृदयात
आता सांग्यीला राम मोती करडयान
रामाच नाव शाना घेतो झोपनदीं
सागरचा रवा त्येच्या पडे मुग्धामदीं

अनुभवाने मालवलेलीं पानें एकामागून एक अशीं भराभर उलटूं लागलीं, म्हणजे तीं वाचणाराची तारांबळ उडून जाते ! वात्सल्याचा उमाळा किती प्रचंड असतो याची कल्पना आली म्हणजे लक्षात येतें कीं, "तान्ह्या बाळाच्या रूपाचें वर्णन करता करता महाकाव्य जन्माला आलें आहे. वामन पंडिताची स्वभावोक्ति येथें फिकी पडेल. ते पांडित्य मातेच्या वात्सल्यातून उत्पन्न झालेल्या प्रतिभेपुढें काळ-वंडेल... या ओव्यातील काव्यशक्ति अतिशय उच्च दर्जाची आहे. अशा ओव्या शेंकडों आहेत काहीं ओव्या वाचून व्यास वाल्मिकी, कालिदास, भवभूति, यांनींहि माना डोलवाव्या ..स्त्रियांनीं निरनिराळ्या प्रसंगीं, निरनिराळ्या स्थळीं काळीं त्या रचलेल्या आहेत. रचलेल्या म्हणण्यापेक्षा त्यांच्या तोंडून सहज हे मगरू बालवेद, या मधुर श्रुति बाहेर पडल्या " ( ज्ञानेगुरुनी–स्त्रीजीवन ) अशा प्रकारच्या या ओव्यांतून व्यक्त झालेलें वात्सल्यहि नितांत रमणीय आहे.

माझें तान्हे बाळ देवाचं मंगल
अमृताचं फळ संसाराचें
अधरुण केंरुं जाई मोगऱ्याचें
सख्या गोजिऱ्याचें अंग मऊ
आकाशात तारे त्याचे ओठ का हालती
संगीत गाणीं गाती बाळराजा
पेरा झाला रानातून मोड काढी वर मान
तसें हसे माझें बाळ पाळण्यात

किती सहृदय आणि समर्पक हे उपमा दृष्टांत आहेत ! त्याची तोड कशाला म्हणून कशाला यायची नाहीं.

मध्यम वर्गातील आईचें हं कौतुक आहे. खेड्यातील आई यापेक्षा निराळें बोलते तिच्यापरीनें तिचं वात्सल्य शिगोशीग भरून येतें, तें असं—

उगवत्या नारायणा आदीं उगव माज्या दारीं
माज्या त्या बाळासंग दुधातुपाची कर न्हारी
पोथी पुस्तक वाचताना बाई कानीचा डूल हाले
माजा त्यो बाळराज सये कागदासंग बोले
सरी मिंदलीच सोनं बाई सवाई सातरंग
इंद्र सभेच सोनार हरी घडविता झाल दंग
आकाशीं वावडी ग चंग लावूनी सोडीली
माज्या ग बाळकान नगरी मामाची येडीली

हेहि कौतुक अपूर्वाईचें आहे बाळराजावरच्या अशा ओव्या सरता सरत नाहींत. गोड गळ्यावर त्या धा धावून बाहेर येतात. अनेक भावनांचा साज त्याच्यावर

चढतो आणि मग भावाची आठवण येते. बहीणभावावरच्या ओव्यांची सख्या मोजणारा थकेल एवढी असख्य आहे.

भैन भावाड ज्याऊ आपुन बाजाराला
नसी तुज्या धोतराला जर माज्या पदराला
भावाला भाऊबीज भैनी द्रुपदीला पुसा
आगासी चादसूर्या हिन बचाळीला क्सा
चवथी आमी भैनी पाचवा बदुराया
नादती सुकायान मोगन्यासाठीं जाया
दिवाळीच्या दिसीं माज्या ताटामदीं सोन
आता मीं बचाळील बयाबाई तुज तान
म्हायार मला केल एका बिच्याचा बमुयलि
सया मला बोलत्याती बदु समृत असयील
बदुजी पावईना रोजो म्हणती कोण राजा
सावळे सीताबाई हिरवा मदील तुरा ताजा
गहू हरबन्याच्या गाड्या बाई येशींत थटल्या
सावळ्या बदुजीन दडभुजानीं रेटील्या
पाच माजे भाऊ देवळाच्या भिंती
गिलावा देऊ किती आयुष्याचा
भाऊ भैनीला भेटन्याची चाल निघाली देशामदीं
माझ्या त्या राजसाच्या चोळी अजिरी खिशामदी

भावाचें बहिणीवर अपार प्रेम. भावासाठीं बहिणीचें काळीज तुटतें. भावाबद्दल बोलावयाचें म्हणजे तिचा जीव खुलतो भाऊ म्हणजेच जणु तिचें माहेर. त्यामुळें जगातील सारें सौंदर्य ती आपल्या भावात बघू पहाते ! आपला भाऊ तिला श्रीमत दिसू लागतो. तरीपण भाऊबहीण म्हणजे एका आईचीं लेकरें. जिवा भावाचीं, रक्तामासाचीं, एकमेकाच्या पाठचीं माणसें. म्हणून बहीण प्रेमानें म्हणते--

भावा बहिणीच्या प्रेमाला नाहीं सरी
गंगेच्या पाण्यापरी पवित्रता
नको धन नको मुदा नको मोतीयाचे हार
देई प्रेमाश्रूची धार भाईराया
बहीण भावडाची पोटात त्याची माया
हिरव सीताफळ आत साकरेची काया
माझ्या आयुष्याची भाईराया तुला कठी
उरल्याची तुला आगठी वेनी बाई

म्हणजे बहिणीनें भावाबद्दल किती बोलावें तेवढें कमी पडतें जिवाभावाची खरी गोष्ट इथें समजते निरपेक्ष प्रेमाची महति लक्षात येते

संसारातील सारीं सुखदु खें भावाशीं एकजीव होतात त्या कारणानें अशा ओव्या वाचाव्यात तेव्हा बहीण भावामधील अपार प्रेम समजत स या जिव्हा ळ्याची साक्ष पटते

भाऊ म्हटला कीं, ओघानेंच आई वडिलाची आठवण येते सासुरवा शिणीला आईबाप म्हणजे मोठा आधार सासुरवासाची गोष्ट सासुरवाशिणीनें काढली कीं, जीव उडून जातो ! काळीज फाटून जातें ऊर दाटून येतो

अतरींची गोष्ट सये हुरदीं साठविली
बया मालनीवाचुनी कान काढील त्येची किल्ली
जिवाला माझ्या जड न्स कळल माझ्या बापा
अगणीं होता चाफा कळ्या पडती झपाझपा

किती निर्मळ ही भावना ! किती सुदर हे उपमा दृष्टात ! ऐकणारा भुलून जातो. सागणारा गहिंवरतो तशातच—

सासर एवडा वस नका करूसा सासूबाई
दारींच्या चाफ्यापाईं दूर देशाची आली जाईं
बधुजी विचारीतो भैना सासुरवास कसा
सावळ्या बटुराया बरम्या लिवून गेला तसा
आब्याच्या सावलींत कोयाळ बोले राधा
घरीं उतरडी आगाशीं उपाशी गेले दादा

अशीं बोलणीं निघाल्यावर तर मग विचारायलाच नको रडू कोसळतें जीवना वरचा विश्वास उडून जातो ! स्त्रीजन्माबद्दल मनात चीड येऊ लागते ! तरी पण दु खात सुख म्हणून नवरा धड वागत असेल तर मग हायसें वाटतें

वाऱ्यान हालती ग पानमळ्याची शेवरी
दिष्ट नि झाली म्हनू माझ्या कुकवाच्या चिरी
माळ्याच्या मळ्यामदीं केळी नारळी जावा जावा
मध गुलाबा तुझी हवा वास घेणार गेले गावा
गोड भ्रताराच सूख सये सागता येता नाता
भर दिवसा डोळ्या ग वर खरव्या पाणी पिता

आणि निवाला तेवढाच निचिंत वाटू लागतें नवऱ्याबद्दल सारा भाव साजशिणगार लेवून आला म्हणजे मग तो रागीट असला तरी शिरीर वाटत नाहीं !

आपल्या जीवनात येणाऱ्या हरघडीच्या अनुभवावर आणि विविध प्रका रच्या विषयावर अशा हजारों ओव्या आहेत त्यापैकीं हा एक केवळ वानवळा

आहे. पण तेवढ्यावरनहि स्त्रियांच्या खास भावना विकाराची व विचार-सौष्ठवाची कल्पना येते.

मराठींतील एक अभिजात छंद या दृष्टीनें ओवी या छंदाचें वैशिष्ट्य फार मोठें आहे. स्त्रियांनीं आपलीं मुसद्दु तें याच छंदाचा उपयोग करुन जशीं सांगितलीं, त्याचप्रमाणें मराठींतील महाकाव्येंहि याच छंदांत लिहिलीं आहेत.

ओवी छंदातील " हीं स्त्री गीतें सहजसुंदर असून त्यांची भाषा प्रसादयुक्त आणि ओजवती आहे. या गीतांत आलेले उपमा दृष्टांत त्या समाजात वावरणाऱ्या स्त्रियांच्या रोजच्या व्यवहारात आढळणारे आहेत. या गीतांमधून आपणास कवीची व्युत्पन्नता दिसणार नाहीं. छंद, अलंकार, भाषा, रस इत्यादि साहित्याच्या अंगोपांगाचें, तारेवरील डोंबाऱ्याच्या कौशल्याप्रमाणें, अभ्यासानें आत्मसात् केलेली कुशलताहि आढळून येणार नाहीं. परंतु या गीतांमधून ओसंडलेली भावनेची उत्कटता पहातांच आपल्या अंतःकरणांत अगदीं सातां पडद्यापलीकडे जाऊन बसलेल्या वृत्ति उचंबळून येतील. "*

" हा सर्व वाङ्मय प्रकार गेय आहे. आपल्या भावना व्यक्त करण्यासाठीं स्त्रियांनीं अनेक प्रसंगावर गाणीं रचिलीं आहेत . ओवी हें स्त्रियांनीं बनविलेलें वृत्त आहे आणि शुद्ध मराठी आहे. ह्याचें नावहि मराठी आहे. ओवीचा अर्थ ओंवणें, गुंफणें, ग्रथन करणें असा आहे. संस्कृतांतील अनुष्टुभाच्या एका श्लोकास ' ग्रंथ ' म्हणतात. महाभारत एक लक्ष ग्रंथ आहे याचा अर्थ त्यांत एक लक्ष श्लोक ग्रथन केले आहेत. ग्रंथ म्हणजे एकत्रित केलेली शब्द संहति . प्रारंभीं जेव्हा मराठींत असें ग्रथन होऊं लागलें, विशिष्ट पद्धतीची बांधीव रचना होऊं लागली, तेव्हा तिला मराठी शब्द ' ओवी ' हा रूढ झाला. अर्थात् येथें ' ग्रंथ ' ह्या शब्दामागें जी बांधणीची आणि रचनावैशिष्ट्याची कल्पना आहे, तीच ओंवीच्याहि मागें दिसते हें वृत्त प्राकृत आहे असें सर्व छंदशास्त्रकार सांगतात ही रचना संस्कृतांत नाहीं. हें केवळ मराठीचेंच वैशिष्ट्य आहे. "†

ओवीची ही सारी रचना प्रामुख्यानें स्त्रियांची आहे. पुरुष लेखकांनीं आपल्या ग्रंथांत उपयोगांत आणलेली ओवी अशी गेय नाहीं ग्रांथिक ओवी पाठ्य असते तर ही ओवी गेय असते. गेयता हें देखील हिचें एक प्रमुख वैशिष्ट्य असून स्त्रियांना त्याची कल्पना आहे. अगदीं जुन्या काळच्या वाङ्मयातून लोकगीतांतील ओवीसंबंधीं मजकूर सापडतो त्यांत स्त्रिया ओव्या गातात असाच उल्लेख वाचावयास मिळतो.

---

* य. खु देशपांडे. प्रस्तावना, वऱ्हाडी लोकगीतें

† डॉ. ना. गो. नांदापूरकर. ' मराठीचा मोहोर ' प्रस्तावना, पा. १५

स्त्रियाची ही ओवी तशी फार पुरातन आहे. "ती मराठी भाषेत ग्रंथ निर्मितीस आरंभ होण्यापूर्वीची आहे. चालुक्य वंशीय राजा सोमेश्वर ह्यानें शके १०५१ मध्यें 'मानसोल्लास' अथवा 'अभिलषितार्थ चिंतामणि' हा ग्रंथ लिहिला. त्यात त्यानें 'महाराष्ट्रीय स्त्रिया कांडताना ओव्या गातात' असें म्हटलें आहे. 'संगीत रत्नाकर' ह्या ग्रंथाचा कर्ता म्हणतो, 'महाराष्ट्रीय स्त्रिया देश-भाषेंत ओव्या गातात. ह्या ओव्या जनमनोहर असतात, आणि स्त्रिया त्या विविध छंदात गातात. .."* म्हणजे दळताना अगर कांडताना त्या काळापूर्वीपासून ओव्या म्हणावयाची पद्धति परंपरेनें चालत आलेली दिसते.

परंतु त्या काळची ओवी आज त्याच थाटात शिल्लक असेल असें मान्य म्हणता येणार नाहीं. कारण हें स्त्रियांचें वाङ्मय आहे. केवळ पाठ करून जतन केलेलें असेंहि तें आहे. त्यामुळे यातील शब्द कालमानाप्रमाणे बदलत रहाणार. भावनाविष्कारात फरक पडणार. तेव्हा एक पिढी दुसऱ्या पिढीला हें ज्ञानदान करीत असताना त्यापैकीं कांहीं भाग मागें रेंगाळतो व कांहीं नवीन जोडला जातो. त्या कारणाने ओव्याचा काळ निश्चित ठरविणें शक्य होत नाहीं.

काय बाई पुण्याची तारीफ
ल्वगा निघाल्या बारीक
टोपीवाल्याचा मुलूख
आगीनगाडीला कुरूप

ह्या गीतावरून अगर—

कोलापूर गाव । गल्लोगल्लीं आले नळ ।
पाण्याचे केले खेळ । इग्रजानीं ॥
आगीनगाडी सुरू झाली । पुण्याला ऐकू गेली ।
मुंबईला सुरू केली । इग्रजानीं ॥

ह्या गीतावरून ही रचना इंग्रजी अमल आपल्याकडे सुरू झाल्यानंतरची आहे असें म्हणता येईल. पण असे अपवाद थोडे निघतील. बाकीच्या ओव्याचा काल त्यामध्यें प्रकट झालेल्या चालीरीतींवरहुकूमच अनुमानानं ठरवावयाचा !

भरल्या बाजारात् । उंच किराण्यामदीं पेरू ।
साऱ्या गोतात पिता थोरू ॥
जावई राजहंस् । परसदारीचा मोगयीरा ।
माजी बाळाबाई । जाई गुतली पदयीरा ॥

आणि अशा कांहीं ओव्यावरून शब्दांच्या रचनेनुसार या ओव्या ज्ञानेश्वर-कालीन भाषेचें वैशिष्ट्य दर्शवितात असं म्हणावयाचें इतकेंच !

---

* डॉ. ना. गो. नांदापूरकर. मराठीचा मोहोर. प्रस्तावना. पा. १८

डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं या ओव्यांच्या सहवासात असताना एक रूपक तयार केलेलें आहे. त्या म्हणतात, "गाणीं म्हणजे स्त्रियांचे वेद. 'दळण्याचें जातें' हें त्यांचे यज्ञकुण्ड व प्राचीन ऋषि ज्याप्रमाणें यज्ञकुंडामध्यें हविर्भाग अर्पण करून त्याचे जोडीला परमेश्वराच्या स्तुतिपर सूत्रें म्हणत व मनो वांछिताची याचनाहि करीत; त्याचप्रमाणें या जात्याच्या यज्ञकुण्डामध्यें 'दाण्याचा घास' हा हविर्भाग अर्पण करून त्याचे बरोबरच ईश्वरस्तुति व वांछित प्रार्थना ओव्यांचे रूपानें करीत."‡

इ. स. १९४० मध्ये जानेवारीच्या ३१ तारखेस महाराष्ट्राचे एक थोर कलावंत कै. मा. विनायक यांनीं कै. सानेगुरुजींना एक पत्र लिहून या ओव्यासंबंधीं आपला अभिप्राय कळविला होता. त्यावेळीं त्यांनीं म्हटलें आहे कीं—

"पोथी पुराण वाचून पापसुद्धा धुतलीं जातील असें आपण वाचतो. पण हें वाचताना—या मंगल बाल वेदाच्या पठणानें तीं धुतलीं जातात असा प्रत्यक्ष अनुभव येऊं लागतो ! वात्सल्यानें हृदय भरून येतें ! आसमंतात मांगल्य दरवळून येतें !

"विद्वत्तेनें भरलेल्या पुस्तकांतून–ग्रंथांतून जी कल्पना येत नाहीं ती हिंदुधर्माच्या संपन्न हृदयाची कल्पना आपणाला या ओव्यांतून येते. जिला आपण 'आपली संस्कृति, आपली संस्कृति' म्हणून डोक्यावर घेऊन नाचायला हव ती ही ! ."*

ह्या ओव्या अनेक दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. एक तर हें एक मौलिक स्त्रीधन असून माय मराठीच्या जन्मापासून आमच्या माउल्यांनीं तें सांभाळलें आहे. काळाच्या प्रवाहात आलटापालट होतानाहि आपलें वैशिष्ट्य अबाधित ठेवून व आपल्या परीनें त्यात नवीन भर घालून त्यांनींच तें आजच्या स्त्रियांच्याहि हातीं दिलें आहे. या ओव्यांत आमची संस्कृति आहे, आमच्या रोजच्या बोलण्यातील भाषा आहे. उत्कृष्ट काव्याला लागणारे प्रसाद आणि माधुर्य हे काव्यगुण या ओव्यांतून भरपूर प्रमाणात प्रकट झाले आहेत. त्याचप्रमाणें रचनाचातुर्य, कल्पनाविलास, आलंकारिकता व शैली या दृष्टीनींहि हें काव्य सरस आहे. थोडक्यात सांगावयाचें तर ही रचना अलंकार लेऊनच बाहेर पडते व अर्थाचा पदर धरून चालताना मनात मोकळ्या भोळ्या भावाचे चिंतन करते, आणि मुख्य म्हणजे कृत्रिमतेचा वासहि तिला लागलेला नाहीं. सारें कांहीं स्वाभाविक व सरळ आहे.

पितृसत्ताक कुटुंब प्रद्धति व त्यामुळें निर्माण झालेली मराठी मुलखातील बालविवाहाची रूढी यांचेकडून मराठी सारस्वताला मिळालेलें हें एक सौभाग्याचें

‡ अपौरुषेय वाङ्मय. पा. ४

* स्त्रीहृदय-दोन शब्द पा. ७, ८.

लेणें आहे. बालवयात माहेरच्या माणसाच्या ताटातुटीमुळें मोठ्या कळवळ्यानं आविष्कृत झालेली ही एक हृदयंगम व पवित्र भावगंगा आहे

● ○ ●

# प्रासंगिक गाणीं

नेहमींच्या रोजच्या कामातून फावल्या वेळीं किंवा सणासुदीच्या प्रसंगीं अगर बारसें, डोहाळे, लग्न, मुंज अशा मंगलप्रसंगीं स्त्रिया एकत्र जमल्या म्हणजे गाणीं म्हणतात ह्या गाण्याचे प्रकार अनेक असतात त्यांचे 'गळे' किंवा चाली मोठ्या देखण्या असतात तसेंच ह्या गाण्याच्यामधून प्रकट झालेल्या भावाचा रसपरिपोषहि मोठा सुंदर झालेला असतो.

अशीं हीं गाणीं कधीं लहान तर कधीं मोठीं असतात. तीं कधीं पांच दहा मिनिटातच संपतात तर कधीं तासन् तास रंगतात आणि मुख्य म्हणजे एकटी-दुकटीकडून तीं फारशीं म्हटलीं जात नाहींत अनेकजणी एकदम तीं म्हणतात किंवा एकदोघींनीं प्रथम सांगून नंतर बाकीच्या त्याबरहुकूम म्हणतात.

हीं गाणीं म्हणावयाचे व खुद्द गाण्याचेहि प्रकार प्रामुख्यानें दोन आहेत. त्यापैकीं एक असा की, झोपाळ्यावर किंवा जमिनीवर बसून म्हणावयाचीं गाणीं आणि दुसरा म्हणजे खेळ खेळताना म्हणावयाचीं गाणीं. पैकीं खेळाच्या गाण्याचा भरणा मोठा आहे नागपंचमी, महालक्ष्मी ( गंगागौरी ), भोंडला व मंगळागौर या प्रसंगीं झिम्मा खेळताना व फेर धरताना स्त्रिया गाणीं म्हणतात अशा वेळीं एखादी सुरस व चटकदार अशी लहान किंवा मोठी कथा ह्या गाण्याच्यामधून गुंफलेली असते त्यामुळें ह्या गाण्याची रचना त्या त्या कथानकास अनुसरून केलेली असते गाण्यातील हें कथानक धावतें व ओघाओघानें आलेलें असतें रोजच्या जीवनाशींहि तें विशेष निगडीत असतें अशा गाण्यात देवादिकांची व विशेषत श्रीकृष्णाचीं गाणीं भरपूर प्रमाणात समाविष्ट झालेलीं असतात.

लग्न, मुंज, बारसें अगर डोहाळे या प्रसंगीं किंवा झोपाळ्यावर बसून निवांत वेळीं म्हटलीं जाणारीं गाणीं त्या त्या प्रसंगानुरूप रचलेलीं अशीं असतात त्या त्या विशिष्ट मंगल संस्कृतीचें अगर सोहळ्याचें प्रतिबिंब त्यात पडलेलें दिसून येतें. अशा गाण्यातहि देवादिकांना प्रमुख स्थान मिळालेलें असतें ! मानव मानवी जीवनातील सर्व संस्कार अशा वेळीं त्याच्याहि जीवनाशीं निगडीत झालेले असतात !!

वाजे चौघडा दणक्षुण
आला ग हादगा पावणा
दारीं तुळस दऊणा ॥
जाईजुई शेवती दुपारी
फुले ग नाना परी
हार गुम्फिते कुसरी
वहातें मी हादग्यापरी
हादगा देव मी पूजीते ॥
लवंगा सुपाऱ्या वेलदोडे
धरून ठेवले वीडे
आणखिन् दुधातले दुधपेढे
वहातें मी हादग्यापुढें
हादगा देव मी पूजीतें ॥

हस्तनक्षत्राच्या वेळीं मुलींबाळींच्याकडून फेर धरून म्हटलें जाणारें हें गाणें आहे. या वेळीं महाराष्ट्रात घरोघरीं मुली हादगा घालतात. खडूनें किंवा रांगोळीनें पाटावर हत्ती काढून त्याची पूजा करावयाची किंवा भिंतीवर हत्तीचें छापील चित्र लावून त्यास फळाफुलाची माळ घालून त्याची पूजा करावयाची, म्हणजे हादगा घालावयाचा. ही पूजा रोज होते. दररोज ह्या पूजेचा प्रसाद ' खिरापती ' च्या रूपानें सर्वांना दिला जातो.

अशा वेळीं अनेक गाणीं म्हटलीं जातात. वर दिलेलें गाणें त्यापैकींच एक आहे. इथे हस्तनक्षत्राची पूजा केली जाते आहे. हस्ताची पूजा म्हणजे नव्या वर्षाच्या मागल्याची, सधनतेची, सुखासमाधानाची पूजा, पावसाची पूजा. म्हणजे ह्या गीतामार्गे निसर्गाच्या शक्तीची उपासना तर आहेच, खेरीज संस्कृतीचाहि भाग आहे. दर वर्षीची ही पूजा असते आणि त्या पूजेचा प्रकारहि ह्या गाण्यात सांगितल्याप्रमाणें असतो.

हादग्याच्या या गीतात अनेक विषय सामावलेले असतात. खेळ असतो, संसार असतो, सुग्रीणपणा असतो, सासर माहेर असते, हौस असते, कलागुण असते, कोडकौतुकहि असते. त्यामुळें सर्वांना हीं गाणीं आवडतात. लहान मुलींच्या बरोबर मोठ्या बायकाहि त्यात हौसेने भाग घेतात. कुठे कुठें ह्या गीताना भोंडल्याची गाणीं अशीहि संज्ञा दिली आहे.

विदर्भामध्ये याच वेळीं भुलाबाईची पूजा असते. पूजेचा प्रकार असाच पण गाणीं काहीं सारखींच तर काहीं वेगळीं असतात. भुलाबाईचीं गाणीं मुख्य नऊ मानलीं गेलीं आहेत. भुलाबाईची उपासना म्हणजे शिवशक्तीची उपासना. त्यात एक शिव व लेकुरवाळी शक्ति अशा निरनिराळ्या मूर्ति असतात.

ह्या भुलाबाईचें एक गाणें नमुन्यादाखल इथें घेता येईल तें असें—

काळा कोळसा फोरुबाई
शेर दूध मावे
आमची भुलाबाई पाटावा नेसे
पाटावाखालून येऊ द्या
पाटावाखालून जाऊ द्या
एक फूल घेऊ द्या
एक फूल उडालं
गंगेंत जाऊन बुडालं
गंगामाय खोल ग
भुलाबाई वहाती बेल ग
वहाता वहाता भागली
शंकराच्या पायीं लागली
शंकराचे पाय सोन्याचे
भुलाबाईचे पाय रुप्याचे

ह्याचप्रमाणेच नागपंचमी व गौरी (महालक्ष्मी) ह्या सणाच्या वेळीं देखील भरपूर गाणीं स्त्रिया व मुली म्हणतात. मात्र या वेळीं फेवळ फेर धरत नाहींत. फुगडी, झिम्मा, लाटणी, कळशी, सूप असले अनेक खेळ खेळतात व गाणीं म्हणतात.

नागपंचमीच्या वेळीं नागाची पूजा होते. नाग म्हणजे घरचा श्रेष्ठ महापुरुष. पूर्वज. घराचा रक्षणकर्ता. आणि गौर म्हणजे पार्वती. लेकीच्या रूपानें माहेरीं आलेली माहेरवाशीण. म्हणून ह्या सणाचें महत्त्व फार. श्रावण आणि भाद्रव म्हणजे सणाचे राजे. ह्याच काळात सणासुदीला (नागपंचमी व गौर) बायका मुली खेळतात व गाणीं गातात.

ह्या वेळीं फेराचीं गाणीं फार मोठ्या प्रमाणावर म्हटलीं जातात. हीं गाणीं कथात्मक असून तालबद्ध घटनांनीं व ओबडधोबड वर्णनांनीं नटलेलीं असतात. त्यांची चालहि सुरेख असते. त्यामुळें रात्र रात्रभर त्यांच्या निदानानें सारें गाव घुमत रहातें! उदाहरण म्हणून इथें एक गौळण घेता येईल.

लक्षपती गवळी एक
त्येला दोघीजणी लेकी
या लेकींचीं नाव काई
म्हाई चंद्रावळ बाई
म्हाई दिली गोविंदाला

चद्रावळ गवळ्या घरीं
या ग गौळणीबाईन
केला दह्याचा ल्ई साटा
चादीचा ग रवी दोर
सोन्याचा ग डेरा बाई
नेसली पिवळा पितांबर
मधुपन्ना चोळी अगीं
नाकीं सूरव्याची नथ
नेत्रीं काजळ भरल
भाग भरीला गुलाली
शिरीं मोत्याची चुंबळ
घेतला दह्यायाचा माठ
चढे यमुनेचा घाट
पायीं जोडव्याचा थाट
निगाली मथुरा बाजारीं
बाजाराची लोक बोल
सुद्रा कामीन कोनाची
गोविंदा म्हेवनी तुमची
गोविंदा तिथून निगाला
गेला आपल्या वाड्याला
अग अग न्हाई राणी
आपली भैन तू आनावी
घरीं न्हाई ल्गीन वो
दारीं न्हाई ल्गीन वो
चद्रावळ माजी क्वळी
न्हाई तुमच मन निर्मळ
तिथून गोविंदा निगाला
गेला आपल्या माडील्या
अतर मतर झोकीयीतो
पिवळ तुदळ फेकीयीतो
येर येर कनड्या नागा
येर येर नच्या नागा
माजा मैतर डुखील
डोहात जाऊन नसदील

या ग गौळणी बाईच्या
दासी पाण्याला गेल्या
नाग घागरीं भरीला
आणून रांजणीं घतीला
*या ग गौळणी बाईनं*
घेतली सोन्यायाची झारी
ती ग रांजणीं बुडविली
नागा करंगळी फोडीली
*गवळण मूर्छना पडली*
या ग गौळणी बाईची
सासू भाईरनं आली
अग अग सून बाई
तोंड धुया पाणी न्हाई
गौळण शिणली भागली
गौळण उगीच निजली
या ग गौळणी बाईचा
सासरा भाईरनं आला
अग अग सूनबाई
आंघूळीला पाणी न्हाई
गौळण शिणली भागली
गौळण उगीच निजली
या ग गौळणीबाईचा
दीर भाईरनं आला
अग अग वैनीबाई
धारला चरवी कशी न्हाई
गौळण शिणली भागली
गौळण उगीच निजली
सासू रोजन मांडली
बरी होती गौरीमाता
घराची हो शोभिवंता
सासरा रोजन मांडली
बरी होती गौरीमाता
घराची हो शोभिवंता
दीर रोजन मांडिली

वैनी नव्हती गवळण
कधीं न्हाई मोटीलें
आमच वसल बोलण
एवढा गलबला ऐकीला
हरी भाईरूनी आला
रावो देवा येण केल
चद्रावळी पान लागल
गोविंदा तिथून निराला
आपल्या वाड्यायाशीं आला
उग अग न्हाई राणी
चद्रावळी पान लागल
न्हाईराणी रडू लाग
केस कुरळ सोडील
उर दणादणा झोडल
गोविंदा तिथून रागेला
गेला आपल्या माटीला
अतर मतर जोकीला
पियळ जुदळ फेकील
येर येर कवड्या नागा
येर येर बच्या नागा
माझा मैतर तू हुशील
वील पिवून घेशील
आळवण बोळवण करूनी
सहा महिने रान गेली
चद्रावळ देवान राणी केली

ही एक अद्‌भुतरम्य अशी कथा आहे. बायकांना तिची गोडी फार, त्यामुळें अशाच सुंदर गोष्टींनीं सजलेलीं गाणीं स्त्रियांना फार मोठ्या प्रमाणावर पाठ असतात. त्या कारणानें सगासुदीला तीं सांगताना त्यांच्या त्यांच्यातच मोठी चढाओढ लागते. अशावेळीं कोणाची हार वा जीत होत नाहीं. सगळ्या गार्णी गायला खुशीनें राजी असतात. जवळचीं सारीं गीतें हौशेनें बाहेर काढतात.

गवरी ग बाई जागरान तुझ
जागता जागता पडल्या झापदी
एवढ्या निनची पिरत वेवदी

सोन्याच्या चौरंटी गौरी बाळातनी
नारळीच्या गोण्या लुटील्या अगणीं
सुपारीच्या गोण्या लुटील्या अगणीं
हळदीच्या गोण्या लुटील्या अगणीं
साखरच्या गोण्या लुटील्या अगणीं
ताबूळाच्या गोण्या लुटील्या अगणी...

गौर जागवताना म्हणावयाचें हें गाणें आहे. बाळतिणीला लागणारे सर्व साहित्य जमा होईपर्यंत तें लांबते. इथे गौरीला बाळंतीण मानलें आहे! माहेर-वाशिणीचें सोपस्कार चालू आहेत. लेकीचें कौतुक सांगितलें आहे. मानवी जीवनातील सगळी हौस इथें जमा झाली आहे.

हें गाणें म्हणताना पालथ्या परातीवर वस्त्रगाळ केलेली राख टाकून तिच्यावर आळीपाळीनें डाव व रवी फिरवतात. अशा वेळीं मोठें सुंदर पार्श्वसंगीत निर्माण होत!

अशा कांहीं गाण्यातून घरच्या वैभवाची वारेमाप खैरात केलेली दिसून येते. मनाचा मोठेपणा उघड होतो. घरचा दिमाख चारचौघींत प्रगट केला जातो.

रुण् झुण् पाखरा रे
जा माझ्या माहेरा
कमानी दरवाजा रे
त्यावरी बैसजा
घरच्या आईला रे
सांगावा सांग जा
दादाला सांग जा रे
ने मला माहेरा

झिम्मा खेळताना म्हणावयाचें हे एक लोकप्रिय गाणें आहे. झिम्म्याचीं अशीं कितीतरी गाणीं आहेत. त्याच्या चालीहि सुरेख असतात. झिम्मा खेळत व गाणीं गात बायका नाचू लागल्या म्हणजे दृष्ट लागण्याजोगा देखावा असतो. अशा गाण्यातून माहेरचें वैभव, माहेरची ओढ प्रामुख्यानें प्रकट होते. त्याच-प्रमाणें दागिन्याचीहि भरपूर नोंद होऊन देवादिकाच्या वायकाचें कौतुक व आपला उणेपणा प्रकट केला जातो.

मगळा गौरीचीहि कांहीं वेगळीं गाणीं असतात. त्यापैकीं नमुना म्हणून एखादें घेता येईल तें असें—

तू रडतेस का गे बहिणी
तुला काय केलें कोणीं

तुला काय सांगू दादा मी
माझी घागर गेली बुडूनी
माझी नथ घेरे दादा
माझी घागर दे काढुनी
तुझी नथ नको गे बहिणी
तुझी घागर गेली बुडूनी
माझा चंद्रहार घेरे दादा
माझी घागर दे काढुनी
तुझा चंद्रहार नको गे बहिणी
तुझी घागर गेली बुडूनी
( याप्रमाणे सर्व दागिने व प्रश्नोत्तरे होतात. नंतर )
माझें काळीज घेरे दादा
माझी घागर दे काढुनी
तुझें काळीज नको गे बहिणी
तुझी घागर देतों काढुनी

मंगळागौरीचीं गाणीं प्रामुख्यानें ब्राह्मण स्त्रिया म्हणतात. विवाहानंतर त्याच्यामध्येंच मंगळागौरीची पूजा करण्याची चाल आहे.

माजघरांतील गाणीं म्हणून लोकगीताचा एक वेगळा प्रकार आहे या प्रकारात पौराणिक कथागीतें, डोहाळे, विवाहगीते व पाळणे येतात. त्या सर्वांचा विचार इथें या प्रकरणात करण्याची गरज नाहीं. तथापि उदाहरण म्हणून त्या प्रसंगींचें एक ' झालीचें गाणे ' इथें घेता येईल—

दुरड्याच्या दुरड्या आणला भात
याही करी मात विहिणीची
आता माझी सखूबाई
असा कसा तुझा याही
गुलालाची दाटी न्हाई
होती त्याचे गोळे न
याही करे सवळे न विहिणीचे

हे गाणें तसें मोठे आहे. परंतु मुख्य पालुपद म्हणून म्हणावयाचें तो भाग असा. या गाण्यात सर्व पक्वान्नाचा समावेश होतांतों तें लावत. येथें विनोदहि भरपूर निर्माण केलेला आहे !

स्त्रियाच्या अशा निरनिराळ्या प्रकारच्या गाण्यात कांहीं ' गजगौरी व्रता '-सारखीं अगर ' ववश्या 'सारखीं इतर गाणींहि येतात. अशा गाण्यातून पौराणिक भाग बराच आलेला असतो.

अशा लोकगीताचे विषय अनेक तसेच प्रकारहि विविध आहेत. खेरीज स्त्रियांच्याप्रमाणें पुरुष मंडळींचींहि अशीं प्रासंगिक गाणीं अनेक आहेत. ज्या गाण्यांत ढोलनाचाच्या वेळचीं धनगरांचीं बिरबादेवाचीं गाणीं, वाघ्यामुरळींचीं गाणीं, गोंधळ्याचीं गाणीं, निरनिराळ्या दैवतांच्या भक्तांचीं गाणीं, वाटेवरील भटक्या लोकांचीं भिक्षेच्या वेळीं म्हणावयाचीं गाणीं, शेतकऱ्यांचीं भलरी वगैरे वगैरे कितीतरी प्रकार आहेत त्यांपैकीं केवळ एक प्रातिनिधिक म्हणून कोकेवाल्यांचें ' जनाई 'चें गीत इथे देत आहें—

दोन पार रात र झाली
स्वारी विठ्ठला तुझी आली
देव गेला जनीच्या म्हालीं
जनाई म्हनून हाक दिली
जनाई आलों तुझ्यासाठीं
जेवाय वाढ विठ्ठलासी
जनाई घरामदीं गेली
कण्या कोंड्याचा मांडा केला
जेवा जेवा पांडुरंगा
दुबळ्याची लाज राखा
जनाई जेवलीं दुपरोटी
जना झोंप लाग मोठी
तीन पार रात देवा गमली
एक पार रात देवा उरली
नऊ लाखाचा हार पितांबर
ठेवला जनीच्या वाकळवर
फाटकी वाकळ घेतली
देव राऊळासी गेला
दिवस उगवुनी रामपार झाला
बडवे आले पुजायाला
देवा अलंकार करीता
वाकळ अंगावर पाहिली
देवाची दया तुनीं केली
दादा चोरी कशी झाली
पंढरीची गोपाळपुरीची
झडती सर्व्यांनीं घेतली
देवाचा शादू तिथ न्हाई

सर्व्ये गेले जनाई घरीं
अग अग माजे जनाबाई
देवाची चोरी केली काई ?
देवाची चोरी न्हाई केली
विठ्ठलाची शिपत तिनं घेतिली
तुझ्या घरची झडती आमी घेतों
पुंडरपुरीं मग आमी जातों
जनाई घरची झडती घेतिली
वाकळ गान्ह तिथं धावला
जनाई देवा चोरटी
सान्या गांवची जना कारटी
राडा रंडक्या देवा तुज्या झाल्या
वरमा आयेव चुडा लेल्या
रशा बांदल्या जनीच्या दंडाला
मार देत्याती पाठीला
चद्रभागला रचला सूळ
जनाईला आलं मूळ
पैला फासा जनी लावीला
इठ्ठलाच सुमरान तिन केलं
फाशाचं तीन तुकडं झाल
दुसरा फासा जनी लावीला
धावा विठ्ठलाचा तिन केला
फाशाचा वर जाळ झाला
तिनव्यानं फासा लावीला
देवा तुज्यावीन कुणी न्हाई
फाशाचं झालं पानी
बडव्याचा कायदा सरून गेला
उतरा खालीं जनाईला
गाव लोक चरणीं लागी
कनी फाशी जनीला आली
विठ्ठलाची भक्ति न्हाई सोडिली
साडी चोळीचं म्हायार केलं
मोत्या पवळ्यानीं वटी भरीली
जनाई माधारीं लावीली

धर्म नेला बाया न्हाई गेला
धर्म तिच्या कामासी आला
धर्माविना न्हाई देवा गती
धर्म जल्माचा सगती
दोन पार रात र झाला
स्वारी विठ्ठला तुझी आली

अशा गाण्यांच्यामधून कधीं शृंगार रस तर कधीं भक्तिरस दुथडी भरुन वहाताना आढळतो कधीं यामधील भावना वत्सलतेनं फुलते, तर कधीं कारुण्यानें काजळून जाते केव्हा या गाण्यातून विनोदी वातावरण खुलत, तर कधीं चिडा चीडहि दिसून येते. मानवी मनात येणारे सारे भाव इथें हात जोडून उभे रहातात.

प्रासंगिक गाण्यांची किंवा लोकगीतांची ही दुनिया मोठी आहे असंख्य गाणीं या दुनियेंत नादताहेत या गाण्यांच्यापैकीं देवादिकांचीं गाणीं स्त्री आणि पुरुष दोघांच्याहि तोंडीं आहेत तर कांहीं खास पुरुषांचीं व कांहीं खास स्त्रियांचींच म्हणूनहि आहेत त्यात स्त्रियांच्या गाण्यांचा भरणा अधिक

या गाण्यातून सारे शब्द कसे सहज सुलभतेनें गुम्फले गेले आहेत. भावना प्रेमानं सर्वत्र खेळली आहे सारें कसें शांत, सरळ आणि चित्ताकर्षक आहे कुठें खटकत नाहीं. कुठें कांहीं अडत नाहीं सगळीकडे रचना ओघवती आहे या गीतांचा ताल आणि स्वर विलोभनीय आहे.

अशा ह्या लोकगीतांच्या बाबतींत प हजारीप्रसाद द्विवेदी यांनीं आपलें मत म्हणून सांगितलें आहे कीं—

"ग्रामगीतोंका समस्त महत्त्व उनके काव्यसौंदर्यतक ही सीमित नहीं है। इनका एक बहुतही महत्त्वपूर्ण कार्य एक विशाल सभ्यताका उद्‌घाटन जो अबतक या तो विस्मृतीके समुद्रमें डूबी है या गलत समज गई है। आर्य आगमन के पूर्व बहुतही समृद्ध आर्येतर सभ्यता भारत वर्ष में फैली हुई थी। उसके साथही औरभी बीसियां छोटी मोटी सभ्यताए इस विशाल भूभागमें फैली हुई थीं। आर्योंने राजनीतिक रूपमें तो भारतवर्ष को जीत लिया था, पर वे सांस्कृतिक रूपमें पूर्ण रूपसे यहाँ के मूलनिवासियों के द्वारा प्रभावित हुए थे। यहाँ की मूल सभ्यता वैदिक सभ्यतासे एकदम भिन्न थी और आज भी लोकाचार, स्त्री आचार, पौराणिक परंपरा आदिके रूपमें विद्यमान है। ग्रामगीत इस सभ्यताके वेद (श्रुति) है। वेद भी तो अपने आरंभिक युगमें श्रुति कहलाते थे। वेद भी आर्यों की महान् जाति के गीत ही थे और ग्रामगीतोंकी भाँतिही सुनकर याद किये जाते थे। सौभाग्यवश वेदने बादमें श्रुतिसे उतरकर लिपिका रूप धारण किया, पर हमारे ग्रामगीत अब भी श्रुतिही है। इस प्रकार वेदों द्वारा आर्य

सभ्यताका ज्ञान होता है, उसी प्रकार ग्रामगीतों द्वारा आर्यपूर्व सभ्यता का ज्ञान होता है। ईंट-पत्थरके प्रेमी विद्वान् यदि धृष्टता न समझें, तो जोर दे कर कहा जा सकता है कि ग्रामगीत का महत्त्व 'मोहन-जो-दाडो' से कहीं अधिक है। मोहन जो दाडो सरीखे भग्नस्तूप ग्रामगीतों के भाष्यकाम दे सकते है।"*

० ० ●

## उखाणा

ओवीप्रमाणेंच स्त्रीजीवनांत हरघडी उपयोगांत येणारा लोकप्रिय वाङ्मय-प्रकार म्हणजे उखाणा होय. अगदीं थोडक्यांत पण वेचक शब्दांनीं चटकदारपणें आपल्या मनांतील गोष्ट सूचित करण्यासाठीं स्त्रियाना उखाणा फार उपयोगी पडतो. विशेषतः फुगडी खेळतांना व लग्नासारख्या घरांत निघणाऱ्या अनेक प्रकारच्या मंगलप्रसंगीं पतीचें नांव घेतांना आणि रुसवत उघडतांना उखाण्याचा उपयोग केला जातो. स्त्रीनें उघडपणें हाक मारून पतीचें नाव घ्यावयाचें नाहीं अशी जुनी चालरीत आहे. कारण अशा करण्यानें पतीचें आयुष्य कमी होतें, अशी मोठी समजूत सामान्य बायकांत रूढ झालेली आढळते. या उलट उखाणा घालून पतीचें नांव घेतलें, तर मात्र कसलाहि बाध येन नाहीं, असा परंपरागत समज आहे. त्यामुळें वेगवेगळ्या प्रकारचे चटकदार उखाणे घेत, आपलें बुद्धिवैभव चारचौघींत प्रकट करतेवेळीं पतीचें नाव घेण्याची चाल, महाराष्ट्रात फार पूर्वीपासून पडलेली आहे.†

पांढरपेशा स्त्रीपेक्षा खेड्यातील शेतकरी स्त्रियांच्यामध्ये पतीचें "नाव घेण्याचे" म्हणून जे खास उखाणे असतात ते मोठे वैशिष्ट्यपूर्ण आढळून येतात. लांबीच्या दृष्टीनें तर ते मोठे असतातच, पण शेवटच्या ओळींत नवऱ्याचें नाव गोवण्यापूर्वी येणारी हकीकतहि इथें मोठी मजेदार असते. आपली

---

* वैदिक धर्म—अप्रैल १९५८—सिन्धी लोकगीत—ले. जगदीश सो. लद्दाणी. पृष्ठ १४६

† (१) जैसे न मांगणें वरी। बाळा पतीसी रूप करी।
बोलु निमालेपणें विवरी। अचर्चा तें॥
(अ. १५।४६८ ज्ञानेश्वरी, साखरेप्रत)

(२) रेवती म्हणे जी यादवा। आधि घ्या ईचीया नावा।
हळदी मग ईसी लावा। देवाधिदेवा श्रीकृष्णा॥
(एकनाथ-रुक्मिणी स्वयंवर)

नातींगोतीं, सणवार, चालीरीति, इतिहास भूगोल, करणीधरणी वगैरे अनेक गोष्टींचा उठावदार सगम या उखाण्यातील इत्नीक्तींत गुफलेला असतो त्यामुळें सामाजिक जीवनाचें दर्शन घडविणारा एक श्रेष्ठ वाङ्मयप्रकार म्हणूनहि उखाणा महत्त्वपूर्ण ठरेल यात शका नाहीं.

उदाहरण म्हणून अशा प्रकारचे कांहीं उखाणे इथें पहावेत—

( १ ) कोल्हापुरी तपेल जागूळीला, चादीचा पाट बसायला, जरीकाठी धोतर नेसायला, सान येवल्याच, ख्वाड बङ्ग्याच, केसरी गध ल्याला, शिवपूजेला पानी गगाभागीरथीच, चादीच ताट, आबेमोहराचा भात, वर केसरी वरण दाट, ताट बिंदलीच, डबा म्हाउलीचा, डब्या गजनीच्या, कात कोंकणचा, चुना भोकरचा, पान रामाच, जायपत्री जयगावची, लवग विजापूरची, चिकणी सुपारी सोलापूरची, लाल गादी मुर्दडची, लोड साताराच, उशी पुण्याची किनखापाची, पल्ग कराडचा मोराचा, हिन्यामाणकाच्या पुंवराचा लकल्काट × × × रावाच्या जिवावर हणदीकुंक्वाचा गजर दाट.

( २ ) पाऊस लागला झिरीमिरी, मूठ धरली चाड्यावरी, शिवार झाल गार, शेतात घातला विळा, बाधला पेंढीचा आळा, शिवार केला गोळा, बुचाड रचल नानापरी, तिवडा रवला येसूवरी, बोलीवल्या नगरच्या नारी, तिवड्याला घाल्तें आकडी, आकडीला आकडी भिड, मदनात बैल तुड, रास मोजताना × × × रावाच्या हातात चमाकल सोन्याच कड.

( ३ ) वटसाविन्रीचा पुजते वड, बेंदरान केला चड ( स्वारी ), बेंदराची घेतें काव, नागपचमीचा जाव, नागपचमीच्या दिंडाची करतें न्हारी, आली गवराय गणपतीची स्वारी, गवराय गणपतीला वहातें दुर्वा, गवराय गणपतीच घेतें दोर, आल म्हाळाच म्हईन म्होर, म्हाळाच्या म्हईन्याची निवडतें डाळ, आली घटाची माळ, घटाच्या माळेला देतें गाठी, शिलगनाची झाली दाटी, शिल्गनाच घेतें सोन, दोन्ही दिवाळ्यानीं केल येण, दिवाळीची पाजळतें पती, आली सक्रांत नेती, सक्रांतीच पुजतें सुगड, आली माही पुनव उघड, माही पुनवेची पुजतें वोंबी, शिमगा खेळे झोंबी, शिमग्याची करतें पोळी, आली रगपचीम भोळी, रग पचमीचा उधळला रग, पाडवा आला टोलेजग, पाडव्याची उभारतें गुढी, आखितीन मारली उडी, आखितीची पुजतें करा, दिवाळी दसरा होस्तोंवर दम धरा, मग येईन × × × राव तुमच्या घरा

( ४ ) पढरपूरचा पुडा, काशीचा चुडा, मथुरेच पान, लायला छान, पल्मी आबा, त्याच्या करतें फोडी, आईबापाची गोडी, सिताच्या काल्ला दुधाची कळशी, दुधाच करतें दही, दह्याच करतें ताक, ताकाच दाटत लोणी, अशी मी अतरीं शाणी की, × × × रावाच्या रागाच तवाच करतं पाणी.

( ५ ) गावदरीला पेरला वरा, उपडून बांधला भारा, आणून टाकला परसदारा, गाई आली हुंगून गेली, म्हैस आली खाऊन गेली, म्हशीच्या पोटीं रेड, गाईच्या पोटीं चितार पाड, आईबानीं दिल जाभळ घोड, जाभळ्या घोड्याच चुडक दाव, दुरून पाहिलीं वाडीगाव, वाडी गावाच्या रुद रुद वेशी, ठस पडल चौदेशीं, चौदेशीच्या उनराय गाज, × × × रावाच्या मदिलाला जवा बगाल तवा नुर दिसत्याल ताज.

या लाबलचक उखाण्याच्या जोडीलाच दोन तीन ओळींचे आटोपशीर व लहान लहान चुटक्याचे उखाणे घेण्याची चालहि सर्वत्र आढळून येते. या प्रकारचे उखाणे असे असतात —

( १ ) हातभर बागडी, अगभर पदर × × × रावाच्या सेवेला मी चोवीस तास हजर.

( २ ) मोत्यानीं विणला पाळणा, रेशमान विणली बाज × × × रावाच्या लेकीचं बारस आज.

( ३ ) जटिताच मगळसूत्र सोनारान घडवल × × × रावाच्या नावासाठीं सर्वानीं मला अडवल.

( ४ ) विठोबाच्या देवळाला सोन्याचा कळस × × × रावाच्या नावाचा मला नाहीं आळस.

( ५ ) सोन्यामोत्याचे सागरगोटे, पडले माझ्या पातळाच्या घोळात × × × रावाच नाव घेतें मैत्रिणींच्या मेळ्यात.

( ६ ) नको पैठणी, नको शाल, नको मला भर्जरी शेला × × × रावाच्यासाठीं देह मीं अर्पण केला.

( ७ ) पाडला पाटा, फोडला हिंग, दिली फोडणी, कडाडली ताकावर × × × रावाच नाव घेतें सर्वांच्या नाकावर

( ८ ) गोदावरी काठची मुलगी कृष्णाकाठीं आली × × × रावाच्या नावच मगळसूत्र ल्याली.

( ९ ) पाडाचा आंबा दिला दारींच्या पोपटाला × × × रावाच नाव घेते चन्द्रसूर्या साक्षीला.

( १० ) आत्तीसाब मायाच्या, मामासाब प्रेमाचे, बाईसाब सुगरीण, दीरभाऊजी हौशी × × × रावाच नाव घेतें हळदीकुंकवाच्या दिवशीं

पतीचें नाव घेण्यासाठीं वापरल्या जाणाऱ्या अशा लहानमोठ्या उखाण्यातून ठराविक अक्षरगण, मात्रागण, अक्षरावलि किंवा मात्रावलीचें बंधन असलेलें दिसून येत नाहीं. त्याचप्रमाणें येथें ठराविक ओळींचेंहि बंधन आढळत नाहीं. यमकाचा वापर येथें भरपूर होत असला, तरी त्यासही बंधनात्मक स्वरूप आलेलें नाहीं.

अलीकडच्या काळात रूढ होत चाललेल्या मुक्तछंदाचें आवरण मात्र ह्या उखाण्या-भोंवतीं आहे असें दिसतें. या प्रकारच्या उखाण्याच्या जोडीलाच लग्न प्रसंगीं रुखवताचे वेळीं घेतले जाणारे उखाणेही मोठे चित्ताकर्षक असतात.

उदाहरणादाखल म्हणून त्याचा तोंडवळा कसा असतो तो पहावा—

( १ ) आला आला रुखवत, दनानल जोत, आत उगडून बघतीबा तर साकरच पोत

( २ ) आला आला रुखवत, आत हुती सान, ईनीबाई छान पण मधल्या आघल्यानीं केली घाण.

( ३ ) आला आला रुखवत माडवाचे दारीं, आत काय परी, शेवाया नाजूक, तेलच्या साजूक, पानाच्या पम्या, खोबऱ्याच्या वाम्या, गुळाच खड, उडदाच वड, पापडहार हारीं, धारी सजुरी, बुदी बरफी झुलापझारी. जिर साकार न्हाईपुरी. शेंडीसिकट पाच नारळ, देटासकट पिकलीं केळ. दराक्ष हजार रामफळ करनी केली धनसपताच्या बळ. रुखवत उघडते खडाखडी. पाइजे तर ××× रावाच नाव घेतें, पन अगूदर चोळी पातळाची वर ठेवा घडी.

( ४ ) कोरी तवली कुमाराची. विहीन बोल टचकाऱ्याची. चितागाचा पासा. ईनीबाई पळगाव बसा. याह्यानीं यीन घेतली कडला. नेली हलव्याच्या पेढीला. तिथ बादली जिलेबीची पुड. यीनबाई फुदुफुदू रड. मला तिकडच न्या म्हण. मग याह्यानीं यीन घेतली कडला. नेली सोनाऱ्याच्या वाड्याला. तिथ घडल तोड्याच जोड. यीन फुदुफुदू रड. मला तिकडच न्या म्हण. याह्यानीं मग यीन घेतली कडला. नेली अत्ताराच्या वाड्याला. तिथ बादल हळदीकुंकवाच पुड. यीन फुदुफुदू रड. मला तिकडच न्या म्हण. याह्यानीं मग यीन नेली आंब्याच्या बनीं. तिथ हातरला गजीखाना. यीनीच्या याही आला मना. बसाया पाट. तोंड धुया घंगाळ. तवा मातूर यिहीन म्हटली कीं, याही लई वगाळ.

( ५ ) आला आला रुखवत, रुखवतात हुत कवाळ. आमच्या नवरीचा कर नीट सभाळ, न्हाईतर ह्या गावचा पिंपळेश्वर लई हाय वगाळ.

( ६ ) आला आला रुखवत, रुखवतात गाजराचा पाला. दीड दिवस झाला न्हाई सजुरी देऊन, तर एवढ्यात कशाला आला ?

( ७ ) आला आला रुखवत, त्यात हुता गडवा, उकान्याला उकाना भिडवा न्हाईतर सादीला त्याड दडवा.

या प्रकारचे रुखवताचे उखाणे पुष्कळच असतात. इथें या उखाण्याचा उपयोग लग्नी मिरचीसारखा होतो. मानापमान त्यामुळें निघतात. बोलण्यावरून बोलणें वाढतें. भांडणें निघतात. रुसाफुगी होते. तरीपण भरपूर विनोद निर्माण करण्यासाठीं या पद्धतीच्या उखाण्याचा उपयोग केला जातो. या उखाण्यावून बाईची अक्कल पार चालते म्हणतात. जिभेला हाड नगावें त्याप्रमाणें इथें हवं तें बोल्लें जातें.

मोठ्या बायकांच्या या विविध प्रकारच्या उखाण्याचे प्रमाणेंच लहान मुली फुगड्या खेळताना उखाणे घालतात. हे उखाणे साधे, खेळाचे, म्हणून ओळखले जातात. या उखाण्यातूनहि एकमेकींच्या उखाळ्यापाखाळ्या अधून मधून निघतात. कधींमधीं कौतुकाचीहि भाषा होते फुगडीचे उखाणे असे असतात—

( १ ) तुझी माझी फुगडी बनात ग, बनात ग,चाफ्याचीं फुलं माझ्या वेणींत ग

( २ ) आपल्याच पान माझ्या झपाऱ्याखालीं, झपाऱ्याखालीं, काळ्याच्या मुली माझ्या डाव्या हाताखालीं.

( ३ ) चिपाडबाई चिपाड जुधळ्याच चिपाड, दादान बायको केली आपल्यापेक्षा धिप्पाड

( ४ ) चुनाबाई चुना परातभर चुना, चिंचपेऱ्या लेवू आम्ही किर्लोस्कराच्या सुना.

( ५ ) आलगडीवर पलगडी, पलगडीवर हार, आज माझी मगळागौर बोलू नका फार.

( ६ ) फुगडी खेळू दणादण्णा, रुपये मोजू खण्णाखण्णा, बाभळीची साल, माझा क्बरपट्टा लाल

( ७ ) एवढासा पाटा बाई जिरीमिरी वाटा, लाडक्या लेकीचा दमारा मोठा.

( ८ ) उच उच बुचडे पुणेकरणी, कासोट्याच्या पट्या सातारकरणी
नाकात मोती बारामतीकरणी, डोक्यावर झाडे बोरगावकरणी.
टाचा पुटक्या गोवेकरणी, भल्या ग दाडग्या फलटणकरणी
फुगडी खेळू दण्णा दण्णा, रुपये मोजू खण्णा खण्णा.
भल्या बापाची लेक, माझी फुगडी पारखून देख.

( ९ ) बस फुगडी बसूगा, चतुरशिंगी लाळुगा
एक पाय खोलीचा, साताराम डोलीचा.

(१०) काथवट कणा, चौघीजणी सुना,
पाणी का ग धाना, ×× का ग प्याना
पायाची माती नणदेच्या हातीं
नणदेन दिली खोबऱ्याची वाटी,
खोबऱ्याची वाटी जळून गेली
नकटी नणद पळून गेली

अशा प्रकारच्या कितीक उखाण्याचा उपयोग खेळात पार्श्वसंगीताप्रमाणें करण्यात येतो। अर्थापेक्षा इथे यमकाचे प्राबल्य अधिक आढळून येतें खेळाच्या सार्थीतून याचा जन्म झाल्याकारणानें अर्थपूर्णतेचें बंधन यावर नसतें पहिल्या,

ओळीला कांहीं अर्थ नसला व दुसऱ्या ओळीशीं पहिलीचा संबंध नसला, तरीहि इथे हरकत नसते. परंतु असें असून राग लोभाची भाषा इथें दिसल्याने होते.

या उखाण्याच्या वाङ्मयप्रकारास अपौरुषेय वाङ्मयातील अनुष्टुभ छंद म्हटलें तरी वावगें होणार नाहीं. "अनुष्टुभ हा अभिजात वाङ्मयातील पहिला छंद वाल्मिकी ऋषींना सहजस्फूर्त झालेला व पुढील वृत्त रचनेचा पाया. त्याप्रमाणेंच उखाणा हा बोलता बोलता सहजस्फूर्त झालेला असतो. नालीवर म्हणता आला पाहिजे असें याचें नसतें व रचनाहि अत्यंत शिथील."* तरीपण स्त्रीजीवनात याची अपूर्वाई फार मोठी असते.

o o o

## म्हणी

जुन्या काळची बरीच वडीलधारी मंडळी ही उठता बसता आपल्या बोलण्यांतून कांहीं परंपरागत अशा वाक्प्रचाराचा उपयोग करताना दिसून येतात. हे वाक्प्रचार दिसायला एखाद्या उखाण्यासारखे दिसत असले, तरी त्याचे अंतरंग ठराविक प्रकारच्या विशिष्ट अशा अर्थानें भरलेलें असते. म्हणून त्यास 'म्हणी' असें वेगळें नामाभिधान देण्यात आलेलें आहे.

ह्या म्हणींचें स्वरूप संपूर्णतः गद्यमय असतें. परंतु त्याचे स्मरण पक्कें रहावें एवढ्यासाठीं येथें यमकाचा उपयोग सर्वत्र केलेला असतो. निरर्थक शब्दांचा वापर म्हणीला खपत नाहीं, थोड्याच व मोजक्या शब्दांनीं जास्तींत जास्त अर्थ सांगणें हें म्हणींचें मुख्य वैशिष्ट्य असतें. त्यामुळें मुरलेल्या लोणच्याप्रमाणें अनुभवाचें शहाणपण सांगणें हें म्हणींचें मुख्य कार्य होय. म्हणून येथें मनोरंजनापेक्षा शहाणपण हेंच लोकांना प्रामुख्यानें अभिप्रेत असते, हें तत्त्व म्हणींचा वापर करणारे व त्याचें श्रवण करणारे मनाशीं बाळगून असतात.

म्हणींचा उपयोग स्त्री आणि पुरुष या दोघांकडूनहि केला जातो. आणि अगदीं सहजगत्या त्या त्यांचे ओठांवर खेळत असतात. त्या कारणानें अमूक एक म्हण स्त्रियांच्या वापरातील व अमुक एक पुरुषाच्या वापरातील असा भेदभाव म्हणींचें ठायीं दाखविता येत नाहीं. तरी परंतु त्यातल्या त्यात स्त्रियांचेकडूनच ज्यांचा अधिक वापर केला जातो, अशा कांहीं म्हणी इथें नमुन्यादाखल देत आहे:–

(१) सतत साहिना व मूळ होईना.

(२) जिकडे गेली बाइ तिकडे आली गाज.

---

* अपौरुषेय वाङ्मय. पा. ४२–४६

(३) सून आली घरात न् सासू पडली केरात.
(४) दिसायला गरती न् गावभर फिरती.
(५) नाजुक नार, मोत्याचा हार, पण चाबकाचा मार.
(६) साप म्हणू नये बापडा व नवरा म्हणू नये आपला.
(७) पहिल्या वरा न् दूध वरा.
(८) जाळावाचून कड नाहीं व मायेवाचून रड नाहीं.
(९) येरे माझ्या मागल्या न् ताकण्या चागल्या.
(१०) आली भेटीला न् धरली वेठीला.
(११) आभाळाला गवसणी कोण घालील शाहाणी.
(१२) आई जेवायला वाढीना न् बाप भीक मागू देईना.
(१३) बाजारात तुरी न् भट भटणीला मारी.
(१४) झाकली मूठ सव्वा लाखाची.
(१५) हौसेन केला वर, दिवसा खोकला न् रात्रीं ज्वर.
(१६) कोणाच्या गाई म्हशी न् कोणाला उठाबशी.
(१७) घर ना दार, देवळीं बिऱ्हाड.
(१८) शब्दाचा सुकाळ तिथ बुद्धीचा दुष्काळ.
(१९) मान सागावा जनात व अपमान ठेवावा मनात.
(२०) चैत्राची माना न् वैकुंठीची यात्रा.
(२१) म्हशीचीं शिंग म्हशीला जड होत नाहींत.
(२२) पदरीं पडलें न् पवित्र झालें.
(२३) वाहिली ती गगा न् राहिल तें तीर्थ.
(२४) वकुब थोडा पण दिमाख बडा
(२५) ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी.

अशा प्रकारच्या ह्या म्हणींची सख्या लोकसाहित्यात भरपूर आहे. आकाशात ढगानीं गर्दी करावी, तशा या म्हणी एकेकाच्या मनात तरगत असतात! त्यामुळें वेळप्रसगानुरूप त्याचा वापर केला म्हणजे माणसाचें बोलणें कसें बाळसेदार होते. या बोलण्यातून मग कधीं नीतितत्त्व बाहेर पडते तर कधीं अनुभवानें नटलेला दृष्टात बाहेर येतो. हे बोलणे त्रिकालाबाधित असें असल्यामुळें अक्षर वाङ्मयात त्याची गणना होते.

लघुता, व्यावहारिकता, चित्ताकर्षकता आणि लोकमान्यता हे या म्हणींचे प्रमुख गुण असतात म्हणींचा बाधा आटोपशीर असतो, पण अतरग डौलदार असते. त्या कारणानें व्यावहारिक जीवनातील एक राजमान्य या लोकमान्य असें चलनी नाणें म्हणूनही म्हणींचा लौकिक आहे. आणि म्हणूनच म्हणी म्हणजे

पिढ्या न् पिढ्याच्या मडळींनीं वापरात ठेवलेला एक प्रभावी असा शानकोशच होय असें म्हणता येईल.

• • •

# कोडीं किंवा हुमाणा

आपल्या नेहमींच्या ऊठबशींतील मडळी काहीं कारणानें एकत्र आली म्हणजे एकमेकाची कधीं मधीं अशी परीक्षा घेत असतात. त्याना एकमेकाच्या बुद्धीची पारख करून घ्यावीशी वाटते. म्हणून अशा वेळीं त्याचें बोलणें प्रश्नोत्तर रुपाचें होतें. तेव्हा अशा या बोलण्यास कोडीं घालणें किंवा हुमाणा–हुमान– टाकणें असें म्हटलें जातें.

या प्रकारच्या बोलण्याचा सराव खेड्यातील स्त्रीपुरुषाप्रमाणेच लहान मुलाबाळानाहि असतो. त्यामुळें अनेकदा ही मडळी एकमेकात याच प्रकारचें बोलणें करताना आढळतात. घातलेल्या कोड्याचें–प्रश्नाचें–उत्तर लगोलग मिळालेंच पाहिजे, म्हणून अशा वेळीं फार मोठी ईर्षा चालू रहाते. एवढेंच नाहींतर, जो अधिक हुमाणे टाकील व ज्याचें उत्तर इतराना सहजासहजीं गवसणार नाहीं, तो अक्कलवान् माणूस म्हणून गौरविला जातो!

एखाद्या माणसाच्या बुद्धीची तारीफ करायला लावणारीं हीं कोडीं कशीं असतात पहा, व कसात दिलेलें त्याचें उत्तर बघून आपल्या देखील बुद्धीला कशी धार येते, याचें मोजमापहि घेऊन टाका —

( १ ) पाढर वावर काळ बीं, चतुर म्हणतो पेरीन मी. ( लेखक )

( २ ) झुक झुक झोळणा, आकाशीं पाळणा, बायको बाळतीण तर नवरा ताहा. ( चिंच व चिंचोका )

( ३ ) आधीं गोल गोल, मग लाल लाल, मग थैय्यम थैय्या. ( उखळ, मुसळ, मिरची )

( ४ ) घा माणसात गोष्ट सागावी खरी, बापाविना पुत्र जल्मला आई पण नव्हती घरीं. ( लव्हाळा )

( ५ ) काळी कचुबाई, हिरवी बचुबाई, पाढरा आजोबा न् उघडी सिताबाई. ( कात, पान, चुना, सुपारी )

( ६ ) जमिनीवर पडला, कोणीं कोपरीं दडला, हातीं तर येत नाहीं असा चमत्कार घडला. ( प्रकाश व काळोख )

( ७ ) घमघमाटा, पिवळा काटा, सोन्याच्या देवळात रुप्याच्या घाटा. ( पिकलेला फणस )

(८) पाणी नाहीं, पाऊस नाहीं, रान कस हिरव, कात नाहीं चुना नाहीं, तोंड कस रगल. (पोपट)

(९) दोन जिभाची नारी, राही मेरूच्या शिखरीं, भल्याभल्याची सेवा करी. (लेखणी)

(१०) घडघड चाले गाडा नव्हे, सुरसुर चाले सर्प नव्हे, कानीं मुद्रिका जोगी नव्हे, गळ्यात जानवें ब्राह्मण नव्हे, नव्हे इद्र, नव्हे चद्र, नव्हे माया, शहाण्यानें घातलें हुमान न् मूर्खाला पडला फासा. (पाणी काढण्याचा रहाट)

(११) पिता ज्याचा सावळा, मातेला नाहीं कान डोळा न् पुत्र जन्मला तोही निघाला सुदर गोळा. (समुद्रातील शिंपा व त्यातील मोती)

(१२) ठिकठिकाणीं पान जस कळकीच रान, आमचा हुमाणा न जिंकेल त्याला वडिलाची आण. (आलें)

(१३) काळा खडक, भोवऱ्यावाणी पाणी, आत खेळते चपाराणी (रवी)

(१४) राजाच्या राज्यात नाहीं, माळ्याच्या मळ्यात नाहीं, सातात पण तोडीत नाहींत. (गारा)

(१५) अख्ख्या दुनियेंत एकच तळं न् त्यात दिसती दोनच रामफळ (चद्र व सूर्य)

अशा प्रकारच्या या बोलण्याला कोणी कोणी उखाणा असेंहि म्हणतात. या परीच्या हुमाण्याची सख्या कितीतरी आहे. एवढी मोठी कीं, ज्याचें गणीतच होऊ नये!

ह्या भाषेची एकदर घडण आणि तिचें मिळणारें उत्तर मोठें मजेदार आहे. अशिक्षिताच्या बुद्धीनें दाखविलेला हा एक अपूर्वाईचा दिमाख आहे. इथें शिकलेलीं माणसें हात जोडून माघार घेतील व या लोकांच्या बुद्धीची तारीफ करीत जातील, असा हा शहाणपणाचा एक सुदर व वैभवशाली खजिना आहे. हा खजिना उघडला कीं, जीवनाला चव येते. भाषेला घनसर अलकार मिळतो आणि माणसाची तारीफ जगभर फिरू लागते. म्हणून पावल्यावेळीं चारचौघात बसून ग्रामधर्माचीं माणसें या बोलण्याची गोडी कशी वाढेल, याची ईर्षा बाळगूनच आपल्या मोठेपणाची बैठक उभारतात.

• • •

## कहाणी वाङ्मय

कोणत्याहि काळातील नव्या आणि जुन्या मानवी मनाला लोकप्रिय वाटणारा वाङ्मयप्रकार म्हणून कहाणीवाङ्मयाचें स्थान मराठी सारस्वतामध्यें फार

वरच्या दर्जाचें आहे. मानवाच्या स्वभावरचनेमध्येंच कहाणीचें उगमस्थान सापडतें. गोष्टी सांगणारा भेटला कीं, ऐकणाराची वाण पडत नाहीं. अगदीं लहान मुलापासून तों वृद्ध मनुष्यापर्यंत प्रत्येकाला कथा ऐकण्याचें वेड असतें. घरातील आजोबा आजींनें गोष्ट सांगावी आणि लहान बालकांनीं ती काळजीपूर्वक ऐकून आपल्या कोंवळ्या मनात ठिपून घ्यावी, ही फार जुन्या काळापासून चालत आलेली प्रथा आहे. अगदीं पुरातन काळापासून सांगणाराची युक्त आणि ऐकणाराची संस्कृति या दोन मुख्य आधारावर कहाणीची जोपासना होत गेली आहे.

मानवाच्या जीवनातील विश्रांतीचें एक अपूर्व साधन म्हणून कहाणीचा लौकिक आहे. मनामधील विचाराना गति देणारें तें एक प्राचीन रसायन आहे. माणसाच्या मनामधील जो एक शाश्वत बालभाव आहे त्याची भाषा, त्याचें साहित्य, त्याचा भावनाविष्कार कहाणी आहे. त्यामुळें उभ्या दुनियेचा संसार कहाणीनें माखला आहे. आणि एकप्रकारें माणसाचें जीवन म्हणजेहि कहाणीचें एक सुंदर भांडार आहे, असें म्हटलें तर खास वावगें होणार नाहीं.

साध्यासुध्या घरगुती शब्दानीं आणि सहजसुलभ रचनाविष्कारानें कहाणीचें अंतरंग सजलेलें आहे.

कहाणीवाङ्मयाचे सामान्यत. दोन प्रकार सर्वमान्य झालेले दिसून येतात. त्यापैकीं पहिला प्रकार म्हणजे घरामधील मोठ्या स्त्रियानीं आपल्या सुनालेकींना योग्य तें वळण लागावें व त्याचें मनावर विशिष्ट प्रकारचा धार्मिक संस्कार व्हावा, म्हणून व्रतवैकल्याचे निमित्तानें सांगितलेगी कहाणी. एथें गोष्टीरूपानें एखादें व्रत सांगून त्याचें माहात्म्य व तात्कालिक फलनिष्पत्ति यांचें वर्णन केलेलें असतें, तसेंच आपल्या आचारविचारास एक प्रकारचें इष्ट वळण लावण्यासाठीं स्त्रियानीं हीं व्रतें श्रद्धायुक्त अंतःकरणानें आचरावीत, असाहि उपदेश ह्या कहाण्याचे द्वारा केलेला असतो. यापैकीं बहुतेक कहाण्या पुराणातील कथाच्या आधारें कैक पिढ्यापूर्वींच्या भाविक म्हाताऱ्या बायकांनीं रचलेल्या असून त्या विशिष्ट प्रकारच्या व्रताच्या प्रसंगीं कुटुंबातील वृद्ध स्त्रिया आपल्या मुलींनातींना सुनाना सांगत आलेल्या आहेत.

सामान्यतः व्रतवैकल्याचे वेळीं कोणतेही व्रत का करावयाचें याचा पौराणिक दाखला घेण्यासाठीं या कहाण्या रचलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, सोमवारच्या शिवामुठीच्या कहाणीमधील वसा व त्याची फलश्रुति यासाठीं किती कडक व्रत अंगिकारिलें पाहिजे, याचें सुंदर वर्णन पहाण्यासारखें आहे—

"...मूठभर तांदूळ घ्यावेत. शिवराईची सुपारी घ्यावी. गंध, फूल घ्यावं. दोन बेलाचीं पानें घ्यावीत. मनोभावें पूजा करावी. हातीं तांदूळ घ्यावे आणि तोंडानें 'शिवा शिवा महादेवा, माझी शिवामूठ ईश्वरा देवा, सासूसासऱ्या, दिराभावा, नणदाजावा, भ्रतारा, नावडती आहे ती आवडती कर रे देवा' असें म्हणून तांदूळ वहावेत. सध्याकाळपर्यंत उपास करावा. उष्टमाष्ट खाऊ

नको. दिवसा निजू नको. उपास नाहीं निभावला तर दूध प्यावं. सध्याकाळीं आघोळ करावी. देवाला बेल वहावा आणि मुकाट्यान जेवण करावं. हा वसा पाच वर्षे करावा. पहिल्या सोमवारीं तादूळ, दुसऱ्यास तीळ, तिसऱ्यास मूग, चवथ्यास जव आणि पाचवा आला तर सातू शिवामुठीकरिता घेत जावे. "

या अशा कहाण्याची भाषा मोठी सुबोध, चित्ताकर्षक, काळजाला जाऊन भिडणारी. महानुभावाच्या भाषेसारखी. इथें थोड्या शब्दांचीं तुटक वाक्यें असतात. वक्ता अगर श्रोता याचा नामनिर्देश वरचेवर इथें येत नाहीं. तसेंच प्रस्तावना अगर उपसहारहि आढळणार नाहीं. जो उपदेश वा बोध असेल तो थोडक्यातच सागितलेला असतो. तसेंच ज्या देवतेचें कहाणीनें स्तवन करावयाचें तिलाच एकदम सबोधून कहाणीस असा आरभ व्हावयाचा—

" ऐका गोपद्मानो तुमची कहाणी. स्वर्गलोकीं इद्रसभा, चद्रसभा, कौरव *सभा इत्यादि सभा बसल्या आहेत. ताशें तर्फे वाजत आहेत, रभा नाचत आहेत.*"
( कहाणी गोपद्माची )

किंवा कित्येक कहाण्या 'आटपाट नगर होतं' या पद्धतीनेंहि सुरु झालेल्या दिसून येतील. सुरवातीप्रमाणेंच या कहाण्याची अखेरहि मोठी मनोवेधक रीतीनें होते. 'ही साठा उत्तराची कहाणी, पाचा उत्तरीं सुफळ सपूर्ण" असें समाप्तिवजा वाक्य आल्याखेरीज तिचा शेवट होत नाहीं. एथें 'उत्तर' म्हणजे गाण्याचा अगर निबधाचा एक भाग असा अर्थ घ्यावयाचा. म्हणजेच ही कथा फार साराशानें एथें आलेली आहे, असा आशय एथें व्यक्त केलेला असतो

या कहाण्यामधून दिसून येणारें सामाजिक जीवन मोठें आकर्षक आहे " वरारे हाकारा, पिटारे डागोरा, नगरात कोणी उपाशी आहे का ? याचा तपास करा. " ही दवडी जाहीर करुन शोध करीत असताना उपाशी कोणी नाहीं. माळ्याचा मळा पिकत नाहीं. विहिरीला पाणी लागत नाहीं. असा एक माळी बसला आहे." अशा प्रकारचें मिळालेलें उत्तर आणि त्यानतर होणारी उपाययोजना मोठी परिणामकारक वाटते यात शका नाहीं. त्याचप्रमाणे देवाजवळ मागणें मागायचेंच तर तें "काकणर्लेल्या लेकी दे, मुसळकाड्या दासी दे नारा यणासारखे पाच पुत्र दे, दोन कन्या दे, कुसुबीच्या फुलासारखें स्थळ दे." ( धरत्रीची कहाणी ) ह्या पद्धतीनें मागावयाचें. सोमवारच्या कहाणींतील शकरानीं एका पोरक्या मुलीला अर्ध्या घटकेचें माहेर दिलेलें वर्णन मोठें अपूर्ण आणि चटकदार झालेलें आहे. हा कथाभाग या कहाणींत कसा आलेला आहे पहा.—

" मनीं शकराची प्रार्थना केली, अर्ध घटकेचें माहेर दे. तों वेळूचें बेट आलें. कोणी म्हणे माझा जावई आला, कोणी म्हणे माझी नणद आली, कोणी म्हणे माझी बहीण आली दासी बटकी राबताहेत, शिपाई पहारा करताहेत, बसायला पाट दिला, भोजनाचा थाट केला......"

बालवाङ्मयातल्याप्रमाणें या कहाण्यातून जी शब्दाची आणि वाक्याची सारखी पुनरावृत्ति होत असते, ती पूर्वीच्या न शिकलेल्या बायकावर परिणाम होण्यासाठीं अगदीं आवश्यक अशीच होती. " उतशील, मातशील घेतला वसा टाकून देशील, उतत नाहीं, मातत नाहीं, घेतला वसा टाकत नाहीं. " यासारख्या स्थळीं प्रश्नाच्या शब्दातच जीं उत्तरे दिलीं आहेत, तींहि परिणामाच्या दृष्टीनें योग्य आहेत असें म्हणता येईल.

लहान लहान सोपीं वाक्यें, आदोलन निर्माण करणारी लयबद्ध वाक्यरचना, ठराविक शब्दाची होणारी पुनरावृत्ति आणि मनाची पकड घेणारा भावनाविष्कार ही कहाणीची साधनसामुग्री असते. त्या दृष्टीनें शब्दरचनेचा सुदर नमुना म्हणून " सोमवार " च्या कहाण्यातील पुढील भाग पाहता येईल.

" कोरान मागत असस. तेव्हा दर सोमवारीं उपास करीस. भिक्षेस जास. पाचच घरीं कोरान मागस. त्या स्वयपाक करून महादेवास नैवेद्य दाखवीस. "

एथील क्रियापदाची ही ठेवण जुन्या काळच्या मराठीचें वैशिष्टय दाखविते.

सचील स्नान ( वस्त्रासहित स्नान ), उतरडीचा मोती ( वेजी उतरलेला मोता ), पाटाव ( पैठणी ), खुलभर ( चुळकाभर ), पसकी ( पस्त ), ताशामर्के ( ताशानगारे ), पावा ( खडावा ), नागाणे ( फुटाणे ) इत्यादि या कहाण्यातील अलकारिक विशेषणेंहि फार सूचक झालेलीं आहेत.

या कहाण्यामधील सामाजिक जीवनहि पाहाण्यासारखें आहे. त्यावेळचीं शहरें फार मोठीं म्हणजे आठ अथवा याहून अधिक पेठाचीं असत. कहाणींतील राजे गरिबाच्या मुली करीत व राण्या स्वतः घरकाम करीत ! प्रा. म. म. दत्तो वामन पोतदार यानीं एकदा या कहाण्याना ' स्त्रियाचें उपनिषद् ' असें गौरवानें संबोधिलें आहे. सुश्राव्य कथाच्याद्वारा आपल्या अशिक्षित स्त्रियाना नीतिमान् करण्यासाठीं या कहाण्या रचिल्या गेल्या आहेत व त्याचें मनावर दडपण राहाण्यासाठीं त्या धार्मिक व्रतार्शी निगडित केलेल्या आहेत.

कहाणी–वाङ्मय हें परपरेनें केवळ आठवणींच्या बळावर चालत आलेलें असल्यानें त्याचा निश्चित काळ ठरविणें कठीण आहे. तथापि मराठी भाषेंतील सर्वांत उपलब्ध असा जो जुना महानुभाव वाङ्मयाचा पुरावा सापडतो, तेथपर्यंत कहाणीचा मागोवा लागतो, असें श्री. चक्रधरस्वामींनीं सारगपडिताची मुलगी " धानाई " हिला " लीळाचरित्रा ' मध्यें सांगितलेल्या पुढील गोष्टीवरून दिसून येतें—

" सर्वज्ञ भणितलें: बाई: तथा धाइया: हे तुम्हा कहाणी सांघेल: आली: पासी बैसली: साळैचें घर मेणाचें. कावळेयाचें घर शेणाचें: पाउसाळा काउळ्याचें घर पुरें जाय: साळैचे घर वाचे: मग उगीची राहिली:... "

स्नानाला निघाला होता. त्यान शंकराची हाक ऐकली. हातातल धोतर तिथच टाकून त्यान त्या खड्डयात उडी टाकली भिकाऱ्याच्या वेषातल्या शंकराना त्यान वर काढल त्या घटकेला शंकरानीं मूळ रूप घेतल आणि त्या भल्या माणसाला अशीर्वाद दिला, " तुझ चागल होऊ दे. "

त्यावेळीं पार्वतीला जवळ बोलून ते म्हणाले, " हा माणूस खरा पुण्यवान्. याच नाव पुरुषोत्तम. बाकीचे सारे ढोंगी. समजला पापपुण्याचा अर्थ देवी ? " पार्वतीन सर्व समजल्याच मान हालवून सागितल तिला आनद झाला तसा तो तुम्हा आम्हाला होवो. आमची कहाणी सपली. तुमची तहानभूक हरली.

लोककथामध्ये राजाराणींच्या गोष्टी फार आणि सारें वातावरणहि अद्‌भुत रम्य ! तशात जुन्या काळीं राजाराणींचें वेड लोकाच्या मनात भरपूर आणि आजच्या काळातहि ती ओढ अद्याप फारशी कमी झालेली नाहीं ! त्यामुळें घरगुती भाषेंत जिव्हाळ्यानें सागितलेली राजाराणीची कथा ऐकणाराच्या मनाची पकड घेते आणि ऐकता ऐकताच त्याच्या मनात पक्की राहून जाते.

उदाहरण म्हणून " एक होता राजा " ही पुढील लोककथा या सदर्भात पाहण्यासारखी आहे—

आटपाट नगर होत. तिथ एक राजा होता. तो मोठा विद्वान, उदार मनाचा आणि पराक्रमी होता तरुण होता देखणा होता. पण त्याला गादीवर येऊन बरेच दिवस झाले तरी तो विवाह करण्यास राजी नव्हता लोकाना मोठी चिंता वाटली, ' राज्याला वारस कसा मिळणार ? " राजाची त्यानीं फार समजूत घातली. ' होय ' ' नाहीं ' करता करता शेवटीं तो तयार झाला. पण त्यान एक अट घातली कीं, ' मला आवडेल त्याच मुलीशीं लग्न करीन ' लोकाना ही अट मजूर नव्हती. आजवर तस कुणीं केल नव्हत पण त्यानीं होकार दिला.

राजान सर्वांना हुकूम दिला. लग्नाचा थाट सुरू झाला. दरबारचे मानकरी नटून सजून जमा झाले. हत्ती, घोडे शृगारले. राजा अबारींत बसला, म्हणाला, ' चला. ' कुठ जायच हें कुणाला माहीत नव्हत तरीपण चालले. पुढ निम्मे लोक मध्यें राजा. माग उरलेले असे सगळेजण निघाले.

होता होता राजा अरण्याकडून चालला लोकाना नवल वाटल. ते म्हणाले, ' हा काय झाडाशीं का लग्न करणार ? त्याना चिंता वाटली. पण बोलायची सोय नव्हती. राजा जाईल तिकडे जाणें भाग होतें. शेवटीं एका मोठ्या सरोवराजवळ ते आले. तिथ एक चागली बाग होती. झाडाला झोपाळा टागला होता. त्यावर एक म्हातारा बसलेला. लोक म्हणाले, ' राजा याच्याशीं लग्न करणार कीं काय ? ' म्हणून पुढच निघाले. पण राजा तिथ थाबला.

एवढ्यात एक मुलगी त्या म्हाताऱ्याजवळ आली नक्षत्रासारखी होती. गुणाची खाण होती. बापाची सेवा करीत होती राजाला तें माहीत होत.

शिकारीच्या निमित्तान तिथ तो आला होता. त्यान तिला लाखदा बघितली होती. त्या कारणानें राजानें म्हाताऱ्याला साष्टांग नमस्कार घातला. हात जोडून म्हणाला, "तुमचा जावई व्हाव ही इच्छा आहे. आशिर्वाद द्याना."

म्हाताऱ्याला परम हर्ष झाला. पण तो कोणी फाटका माणूस नव्हता. मोठा साधुपुरुष होता. त्यान धर्मांचा अभ्यास केलेला. राजाची परीक्षा घ्यावी म्हणून त्यान विचारल, "मी गरीब, माझी मुलगी तुला कशी शोभावी राजा!" तसा राजा म्हणाला, "माझ तुमच्या मुलीवर प्रेम जडल आहे. करीन तर हिच्याशींच लग्न करीन. याउप्पर आपली मर्जी."

म्हाताऱ्यान राजाची विनती मान्य केली. त्याच्याच तालमींत तयार झालेल्या मुलीनहि होकार दिला म्हाताऱ्यान राजाला आपली मुलगी अर्पण केली. पण कन्यादानाला जवळ कांहीं नव्हत त्यान राजान आणलेलीं उची वस्त्र व दागिने घालून आणलेल्या करडयात मुलीचे पहिले फाटके तुटके कपडे तेवढे बरोबर घालून दिले. मुलगी नवी राजदरबारी वस्त्र व अलकार घालून राजाबरोबर निघाली. राजाचा आनद गगनात मावेना. एक नोकर म्हाताऱ्याच्या सेवेला ठेवून तो राजधानींत परत आला.

राजान ह्या सुदर मुलीशीं लग्न केल पण इतर राजेरजवाड्याना तें पसत पडल नाहीं. 'भिकाऱ्याची मुलगी केली' म्हणून सर्वांचा रागराग

पण नवी राणी देखणी होती स्वभावान गुणी होती. सदा शात, नेहमीं हसतमुख, बघाव तेव्हा हुषारींत आळस कमला तो नाहींच. तिन लोकाचीं मन तेव्हाच काबीज केलीं तरी पण आपल्या भोवतीं कसलीहि परिस्थिती निर्माण झाली, तरी राणीन आपल्या मनाचा तोल ढळू द्यायचा नाहीं असा बेत पक्का केला

त्यानतर एक दोन वर्षांनतरची गोष्ट. राणीला मुलगी झाली. दिसायला फारच सुरेख. राजाराणीला आस्मान ठेंगण झाल त्याचा आनद पोटात मावेना.

पण ती मुलगी चार पाच वर्षांची झाली नाहीं तोंच राज्यावर सकट आल. राजा काळजींत पडला. ही मुलगी इतर राजाच्या डोळ्यात खुपतेय अस त्याला वाटल. तिला मारून टाकली नाहींतर घडगत नाहीं अस त्याला दिसून आल. त्यान भीत भीत राणीजवळ ही गोष्ट काढली. त्याची समजूत, राणी घाबरेल. 'नाहीं' म्हणेल. पण तस झाल नाहीं तिन बापाजवळ वेदाताच शिक्षण घेतल होत. तिची वृत्ति थोडीसुद्धा बदलली नाहीं उलट हसतमुखान ती राजाला म्हणाली, "ज्या मगल दिवशीं मी आपली झालें त्याच वेळीं तुमच्या इच्छेला मान दिला. आपल्या शब्दाबाहेर मी नाहीं."

राजान रातोरात आपली मुलगी मारेकऱ्याच्या हवाली करून जगलात नेऊन मारण्याचा हुकूम दिला!

त्यानतर तीनचार वर्षांत राजाला एकामागून एक असे दोन मुलगे झाले. त्यांचीहि त्या मुलीसारखीच गत झाली पण तेवढ्यान भागल नाहीं. आसपासच्या लोकाचा असतोष कायमचा थाबावा म्हणून त्या राजान राणीला देखील राज्या-बाहेर हाकलून देऊन दुसर लग्न करण्याची गोष्ट राणीला ऐकवली आता मात्र राणीच्या सहनशीलतेन कमालमर्यादा गाठली. राजाला वाटल ती आकात करील. पण नाहीं ती एवढ होऊनहि प्रसन्नच राहिली. वडिलाच्या घरचे फाटके कपडे घालून ती सरळ बापाकडे निघून आली. बापाला तिन झाला प्रकार सागितला. ' हरकत नाहीं. तू इथ ऐस. मी आहें. ' बापान अस बोलून आनदान तिच स्वागत केल. राजाचा नोकर परत धाडला. दोघेजण पहिल्यासारखे मुखात राहू लागले.

त्यानतर कितीतरी दिवस आले आणि गेले. मग मात्र राजान दुसरी राणी घरात आणायचा बेत केला. पण त्या देशाची चाल होती कीं, नव्या राणीन पहिल्यादा पहिल्या राणीच्या समोर जायच, उची वस्त्रालकाराची तिला भेट द्यायची आणि तिच्या समतीन लग्न करायच राजान हा बेत आखला. नव्या राणीला पसत केली. पहिलीच्या स्वागताची तयारी केली. आणि मग तो पहिल्या राणीला भेटायला गेला. तिची क्षमा मागायला गेला. पण पहातो तों ती पूर्वी-इतकीच आनदात ! त्याला नवल वाटल. त्यान अज्ञान अशी गोष्ट आहे ई वर्तमान तिच्या कानावर घातल. राणी आनदान त्याच्याबरोबर आली. ती खरी पतिव्रता होती. राजाचा शब्द तिन झेलला.

राजधानींत नव्या राणीकडून मोठ्या थाटान जुन्या राणीच स्वागत झाल. जुन्या राणीन मोठ्या प्रेमान नव्या राणीला आलिंगन दिल. एकीपेक्षा एक दिसायला सरस होती. म्हणून कुणी कुणाचा हेवा केला नाहीं दोघी आनदान वाड्यात आल्या.

त्यावेळीं लग्न लागायच्या आधीं समस्त राजेलोकाना एक थाटाची मेजवानी राजान दिली. जुनी राणी आपुल्कीन सर्वत्र वावरली. मायेन तिन सर्वांच आगत स्वागत केल. तिची माया बघून जमलेल्या लोकाच्या मनात तिच्याविषयीं आदर निर्माण झाला. ह्या सोन्यासारख्या राणीला आपण उगाच छळल असा पस्तावा होऊन ते कष्टी झाले, पण राणीन त्याची समजूत घातली.

एवढ्यात नव्या राणीचा पिता उठून उभा राहिला. म्हणाला, " लोक हो, ऐका. ही राणीच या राज्याची खरी राणी आहे. नवी राणी ही तिची मुलगी आहे. ऐका हो ऐका " हें ऐकून राजाचाच काय पण सर्वांनाच मोठा चमत्कार वाटला. प्रत्येकान एकमेकाकड आश्चर्यान बघितल. तोंडात बोट घालून सर्वांनीं म्हाताऱ्याला कान दिला. नव्या राणीचा बाप पुढ म्हणाला, " लोक हो, राजान तुमच्या आमच्या वेड्या कल्पनेसाठीं आपलीं जीं मुल ठार मारण्यासाठीं मारेकऱ्याजवळ दिलीं तीं मीं साभाळलीं आहेत ! ही नवी राणी ही राजाची

पहिली मुलगी, हे दोन तिचे भाऊ, राणीच्या हवाली या सर्वांना करताना मी धन्य होत आहें. माझं काम सपलं. "

झाला प्रकार सर्वांना उमजला. राजाराणीन मोठ्या प्रेमान मुलाना आलिंगन दिलं. सर्वांचा आशीर्वाद घेतला. ते सगळे सुखान एकत्र राहू लागले. राजाला वारस मिळाला. लोकाना पराकोटीचा आनद झाला. राणीचं सर्वांनीं कौतुक केलं. सगळीकडे आनदी आनद झाला. हा आनद तुम्हा आम्हालाहि मिळो.

अशा प्रकारच्या अनेक लोककथांचें जर आपण विश्लेषण करावयाचें म्हटलें तर एक गोष्ट ठळकपणें आपल्या ध्यानात येते ती अशी कीं, अशा कथांच्यामधून अद्‌भुत चमत्काराना भरपूर वाव दिला गेलेला आहे. आणि त्यामुळेंच कीं काय अशा कथाची गोडी पिढ्यान् पिढ्याना वाटते आहे. एवढेंच नाही तर एकदा ऐकले कीं, या कथा ऐकणाराच्या मनात पक्क्या घर करून राहिल्या आहेत. मानवी मनाला त्यानीं चटका लावून सोडला आहे.

धनगर मडळींच्यामधून मोठ्या ढगदार रीतीनें वरचेवर ऐकायला मिळणारी " मल्हारीची बानू " ही लोककथा एक अद्‌भुतरम्य कथा म्हणून इथे अवश्य पहाण्याजोगी आहे. ही कथा अशी—

तशी ही कहाणी जुनी. कितीक झुयानीं ऐकलेली. लाख मुखानीं सागितलेली. आभाळातल्या देवाघरची. देवाच्या राजाची. इद्राची न् त्याच्या धाकल्या लेकीची.

एकदा काय झाल, इन्द्र देवान आपल्या साती लेकींना जवळ बोलावल. शेजारीं बसवून घेतल. एकेकीला म्हणाला, " बाईग, तुझा जन्म कुणाच्या जिवावर ? " तशी पहिल्या सहाजणी आपापली पाळी आल्यावर म्हटल्या व्हा, ' बाबा, आम्ही सगळ्याजणी तुमच्याच जिवावर जगायच्या कीं ! ' पण सातवी धाकली लेक मोठी बिलदर. ताड्दिशी म्हणाली, ' अह ! मी कुणाच्या जिवावर नाहीं जगायची. माझी मी एकटी जगीन. स्वत च्या शिरावर जगीन. '

धाकल्या लेकीच अस बोलण इद्राला झोंबल. त्याच्या अगाची लाही झाली. सतापानं त्याच मस्तक भडकल. अगाचा थरकाप उडाला. त्यान पाडकन् तिच्या मुस्काटात दिली. म्हणाला, " कार्टे ऽऽ एकली जगणार काय ? " आणि दातओठ खात त्यान तिला शाप दिला. एकाएकीं आभाळ दणाणल. वीज कडाडली. चादण्या लखलख्या. धाकली लेक चार महिन्याच मूल झाली. उभी होती ती अवचितच हाताच्या मुठी चोखीत पाळण्यात पडली. टकामका बघू लागली.

पण इद्रान तेवढ्यान भागल नाहीं. चार महिन्याच्या या पोरीला त्यानं एका पेटींत घातली. पेटीला मोहोर ठोकली. जासुदाला ती घेऊन जा म्हणाला. चंदनपूरच्या जगलात सोडून दे म्हणाला. तशी जासूद घाबरला. पण करतोय काय ? हुकूम झाल्याला पाळलाच पाहिजे. मुकाट्यानं ती मोहोर केलेली पेटी घेऊन

तो निघाला. ढगाची लाखों पायऱ्याची शिडी उतरून धरणीवर आला. सात सागर ओलाडले. वनामागून वन ओलांडली. अटींग्या वनातल चदनपूरच जगल त्याला गवसल त्यान विचार केला, " एवढी बारकी पोर ह्या जगलात सोडावी तरी कशी ? " त्याच मन पोरीभोंवतीं घुटमळल. त्या पेटीकड बघत राहिला. एवढ्यात माणसाची चाहूल त्यान ऐकली. मन घट्ट केल. पेटीला पोटाशीं धरून खालीं ठेवली. " म्हातारी हो " म्हणाला. आणिक जड मन बाळगूनच आला तसा माघारीं वळला.

इकडे तोंवर धनगर मडळी मेंढ्या चारायला घेऊन आलीं. "ब बें" करीत इकडे तिकडे अवखळपणान हुदडणाऱ्या मेंढराना त्यानीं आपापल्या टोळक्यात जमा केल. आणि आता ठरानिक ठिकाणीं त्याना चरायला सोडून स्वत एखाद्या झाडाखालीं विसावा घेणार, तर त्याच्यापैकीं एकान ती पेटी पाहिली. झाल. एकामागून एक हाका देत त्यान सगळे लोक जमा केले. सर्वांना त्या पेटीबद्दल कुतूहल वाटल. ' होय ' ' नाहीं ' करीत, शकाकुशका काढीत, त्यानीं अखेरीस ती पेटी जवळ घेतली. देवाच नाव घेऊन तिची मोहोर काढली. उघडून बघितल. पहातात तर आत एक सुदर बाळ. गोजिरवाण. देखण पोर. त्याच तेज त्याच्या डोळ्यात मावेना पहिल्यादा सगळीजण ' हा काय चमत्कार ' म्हणून टकामका एकमेकाकडे बघत राहिलीं. पण नतर त्याना फार आनद झाला. देवाची देणगी वाटली. मनातून ते भारी हारखले. त्यानीं ढोलनाच करीत वाजत गाजत ते बाळ आपल्या म्होरक्याच्या घरीं नेल. मोठा उत्सव केला. दाबून जेवण खावण घातलीं.

होता होता ते बाळ लहानाच मोठ होत गेल. सर्वांची त्याच्यावर माया. प्रत्येकाचा त्याच्यावर लोभ त्यानींच बाळाच नाव ठेवल बानू पोटच्या मुलासारखी तिची सर्वांनीं जोपा केली.

आणिक मग एक दिवस बानू मोठी झाली, तेव्हा तिच्या लग्नाचा विचार सर्वांच्या मनात आला. जो तो आपल्या ओळखीन तिला नवरा बघू लागला. एकदा तर त्यानीं देवाच ' सुमरान ' माडल ! रात्रभर ढोलनाच केला. ' हिला चागला नवरा मिळवून दे ' असा त्रिस्वा देवाला वर मागितला. पण बानू मोठी हुषार सगळ्याला गोळा करून म्हटली कशी, " तुम्हाला माझी काळजी नको. माझ लगीन आपोआप होईल. वेळ येऊ दे. मी तोंवर शकराची पूजा बाधतें. " लोक गप्प बसले तिच म्हणण त्यानीं डावलल नाहीं.

त्यानतर चागलीं बारा वर्षे तरी तशींच आलीं आणिक निघून गेलीं ! बानूची पूजा अखड चालू होती. पण त्याच्या पुढच्या वर्षीं शकर बानूला प्रसन्न झाला माणसाच्या रूपान तिच्यासमोर उभा राहिला. तिन शकराला पाहिल. ती हारखली. देहभान विसरली. देवाच्या पायावर तिन लोटण घेतल. शकर म्हणाला, " वर माग. तुझी इच्छा पुरी होईल." तशी ही म्हणाली, " चागला

नवरा दे. गुणान चागला. मनान चागला. रूपान चागला. सगळ्यात सगळा. असा नवरा दे." देव म्हणाला, "तथास्तु. तुझी इच्छा पुरी होईल." आणि त्यान तिला सागितल, "समोरच्या खडावावर उभी रहा. तुला पाहिजे त्या ठिकाणीं चल म्हण. माझ नाव घे. खडाव तुला घेऊन जातील."

शकराच्या म्हणण्याप्रमाण झाल. बानू खडावावर उभी राहिली. तिन त्याच नाव घेतल. फ्रायसस पुटपुटली. खडावानीं तिला एकदम उचलली. आभाळात नेली. सात वन ओलाडलीं. सात नद्या ओलाडल्या. आणि जेजुरीला ते तिला घेऊन आले.

त्यावेळीं मल्हारी आणिक म्हाळसा आपल्या रगमहालात निजले होते. बानूनं ते पाहिल. विचार केला घटकाभर तिथच उभी राहिली. लुगड्याचा पादरा पदर फाडला. हाताच्या बोटान डोळ्याच काजळ काढल पत्रिका लिहिली. मल्हारीला निरोप ठेवला भेटायला ये म्हणाली पुन्हा खडावावर पाय ठेवले. माघारीं गेली.

इकडे तोंवर मल्हारी उठला. त्याच्या हातात ती पत्रिका आली. त्यान बघितली, वाचली. तो हारखून दुम्म झाला. मोत्यासारख अक्षर. मनाला भुरळ पाडणारी भाषा. एवढा मोठा जेजुरीचा देव पण वेडा झाला. 'बानू ..बानू' करीत सुटला. खुळाभैरा झाला. परतु त्यान विचार केला कीं, ह्या म्हाळसाचा डोळा चुकवून जाव कस? पण युक्ति सापडली. सारीपाट खेळायचा त्यान बेत केला. आणि म्हाळसाला अट घालीत म्हणाला कसा, "माझ्यासारखे फासे पडले तर तू बारा वर्षे कच्च्या घागरीन माझ्या घरीं पाणी भरल पाहिजेस. आणि तुझ्या सारखे फासे पडले तर मी बारा वर्षे वनवास भोगीन जगलात जाईन." म्हाळसा सारीपाट खेळण्यात पट्टीची होती. तिन ही अट कबूल केली. खेळायला बसली. आणि तिन डाव पण जिंकला! सारखे तिचेच फासे पडत गेले!

झाल. ठरला शब्द मल्हारीन पाळला. तो बारा वर्ष वनवासाला निघून गेला. म्हाळसा कष्टी झाली. पण मल्हारी आनदला. बानूला भेटायला उत्सुक झाला. त्याच्या मनासारख झाल.

वनवास भोगायला म्हणून मल्हारी निघाला तर भुलेश्वराच त्याला वाटेंत दर्शन झाल. थाबला त्यान भुलेश्वराला दडवत घातला. नव्हे तो भुलेश्वर म्हणजे देवाचा गुरु. त्याला सोडून हा पुढ जाईल कसा? मनची गोष्ट त्याला सागितल्याशिवाय राहील कसा? भुलेश्वरान ह्याच म्हणण ऐकल. आशीर्वाद दिला. म्हणाला, "हा राजवेष सोडून दे. चाळीस पचेचाळीस वर्षांचा हो. धनगराकडे चाकरी कर. इमानान वाग. मनासारख होईल"

मल्हारीन भुलेश्वराचा शब्द पाळला. टाकोटाक चदनपुराला आला. धनगराकडे चाकरी धरली. सातशें मेंढ्या न् सातशें शेळ्या साभाळीत राहिला.

या शेळ्यामेंढ्याची मालकीण बानू होती. त्याला पाहिजे तें मिळाल दैवी लीला तो खेळू लागला भडारा पगाला लावून हा हा म्हणतोवर एवढ मोठ काम एकटा करु लागला. सगळ्यानीं तोंडात बोट घातलीं. पण कुणाला काहीं उमजल नाहीं समजल नाहीं

पुढ मग एकदा काय झाल कीं, मल्हारी हीं एवढीं भल्या सख्येची शेळ्या मेंढरें घेऊन नदीवर धुवायला गेला. तिथ एकाचीं दोन, दोनीचीं चार अशीं होता होता नऊ लाख मढर जमलीं ! ह्यान त्या सगळ्याना जिवत सोडून काढल ! मास एकीकड केल रक्त एकीकड ठेवलन्, हाड एकीकड माडलीं !

इतक्यात बानूला ही बातमी कळल्या कारणान ती मोठ्या रागारागान तिथ आली तिन मल्हारीला बोल बोल बोलून घेतल रागान तिच्या अगाचा थरकाप उडाला. तशी मल्हारी तिला म्हणाला, “ तुझ सार होत तस्स करता. पण एक अट कबूल कर. ” त्यावर ती म्हणाली, “ अट कसली ? ” हा म्हणाला, “ माझ्याशीं लग्न कर. ” तशी ही हायकलीच ! न्हव नाहीं त्याच्याशीं ती लग्न करील तरी कशी ? पण एवढ मोठ नुकसान होण्यापेक्षा तिन ही अट कबूल करावी म्हणून कितीकानीं तिला गळ घातली. आणि तिच्या कानात त्यानीं हळूच सागितल, “ आता हो म्हण मेंढर मिळालीं कीं देऊ त्याला हाकलून. ”

अखेर शेवटीं बानून मल्हारीची अट मानली. तेव्हा हा हा म्हणता मेंढर जशींच्या तशीं अगदीं उगळीं निगळीं, पहिल्याप्रमाण झालीं ! आणि मग लगोलग मल्हारी तिचा हात धरुन म्हणाला, “ चल आता माझ्या बरोबर ! ” तशी बानून ढीग त्याची समजूत घातली पण ह्याचा हेका कायम. शेवटाला तिचा नाइलाज झाला ती त्याच्याबरोबर जायला कबूल झाली

आणि काय चमत्कार बघा ! मल्हारीन आपल खर रुप धारण करुन तिला जेव्हा का आपल्या घोड्यावर घेतली, तेव्हा तिला कोण आनद झाला म्हणता ! सगळ्या धनगराना बोलावून तिन लग्नाची तयारी करा म्हटल रहात होती त्या वाड्यात राजीखुषीन मल्हारीशीं तिन लग्न लावून घेतल मोठ थाटात लग्न झाल लोकरीच्या माळेन, तादळाच्या अक्षतेन सर्वांसमक्ष लग्न लागल.

*नतर थोडे दिवसानीं मल्हारीन बानूला पहिल्यादा भुलेश्वराकडे आणली.* आणि शेवटीं तिला जेजुरीला घेऊन आला मल्हारीला बघून म्हाळसा हारखली. पचारती घेऊन ओवाळायला धावली. पण मल्हारीच्या पाठीशीं असलेली बानू बघून ती थबकली तिच्या हातातल तबक ढासळल तशी मल्हारी म्हणाला, “ ही माझी बायको न तुझी सवत आहे ” म्हाळसाच्या अगाचा तिळपापड उडाला रागान ती लाल झाली, आणि डोंगराव्र जाऊन मोठी शिळा होऊन पडली ! मल्हारीन तिची खूप समजूत घातली पण उपयोग झाला नाहीं शेवटीं त्यान तिला अर्ध्या डागराची मालकीण केली अर्धा डोंगर बानूला दिला, आणि स्वत वर देवळात

राहिला. दोर्धीच्या अगावर आपला भडार त्यान उधळला, आणि धानू मिळाली या आनदात तिच्याशी सुखाचा ससार केला.

आमची कहाणी सपली. तुमची तहानभूक हारपली.

आजच्या काळातहि माणसाना कहाणीचें वेड आहे. परतु आजचा काळ पूर्वीच्या मानानें पार बदललेला आहे. त्यामुळे माणसाची कहाणीबद्दलची अभिरुची बदलत चालली आहे. नव्या युगमानाप्रमाणें सम्यतेच्या कल्पना आज बदलत चालल्या आहेत सुधारणाच्या गर्दींत माणूस गुरफटून गेला आहे त्यामुळें जुन्या काळच्या कहाणींचें महत्त्व या नव्या युगातील मानवी मनाला तितकेंसें वाटत नाहीं, असें म्हणावें लागत अद्‌भुतरम्य वातावरणाचा पगडा मानवी मनावर अजूनहि असला तरी दिवसेंदिवस सत्यसृष्टीकडे त्याचा कल झुकतो आहे रोजच्या जीवनावर आधारलेल्या लघुकथा आणि चारसहा ओळींत सपणारी लघुतम कथा आज विशेष लोकप्रिय होत चालली आहे.

पूर्वीच्या जमान्यातील मानवी मनाला गोंधळ्याचेकडून, शाहिराचेकडून, हरदासाचेकडून अगर रोजच्या बैठकींतील माणसाकडून रात्ररात्रभर कथा वा कहाणी ऐकण्याची चटक लागलेली असे, परतु आज जीवनाबद्दच्याच कल्पना निराळ्या झाल्यानें ती शक्ति मानवात उरलेली दिसत नाहीं. सार काहीं थाज आटोपशीर हवे आहे. पूर्वीच्या दीर्घ काळ अखडपणें चालणाऱ्या कथा आज नाहींशा होत चालल्या आहेत, आणि ज्याच्या कठामध्यें साहित्यलक्ष्मीचें नव भागल्य दृष्टोत्पत्तीस येत होतें, त्या व्यक्तिदेखील आज दिनप्रतिदिन कमी होत चालल्लेल्या आढळून येतात. पाढऱ्या कागदावर लिखित झालेल्या भावनाविचाराची मिजास आज एवढी वाढली आहे कीं, पाठातराचे बळावर जन्मोजन्मीं टिकलेलें अलिखित वाङ्मय त्यापुढ पार फिकें पडतें आहे ! त्यामुळें आमची जुनी सस्कृति, चालरीत आणि वाडवडिलाचें भावधन आमच्या चालू पिढीलाहि म्हणावें तसें अवगत होऊ शकत नाहीं नव्या युगामधील नवकल्पनाचा अवश्य स्वीकार व्हावा, परतु त्याजबरोबर जुनें साहित्यिक धनहि भरघोसपण जवळ असावें या शका नाहीं.

स्त्रियाच्या अलिखित वाङ्मयाचें स्वरुप हे असें आहे. गद्य आणि पद्य हे दोन्ही प्रकार या वाङ्मयात समाविष्ट झालेले आहेत स्त्रियाच्या भावना या अलिखित वाङ्मयात अतिशय मोकळ्या मनानें आविष्कृत झालेल्या आहेत ओवी मध्यें तर स्त्रीनें आपल्या अत करणातील सारी भावना ओतलेली आहे. मनातील भावनेचा होणारा सहजसुदर आणि उत्कट आविष्कार इतक्या आत्मियतेनें प्रकट झालेला इतरत्र क्वचितच आढळून येईल उत्तम काव्याचे सारे गुण या ओवींत ओतप्रोत भरलेले दिसून येतात या ओव्या हें मराठीचें एक अभिनव लेणें आहे यात शका नाहीं. स्वत.च्या भावना स्वत च्याच भाषेंत आणि कल्पनेंत गोवून

महाराष्ट्राच्या संस्कृतीचें प्रतिबिंब दर्शविण्याचे महान् कार्य स्त्रियांनीं या ओव्यांच्या द्वारें पार पाडलेलें आहे.

उखाणा हा स्त्रीजीवनातील एक महत्त्वाचा भाग आहे. कोणतीहि अभिमानाची अगर आनंदाची गोष्ट दुसऱ्याला, सांगण्यांत आपला आनंद दुणावतो, आणि त्यामुळेंच आपल्या पतीचें नाव दुसऱ्याला सांगण्यांत बायकांना आनंद वाटतो. हा आनंद स्त्रियांनीं उखाण्याच्या द्वारें पुष्कळ उपभोगला आहे असें दिसून येतें. त्याचप्रमाणें उखाणा घेणाऱ्या स्त्रीची कल्पकता, समयसूचकता, धीटपणा, मनावरील संस्कारक्षमता आणि पतीबद्दलची आदराची भावनाहि अतिशय मोकळ्या मनानें ह्या उखाण्यांतून प्रकट झालेली आहे. "उखाण्याच्या द्वारें आपण आपल्या सर्वांत प्रिय माणसाची जमलेल्या मंडळींना ओळख करून देत असतों आणि या कामाला लागणारी सर्वांगीण सामुग्री हिंदुस्थानच्या मराठी खजिन्यांत ओतप्रोत भरलेली आहे. त्याकरिता परकीय भाषेची जरूरी नाहीं *" अशीच स्त्रीची भावना असते व तिचा प्रत्यय अशावेळीं आल्याविना रहात नाहीं.

कहाण्याच्या द्वारा स्त्रियांच्या धार्मिक व सामाजिक भावनांचा चित्ताकर्षक आविष्कार झालेला आहे. रोजच्या जीवनाशीं मोठ्या कौशल्यानें या कहाण्यांची सांगता करण्यांत आलेली आहे. त्यांत कसल्याहि प्रकारची कृत्रिमता आढळत नाहीं. सारें कांहीं सहजसुलभ झालेलें आहे. स्त्रियांच्या अंतःकरणांतील मृदुभाव येथें सर्वत्र विखुरलेला आहे. देवाची प्रार्थना करतांना मनाचा दिसून येणारा हळुवारपणा व जिव्हाळा, अंतःकरणांतील खरी तळमळ व सर्वोत्कृष्ट काव्यशक्ति हीं येथें प्रतीत झालेलीं दिसून येतात. ललित वाङ्मयाचा हा एक वैशिष्ट्यपूर्ण भाग आहे.

जुन्या काळच्या स्त्रियांच्या ओठावर खेळणारें हें अलिखित वाङ्मय म्हणजे त्यांच्या अंतःकरणांतून प्रामाणिकपणें व सहजसुंदर रीतीनें आविष्कृत होणारें असें मनोवेधक भावगीतच आहे. या भावगीतांचें सौंदर्य शतकानुशतकें टिकणारें असून त्याची गोडीहि अवर्णनीय आहे. आपल्या भोळ्या भाबड्या कल्पनांनीं मराठी भाषेला भूषविणारी स्त्रियांची ही देणगी खरोखरच अभिमानास्पद आहे. मराठींत या वाङ्मयाला दुसरी तोड नाहीं इतकें तें वैशिष्ट्यपूर्णहि आहे, हें मागील विवेचनावरून ध्यानांत आल्याविना रहाणार नाहीं. मराठीचें खरें सौंदर्य व अभिजातता या वाङ्मयांत पहावयास मिळते आणि तेंच याचें प्रमुख वैशिष्ट्य होय.

प्रत्येक देशाला आणि त्या देशांतील प्रत्येक प्रांताला त्याचें स्वतःचें म्हणून लोकवाङ्मय असतें. या वाङ्मयांतून त्या प्रांताच्या लोकांच्या चालीरीती, त्याचें

---

* सौ. पार्वतीबाई चितळे, उखाणे, गृहलक्ष्मी, १९२९ ऑगस्ट.

दैनदिन जीवन आणि त्याच्या संस्कृतीची वैशिष्ट्यें व्यक्त होतात. रोजच्या जीवनातील सुखदुःखाना या वाङ्मयामुळें जिवाभावाची वाचा फुटते काम करता करता, घाम गाळता गाळता आणि अश्रु ढाळता ढाळता ही भापा जन्माला येते. आणि कधीं कधीं मनाला विरगुळा म्हणून खदखदा हसतानाहि तिला मोहोर येतो. त्या कारणानें तिचें वास्तव्य जन्मोंजन्मींचें ठरते. आणि म्हणूनच लोकगीतातील काहीं रुढींचा व आचार विचाराचा उगम वेदात सापडतो व त्या त्या चालीरीती त्या काळापासून कमी जास्त प्रमाणात आजहि चालत आलेल्या दिसून येतात ! !



. ४ .

# इतिहासकालीन पत्रव्यवहार

आपल्या पराक्रमी व कर्तबगार पूर्वजांचा वैभवशाली इतिहास समजावून घेण्यासाठीं आणि त्या काळची सामाजिक व राजकीय माहिती मिळविण्यासाठीं अनेक संशोधकांनीं आजवर परिश्रमपूर्वक प्रयत्न करून अनेक प्रकारचीं साधनें उपलब्ध केलेलीं आहेत. अद्यापहि हें काम चालू आहे आणि पुढेंहि तें चालूच राहील. तथापि उपलब्ध झालेल्या विविध साधनांच्यापैकीं सर्वांत महत्त्वाचें साधन म्हणजे त्या त्या वेळचा इतिहास घडविणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं केलेला पत्रव्यवहार होय. ह्या पत्राच्यामधून वेळोवेळीं त्या वेळच्या सामाजिक व राजकीय घडामोडींचें दिग्दर्शन घडविणारी सत्य स्वरूपांतील माहिती आलेली आहे.

" राष्ट्राचा उत्कर्ष व्हावयाचा म्हणजे त्यास सर्व वर्गांचें भरपूर सहाय्य पाहिजे. इंग्रजी अंमलांत याविषयीं हिंदी राष्ट्राची मोठी आबाळ झाली. स्त्री वर्गांचा राष्ट्रकार्यांत उपयोग करून घेणें आवश्यक आहे. याची जाणीवच कोणासहि नव्हती ... पण मराठी राज्याच्या दोनशें वर्षांत स्त्रीवर्ग सर्वथा निश्चल होता असें मात्र कोणी समजूं नये. नुसतीं दोन ठळक नांवें जिजाबाई व झाशीवाली राणी लक्ष्मीबाई एवढ्यांनींच शक्तिची खात्री पटूं शकेल. जिजाबाईनें राष्ट्रास शिवाजी दिला. आणि लक्ष्मीबाईने शिकस्तीचें शौर्य रणांगणावर गाजवून राष्ट्रोद्धारार्थ प्राणार्पण केलें. या दोन व्यक्तींमध्यें दोनशें वर्षांचें कालांतर असून तेवढ्या अवधींत आणखी शेंकडों स्त्रियांनीं भाग घेतला असें इतिहास सांगतो*."

आपल्या भारत देशाचा इतिहास तसा फार मोठा आहे. त्याचें स्वरूप उज्ज्वल आहे. अंतरंग स्फूर्तिदायी आहे. त्यामधील पराक्रम स्वाभिमानानें सळसळणारा व तेजस्वी आहे. प्रचंड वीरश्रीनें भरून गेलेला आहे. हा इतिहास घडविण्याचें श्रेय प्रामुख्यानें पुरुष वर्गाकडे जात असलें, तरी त्यास कांहीं पराक्रमी स्त्रीयांनींहि हातभार लावलेला आहे. या पराक्रमी स्त्रियांनीं त्या काळांत जो पत्रव्यवहार केला आहे, त्याचाच प्रस्तुत प्रकरणामध्यें विचार करावयाचा आहे.

---

* गो. स. सरदेसाई. छत्रपति कुटुंबांतील नामांकित स्त्रिया. स्वराज्य. ८ जून १९५७.

" गेल्या शतकातील स्त्रियांच्या इतिहासाचें अवलोकन केल्यास देश, काल, परिस्थितीप्रमाणे त्या कार्यतत्पर होत्या. हे सिद्धकरण्याला इतिहासाचा पुरावा भरपूर आहे. त्या काळीं घोड्यावर बसता येणें ही एक प्रमुख कला समजली जात असे, व त्यात उच्च घराण्यापासून सामान्य परिस्थितींतील स्त्रियांनाहि प्रवासात घोड्याचा उपयोग करावा लागे. त्या काळीं सामान्य देशी भाषा व मोडी लिपी येवढ्यावर साहित्याचें कार्य भागत असे. याशिवाय राज्यकर्ते त्यावेळीं जे असेत त्यांची भाषाहि शिकावी लागत असे. कथा पुराणाच्या रुपानें राजकारण व समाज बंधनें स्त्रियांच्या कानीं पडत असत व पुरुषांना पराक्रमाची संधि मिळत असल्यामुळे नकळतच वीरपत्नीत्वाची जबाबदारी स्त्रियांवर पडत असे हे सिद्ध होतें !* "

याखेरीज कोल्हापूरची महाराणी ताराबाई, इंदूरची अहिल्याबाई होळकर, पेशवेकालीन सुप्रसिद्ध आनंदीबाई वगैरे अनेक स्त्रियांनीं स्वत:च्या पराक्रमानें इतिहासाचीं कितीक पानें रंगविलेलीं आहेत. ह्या स्त्रियांचे आचार व विचार कोणत्या प्रकारचे होते, याची कल्पना त्यांनीं लिहिलेल्या पत्रांवरुन येते. त्या दृष्टीनेच त्यांच्या पत्रांचा इथें विचार केलेला आहे.

० ० ०

## जिजाबाई

शककर्त्या शिवाजी महाराजांची मातोश्री जिजाबाई हिची एक सनद सापडली असल्याचा उल्लेख इतिहासात आला आहे.‡ ही सनद जर खरी असेल तर त्या सनदेवरून जिजाबाईंची दयार्द्रता दिसून येते. या थोर स्त्रीनें या सनदेंत व्यक्त केलेला भाव असा आहे—

" आज्ञापत्र सौभाग्यवती मातुश्री जिजाबाई भोसली मोकदम, कसबे जिंती परगणे श्रीगोंदे, कडेवलीत यानीं दानपत्रें वतनावर वतनभाऊ आणि पुरातन चाकर एकनिष्ठ याजवर कृपाळु होऊन, इनाम जमीन सवा चावर बिघे १५० *दीडशें राजश्री शिवाजी रघुनाथ सोनटक्के कुळकर्णी कसबे मजकूर* याची स्त्री सौभाग्यवती भानाबाई याजवर कृपाळु होऊन चोळी पातळास म्हणून जमीन नेहर शेरी नजीक शीव बाभुलगाव जमीन बिघे १२० एकशेंवीस वंशपरंपरेनें अनुभऊन सुखरूप राहणें. एकूण येणेंप्रमाणें दानपत्रें अजरामर हाकत निधि जल, तरु, पाषाण, चंद्र, सूर्य पावेतों अनभवीत जाणें.

---

* सौ. कमलाबाई किबे—प्रस्तावना, होळकर शाहींतील ऐतिहासिक स्त्रियांचा पत्रव्यवहार खंड २२.

‡ सनदा पत्रें पृ. १०३, ३१ जाने. १६०५

राजश्री रंगो गणेश सोनटक्के कुळकर्णी कसबे मजकूर हे हिदेब मोहसब व्यावयास किल्ले कोंडाणा, राजश्री दादो कोंडदेव यांचे घरीं भोजनास बोलाविले. भोजन करुन खोलीमध्यें बिछाना करून निद्रा केली. पांचसहा घटका जाहलीयावर अंगाची आगी जाहली. पाणी पाणी करून खोलींत प्राण गेला. खोलीस बाहेरून कुलूप होतें. दुसरे दिवशीं खोलीचें कुलूप काढून पाहिलें तों मृत पावले. प्राण निघोन गेला. असें वर्तमान जाहलें. याजकरितां साहेब कृपाळु होऊन, दानपत्रे इनाम करून दिल्हीं असे. कदीम सेवा केली आहे. भोंसले याचे वंशीं कुटुंब दाखल यांनें चालवोन, जे कोणी अंतर करील त्यास श्रीवाराणसीची शपथ असे.

शके १५२६ सिध्यर्थीनाम संवत्सरे, माघ शुद्ध सप्तमी रविवार लेखन सीमा."

जिजाबाईच्या या भाषेवरुन स्त्रियांच्या जीवनांत असलेली देवादिकांच्या शपथेची किंमत व चोळीबांगडीच्या तरतुदीचें महत्त्व, त्या काळांतहि किती असे, याची कल्पना येते. शिवाजीसारखा महान् पराक्रमी पुरुष महाराष्ट्राला देणारी जिजाबाई आपल्या राज्यांतील मंडळांची किती आपुलकीनें विचारपूस करीत असे व त्यांना किती जिव्हाळ्यानें वागवीत असे, हेहि यावरून आढळून येतें.

● ● ●

# येसूबाई

छत्रपति शिवाजी महाराजांच्या सुना–संभाजीची पत्नी येसूबाई व राजारामाची पत्नी ताराबाई–या दोघी छत्रपतींच्या घराण्यांतील दोन विशेष पराक्रमी स्त्रिया होऊन गेल्या. त्या दोघीहि राजकारणांत प्रामुख्यानें चमकल्या आहेत. "त्यांच्या कर्तृत्वानेंच मराठ्यांनीं औरंगजेबाचा संपूर्ण उच्छेद करून कठीण प्रसंगांतून राज्य बचाविलें. येसूबाईची योग्यता मोठी आहे. संभाजीच्या कोपास आळा घालून या थोर बाईनीं बहुमोल राष्ट्रसेवा केली. स्वतः भीषण कष्ट सोसून केवळ राज्याचें हित साधणें हा तिचा कित्ता राष्ट्राला चिरंतन मार्ग दाखवील. स्वतः ती अत्यंत निरहंकार, *आपल्या जिवाची तिंवा हाल अपेष्टांची क्षिति तिनें कधीं बाळगली* नाहीं. अठरा वर्षे तिनें तीनशेंचा परिवार घेऊन बादशाही कैदेंत निभावली. इकडे बादशहाची मर्जी सांभाळणें आणि दुसरीकडे मराठी राज्य टिकविणें हीं दोन्ही विरोधी कृत्यें तिनें मोठ्या हिताफीनें सिद्धीस नेलीं. जन्मभर यातना भोगल्या. रायगड किल्ला मोंगलाच्या हातीं पडणार असें दिसतांच तिने स्वहिताचीहि पर्वा न ठेवता वीर राजारामास जिंजीस रवाना केलें आणि मराठा मंडळास उत्तेजन देऊन बादशहाचा अप्रत्यक्षपणें पाडाव करविला. आकाश कोसळलें तरी धीर सोडला नाहीं. मोठी युक्तिबाज बाई. संकटास तोंड देण्याची तिची हिंमत अप्रतिम म्हटली पाहिजे...तिचें समग्र जीवन राष्ट्रकार्जांत खर्च झालें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतरहि

दहावारा वर्षे तिला ओलीस म्हणून दिल्ली येथें कष्टातच काढावीं लागलीं. शेवटीं पेशवा बाळाजी विश्वनाथ व पुत्र बाजीराव यानीं दिल्लीवर स्वारी करून या थोर बाईला सोडवून परत मायभूमींत आणली, हाच एकदर मराठा मंडळाचा पहिला "ऐतिहासिक विजय होय. ‡"

अशा थोर व पराक्रमी येसूबाईनें बादशाही कैदेंत असताना चिंचवडचे मोरया देवास लिहून पाठविलेली करुण कहाणी उपलब्ध झाली आहे. ही कहाणी वाचताना वाचणाराचें अंतःकरण गहिंवरतें. डोळे अश्रूंनीं न्हाऊन निघतात. या पत्रामध्यें तिनें केवळ निर्वाहासाठीं पाच हजार कर्ज मागितलें आहे! शिवाजी राजाच्या प्रत्यक्ष सुनेवर आलेला हा प्रसंग मनाला चटका लावणारा आहे.

येसूबाईचें हे पत्र असें आहे—

इ. स. १९ ४-१७०५

श्री शंकर

राजश्री श्री देवस्वामीचे सेवेसी.

श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकल गुणालंकरण देवमान्य वरद मूर्तीपरायण राजमान्य राजश्री.

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाईसाहेब दोनीकरकमल जोडून चरणावरी मस्तक ठेवून सा. नमस्कार विनंति उपरि. येथील क्षेम तागाईत वैशाख शुद्ध सप्तमी गुरुवार जाणऊन मुक्काम अमदानगरीं दुर्गांत स्वामीच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे. स्वकीय कुशल लेखन-आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. स्वामींनीं आशीर्वाद पत्र पाठवून बालकाचा परामृश केला नाहीं. याकरिता चित्तास स्वस्थता होत नाहीं त देव जाणें. तरी स्वामींनीं येणारा मनुष्यावरोंवरी प्रतिक्षणीं आशीर्वाद पत्र पाठवीत गेलें पाहिजे. विशेष आमचे वर्तमानतरी स्वामीपाशी सत्यच लेखन केले पाहिजे. चिरंजीव[1] दाजी तो पृथ्वीपती[2] समागमें गेले. आम्हास सार्वभोमाची आज्ञा जाली कीं, 'अहमदनगरास जावें.' आज्ञेप्रमाणें आम्हास अहमदनगरास घेऊन आलें. तेथें आलियावरी आजी पाच मास जाले. परतु खर्चाची बहुत तगचाई जाली. काय निमित्य तरी सार्वभौम दूर गेले. आमचा तनखा जो दिल्हा तेथें साम्रानीं व हरिभक्तानीं व काळानें ( प्रतिकूल परिस्थिति )

---

‡ गो. स. सरदेसाई छत्रपति कुटुंबातील नामांकित स्त्रिया. स्वराज्य. ८ जून १९५७.

१ शाहू. २ औरंगजेब.

वरून प्रतिकूल जाली. ( मोगल, राजपूत व दुर्दैव हीं आडवीं आलीं. ) यामुळें द्रव्य येणें राहिलें. येथें अंमदानगरीं साहुकाराचें पाच सात सहस्र अक्षस्व[1] जालें. आता कोण्ही देत नाहीं. मागिल्याच पैकियास तगादे लावले आहेत. त्याच्यामुळें बहुत कष्टी होतों. तो दुःसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहाव ? स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी माहाराज वैकुंठवासी स्वामी गेल्या तागाईत आपणावरी हा कसाला[2] प्राप्त आला इगळास येोळने लागले. बरें, होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आता एक स्वामीवितरिक्त आणिक कोणाचा भरवसा या समयात नाहीं. एक स्वामीच कष्टे परिहार करतील. इतराच्यानें काहीं होणें नाहीं. तरी साराश गोष्ट कीं ग्रहास्वापासून मुक्त केलियानें बहुत कीर्ति स्वामीची आहे. आणि पाऊस पाणी जालियावरी स्वामी त्यापासून देवितील त्यास प्रविष्ट करून ...( स्वामी त्याच्यापासून कर्ज देववितील त्यास ते परत देऊ )...माझी उपेक्षा न केली पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील सामराज[3] व आमचे वर्तमान रायाजी मुखातरीं चरणापाशीं विनंति करिता श्रुत होईल तें सत्यच मानणें. विशेष ल्याहावें तरी आपण अज्ञान, मूढ असे. लिहिता येत नाहीं. अथवा ज्ञानहि नाहीं. त्याहिवरी आपणाजवळी कोण्ही शाहाणा कारकून नाहीं. आद्याक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरंतर करीत गेलें पाहिजे. कृपा असो दीजे. जाणीजे मोर्तबसुद.

" ता छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना. "*

राजमाता येसूबाईंचीं आणखीहि काहीं पत्रें उपलब्ध झालीं असणें अगर उपलब्ध होणें शक्य आहे. माझ्या माहितींत मिळालेलें हें एकच पत्र आहे. एवढ्या एका पत्रावरूनहि येसूबाईंच्या स्वाभिमानी जीवनाची व कर्तृत्वाची कल्पना येते. तिच्या अंतःकरणाच्या स्त्रीमनाचें उत्कृष्ट प्रतिबिंब या पत्रात पडलेलें दिसून येतें. कर्ज मागण्याची वेळ आली तरीहि आपली उपेक्षा होता कामा नये हा तिनें या पत्रात प्रकट केलेला भाव तिच्या थोर योग्यतेची व स्वाभिमानाची साक्ष देत आहे. त्याचप्रमाणें " मी अज्ञ आहें. कोणाचा आधार नाहीं. लिहिता येत नाहीं. सांभाळ केल्यानें पुण्य घडेल. " असी तिनें केलेली या पत्रातील भाषाहि त्यावेळच्या स्त्रीच्या भावनेची वैशिष्ट्यपूर्ण कल्पना देत आहे. मोरया देवासारख्या येसूबाईसारख्या महान् पराक्रमी स्त्रीनें आपल्या खाजगी जीवनातील प्रकट केलेला हा भावनाविष्कार संकटसमयीं तिनें दाखविलेल्या मनोधैर्याची साक्ष देत आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

० ० ०

---

१ कर्ज २ संकट ३ समाचार.

* महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास-पत्र ६५. पा. ९३, ९४, ९५.

# ताराबाई

येसूबाईंची जाऊ व छत्रपति राजारामाची बायको ताराबाई ही एक फार महत्त्वाकांक्षी व कारस्थानी स्त्री होऊन गेली. हंबीरराव मोहिते सेनापतीची ही कन्या. हिचें एकंदर जीवन मोठें विचित्र होऊन गेलं आहे.

" नवऱ्याच्या हयातींत ती केवळ पडद्यात वागणारी, काम नसलेली राणी होती. जिंजीच्या वेढ्यात नवऱ्याचे सानिध्यात तिचीं पांच सात वर्षे परदेशात गेलीं व नोकराच्या घोळक्यात परदेशगमन घडलें. त्यात तिला स्वातंत्र्य नव्हतें. पंचविशीच्या वयात तिचा नवरा वारला तेव्हा तीच राज्याची मालकीण मुख्य झाली आणि हा अधिकार तिनें पुरेपूर गाजवून युद्ध, राजकारण, राष्ट्रीय हालचाली हे विषय अनुभवून मोठा लौकिक मिळविला. पण हा तिचा उत्कर्षकाल सहा सात वर्षांहून जास्त काल टिकला नाहीं. या काळात तिनें अप्रतीम धडाडी दाखवून औरंगजेबास नामोहरम केलें. हा पराक्रम इतिहासात सदैव गाजत राहील. " *

ताराबाईनें आपल्या स्वत:च्या कर्तबगारीवरच कोल्हापूरचा राज्यकारभार पाहिला. यावेळीं आपलें वर्चस्व कायम टिकविण्यासाठीं ती कोणत्या धोरणानें वागत असे, याची कल्पना तिनें बाळाजी बाजीराव पेशवे यास लिहिलेल्या पत्रावरून येते. या पत्रात ताराबाईनें बाळाजी बाजीरावास निरुत्तर केलें आहे. हें पत्र असें आहे—

श्री

इ. स. १७५१

श्रीमत महाराज मातुश्री आईसाहेब यांचीं राजमान्य राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यासी आज्ञा केली ऐसिजे —तुम्हीं विनति पत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. कैलासवासी चिरंजीव यांणीं एकच तालुका सांगोन सेवा घेतली. त्यामागें साहेबीं सेवकावर कृपा करून सर्व राज्यभाराचा एखतियार दिल्हा. सेवकानें दीड वर्षे जीं जीं कार्यें केलीं, तीं आज्ञेनेंच केलीं. तेणें करून सर्व स्नेहतेसी आज्ञेच्या वर्तणुकेमुळे विक्षेप वाढले. या प्रसंगीं सेवक हुजूर आला असता सहा महिन्यात विक्षेप वाटला असेल त्याचा अर्थ करावयाबद्दल साहेबीं इतबारी कोण्ही पाठवावा, अगर सेवकास आज्ञा केलीयानें आपलेतर्फे कोण्ही पाठवून देऊं. यासी तुम्ही एकनिष्ठ सेवक यात तर

---

* गो. स. सरदेसाई, छत्रपति कुटुंबातील नामांकित स्त्रिया. स्वराज्य ८ जून १९५७.

राज्यकारभाराचा अखत्यार तुम्हास आहे...जाणीजे. छ. १७ जमादिलाखर[1] बहुत काय लिहिणें सुज्ञ असा."

आपल्या सर्व राज्याच्या बंदोबस्ताच्या दृष्टीने ताराबाई कशा प्रकारची दक्षता घेत असे, याचा एक नमुना म्हणून मेणवली दप्तरामधील एका पत्रातील पुढील भाग जरूर पहाण्यासारखा आहे. हें पत्र ताराबाईने बाळाजी पंडित प्रधान याना लिहिलेलें आहे.

" ..उत्तरेकडे पठाणानीं दगा केला. अतरवेद वगैरे अमल उठविला. तमाम साहुकारा लुटोन पैका बेमब्लग केला. मथुरा वृंदावन इत्यादि तमाम शहरें मारून कत्तल केली पुढे नर्मदा ऐल्तीरीं दक्षण प्रांत यावें, इकडील तमाम किल्लेकोट हस्तगत करून आपला बंदोबस्त करावा, वगैरे नित्येक मनमुब्याची गुर्मी धरून मजल दरमजल येत असे. समागमे दिल्लीपतीहि आहेत. याचा उपमर्द करावा, उठला अमल पुन्हा बसवावा, घेतली ठाणीं घालावीं, या उद्देशें राजश्री अताजी माणकेश्वर व राजश्री नारोशंकर व राजश्री समशेर बहाद्दर रवाना जालेच होते. हल्लींही चिरंजीव राजश्री रघुनाथपंत याची फौजसुद्धा रवानगी केली. नर्मदातीरीं पावेतो जाऊन पोहोंचले. हे त्याचें पारिपत्य करतीलच. ऐसेंही करिता त्यानीं लईच गुर्मी केली, तरी आम्हासही जावें लागेल पत्र पावतेक्षणीं स्वार होऊन येणें. एक घडीची विलंब न लावणे "

इ. स. १७४५ त ताराबाईने शाहूस एक आज्ञापत्र धाडलें होतें. या आज्ञापत्रात ताराबाईनें शाहूस घरगुती वाद मिटवून गादीच्या वारसाच्या दृष्टीने कांहीं सुचविलें आहे. हें प्रकरण शिवाजी व शाहू याच्या भांडणावून उद्भवलें. शिवाजी व संभाजी या सावत्र भावाचें भांडणहि त्याच वेळीं निघालें. शिवाजी व ताराबाई ही यावेळीं कैद झालीं. संभाजी गादीवर बसला. पुढे शिवाजीस दोन पुत्र झाले. त्यापैकीं एक मरण पावला. दुसरा संभाजी-राजसबाईकडून मारला जाईल या भीतीनें गुप्त रीतीनें लपविला गेला. तो जन्मताच कुणीतरी भवानी बाई नाळत झाली होती तिच्याकडे धाडला. तिनें मूल इकडे आणलें गेले. आदलाबदल झाली. पुढें बदला पुत्र मारला गेला. म्हणजे शिवाजीचा पुत्र जिवंत राहिला. त्याचें नाव रामराजा. तेव्हा शाहूनें त्यास दत्तक घ्यावें असें या आज्ञापत्रात ताराबाई सुचवितें तेव्हा घराण्याचें नात्यांत इथें ताराबाई किती चाणाक्षपणें वागली आहे, हें पुढील मजकुरावरून ध्यानात येतें.

" समस्त कार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री सरकारकुनानीं व समस्त सेना हिंदुपति सरदारानी यासी आज्ञा केली ऐसीजे—

---

१ इतिहास संग्रह, ऐतिहासिक टिपणें भाग १ पा. ५२

कालपरते आमचा प्रसग विस्कळित होऊन चिरंजीव राजश्री संभाजीराजे व राजसबाई यांणीं गिरजोजी यादव व अताजी निंमळ व लोक खासखेल[1] गडकरी व तुळाजी सितोळे यासी पुढें करून किल्ले पनाळा येथें चिरजीव राजश्री संभाजी राजे यासि राजपदास बैसविले. आम्हास सक्ती घातली. बहुत निकड[2] केली ते प्रसगीं चिरजीव राजश्री शिवाजी राजे यासि संतान सौभाग्यवती पार्वतीबाई यासी दोघे पुत्र झाले. त्यांपैकीं पहिला पुत्र म्रमला. दुसरा पुत्र त्यासी देवी सगर्भ होती. प्रसूत जाली. त्याचा पैरमोबदला करून हा मूल देवीच्या स्वाधीन केला. पाळग्रहण करविलें. सौभाग्यवती भवानीबाई सगर्भ होती त्यानतर चिरंजीवास देवी काळवशें समास झाले. समागमें पार्वतीबाईनीं सहगमन केले. त्याचा पुत्र देवीच्या स्वाधीन केला. तो अद्यापवर तिजपादी सुखरूप आहे. सौभाग्यवती भवानीबाई पाटोसी होती. ती प्रसूत झाली. पुत्र जाहला. तो चिरंजीव संभाजी राजे व राजसबाई यांणीं कपट बुद्धी करून मारिला. काय निमित्य म्हणून पुसिलें. त्यास त्यांनीं उत्तर दिलें जे—राजश्री शाहू राजे याची आज्ञा आपणास आहे, त्यावरून आपण अपाय केला. ऐसे जनात सागो लागले. काहीं दिवस तैसेच गेले. त्या उपरि उभयता चिरंजीवाचा[3] विवेक होऊन भेटी जाल्या . "*

ताराबाईंची अशी आणखी काहीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. तथापि या पत्रावरूनहि तिच्या खंबीर व मुत्सद्दी मनाची कल्पना येते तिची भाषा आकर्षक व काळाला साजेलशी आहे. विचाराची मांडणीहि लक्षात घेण्याजोगी आहे.

o o o

## राधाबाई

राधाबाई ही बाळाजी विश्वनाथ याची बायको व नानासाहेब पेशवे याची आजी होय. ती फार शहाणी व चतुर स्त्री होती. पेशव्यांचे गुरु ब्रह्मेंद्रस्वामी याचे चरणीं तिची फार दृढ भक्ति होती. सर्वसामान्य स्त्रीप्रमाणें तिच्याठायीं देवभोळे-पणा होता, हे तिनें श्रीमत महाराज श्री परमहंस ब्रह्मेंद्रस्वामी यांना लिहिलेल्या पुढील पत्रावरून दिसून येतें—

" ...येथील क्षेम माघ शुद्ध नवमी पावेतों स्वामींचे कृपावलोकनें करून समस्त क्षेम असो विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन परम संतोष जाहला. असेंच सदैव आशीर्वाद पत्र पाठवून परामर्ष केला पाहिजे. स्वामींचें आज्ञापत्र

---

१ सेनापति, २ तगादा, ३ शाहू, संभाजी.

* महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास. पत्र ७२ व. इ स. १७४५ पा. १०३, १०४.

सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं, सोवळ्यात पाघरानयास दुलई सोवळ्याची उत्तम. हिवाळा प्रावर्णास पाठवून देणें म्हणून आज्ञा. आज्ञेप्रमाणें पदामी दुलई, अस्तर ताफत्याचें, सजाब ताफत्याचा सोमार्जाचे गुजारतीनें तयार करुन सेवेसी पाठविली आहे. अंगीकार करावयासी स्वामी समर्थ आहेत. चिरंजीवास तिळगूळ व पत्रें पाठविलीं तें आज्ञेप्रमाणें. अहोरात्र आसीर्वाद द्यावा, आणि शत्रुपराभव होय तो अर्थ करावा "*

या पत्रावरुन स्वामींच्या आशीर्वादाची योग्यता पेशव्यांच्या स्त्रियाना देखील किती वाटत असे याचा पुरावा सापडतो. तसेंच या पत्रातील 'चिरंजीवास अहोरात्र आसीर्वाद द्यावा' ही कल्पनाहि स्त्रीमनाचें खास वैशिष्ट्य दर्शवीत आहे. शिवाय या पत्रात आलेला घरगुती व कलाकौशल्याचा भाग चित्ताकर्षक आहे.

राधाबाईच्या अंगीं नीतिधैर्य केवढें प्रचंड होतें, याची कल्पना तिनें प्रायश्चित्ताबाबत दिलेल्या आज्ञापत्रावरुन दिसून येते. हें आज्ञापत्र तिनें नानासाहेब पेशवे यास दिलें असून त्याचें अंतरंग असें आहे—

श्री

"छ १ रजब

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यास—

प्रति राधाबाई आशीर्वाद उपरी. येथील कुशल ता॥ आषाढ वद्य अमावास्या इंदुवार जाणोन स्वकीय लिहित गेलें पाहिजे. विशेष—राजश्री गोविंद हरी याचे घरीं बटीक महारीण निघाली. त्याचें वृत्त काल राजश्री अंतोबानीं तुम्हास लेहून पाठविलें आहे. त्यावरुन सविस्तर कळलेंच असेल. त्याचे घरीं मुलामाणसाचा उपोषणानें आट[1] जाला. त्यांणीं ब्राह्मणास व पंडितास बोलावू पाठविल्यास जमा न होत. याकरिता आम्ही व राजश्री अताजीपंत, राजश्री शिवाजी पंताचे घरीं जाऊन जितके ब्राह्मण थोर थोर पंडित व वैदिक सभा करुन बाळभट यास प्रायश्चित द्यावयाची आज्ञा प्रभूची पाहिजे. त्यास आम्ही सर्व पंडितास व ब्राह्मणास आज्ञा केली कीं, तुम्ही प्रायश्चित्त देणें. आम्ही आज्ञा केली, तेच आज्ञा प्रभूची आहे. दुसरा धर्म चित्तात न आणणें यावरुन आजच प्रायश्चित्त दिलें. तेथील विचार पंडितराव यास कळलिया उपरी, उपद्व्याप करुन राजश्रीचे[2] कानावर घालून पद्[3] फैलाव[4] होईल या करिता अगोदर जो बंदोबस्त

---

* श्रीमद्दापुरुष ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर, चरित्र व पत्रव्यवहार, लेखांक २० पा १७.

१ त्रास. २ शाहू. ३ बारस्थान. ४ विस्तार

करणें तो केला पाहिजे. यासाठीं तामडतोब हें पत्र लिहिलें आहे ..बहुत काय लिहिणें हा आशीर्वाद. "‡

या पत्रावरून सुमारें दोन शतकामागें मराठ्याची सामाजिक परिस्थिति कोणत्या प्रकारची होती याची माहिती मिळते. या पत्राची भाषाहि बऱ्याच जुन्या वळणाची असल्याचें दिसून येतें.

० ० ०

# आनंदीबाई

इतिहास प्रसिद्ध आनदीबाई ही श्रीमत रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब याची पत्नी होय. एक महाकारस्थानी बायको म्हणून तिची विशेष प्रसिद्धि आहे श्रीमत नारायणराव पेशव्याच्या वधामुळें तिचें नाव कलंकित झालें आहे. तथापि ज्यावेळीं रघुनाथराव दादासाहेब हे इग्रजास जाऊन मिळाले, त्यावेळीं ह्या राजकारणी स्त्रीनें सखारामबापू व नाना फडणवीस याना गुप्तरीतीनेंच पण जोरदारपणें लिहिलेलीं पत्रें पहाण्यासारखीं आहेत. ह्या पत्रातून ब्राह्मणी राज्य बुडूं देऊं नका असा तिनें उपदेश केलेला आहे. हीं पत्रें राघोबादादा इग्रजास मिळून पहिल्या मराठी युद्धास प्रारभ होण्याच्या सुमाराचीं आहेत व तीं खुद्द आनदीबाईंच्या हातचीं आहेत.

आनदीबाई ही स्वभावाने फार मानी होती. स्वत च्या ब्राह्मणपणाचा तिला अभिमान होता. तिच्या या स्वभाववैशिष्ट्याचें प्रतिबिंब सवाई माधवरावाच्या जन्मानतर तिने २९ एप्रिल १७७४ मध्ये नानास लिहिलेल्या पत्रातील पुढील मजकुरात पडलेलें दिसून येतें या पत्रात आनदीबाईनें लिहिलें आहे कीं—

" किल्याची हवा[1] बहुत सरद आहे. लेकरू लहान, यास्तव तुम्ही व राजश्री सखारामबापू उभयता विचार करून, ज्या जाग्यास या गोष्टीनें लेकरास सुख पडे ते करावें. तुम्हासही याजविशीं काळजी आहेच. आम्ही ल्याहावें असें नाहीं. थोरपणाची रीत हीच आहे कीं, कोणासीं कोण्याही गोष्टीविशीं बहुत बेढू नये. चुणूक दाखविण्यात चमत्कार आहे आम्हास वाटतें. परपरा पाहावें, योग्य असेल तो अर्थ समजून घ्यावा. सूचना मात्र दिली आहे "*

पुढील दोन पत्रें आनदीबाईनें नाना फडणीस व सखारामबापू याना दोन मुख्य कारभारी या दृष्टीनें लिहिलेलीं आहेत. या पत्रात तिनें गृहकलहामुळें ब्राह्मणी

---

‡ महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास. पत्र ११४ पा १५७, १५८

१ पुरदर येथें सवाई माधवरावाचा जन्म झाला. तेथील हवा सर्द.

* इतिहाससग्रह, ऐतिहासिक टिपणें, भाग १, पान ४९.

राज्य कसें बुडणार याची मोठी मार्मिक मीमांसा केली आहे. आनदीबाईंच्या ठायीं असलेली दूरदृष्टि व हुषारी या पत्रांतून प्रकट झालेली दिसून येते. या दोन पत्रांपैकीं नाना फडणिसास लिहिलेल्या पत्रात आनदीबाई ब्राह्मणी दौलतीच्या सरक्षणासाठीं उपदेशात्मक मजकूर लिहिते, तो असा आहे—

. "हल्लीं पत्रांचें कारण कीं, तुम्ही तीन पिढ्यांचे दौलतींतील फडणीस असोन, दौलतेची तों गति झाली ती झाली. हल्लीं यवनाक्रांत ब्राह्मणी दौलत पितुरानीं होऊ पाहाते. तुमच्या चित्तांतील उगीच आटी[1] जात नाहीं, आणि ब्राह्मणी तों बुडत चालली! या दौलतेंत पूर्वीं कारभारी झाले. त्यांणीं ब्राह्मणी स्थापली व दौलतेची वृद्धि केली. हा काळ प्रस्तुत श्रीसत्तेनें असा आला!! इंग्रेज बुदेलखडापर्यंत दोन कपू आले, आणीकही मागून येणार याचा बारीक मोठा विचार जो करणें तो तुम्हींच करणे. आम्हास म्हणाल तर आपला जीव कोणास नकोसा नाहीं. त्यापक्षीं दोन्ही गोष्टींचा आदेश करून, ब्राह्मणपण राहे ते करणे. आम्ही येथें तुमच्या स्वाधीन पावणे दोन वर्षें जाहलीं. कार्यसिद्धी तुमची काहींच न जाहाली. नुक्सान पाच हजार फौजेचे सरंजामी गुतले, ही झाली. विशेष काहींच न झालें. तुमची फौज गुतून, आमचा धन्याचे पायाशीं वियोग, हें उभयपक्षीं नुक्सान आहे...." *

या पत्रातील 'आमचा धन्याचे पायासीं वियोग' हा भाग आनदीबाईंच्या स्त्रीमनाचें खास वैशिष्ट्य दर्शविणारा आहे.

राजश्री सखारामबापूस लिहिलेल्या पत्रात ब्राम्हणी दौलतीबद्दल आनदीबाई लिहिते—

"...हल्लीं इंग्रेज घरात येऊ पाहतात. तमाम अमल उठवून आपले अमल बसवितात. आमचे निमित्य करून सर्व दौलतेस गिराईक होतील. सुजादौले व महमदअली याच्या घरांतून प्रथम चाकरीस येतो म्हणून नम्रतेनें पायरव[2] करून घेतली, आणि आता उभयतास पोटापुरतें देऊन सर्व दौलतीचे धनी जाले आहेत. या सर्व गोष्टी तुम्हास ठाऊक आहेत, तसेंच आमच्या घरात होईल. ते जातीन खबरदार व मनुष्यें जवळ चागलीं, असें असोन, उभयताच्या गती या प्रमाणें जाल्या, आमचे येथें तों कारभारी जवळ मातबर कोण आहे, पायरव कोणाची आहे, व मर्जीही कोणत्या तऱ्हेची आहे, ह्या सर्व गोष्टी तुम्हास ठाऊक असोन, तुम्ही तिही पिढ्याचे कारभारी ही ब्राम्हणी दौलत बुडायाजोगी करिता, हें तुम्हास करणें ठीक दिसत नाहीं. तुम्हास हुजूरची मर्जी कोण्या तऱ्हेनें समजावल्यानें नीट

---

१ तेढ

* इतिहास सग्रह, ऐतिहासिक टिपणें भाग १ पान २८, २९.

२ प्रवेश.

राहते हें सर्व, कोण्या तऱ्हेनें विनंति केल्यास बिघडते यास तुम्ही माहीत आहा. पहिल्यापासून आम्हाकडील दिमतीचे तुम्हीच कारभारी. मर्जी राखून सर्व गोष्टी करीत गेला, आणि हल्लीं या तऱ्हा दिसतात...तरी ब्राम्हणी दौलत नीट राहून, हुजूराचाही संतोश राहून सर्व गोष्टी बऱ्या होतील त्या कराव्या. न केल्यास जन्मभर चागलें केलें आणि शेवटीं म्हातारपणीं इंग्रेजाच्या घरात ब्राम्हणी दौलत घातली, हें अपेश येईं, तो अर्थ न करावा..."* (ऐ. टि. भा. १. ले. १९, २ सप्टें. १७७८)

याच पत्रात शेवटच्या भागामध्यें स्त्रीस्वभावाला अनुसरून आनदीबाईनें सखारामबापूनें वृद्धपणीं लग्न केलें म्हणून जो टोमणा मारला आहे तो मोठा वाचण्याजोगा आहे, तो असा—

"...पूर्वी तुम्हास दोन पत्रें पाठविलीं होतीं, व नवी भावजय लाडकी केली, तिचें नाव काय ठेविलें, व दुसरी करावयाची कधीं, हा मजकूर विशेष लिहिला होता, त्याचें उत्तर काहींच आलें नाहीं. पत्रें पोहोंचलीं कीं नाहीं हें न कळे. तर उत्तर पाठविणें..."

आनदीबाईच्या स्त्रीसुलभ भावनाचा या प्रकारें झालेला आविष्कार आणखी एका पत्रात पहावयास सापडतो. हें पत्र तिनें सखारामबापूस २९ एप्रिल १७७४ला लिहिलें असून त्यात ती लिहिते—

"...आम्हास नातू जाहला म्हणून पत्रें घेऊन खिजमतगार आले. त्यास येथें इनाम सोन्याचीं कडीं द्यावीं. परतु येथें तयार नवतीं. करून द्यावीं तर दर मजलीमुळें फावत नाहीं. यास्तव तुम्हीं तेथें दोन कडीं सोन्याचीं आमचेवरचीं द्यावीं. बहुत काय लिहिणें. चिरजीव बाळाचा समाचार नित्य घेत जावा..."‡

राजकारणात आनदीबाई ही मोठी तरबेज स्त्री होती. वरचेवर ती आपल्या पक्षाचे सरदाराना सल्लामसलत देत असे. १४ फेब्रुवारी १७७५ रोजीं तिनें सदाशीव रामचद्र, आबाजी महादेव आणि सखाराम हरी या तिघा सरदाराना उद्देशून लिहिलेल्या पत्रात जो फितुरीबाबतचा सल्ला दिलेला आहे, तो उल्लेखनीय आहे. या ठिकाणीं आनदीबाई सागते—

"...होळकराजवळ, फितुरीयाकडील वकील आहेत. तो फितुरीयाकडे त्याचे पत्र आलें; त्याचीं नावे लिहितो. येणेंकरून बदोबस्त रहात नाहीं. तेथें होळकर व शिंदे याचे कारकून आहेत. त्यास बोलावून साफ ताकीद करणें कीं, वर्तमान लिहिणें तें मोघम लिहीत जाणे. नावें न लिहिणें आणि आपले लष्करात

* ऐतिहासिक पत्रबोध, पा. ८२, ८३.
‡ ऐतिहासिक सग्रह, ऐतिहासिक टिपणें, भाग १, पा ४९-५०.

कोणीएक पत्र पाठवीत असतील त्याचे नावाचा बोभाट होऊ न देणें. बोभाट जाल्यास पितुरी त्यास खटपट करितात... ''*

आनंदीबाईच्या पत्रांपैकीं येथें दिलेल्या या निवडक पत्रांतील भाषा सोपी, घरगुती व वेंचक शब्दांनीं नटलेली असून तिची घाटणी खास जुन्या पद्धतीची आहे.

० ० ०

## गोपिकाबाई

नारायणराव पेशव्याचा मुलगा सवाई माधवराव हा ता. १८ एप्रिल १७७४ रोजीं पुरंदरावर जन्माला आला. त्यावेळीं त्याची आजी गोपिकाबाई ही नाशीकजवळ गंगापूर येथें रहात असे. या ठिकाणीं तिचें कायमचें वास्तव्य असे. या गोपिकाबाईनें आपल्या होतकरू नातवाला आपल्या घराण्याचे कांहीं रीतरिवाज व शिक्षण यांची कल्पना असावी म्हणून आपलें मनोगत एका पत्रांतून कळविलें. या पत्रांत तिनें आपल्या नातवाला चांगलें वळण लागावें म्हणून तेरा कलमी उपदेश केला आहे तो असा—

[ ८ जाने. १७८३. ]

" श्रियासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यांसी प्रति गोपिकाबाई मुकाम नाशिक, आशिर्वाद उपरी येथील ताागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीय कुशल वर्तमान यथास्तित असे विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें.

' मी लहान, वडिलीं सर्वत्याग करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहीत वडिलास, यास्तव कोणे रीतीनें चालावें हें सर्व ल्याहावयास आज्ञा व्हावी,' म्हणोन लिहिलें त्यास सूर्यग्रहण संधि अन्वयें कृष्णपक्ष होउन लोप जाहला होता. तो हल्लीं पुण्योदयें करून दुष्टाचा सहार व सुष्टाचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुळात जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आला, त्या पक्षीं इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं. परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें, त्यापेक्षा तूर्त चालावयाचें जें सुचलें तें लिहिलें तपसील कलमबंदी—

प्रातःकालचे घटका रात्रौ उठोन दिशेस जाऊन पाद प्रक्षालन मुख प्रक्षालन करून दिवाणखान्यातील श्रीमृत्तिका गणपतीचें दर्शन घेऊन प्रातःस्मरणाचे श्लोक म्हणावे. नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यानीं येऊन हात पहावा. प्रकृति अन्वयें औषध घ्यावें. नंतर लिहावयास बसावें. नित्यांत हात फिरवून मग ज्या कागदावर

* ऐतिहासिक संग्रह, ऐतिहासिक टिपणें, भाग १. पा. ८८,८९.

निशाणें[1] व्हावयाची असतील ते लिखितान्वयेंच वाचावे. ते समयीं जवळ गुरुजी[2] व आणखी एक दोने सभावित योग्य असतील ते असावे. जास्त असो नये. येणें प्रमाणें घटिका तीन एकूण घटिका...कलम १.

तालीमखान्यात जाऊन दड काढावे. दिवसेंदिवस शक्ति अन्वयें चढते दड असावे. बरोबर समवयी मुलेंपाच चार सभावित असावीं, व जेठी एक दोघे व नेहमीं विश्वासुक ग्रहस्थ बरोबर असावयाचे ते असावे. खिजमतगार कार्याकारण असावे. जेठी यानीं कुस्तीचे डाव शिकवावे. नतर समवयी मुलासुद्धा प्रकृतीस जो खुराक मानेल तो नेमें करून घेत जावा. येणे प्रमाणे घटिका दीड एकूण साडेचार घटिका ...कलम २

स्नान करावयाचे समयीं पचाग जोशी वाचून सकल्प सागावा. नतर गगा एक म्हणावें, सध्या थोडकी, परतु न बोलता करावी. तर्पण करावे. उपाध्ये यांणीं पूजा करावी. ते समयीं पुराण देवघरात व बाहेर गायन होत असावें. आपण तुळशीपुढे माळा वहावी. नतर नित्य दानें देऊन क्षणभर बसावें ते समयीं शास्त्री व वैदिक महान् शिष्ट आल्यास नमस्कार करून योग्यतेनुरूप उत्थापन देऊन कांहीं भाषण करावे. नतर उपहार करावयास जावें. येणें प्रमाणें घटी साडेतीन. येकूण घटी आठ...कलम ३

कचेरीस यावे ते समयीं सर्वांस देऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरींत लघुशब्द बोलू नये व गैर नि ही (!) बोलू नये. मनुष्य परीक्षा असावी. गैरवाका एखाद्यानें समजाविलेस पक्केपणीं विचार करून अपराध ठर ल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध करवावें आपण नेत्रकटाक्ष करून पहावें. अप राधानुरूप पारपत्य करावें, परतु सभावित ग्रहस्थ बहुत दिवस पदरींचा प्रामाणिक, अज्ञानें रदबदली केली असता क्षमा करावी. दुसऱ्याचें क्षुद्र काढू नये. येणें करून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनात दश राहतो, साधल्यानुरूप नाश करील, आणि आपल्यास लघुपणा येईल. सन्निधानी लोभात लघु मनुष्य राखल्यास जें केलें त्यास ते रुकार देतात, परतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती...कलम ४

भोजनाचेपूर्वी सोंवळे जाहले नतर थोरल्या देवघरात जाऊन फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणास उदक सोडून, भोजनास बसावें ते समयीं भाषण करावें तें राजसूय यज्ञातील ब्राह्मण भोजन प्रकरणीं वगैरे योग्य सर्वांस दिसेल ते बोलावें. पाक करणार व शिष्यमडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे . कलम ५

---

१ शेवटचीं अक्षरें २ महादजी बल्लाळ गुरुजी. थोरल्या माधवरावाचा इत-बारी. उपनाम वरवरे.

भोजनोत्तर आचमन करून शतपदी करून तांबूल घ्यावा. नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे...कलम ६

शास्त्री यांजवळ विराटपर्वांपासून भारतातील चिंतनिका करीत असावी, व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं व अन्य शहाणे असतील त्यांशीं दिल्ली प्रकरणीं व महाराज प्रकरणीं गोष्टी कथा जाहल्या त्या ऐकण्यात असाव्या. आपले वडिलांच्या गोष्टी कारभारी यांशी एकांत स्थळीं विचारीत असावें, व तसविरा, नकाशे अनेक पहात असावे. ते समयीं शहाणे बुद्धिमान् असतील ते जवळ असावे . कलम ७.

खर्डे लिहावयास बसावें, ते समयीं एक दोन मुलें सभानित गृहस्थाची बुद्धिमान पहावयास असावीं. करदन, बरतन, गुणाकार, भागाकार करावयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांनीं विद्याभ्यासाकरिता बोलणें प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलणें तेथें विशेष कोणी असों नये कलम ८

लिहिणें जाहले नंतर कांहीं उपहार थोडासा मर्जी असल्यास मुलासमवेत घेऊन करावा. नंतर तांबूल घ्यावा .कलम ९

घोडीं फिरावयास चार रोजानीं जात असावें. ते समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अन्यत्र सरदार असावे. त्यांशीं भाषण करणें ते संतोषवृत्तीनें करावें. परंतु अत्यंत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें. कांहीं अंतर जाहल्यास क्षमा होणार नाहीं असें भय असावें. योग्यता पाहून त्यांशीं भाषण संतोषें करून करावें. आठा दिवशीं बाग पहावयास गेल्यास जिन्नस तेथें फुलें व फळें जीं आणून पुढें ठेवतील तीं योग्यायोग्य पाहून त्यास देवावीं व आपण घ्यावयाचीं असतील त्यास आपण देऊन मग यावें. ज्या दिवशीं स्वारी जावयाची नाहीं, त्या दिवशीं कागदपत्र दवलत प्रकरणीं असतील ते कारभारी यांणीं समजावीत असावें. ते समयीं कोणी असों नये गंगा भागीरथी तार्इसाहेब* यांची भेटी चार रोजीं एक वेळ घेत असावी. त्यासच वाड्यात यावयाची बेत व्हावा. नंतर त्यास बहुत संतोषें करून बोलावें व मूलपणानें बोलण्याचा डौल दाखवावा. वाड्यातच आज रहावें असा आग्रह करून ठेवून घेत जावी. दिवाण यांचीं राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंति करीत असावी. ते समयीं अन्यत्र कोणी असों नये. व त्यांतील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये. म्हणजे मसलती असाध्य होत नाहींत. बातमी हरतऱ्हेची राखावी, म्हणजे मसलतीस बल बहुत आहे. पदरच्या मनुष्याचें चालवावयाचें त्यास जिकीर करू नये कलम. १०

तिरंदाजी करावयास जावें. तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बरोबर असल्यास तीर कोण कसे मारताहेत ध्यानात असावें व हरएक खेळ पहावयाचे ते सर्वत्र समवेत पहावे...कलम ११

---

* मातुश्रीची आई.

दीपदर्शन जाहल्या नतर सध्येस यन्त्रातर करून असावें सध्या जाहलेनतर स्तोत्र पाठ म्हणावा. नतर पुरुषसूक्त अथवा पवमानातील अध्याय म्हणावे ते समयीं आश्रितानीं जवळ असावे नतर भोजनास जावें कलम १२

भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यात क्षणभर बसून तांबूल घ्याव नतर कार्याकारण मडळी जवळ असावी ते समयीं बातमीदार यांणीं वर्तमान गुप्त सागत असावें, व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं, बाकीचीं पत्रें विश्वासुक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें, त्यांनीं सागावें व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सागतात याची चौकशी असावी. नतर निद्रेस जावें

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगीं पडतील. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद "*

गोपिकाबाईचें हें पत्र भाषेच्या दृष्टीनें आकर्षक असून अतरगाच्या दृष्टीने विशेष लक्षात घेण्यासारखें आहे आपला नातू सर्वोत्तम पुरुष म्हणून तयार व्हावा यासाठीं आजीच्या खऱ्या जिव्हाळ्यानें तिनें इथें उपदेश केलेला आहे तिचा इथें प्रकट झालेला बारकावा, व्यवहारचातुर्य, बुद्धिवैभव, सामाजिक बधनें वगैरे भाग चिंतनीय आहे. उत्कृष्ट प्रकारचें राजकारण करण्यासाठीं लागणारी पार्श्वभूमि तिनें एवढ्या चटकदारपणानें व आपलेपणानें तयार करू पाहिली आहे कीं, तिला दुसरी तोड अन्यत्र असू नये. आपल्या नातवाचा सर्वांगीण विकास करीत असतानाच एकदर सामाजिक जीवनाच्या विकासाबद्दलहि गोपिकाबाईनें इथ विशेष काळजी घेतली असून त्या दृष्टीनें हें तिचे पत्र वैशिष्ट्यपूर्ण ठरेल

## तुळजाबाई शिंदे

तोरगळकर तुळजाबाई शिंदे हिचे पुढील पत्र भाषेच्या व राज्यकारभाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें असे आहे तुळजाबाईसारख्या स्त्रिया त्या वेळीं राज्य सरक्षणाचे कामीं किती आवडीनें व उत्सुकतेनें विचार करीत असत, व छत्रपति आणि पशवे यांच्याबद्दल सरदाराची भावना कोणत्या प्रकारची असे, याची कल्पना या पत्रावरून येते. हे पत्र असें आहे —

श्री शकर

राजश्री पतप्रधान गोसावी यासी,

श्रीमत अखडित लक्ष्मी अलकरण राजमान्य विराजित स्नो तुळजाबाई सिंदे दडवत विनती उपरी–येथील कुशल जाऊन स्वकीये कुशल लेखनाज्ञा करून

* ऐतिहासिक पत्रबोध. पा. ९०, ९६, ९७, ९८, ९९.

आशीर्वाद पत्री साभाळावे विशेष. आपणाकडील आसीरवादपत्र बहुत दिवस येत नव्हतें. याजकरिता अमृतोतराची प्रतीक्षा सदैव सापेक्षित असता साप्रत आनदरूप आसीरवाद ( पत्र स्वामीने आम )चे नावे पाठविले ते ( मस्तकीं वदून ) चित्तास परम आल्हा * * * पत्रावलोकनी आपले चरणाविंदच अवलेकनात आले. आज्ञापत्री अज्ञोत्तरे लिहिली कीं नवाब अमीरउ उमराव निजामनमुलक गाजुदीखान बाहादर पेरोजग दक्षणेस सुबेदार होऊन औरंगाबादेस दाखल जाले. सारी पातशाही मनसबदार दक्षणेच्या सुबियाचे ताबे आहात. आपले जमियेतीनिसी पत्रदर्शनी औरंगाबादेस जाऊन नवाबाची मुलाजमात करणें यात तुमचा गौर- सरफराजी व बेहबुदी[१] असे, तरी जल्दीनें येणें म्हणऊन आज्ञापिलें. त्याजवरून परम सतोष जाला. येसियासी आम्हास आपली आज्ञा वत्र. आमचे मुरबी सर्व प्रकारे पूर्वीपासून गोसावी समर्थ आपले सिरी आहेत, आणि सर्वस्वे आपल्या साभाळाचा अभिमान गोसावियासीच वडील वडिलापासून आमचा साभाल होत आला. आपल्या आज्ञेप्रमाणें जामियेत सुद्धा चिरजीवास यावया विलब नाहीं. आमचे वर्तमान राजश्री धोंडाजी आऊदेव सेवेत निवेदन करिता अवगत होईल, आणि पत्रीही विज्ञप्ति कीं चिरजीवास गत वरषी न्यामतुलाखाजीचे हामराह करनोलच्या मोहिमेस रवाना केले ते करनोलची मोहिम करून न्यामतुलाखाजी बराबरीच भागानगरास दाखल जाले. आम्हीही चिरजीवास गोसावियाच्या आज्ञापत्रा अगो- धरींच पत्रें लेहून पाठविली की तुम्ही लवकर येणें. इकडे नवाब निजामनमुलक पेरोजंग बाहादर औरंगाबादेस दाखल जाले म्हणऊन पहिलेही पत्रें लिहिली आहे तीं आणि तेही लवकरीच येऊन पोहचतील.

विशेष विस्तार काय लिहिणें ही विनती. ×

*या पत्रात तुळजाबाईनें स्त्रिया घरगुती बोलण्यात जी भाषा वापरतात* तिचाहि वापर केलेला दिसून येतो. त्यामुळें भाषेच्या दृष्टीनें हे पत्र थोडें वैशिष्ट्यपूर्ण झालें आहे असें म्हणता येईल.

● ● ●

# अहिल्याबाई होळकर

अहिल्याबाई ही मल्हारराव होळकर याची सून. हिनें कोणावरहि अवलबून न राहता अगर स्वत बाईमाणूस म्हणून कोणाकडे मदतीची भीक न मागता स्वतःच्या कर्तबगारीवर विसबून इदूरचें राज्य चालविलें. राज्यकारभार करीत

---

१ भरभराट.

× ऐतिहासिक पत्रबोध. पा ४३, ४४.

" मेल्या ब्राह्मणानें हरामखोरी आरंभिली आहे. परंतु मी बायको असें मानू नका. खांद्यावर बासडा ठोकून उभी राहीन, तेव्हा श्रीमंताचे दौलतीस अवघड पडेल ! आमचे वडिलांनीं भाडमबई करून दौलत मिळविली नाहीं, तर तरवारीचे अनुमानें शरीर खर्च घातलें आहे. आम्ही शिलेदार वडिलाचे चाकरी प्रमाणें चाकरी घेतल्यास हजर आहोंत. धुणीपाणी[1] सरली असल्यास मोंगलाईची चाकरी करू अथवा फिरंग्याची करू अगर पाहिजे ते करू ब्राह्मण म्हणतील[2] दौलतीचा अभिलाष करू तर हें होणार नाहीं "†

अहिल्याबाईंचीं अशी स्वाभिमानाचीं बोलणीं नेहमीं ऐकल्यामुळें एकदा महादजी शिंद्यानें अहिल्याबाईस प्रश्न केला. " बाईसाहेब आपण इतकी अगवळणीं बोलता परंतु आम्हीं पुरुष आहोंत. आपले दगावर आलों असता आपण काय कराल ? " त्यावेळीं अहिल्याबाईनें त्यास तात्काळ उत्तर देऊन टाकलें कीं—

" जसें तुम्हीं आपल्या बाया सुपारीच्या खाडासारख्या तोंडात गिळून गेला, तोच बोध तुकोजी होळकरास करून उभयता फौजबंदीनें येण्याचें करावें हुजुरीहून तुमचें कूच, त्याच दिवशीं हत्तीचे पायात अदू[3] घालून तुमची खात्री करीन, तरच मल्हारजी होळकराची सून. तुमचे मनात गुबार[4] होता तो तुम्हीं बाहेर काढला. या गोष्टीस चुकाल तर तुम्हास मार्तंडाची शपथ. "‡

अहिल्याबाईच्या या प्रकारच्या भाषेवरून व विशेषत 'येथेंही कोणी बागड्या लेवून बसलें नाहीं' या बोलण्यावरून तिच्या तडफदार विचारसरणीची तर कल्पना येतेच, परंतु तिनें स्वत:च्या कर्तबगारीबद्दल केलेला उल्लेख स्त्रीमनाच्या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय, अभिमानास्पद व वैशिष्ट्यपूर्ण असाच असल्याचें दिसून येतें. वास्तविक बांगड्या नेहमीं बायका भरतात आणि नालायकी दाखवावयाची तेव्हा पुरुषांना 'बांगड्या भरा मग' असा टोमणा मारला जातो. अहिल्याबाईनें याचें मोठें सुंदर निराकरण येथें केलें आहे यात शंका नाहीं अशा प्रकारें भाषा करणारी इति हासकालीन अशी ही पहिलीच स्त्री बहुधा असावी.

आपल्या राज्यांतील जमाखर्चाची व्यवस्था अहिल्याबाई मोठ्या चोख-रीतीनें ठेवीत असे. तिच्या या वैशिष्ट्याची कल्पना तिनें तुकोबास लिहिलेल्या पुढील पत्रावरून येते.

---

* महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें भा. २ पा १०, पत्र १२.

१ ऋणानुबंध. २ पेशवे म्हणतील.

† होळकराची कैफियत पा. ४४.

३ लढाईचे वेळीं हत्ती जाग्यावरून पळू नये म्हणून त्याच्या पायात जो मारखळ-दड घालतात तो. ४ दुष्ट हेतु.

‡ होळकराची कैफियत. पा. ७५, ७६.

श्री

६ जानेवारी १७९१.

चिरंजीव राजश्री तुकोबास

प्रति अहिल्याबाई होळकर आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणे. विशेष. प्रगणे टोंक प्रांत धुडाड येथें परनी आसाम्या सरकारातून पेशजीपासून येणें प्रो.

४०० मजमू खासगीकडे मा (मार्फत) गोविंद रघुनाथ
५०० फडणीसी गोविंद रघुनाथ
३०० पोतनिसी व्यंकोजी बापूराव
२०० दप्तरदारी सदाशीव रामचंद्र
१४००

येणेंप्रमाणें च्यार आसाम्या मिळोन चौदासे रुपये चालत आले असता हल्ली तेथील मामलता तुम्ही कृपाळसिंग याजकडे सांगोन माहाली त्याचे बंधु विश्वंभरदास याजला रवाना केले. त्याजला नेमणुकीचा बयाहाडा करून दिल्हा त्यात या आसाम्या दिल्ह्या नाहींत म्हणोन विदित जाले. त्याजवरून हें पत्र तुम्हास लेखन केलें असे. तरी तुम्ही सदरहू चौदासे रुपयेचे आसाम्याचे सालाबाद प्रो लिहून देऊन त्याचे काम त्याचे हस्ते घ्यावे. विसी मामलेदारास लिहून कोणे विसी दिक्कत न पडे ते करणें. रवाना छ. १ जमा दिलाखर सुा इहिदे तिसैन मया–व–अल्फ. बहुत *काय लिहिणें हा आशीर्वाद.**

मोर्तब
सुद

अहिल्याबाईची लेखनपद्धति व भाषासौष्ठव लक्षात येण्यासाठीं म्हणून नमुन्यादाखल हें पत्र येथें जसेच्या तसें दिलें आहे.

खुद्द अहिल्याबाईसंबंधीं तिचा स्वभाव विशेष दर्शविणारी इतरांनीं लिहिलेलीं अनेक पत्रें इतिहासात सापडतात.

• • •

# अहिल्याबाई गायकवाड

बडोद्याचे फत्तेसिंगराव गायकवाड यांची पत्नी अहिल्याबाई हिची तिच्या नवऱ्याचे पश्चात् हैराणगत कशी झाली याची करुणरम्य हकीकत तिनें राजश्री

* होळकर शाहीच्या इतिहासाचीं साधनें. पत्रव्यवहार, पूर्वार्ध खंड १ ला. (फडणीसीचे नकलेवरून) पत्र नं. १०१. पा. १५५

दवलतराव बाबा शिंदे याना लिहिलेल्या पत्रात आलेली आहे त्या वेळी अशा प्रकारच्या स्त्रियाची कशी आबाळ होत असे याची कल्पना ह्या अहिल्याबाईच्या पुढील पत्रावरून येते—

"... आमचे वर्तमान आमचे धणी कैलासवासी जालेनंतर मानाजीराव गायकवाड यानीं पचवीस तीस लक्षाचें वित्तें ( वित्त ) घरात होतें तें दरोबस्त लुटून नेलें. आम्हास एक वस्त्रानिसी एक घर लहानसें होतें तेथेंच टाकून ठेविलें, आण मानाजीराव देव लोकास गेले. तदनतर गोविंदराव गायकवाड आले. त्यानीं येताच प्रथम आमची खायासर्चाची नेमणूक दहा हजाराची होती ते बद केली, आण घरास खणतें लाऊन एक लक्षाचें वितें नेलें मग तेथें आमचे चुलते नारोजी देशमुख होते त्याजपाशीं आम्हीं डागिने चवलक्षाचे ठेविले, आण आम्ही श्री मार्तंडाचे दर्शनास जेजुरीकडे निघालों आमचे मागे देशमुख मजकुर याणी गोविंदराव बावास सागून डागिने चवलक्षाचे त्यास दिल्हे, आण आपण मामलत करून गेले आम्ही ये प्रांतीं आलो तेंव्हा आम्हास वारीस एक श्रीमार्तंड किंवा आपण आहेत यास्तव विनति लिहिली आहे तर आमचा बदोबस्त करून ठेविला पाहिजे. आम्हीं भेटसी यावें, तर येथें आम्हास खर्चाची आबळ आहे, यास्तव हे पत्र लिहिलें ..

आमचे धन्यास एकदरीं साठ बायका होत्या. त्यात चौघी खाशा. गोविंदराव गायकवाड याणी बायका दरोबस्त काढून दिल्या आणि आमची चौघींची हे गत केली . आमचे धण्यानी कोष्यानकोट पैका असोन, त्यानें देऊळ कोणें बाधलें नाही, हें आपल्यास श्रुत होये आपण पाटीलसाहेबाचे पोटीं कुलदीप आहेत. मी धर्माची बहीण जाणोन हें कार्य केलें पाहिजे आण हें न जाल्यास आपले पायापाशीं बोलाऊन घ्यावें. आपण शेर पीठ घाल तर खाऊन वसू यादो भास्कर यार्णी सर्व बदोबस्त करून घरोघर लाविले दामाजी बावाचे हातचे दोनचार गाव पाटिलकीचे आहेत, त्यात सर्वपरी काल याचा आहे. आमचें कोठें चालू देत नाहींत. आम्हास पत्रें आणून दाखवितात कीं, आम्हास धण्यानीं सागितलें. मग खरें किंवा खोटें न कळो सर्व कारभार सोडून बायकास लुटितात सेवेसीं श्रुत होय. हेंवूप्रमाणें भरवसा जाणून, हें पत्र कोणास न दाखवण आण उत्तर पाठविलें पाहिजे . "*

अहिल्याबाईच्या या पत्राची घाटणी व भाषा इतर स्त्रियाच्या मानानें थोडी वेगळी आहे. तिनें ' आणि ' ऐवजीं ' आण ' असा शब्द वापरलेला आहे ' आणि आपलें पत्र कोणासहि न दाखविण्याची सूचना करून झाला प्रकार सविस्तर कळवून टाकला आहे हें विशेष होय

---

* राज० ग्र. १० ले० ३८७. ऐतिहासिक पत्रबोध पा. ११६,११७.

राजघराण्यातील या थोर स्त्रियाच्या प्रमाणेंच त्याच्या दासींनीं लिहिलेलीं कांहीं पत्रेंहि उपलब्ध झालेलीं आहेत त्यापैकीं एकदोन येथें नमुन्यादाखल घेता येतील.

अहिल्याबाई होळकर याची दासी सती हिनें अहिल्याबाईस एक पत्र लिहिलें आहे. सती अहिल्याबाईकडे कुणबीण म्हणून होती. हें पत्र स्वत तिनें लिहिलें असून त्यातील अक्षर वेडें वाकडें आहे. या पत्राचा मजकूर असा—

श्री

श्रीमत गगाजल निर्मल मातुश्री बाईसाहेब
साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक सतीनें चेरनावर मस्तक ठेऊन सा|| दडवत विनति विज्ञापना येथील कुशल ता|| पौश शु|| ५ पर्यंत माहाराजाचे प्रतापें करोन येथास्थित असो विशेष. को इदूरपैकी उगाई हर जिन्नस येणे प्रो पाठविली आहे.

८=||८ वजणी जिन्नस
८१|| मेथी भाजी वाल
८||| वागीयाची उसरी
८|| मिरच्या
८८८ आल व लसन
८=|||८

सदरहू पावणेतीन मण आठ सेर वजन-रसू कुजडा याज समागमे पो. आहे. हु||र प्रविष्ट होईल. पावली याचे उत्तर सादर केले पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना."*

ह्या पत्राची भाषा अगदींच सामान्य असून मजकूर फारच घरगुती असा आलेला आहे या पत्रावरून त्या वेळच्या दासींनाहि लेखन वाचन येत असावें असें दिसतें.

राजघराण्यातील एका स्त्रीने बाजीरावास एक पत्र लिहिलें असून त्यात छत्रपतीकडील स्वयपाकघराची दुरस्ती करण्याबद्दल विनति केली आहे. या पत्रात या स्त्रीच्या नावाचा उल्लेख आलेला दिसत नाहीं. हें पत्र असें आहे—

" छ १ साबान

श्री

राजश्री बाजीराव पडित प्रधान यासी—

प्रति सौभाग्यादि सपन्न उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन कारणे विशेष. सातारा माहालातील मुदबखचे घर ( स्वयपाकघर ) तुम्हाकडून बाधिवले होत प्रस्तुत सोप्याचे खाब जागाजागा दरले व काही विडीने जाया

* होळकर शाहींतील ऐतिहासिक स्त्रियाचा पत्रव्यवहार, खड १२ पा. ६७

जाले. मोहाऱ्या—( ओसरीची छपरे ) कीठ ( नादुरुस्त ) जाया जाहल्या व काही पाडिल्या. यास्तव नीट करावे लागते. तरी तुम्ही राजश्री माहादाजी अबाजी व राजश्री दादोपता सागोन मुदबखचे घर सोपा नीट करवणे. दिवसगतीवर न घालणे. अविल्बे तयार करविले पाहिजे. जामिजे. छ १९ रजब. बहुत काय लिहिणें. ''*

या पत्राची भाषा अगदींच साधी व सामान्य लोकांच्या व्यवहारातील दिसते. तसेंच मजकूरहि अगदींच घरगुती आहे.

इतिहासकालीन अशी हीं सर्व पत्रें त्या वेळच्या पद्धतीनुसार मोडी लिपींत लिहिलेलीं आहेत असें त्यांच्या मूळ पुराव्यावरून आढळून येतें मोडी लिपीस त्यावेळीं राजदरबारी मोठा मान असे.

या पत्रापैकीं काहीं पत्राच्या शेवटीं किंवा ' श्री ' काराजवळ विशिष्ट कुलदेवतेचें नाव अगर विशिष्ट खूण घातली असून कोठेंहि पत्र लेखिकेच्या नावची सही आलेली नाहीं. या पत्राचे मायने मात्र वैशिष्टयपूर्ण व विविध आहेत. भाषा देखील त्या त्या पत्र लेखिकेच्या मानानें वेगवेगळी आली आहे. आणि मुख्य म्हणजे या पत्रातून सर्वत्र विखुरलेलें खाजगी, घरगुती व राजकीय जीवन ज्या पद्धतीनें रेखाटलें गेलें आहे ती पद्धति फारच छान आहे.

येथें दिलेल्या निरनिराळ्या पत्रातून त्या त्या विशिष्ट व्यक्तींचें स्वभाव-चित्र व त्या व्यक्तीभोंवतीं घडलेल्या घडामोडी प्रतिबिंबित झालेल्या आहेत. त्यावरून पूर्वींचे सर्व प्रकारचे व्यवहार व रीतरिवाज काय असत याची चांगली कल्पना येते त्याचबरोबर भाषाशैलींतील विविधता व खास जुन्या शब्दांचा वापर याचाहि परिचय चांगला होतो सामाजिक व धार्मिक व्यवहार, लोकांचे शिक्षण व उमेद, राष्ट्रीय जीवनात स्त्रियांचा कार्यभाग वगैरेचीहि यावरून बरीच माहिती मिळते.

पुरुषांच्या पत्रलेखनाच्या मानानें स्त्रियांनीं लिहिलेल्या पत्रांची संख्या फार कमी आहे. त्यातून इथें अगदींच निवडक पत्रांना उल्लेख आलेला आहे तथापि तेवढयावरूनहि एक गोष्ट ठळकपणें लक्षात येते ती अशी कीं, त्यावेळच्या राज स्त्रियांना व दासींना शिक्षण मिळत असे ! राजकारणाविषयीं त्या आवडीनें विचार करीत असत !

दुसरें असें कीं, या पत्रातील कांहीं अपवाद सोडला तर बराचसा भाग विशेष घरगुती असा आलेला आहे. राजपुरुषाप्रमाणें घडामोडींचें व युक्तींचें राज-घराण्यातील कारण फारसें त्यात आलेलें नाहीं तथापि स्वाभिमान मात्र कोठेंहि लोप पावला नाहीं हें विशेष होय.



* महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास. पत्र १०८ पा. १५१, १५२

.५.

# ललित वाङ्मयाची सुरवात

मराठी वाङ्मयाची भावगंगा मुळात प्राकृताच्या पर्वतातून निघालेली असली तरी तिला तीर्थांचें माहात्म्य ज्ञानदेवानीं प्राप्त करुन दिलें. या असामान्य प्रतिभेच्या संताच्या प्रभावामुळें मराठी भाषेनें अमृतालाहि जिंकणारी गोडी अंगिकारिली. परंतु ज्ञानदेवाच्या या उदयकालाच्या वेळची महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनाची परिस्थिति मोठी विचित्र होती. त्यामुळें त्या वेळच्या सतकवींच्या हातून फक्त काव्याची व तीहि निवृत्ति प्रधान काव्याची अशीच वेल फुलली. वाङ्मयातील इतर सर्व प्रकारच्या वृक्षवेलींना मानवणारी हवाच त्यावेळीं महाराष्ट्रात नव्हती. त्या कारणाने संस्कृत वाङ्मयांत सुंदर फुलानीं नटलेली निरनिराळ्या प्रकारची वाङ्मयीन कल्पलता मराठीच्या उद्यानात आरंभीं आरंभीं अदृश्य झाली ! त्याचा परिणाम मराठी वाङ्मयावर झाला.

वाङ्मयीन कलेचा उदय आणि उत्कर्ष हा देशकाल परिस्थितीवर अवलंबून असला, तरीहि अशी कला एखाद्या देशात शतकानुशतकें पडदानशीन होऊच शकत नाहीं. या ना त्या प्रकारें तिचा आविष्कार होत जातो व त्यावरुन त्या देशाची पारख केली जाते.

कारण वाङ्मय म्हणजे मानवी मनातील वैचारिक व खाजगी भावभावना लाभलेलें लिखित स्वरुप होय. त्यामुळें वाङ्मयाच्या द्वारें एखाद्या विशिष्ट देशांतील आदर्श जीवनाची नोंद केली जाते. राष्ट्राच्या चरित्राचा इतिहास सांगितला जातो. तिथल्या माणसांच्या बुद्धीची पारख केली जाते. त्या वाङ्मयातून प्रकट होणाऱ्या भावनाविष्कारावरुन राष्ट्राचें आरोग्य तपासलें जातें. म्हणून वाङ्मय हा त्या राष्ट्राचा एक सुंदर असा आरसा होय. *

---

* "A National literature, it is generally recognised is a reflection of the national history."

Worlds Literature, Page 431, Moulton

" राष्ट्राच्या मनाची, बुद्धीची व कर्तृत्वाची लांबी रुंदी व उंची जाडी या वाङ्मयाच्या मापाने निनचूक मापता येते इग्रजी अमलाच्या सुरवातीपासून आमच्या समाजाची स्थिति गति आमच्या तत्कालीन वाङ्मयावरून उद्धृष्ट कळून येते स्वराज्य गेले आणि पाठोपाठ सरस्वतीहि आम्हास विन्मुख झाली ! नव्या परकी सरकारला आपली गाथा लावून आपल्या लगामीं राहील असा नवीन सुशिक्षिताचा एक वर्ग निर्माण करावा लागला या नवीन वर्गांत बहुतेक भरती नवीन सुभिक्षिताची होती जुने खानदानी, राज्य भोगलेले मुत्सद्दी, सरदार वगैरे सर्व अतर्धान पावल्याप्रमाणें झाले ! राष्ट्राची वाचाच बसली ! ! ती दातखिळी उचकटण्याचा पहिला प्रयत्न विष्णुशास्त्री यांनीं केला व नवीन सुशिक्षिताच मोहपटल त्यांनीं दूर केले "* इतकेंच नव्हे तर विष्णुशास्त्र्यांनी आपलें " महत्कृत्य जें निबधमाला लेखन, ज्याचे योगानें त्यानीं महाराष्ट्र भाषेचे स्वरूपात इतकें अतर पाडिलें, व तींत उत्तम ग्रथरचना करिता येईल असा विद्वान् लोकास भरवसा आणिला, व ज्याचे द्वारें त्यानीं आपले लोकांचे अनेक विषयावरील समजुतींत बदल केला, त्याची उत्पत्ति सहज होऊन त्याची प्रथम कल्पना अगदीं साधी व अपूर्व होती " ××

इग्रजी राजवट महाराष्ट्रात सुरु झाल्यानतर स्वाभाविकच राजभाषा म्हणून इग्रजी भाषेलाहि प्रचार दृष्टे सुरु झाला त्यामुळें इग्रजींतील उत्तमोत्तम ग्रथाचें अध्ययन आपल्याकडील लोकानीं सुरु ठेविलें त्याचा परिणाम म्हणून आपल्याकडे इग्रजींतील विविध वाङ्मयप्रकारहि सुरु झाले इ स १८१८ ते १८७४ पर्यंतचा काळ प्रामुख्यानें भाषातरित काळ म्हणून समजला जातो सस्कृत आणि इग्रजी भाषेंतील ग्रथाचें भाषातर या काळात बरेंच झालें या वाङ्मयाचें स्वरूप बरेचसें अद्भुतरम्य आणि कल्पित होतें त्याविषयीं लिहिताना श्री काशिनाथपत नातू यानीं इ स १८७२ सालीं प्रसिद्ध केलेल्या विजयसिंग ( शेक्सपियरच्या ज्युलियस सीझरचें हें भाषातर आहे ) या नाटकाचें प्रस्तावनात म्हटलें आहे कीं, " अलीकडे कल्पित कादबऱ्या आणि नाटकें इत्यादि पुस्तकाचा मोठा पूर आला आहे हें वस्तुत पाहिलें असता आपल्या देशाला एक वैभवच आहे, पण त्याची जशा प्रकारची भाषा असावी तशी नसते व कल्पित कादबऱ्यातील गोष्टी एकाच तोऱ्यावर लिहिलेल्या असतात " पण निबधमालेचें युग सुरु झाल्यानतर ही परिस्थिति पालटली मराठींतून स्वतत्र अशी ग्रथरचना होऊ लागली व या ग्रथातून महाराष्ट्राचें अत करण चित्रित होऊ लागलें

इग्रजीमधून मराठींत आलेले विविध वाङ्मयप्रकार आपल्याकडे अगदींच

---

* मराठी गद्याचा इग्रजी उपोद्घात, पा १०

×× विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र पा १०९

नवे होते असें मात्र नव्हे. मराठी वाङ्मयाचा विकास त्यामुळें आपल्याकडे झाला हें मान्य केलें तरी असे म्हणता येईल कीं, आपल्या जुन्या मराठींत ह्या विविध वाङ्मय प्रकाराचा गाभा नि सशय होता. या काळात त्याची वाढ झपाट्यानें झाली आणि त्यास ठसठशीत असें वेगळें स्वरूप आलें एवढें मात्र निश्चित. हा जो बदल झाला त्याविषयीं लिहिताना विष्णुशास्त्र्यानीं एके ठिकाणीं म्हटले आहे कीं, "इग्रजी ग्रथाचे ज्ञान चोहोकडे पैलावल्याने नवा सुरु झालेला प्रकार आणखी एक सागणें आहे. तो सृष्टिवर्णन हा होय. हा जुना मराठी कवींच्या ग्रथात क्वचितच आढळतो, व सस्कृतातहि त्याची एक निराळीच तऱ्हा आहे. इग्रजी कवितेंत व गद्य ग्रथात मात्र तो अलीकडे मोठ्या पूर्ण दशेस येऊ लागला आहे." *

कथा, कादबरी, नाटक, निबध, चरित्र, आत्मचरित्र इत्यादि अनेक वाङ्मयीन कलाप्रकार मराठीमध्यें नव्यानें रूढ होऊ लागले होते. या काळात जे अनेक लहानमोठे लेखक उदयाला आले त्यानीं हे कलाप्रकार लहानमोठ्या प्रमाणात हाताळण्याचा प्रयत्न केला अर्थात् हें सर्व वाङ्मय हें मराठींतील ललित वाङ्मयाची सुरवात या दृष्टीनेच पडताळून पहावे लागेल. आजची वाङ्मयीन कसोटी त्यास लावून चालावयाचें नाहीं. कारण त्यावेळीं कथेची किंवा कादबरीची रचना कशी करावी याबद्दलची शास्त्रीय माहिती लोकाना फारशी नव्हती. कला व तत्र या दृष्टीनें या वाङ्मय प्रकाराचा कुणीं फारसा अभ्यास केलेला नव्हता. "मनुष्य समाजाची मार्मिक परीक्षा करून त्याच्या अत करणात खोल बुडी घेऊन तेथील तळचीं महार्ह रत्ने बाहेर प्रकटून त्या प्रभेनें जगाला थक्क करणारे ग्रथकार अद्यापि मराठी कादबऱ्या लिहू लागले नव्हते."† तीच गोष्ट इतर वाङ्मय प्रकाराचीहि होती. उदाहरणार्थ श्री. रिसबूड याची 'मञ्जुघोषा' किंवा श्री. हळबेशास्त्री याची "मुक्तामाला" या मराठींतील सुरवातीच्या कादबऱ्या याची सजावट बेताबाताचीच झाली आहे.

विष्णुशास्त्र्याच्या निबधमालेनें आणि हरिभाऊ आपट्याच्या कादबऱ्यानीं राजकीय क्षेत्रात व सामाजिक क्षेत्रात एक प्रकारची क्राति घडवून आणलेली आहे. इ. स. १८७० मध्यें महाराष्ट्रात मोठी खळबळ उडाली होती. उद्धारक आणि सुधारक अशा जुन्या व नव्या मतप्रणालींनीं भारून गेलेल्या लोकामध्यें एक प्रकारचा उघड तट पडला होता. स्त्रीशिक्षण किंवा विधवाचा पुनर्विवाह इत्यादि विषयावर सभासमेलनातून भाषणें व लेख याची नुसती गर्दी उसळून गेली होती. या विचार क्रातीमधूनच खरें ललितवाङ्मय निर्माण झालें. हरिभाऊच्या कादबऱ्यानीं स्त्रीजीवनाची सहृदय बाजू माडली, विष्णुशास्त्र्याच्या निबधानीं

---

* निबधमाला, भाग १, पान १७४.

† मराठी गद्याचा इग्रजी अवतार, पान ८१.

त्याना " मराठी भाषेचे शिवाजी " होण्याच भाग्य मिळवून दिलें, शिवरामपंत परांजपे याच्या लेखणींतून जळजळीत देशाभिमान प्रगट झाला आणि केशवसुताच्या कवितेनें क्रांतीची तुतारी वाजविली.

इ. स. १८७४ ते १९२० हा कालखंड अशा प्रकारें एक प्रकारचा क्रांतिकाल होता यावेळच्या वाङ्मयाचा प्रमुख हेतु राजकारण, व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजसुधारणा या दृष्टिकोनातून लेखन करून समाजात जागृति निर्माण करण्याचा होता.

या कालखंडातील स्त्रीशिक्षणाचा प्रसार अतिशय बेताचा असा झाल्यामुळें व स्त्री वर्गाकडे सहानुभूतीनें पहाणारे लोक त्या वेळीं फार थोडे असल्यामुळें पुरुष लेखकांच्या बरोबरीनें सर्व प्रकारचे वाङ्मयीन कलाप्रकार स्त्रियांनी हाताळलेले दिसत नाहींत. प्रस्तुत प्रकरणात याच कालखंडातील स्त्रियांच्या वाङ्मयाचा विचार करावयाचा आहे.

• • •

## साळूबाई तांबवेकर

मराठी कादंबरीचा आरंभ करणाऱ्या लेखकांचा संस्कृताशीं फार निकटचा संबंध होता बाणभट्टाची " कादंबरी " आदर्श मानून त्यावेळच्या लेखकांनी लेखनास आरंभ केला असल्यानुळें त्यांच्या कादंबऱ्यांमधून अद्भुतरम्य कथानकें आढळणें स्वाभाविक होतं असें कथानक असणें हा त्या वेळच्या कादंबरीचा एक आवश्यक भाग होऊन बसला होता ! शिवाय " रूढीच्या चाकोरींतून समाजाचा गाडा शतकानुशतकें जात असल्यामुळें स्वातंत्र्य, ऐश्वर्य व प्रणय हे मानवी मनाला मोहिनी घालणारें त्रिभुवन त्याला सर्वस्वीं पारखें झालें होतें. कादंबरीचें विमान मिळताच समाजाचें मन या त्रिभुवनात स्वच्छंद विहार करूं लागलें.*" या कादंबऱ्या प्रामुख्यानें राजा-राण्यांच्या अद्भुतरम्य जीवनाचें चित्रण करीत असत आणि बाह्यत दिसणारा विरोध, आकस्मिक प्रसंग व योगायोग यावरच मुख्यत. त्यांचें कथानक उभारलेलें असे १८७३ मध्यें प्रसिद्ध झालेली साळूबाई तांबवेकर यांची " चंद्रप्रभा विरह वर्णन " ही कादंबरी याच पद्धतीची आहे.

साळूबाईची ही कादंबरी म्हणजे मनःकल्पित अशी एक मनोरंजक गोष्ट आहे हें पुस्तक काहीं अंशीं " हातीमताई "च्या जातीचें आहे. त्यावेळच्या इतर काहीं कादंबऱ्यांप्रमाणेंच येथेंहि अधून मधून साक्या, दोहे व आर्या पाहावयास मिळतात. या कादंबरींतील चंद्रप्रभा ही जादूगार असल्याचें दिसून

---

* वि. स. खांडेकर, धुमकेतु, पा. १२३

येते. कारण जादूनें स्त्रियाचे पक्षी आणि पुन्हा पक्ष्याच्या स्त्रिया ती बनवीत असते ! स्वतः लेखिकेनें या पुस्तकाच्या प्रस्तावात म्हटलें आहे कीं, "स्त्री शिक्षणात असलेल्या स्त्रियाचा व लहान मुलींचा काही वेळ करमणुकींत जाईल व सुबोधानें मनहि रंजन होईल अशा प्रकारचें एक पुस्तक करून त्याना यथाशक्ति सादर करावें असा हेतु माझे मनात उत्पन्न झाला." आणि त्याच हेतूनें या पुस्तकाची रचनाहि झालेली आहे. त्यावेळच्या रीतीप्रमाणें येथें चतुरंग शहराचें वर्णन आलेलें आहे.

स्त्रीनें लिहिलेली अशी मराठींतील ही पहिलीच कादंबरी होय. यापूर्वी मिसेस् फरार व मिस् विल्सन् या लेखिकानीं खिस्तीधर्माचे प्रसारार्थ मराठींतून लेखन केलें होतें. परंतु ही ग्रंथरचना ललित स्वरूपाची नसल्यामुळें प्रस्तुत प्रबंधात तिचा विचार करण्याचें कारण नाहीं.

० ० ●

# पंडिता रमाबाई

विष्णुशास्त्र्याच्या निबंधमालेच्या सुमारासच पंडिता रमाबाई यानीं आपलीं "स्त्रीधर्मनीति" (१८८२) व "युनायटेड स्टेटस्‌ची लोकस्थिति आणि प्रवास-वृत्त" (१८८९) हीं पुस्तकें भगिनीवर्गासाठीं म्हणून लिहिलीं. आपले विचार स्पष्टपणानें व्यक्त करण्यासाठीं पंडिता रमाबाई यानीं हातात लेखणी घेऊन त्यावेळच्या काळाच्या मानानें एक प्रकारची क्रांति केली असें म्हणावे लागेल.

"स्त्री धर्मनीति" या पुस्तकात स्त्रियांच्या जीवनाविषयीं लिहिताना त्या म्हणतात, "...चिंचोक्या एवढें किंबहुना त्यापेक्षाहि लहानसे बीं जमिनींत रोविलें असता, कालक्रमानें त्यापासून जसे मोठमोठे वृक्ष होतात व त्यापासून देशभर मनुष्यावर महदुपकार होतात, तसेंच प्रत्येक स्त्री जर आपआपले उद्योगरूपी लहानसे "बीं" कृत्यरूपी जमिनींत रोवील तर कालक्रमानें आमच्या जातीवर महदुपकार होतील.

"...उद्योग करा हेंच मी वारंवार सागतें. तुमच्या शरीरात जें रक्त आहे तें मनाच्या उत्साहामुळें उष्ण होऊन प्रत्येक धमनीवाटें मोठ्या मोठ्या वेगानें वाहूं द्या. तुमचें सजीवत्व लोकास समजू द्या. तुमच्या जातीचा उद्योग, ज्ञान, तेजस्विता, सत्य, ईश्वरपरायणता, सनीधर्म इत्यादि गुण सर्वांच्या दृष्टीपुढें येऊन त्याचीं मनें स्तब्ध होऊं द्या. आमच्या ह्या भारत वर्षांतील पूर्व काळच्या साध्वी स्त्रियाचा महिमा पुनरुज्जीवित करा. तुम्हास कोठें समरागणात जाऊन युद्ध करणें नलगे, तुम्ही आपल्या आळसरूपी शत्रूबरोबर निकरानें युद्ध करून त्यास जिंकिलें म्हणजे त्रैलोक्य जिंकिलें..." यापुढें आपल्या देशातील स्त्रियानीं समुदाच्या

मर्यादा ओळखून त्या दृष्टीनें आपल्या मनाची विशालता वाढवावी असें लेखिकेनें सुचविलें आहे शिवाय आपल्या धन्याची, आपल्या परिस्थितीची कुवत न ओळखता दागिन्याचा हव्यास धरून संसारात भाडणतंटे उत्पन्न करणें म्हणजे साध्वी स्त्रीनें नीतीविरुद्ध वागणें होय असे त्यानीं स्पष्टपणें सागून टाकलें आहे. गृहकृत्याविषयीं लिहिताना त्या सागतात, " गृहकृत्य हें स्त्रियाचच काम आहे. तें करण्यास त्यानीं कधीं हयगय करू नये ज्या घरात स्त्रिया आपल्या घरचें काम करीत नाहींत तेथें सुख नसते ज्ञानी लोकानीं ' गृहिणीच घर ' असें म्हटलें आहे.... "

पडिता रमाबाईचें हें पुस्तक म्हणजे स्त्रीजीवनातील दोषाचें एका स्त्रीकडून पहिल्यादाच स्पष्टपणें केलेलें दिग्दर्शन होय त्या दृष्टीनें या पुस्तकाचा दर्जा केव्हाहि उल्लेखनीय असाच राहील.

"युनायटेड स्टेटस्‌ची लोकस्थिति" या पुस्तकात रमाबाईनीं दिलेली माहिती त्याच्या सखोल अध्ययनाची साक्ष पटविते परक्या देशात गेल्यानतर त्या देशाच नैसर्गिक सौंदर्य पहात असतानाच रामाबाईनीं तेथील इतिहासाची व भूगोलाची भरपूर माहिती मिळविली. त्या माहितीच्या आधारावरच त्यानीं या पुस्तकात अमेरिकेंतील शासनपद्धति, लोकस्थिति, गृहस्थिति, विद्याभ्यासग, धर्ममतें आणि दानधर्म, स्त्रियाची स्थिति आणि व्यापारधदे इत्यादि विषयीं सुदर विवेचन केलेलें आहे. तेथील स्त्रियाच्या फॅशनविषयीं बोलताना त्यानीं वापरलेला " नखरा " हा शब्द वाचकाच्या मनात दुहेरी दृष्टीनें लक्षात रहाण्यासारखा असा योग्य स्थळीं पडलेला आहे. एखाद्या विषयावर स्त्रीनें व्यासग करून केलेलें लेखन म्हणून सुरवातीच्या काळातील या पुस्तकाचें महत्त्व विशेष आहे. याच पुस्तकात लेखिकेनें " लिवरपूलपासून फिलाडेल्फिया " पर्यंतच्या आपल्या प्रवासाचें वर्णन दिलेलें आहे त्यावेळीं पडिता रमाबाई ह्या इग्लडमधील चेल्टनूहम्‌ शहराच्या स्त्री विद्यालयात अध्ययन व अध्यापन करीत होत्या. १८८६ च्या मार्च महिन्यात डॉ. आनदीबाई जोशी याना वैद्यकीय पदवी देण्याचा जो समारभ होणार होता, त्यासाठीं त्याना निमत्रण आल्यावरून त्या फिलाडेल्फियास गेल्या होत्या. त्यावेळीं प्रवासात झालेल्या समुद्रातील वादळाचा त्रास त्यानीं पुढीलप्रमाणें वर्णन केला आहे.--

" समुद्राच्या पर्वतप्राय लाटाच्या जोरानें आमची नाव एकदा आकाशात आणि एकदा पाताळात जाई तेव्हा ती आता बुडते की क्षणात बुडते असा सशय सहज मनात येई. त्या अफाट पारावारशून्य समुद्रात वरच्या बाजूस कधीं स्वच्छ, कधीं आभ्राच्छादित असा गोल चादवा, खालीं हिमाच्याच्या लहान लहान टेकड्याएवढाले कल्लोळ आणि त्यावर आपटत असलेली आमची नाव... भोंवतालच्या देखाव्याशीं तुलना केल्यास आमची नाव पाण्यावर तरगत असलेल्या लहानशा उडत्या माशागारखी दिसत होती म्हटल्यास चिंता नाहीं...."

अमेरिकेंत पडणाऱ्या बर्फाचें आकर्षण फार लेखकांनीं मोठ्या उत्सुकतेनें आजवर रंगविलेलें आहे. त्याच आकर्षणाने मोहित झालेल्या पंडिता रमाबाई लिहितात, " तुषार पडताना शब्द मुळींच होत नाहीं. कोणी उभें राहून बारीक सपीट चाळींत असता तें जसें हलकेंच जमिनीवर पडतें व तें खालीं पडल्याचा शब्द कोणाला ऐकू येत नाहीं, त्याप्रमाणें तुषारहि कोणाला नकळत पडतो. त्याचे कण आकाशातून खालीं येतात, तेव्हा ते पांढऱ्या जाईचे फुलांच्या नाजूक पाकळ्यांसारखे नाचत बागडत, उडत पडत, गोंधळत मोठ्या घाईनें धावत येत असलेल्या अणुरेणू एवढाल्या आनंदी पऱ्याप्रमाणे सुरेख दिसतात."

पंडिता रमाबाईंच्या ह्या उपमा स्त्री हृदयातून निघालेल्या असल्यानें येथें विशेष हृद्य झालेल्या आहेत. त्यांची वर्णनाची हातोटीहि चित्ताकर्षक असून त्यांचे ठायींच्या स्त्रीस्वभावाचा सुंदर आविष्कार येथें झालेला दिसून येतो.

० ० ०

## काशीबाई कानिटकर

काशीबाई कानिटकर ह्या हरिभाऊ आपट्यांच्या समकालीन अशा लेखिका होत. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांची छाप त्यांच्या वाङ्मयावर बरीच पडलेली दिसते. " जेन ऑस्टेन व डिकेन्स या दोघांनीं इंग्रजी कादंबरीला जें वळण लावलें, तेंच हरिभाऊंच्या लेखणीनें मराठी कादंबरीला लावलें. मानवी सुखदुःखें राज्यक्रांत्यापेक्षाहि हृदयांत घडून येणाऱ्या परिवर्तनावर अवलंबून असतात. घरोघर आणि गांवोगांव जुनीं मतें व नवीं मतें यांच्यात जी रस्सीखेंच चालली आहे तीच सर्व बऱ्यावाईट सामाजिक प्रसंगांच्या मुळाशीं आहे. रूढी, शिक्षण, मनुष्यस्वभाव इत्यादिकांच्या मिश्रणानेंच कौटुंबिक व सामाजिक जीवन निर्मळ अथवा गढूळ होतें, हें लक्षात घेऊन हरिभाऊंनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. "* हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं मराठींतील कादंबरीचें नवें युग निर्माण केलें आहे.

हरिभाऊंनीं आपलें लेखन जोरानें सुरू केलें, त्यावेळीं स्त्रीशिक्षणाचा पाया भक्कमपणे घातला जात होता. त्यामुळेच एका विशिष्ट दृष्टिकोनातून त्यावेळच्या सुशिक्षित स्त्रीचें चित्र पुरुष कादंबरीकारांनीं चित्रित करण्यास आरंभ केला. पण सुदैवाने याच वेळीं मराठी कादंबरीच्या परिसरात एक अभिनव प्रयोग करण्यात आलेला दिसून येतो. स्वतःच्या भावना स्वतःच्याच शब्दांत रंगविण्याची अभिनव कल्पना काशीबाई कानिटकरांनीं अमलात आणली. हरिभाऊंच्या उत्तेजनानें त्यांनीं आपलें कादंबरीलेखन सुरू केलें. त्यावेळच्या समाजाच्या दृष्टीनें हा प्रयोग सरो-

* वि. स. खांडेकर, धुंधुर्मास, पान १२८.

विरजलेलं ! ! इतक का बरं आता लक्षात येऊ नये ? बुक नि पत्रं हीं सारा दिवसभर आहेतच. पण सकाळीं दोन घटका सध्याकाळीं दोन घटका नको का बघायला ? आपला बाई हा बायकाचा जन्म. निती जरी ब्राह्मणपण असल, निती जरी श्रीमंती असली तरी अगोदर हें ब्राह्मणपण नी त्याच्यामागून ते, तेंही राहिल्या-साहिल्या वेळातल. का मी खर म्हणतें कीं, खोट म्हणतें सगुणाबाई ? तुम्ही सागा.

सगुणा.—खरच आहे ते. बायकाना ढीग लिहिण आल तरी त्याच्या कपाळचीं मडकीं खरडायचीं चुकतील का ? तीं त्याना खरडलींच पाहिजेत.

राधाबाई:—अस, कस बर बोललात ? दूध दुभ्त, पक्वान्न निकान्न हीं बायकाना आलींच पाहिजेत; आणखी तीं त्यातून येण म्हणजे भूषणहि आहे. तसच काहीं झाल केल म्हणजे पान वाटण, चागला सैंपाक करण हें सुद्धा आल पाहिजे.... "

*या कादंबरींत याशिवाय नारायण पेठी लुगड्याचा वापर सागणारा किंवा* " तीन आणे किंमतीची गुलाली किंवा पारव्या खणाची चोळी जाऊन वीत वीत काठाची रेशमी धारवाडी खणाची चोळी आली. भिवंडीचा बाड जाऊन नारायणपेठी काळी चंद्रकळा झळकू लागली. " असा त्यावेळचें समाज जीवन सागणाराहि उल्लेख आढळतो.

त्याचप्रमाणें येथें " आता तिच्या ( रगूताईच्या ) पोटात दगड उभा राहिला आहे. " ( काळजी ) किंवा " एकदा डोकीवरच सात्यावर येऊ दे बाबा " ( सपूठकूच्या लग्नादून मुक्त होण्यासाठीं मथूताई ) अशा विविध घरगुती म्हणींचा वापरहि आढळतो.

" रगराव "पेक्षा " पालखीचा गोंडा " ही काशीबाई कानिटकराची दुसरी कादंबरी जास्त घरगुती आहे. " ही कादंबरी १८९७ सालीं मला मिळाली. " असें खुद्द काशीबाईनींच या कादंबरीच्या प्रस्तावादाखल लिहिलेल्या " दोन शब्दात "त म्हटलें आहे. त्यावेळच्या सामाजिक परिस्थितीचें सुदर चित्र येथें पहावयास सापडतें. लेखिकेनें स्वत.च म्हटलें आहे कीं, " त्यावेळच्या परिस्थितीचें चित्र या कादंबरींत पहावयास सापडेल. " तेव्हा या कादंबरीच्या यथायथ्यताचें मूल्य मापन करताना हीच गोष्ट प्राधान्यानें ध्यानात घ्यावी लागेल.

" हत्तीची अंबारी मिळो कीं न मिळो पण जिथें पालखीचा गोंडा, मोत्याचा कठा असेल अशाच घरीं मुली द्यायचा हा तर बाई माझा पण आहे " असा जिच्या आईनें निश्चय केला होता अशा रिऊताईचें हें एक जीवनचित्र आहे. एका बेडसर युवराजाशीं फसवणुकीनें रिऊताईचें लग्न होतें. त्यामुळें तिला व तिच्या आईवडिलानाहि मनस्वी ताप होतो. पण याहि मन.स्थितींत स्वउ.च्या कर्तबगारीवर ती आपल्या राज्याची व्यवस्था पाहाते व शेवटीं तीर्थयात्रेस निघून जाते, असें या कादंबरीचें अगदीं थोडक्यात कथानक आहे. कथानकाची एकदर

गुंफण चांगली झालेली आहे हें मान्य केलें तरी त्याहिपेक्षा स्वभावलेखनाची कला काशीबाईंना चांगलीच अवगत होती या गोष्टीची कल्पना येथें प्रामुख्यानें आल्याविना रहात नाहीं. नानासाहेबासारख्या वेडसर मुलाच्या स्वभावलेखनाची चुणूक अगदीं पहिल्याच प्रकरणात आलेली आहे. सुरवातीपासून अखेरपर्यंत नानासाहेबाच्या वेडसर लीलांचें वर्णन काशीबाईंनीं मोठ्या कुशलतेनें चितारलेलें आहे. सुरवातीला दिसणारे व्यक्तीमधील गुणदोष प्रसंगातून जसेच्या तसे फिरते ठेवणें ही एक मोठी कला आहे. कादंबरींतील स्वभावलेखनाचा हाच विशेष होय. हरिभाऊ आपट्यांचें लेखनातील यश आज त्यांच्या अशाच प्रकारच्या स्वभावलेखनाच्या तेजस्वी हाताळणीमुळें चिरंतन झालेलें दिसून येतें. त्यांच्या संगतीमुळेंच काशीताईंनीं या कलेंत यश मिळविलें असावें असं म्हणावयास हरकत नाहीं.

रिऊताई, तिचे आईवडील, भाऊ नाना व भगिनी मनुताई आणि तिच्या सासूबाई–राणीसाहेब–यांच्या स्वभावरेखा एकापेक्षा एक सरस वठलेल्या येथें दिसून येतील.

या कादंबरीमध्यें सामाजिक जीवनाचें दर्शन घडविताना काशीबाईंची लेखणी स्त्रीस्वभावाला धरूनच विशेषतः चालताना दिसते. कादंबरीची सुरवातच मुळीं अशा घरगुती प्रसंगानें झालेली आहे कीं, ती वाचताक्षणींच येथें आता भरपूर घरगुती प्रसंगाचें रम्य दर्शन घडावें अशी वाचकाच्या मनात कल्पना उभी रहावी. हा प्रसंग असाः—

" एकदा तिसऱ्या प्रहरीच्या वेळीं आमची आई, नाहरकाकाची लक्ष्मीराव, परसूकाकाची अपूकाकू, आणखी आमची मोठी मामी अशा सगळ्या जणी आपापल्या घरची डाळ, तांदूळ निवडावयाला बसल्या होत्या. आईनें मला आणि ताईला चिपटें चिपटें डाळ निवडावयाला दिली होती. ती झाल्याशिवाय खेळावयाला जायचें नाहीं, असें तिनें सांगितलें होतें, म्हणून आम्ही दोघी त्याच्यात होतों, नाहींतर आम्हाला मोठ्या बायकांत फारशी बसू देत नसे.

"ते दिवस पावसाळा संपण्याचे होते. नवरात्राची सहावी माळ होती. डाळ निवडून झाल्यावर देवीला जायचा सगळ्यांचा बेत होता.

" त्या आपल्या एकमेकींत इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत [illegible] कार्याच्या गोष्टी निघाल्या. अपूकाकू म्हणाल्या, " रमाकाकू तुमच्या [illegible] नाहीं का लग्न यंदा ? " तेव्हा आई म्हणाली, " नाहीं [illegible] ?, यंदा [illegible] ठेवायचं, यंदा केलं म्हणजे कशी ठीक नवरी दिसेल. तिंदीपहा [illegible], नाहींतर तो मोठ्या मुलींना नाहीं बाई शोभत... "

त्यावेळीं अधिकारी नवऱ्याबरोबर कुठे फिरतीवर [illegible] दररोजच्या सैंपाकाला लागेल एवढ्या जिनसा [illegible] दोनचार महिन्यांची साधारणतः ही फिरती असे. [illegible]

स्त्रीस्वभावानुसार स्त्रिया पाट्या वरवंट्यासह सामान नेत ! असाच एक प्रसंग रंगविताना " आमचा बेत ठरला " या प्रकरणात काशीताईंनी लिहिलें आहे—

"आई —अण्णा, परवा रे कस निघणं होईल? सारा पसारासिसारा आवरून बरोबर काय घ्यायचें तं घेऊन व्हायला नको का ?

मामा —व्हायच व्हायच ते काय ? दोन बुगडीं घ्याचीं आणि निघान झाले आज काय नव्यान का जायच जाह पिरतीवर ?

आई —अण्णा, मला तुमच पुरुषाच मोठं नवल वाटत तुम्हाला नाहीं लागत नाहीं, काय लागत तें आम्हा बायकांना, अशी आपली तुमची समजूतच नाहीं बर !

मामा —अक्का, तुला राग येऊ देऊं नको पण आम्ही पुरुष जर गावाला जायला निघालों तर आमची एक ट्रंक आणि वळकटी झाली कीं, झालं आपला कारभार आणि तुमच म्हटल कीं, आपल पर्वतप्राय ओझं आवरता आवरता पुरे वाट ! कुठें पाटाच घेतील, कुठें जातच घेतील, मिठाचा राजण घेतल्याशिवाय कस बाई चालेल ? स्वयपाक घरातली मोरी घेतल्याशिवाय हात कुठ धुवावेत असा तुमच्या अडचणी निघतात !

आई —पुरे रे तुझ ! मोरीन्, जातन् मिठाचा राजण का मी बरोबर घेत असतें दर खेपेला ! आता पाटा म्हणशील तर तो बरीक लहानसा बरोबर लागतो तो तरी आमच्यासाठीं का लागतो ! तुम्हा पुरुषाच्या पानावरच वाढायला कुठें मीठ चटणी लागते, तेवढ्यासाठींच घ्यावा लागता नुसत पान वाढल तर तें चांगल दिसणार नाहीं म्हणूनच ना ! जें लागत तें तुमच्या पुरुषासाठींच आम्हाला काहींच लागत नाहीं आचारी बुदीमोतीचुराच झारे बाळगतो तो का बाळगतो ? तसच आम्हाला डोंगराएवढ सामान लागत तं तुमच्यासाठीं लागत बर "

" मामा —पण पैठण ठरवायला हवी ना ? का आगगाडीन जाण्याचा विचार करता ?

आई —आगगाडीची नको बाबा कटकट इथून तितक जाऊन तरी पुढें टांग्यातच जायच ना ? तीनतीनदा चढा उतरायला तरी नको इथ एकदा सामान भरल कीं आपल्या दारापाशीं जाऊन उतरलं तें सुखानं होईल

मामा —बर तर पाहाता पैठण, पण सामान पैठणीच्या बेतानेंच घ्या हो ? नाहींतर घ्याल बैलगाडी सारख ! "

अशा प्रकारचे संवादहि यथें मधून मधून आढळतात त्यात सूक्ष्म विनोद, सहज सुंदरता आणि ओघवता घरगुती भाषा आलेली आहे शिवाय हे संवाद यात नाट्याच्या दृष्टीनें चटकदारहि आहेत यात शंका नाहीं

मुलींना भावल्याचा विशेष नाद असतो भातुकलीचा मेळ मांडून नाचून त्या आपल्या भावी जीवनाचं स्वप्नच साकार करण्याचा प्रयत्न करीत असता

मुलींचा हा भावल्यांबद्दलचा स्वभावविशेष काशीताईंनीं पुढील शब्दांतून व्यक्त केलेला आहे.

" ...आज देईल ते दोन पैसेसुद्धां त्यांतच घालून पहिल्यांदा एकच चांगली बाहुली घ्यावयाची, आणि समाईकीनें दोघींनीं खेळावयाचें, असा बेत करून आम्ही आपले सागरगोटे, कवड्या ठेवण्याचें झोळणें काढिले. त्यांतल्या चिंध्याचांध्यांच्या पुरचुंड्या गाठोड्या शोधतां शोधतां पया पैसे मिळून दोघींचे दोन दोन आणे जमले. इतके पैसे जमल्यावर मग समाईक बाहुली आणण्याचें कारणच उरलें नाहीं. दोघींनीं निरनिराळ्या बाहुल्या दोन दोन सव्वादोन दोन आण्यापर्यंत आजच आणण्याचें ठरलें.

...आमचा बेत ठरला....आम्ही लागलीच त्या बाहुल्यांना आणल्या-बरोबर साड्या कोणत्या नेसवाव्या, त्यांच्या अगावर पहिल्या दिवशीं दागिने काय घालावे, याचे बेत करीत बसलों...

.. मीं म्हटलें, " मी आपल्या बाहुलीस भरगच्ची शालू नेसवीन! " बारी म्हणाली, " मी बुट्टयाचा शालू नेसवीन! " ताई म्हणाली, " माझ्याजवळ बाई एक चांगलसं जरीच पातळच आहे, तें नेसवीन." हे आमचे बेत चालले होते. " नव्या बाहुलीला छान छान पोशाख, छान छान दागिने घालून आपण नटवू, आणखी उद्यां भातुकलीला घेऊन पुष्कळ मुली जमवून त्यांना आपल्या राजाच्या राण्यांसारख्या बाहुल्या दाखवू. ती आपली द्वारकी ती! तिनें कबूल केलें तर आपण तिच्या बाहुलीशीं लगीन करू गडे. अनू, तू एक तुतारी नाहींतर घोडा असच घे बर का. " असें आम्हीं त्याला सांगितलें. तो म्हणाला, " त्यांतलच काय म्हणून घ्यायच ग ताई? " ताई म्हणाली, " अरे, आम्ही जेव्हा भावलीच लगीन लावू, तेव्हा तुझी तुतारी वाजल्यासारखी वाजवायला होईल. घोडा आणलास तर नवरा मुलगा न्यायला आणखी वरात आणायला उपयोगीं पडेल. " हें बोलणें ऐकून बारी म्हणाली, " इश्श! वरातीला घोडा कसला? खेडेगावसारखी चांगली पालखी नाहींतर हत्तीची अंबारी असावी, नाहीं का ग माई? " मी म्हटलें, " अग बारे, हवं सगळं, पण आपल्याला मिळायला पाहिजे ना? " बारी म्हणाली, " न मिळायला ग झाल काय! आपल्या धिंताकाकूच्या द्वारकीच्या आतेबहिणीची मांग श्रावणपाटी आली त्यांत सगळें आहे. पालखी, मेणा, घोडे, त्यांतलं आणूं आपण मागून. नाहींतर द्वारकीलाच आणायला सांगू. " ताई म्हणाली, " हो हो गडे, ही बरी युक्ति काढलीस. आपण आपली तिलाच करू नवऱ्याकडली. म्हणजे ती आपल्या मुलीला दागिने आणखी साड्या चांगल्या घालील. झालंच म्हटलं तर लगीनसुद्धां धादामाडान करील. "

मी म्हटलं, " त्यांत बाई दोन नडी आहेत. एक आपली बाहुली नित्य द्यावी लागेल, आणखी तिची सनादा आर्जवं करावीं लागतील. ती होणार

मुलाकडली मग आपण आपलं तिच्यापुढें नाक घासायला तयार झालं पाहिजे. आपली बाहुली तिला दिली म्हणजे मग ती काहीं परत घेणार नाहीं. मग आपल्याला पुन्हा एकच बाहुली !" ताई म्हणाली, "आपण आपली तिच्याशीं बोलीच करू कीं, लगीन झाल म्हणजे आठ दिवसानीं आमची बाहुली आम्हाला परत दे म्हणून !" वारी म्हणाली, "अस कस ग होईल ! एकदा लगीन करून दिलेली बाहुली परत का कुणी आणतात ? लगीन झाल कीं, मुलीवर सासरचा हक्क असतो म्हणतात महाराज बरं का !" ताई म्हणाली, "हें काहीं खरच माणसाच लगीन आहे वाटत ?..."

आणि अशा या भावलीच्या लग्नाची हकीकत देऊन पुढें काशीताई सागतात–" रुखवत नेलें, आणखी नानानें खरोखरच मारती गञ्याला सागून बाबाच्या घोड्यावर खोगीर घालवून आणलें. नवरा मुलगा घोडयावर बसविला. दोन पावलें घोडा चालला नाहीं तोंच नवरा मुलगा खालीं घोडयाच्या पायाशीं पडला...हा सारा खेळ या नानिटल्याने केला...(घोडा मोडला नाहीं !)

झालें. अशा काहीं गमतीच गमती होऊन आमच्या बाहुलीचें लगीन पडलें एकदाचें पार. माडव परतण्याला आईने मोठी भातुकली केली. खूप मुली आल्या होत्या. मागल्या परसात पुष्कळ जणी गिळून फुगड्या, झिम्मा, गोफ विणणें, आठजणींचा झिम्मा, असे पुष्कळ खेळ खेळलों. मग आमचे फराळ झाले. फराळ करिताना आम्ही द्वारकीला खूप उखाणे घातले. पण भाडण बिंडण काहीं झालें नाहीं. हळदीकुंकू, विडे, ओट्या झाल्यावर सर्व मुली आपापल्या घरीं गेल्या..."

बाहुलीच्या लग्नाच्या या हकीकतीमधून काशीताईनीं त्याच्या काळच्या खरोखरीच्या लग्नाच्या चालींतील बारकावा सागितला असून, एक प्रकारें जुन्या काळच्या सामाजिक इतिहासाचीहि नोंद केली आहे, असें या ठिकाणीं अवश्य म्हणता येईल.

मुलगी सासरीं जात असताना तिच्या वियोगाचें स्त्रीला होणारें दु:ख अवर्णनीय असतें. मुलगी जन्मल्यापासून तिच्या आईच्या रक्तातील अणुरेणू तिच्या वाढीसाठीं खर्ची पडलेला असतो. त्यामुळें मुलगी सासरीं जात असता ती आता परक्याची झाली या भावनेनेंच तिच्या मनाला विलक्षण यातना होत असतात. त्या यातनाचा आविष्कार काशीताईनीं पुढीलप्रमाणे केला आहे—

" अशा रीतीनें गौरीहराजवळचा विधी झाल्यावर आईकडे ताई गेली. आईनें तिला पोटाशीं घट्ट धरलें व आज चार दिवस जे अश्रु दाबून ठेविले होते त्याना तिनें डोळ्यावाटें मोकळी वाट करून दिली. ती आपले सर्व विचार, सर्व दुःख पाण्याबरोबरच बाहेर व्यक्त करीत होती, तिच्यानें एक शब्दहि बोलवला नाहीं. फक्त ती आपल्या पदरानें आईचे डोळे पुशीत होती. मधून मधून तिच्या तोंडावरून व पाठीवरून हात फिरवीत होती. त्याचप्रमाणें ताईहि करीत होती. ती आपली

ते नाजूक, कमळाच्या देठासारखे हात आईच्या गळ्यात घाली, केव्हा त्या हातानीं आईच्या कमरेला विळखा घाली. या कृतींवर त्याच्या अंत:करणातील भाव व्यक्त होत होता. "

आणि अशा वेळीं आजवर आपल्याशीं घटोघटी खेळलेली; आपली ताई सासरीं जात आहे, या कल्पनेने तिच्या बहिणीच्या मनात उडालेला गोंधळ काशीताईंनीं मोठ्या कुशलतेनें कसा व्यक्त केला आहे पहावा—

" ताईचं शुभ लग्न सावधान " झालं त्याच वेळेपासून तिचा पुन्हा जन्म झाला. आमची पहिली ताई त्या दिवशीं इहलोक सोडून त्याच देहात ही दुसरी ताई अवतरली. आता आम्ही सर्व तिच्या हाडामासाचीं, एका रक्ताचीं माणसं दुरावून सप्तसीन वश झालेलीं माणस आता तिला जवळचीं झालीं. मी आता एकटी झालें... " ही कल्पना मनात येताच मला अशी उत्कंठा कीं, या आपल्या ताईच्या—ती फारशी अजून आपल्याला परकी झाली नाहीं, तोंच—गळ्याला घट्ट मिठी मारून भेटून घ्यावें. आपल्या मनाशीं तिच्या मनाची गाठ एके ठिकाणीं बांधून टाकावी. तिचा स्पर्श आपल्या अंगात साठवून ठेवावा. तिचे सुंदर शब्द आपल्या कानात भरून घ्यावे. असें मनात येऊन मी आपले हात पसरून ताईला मिठी मारण्याकरिता पुढे केले तोंच ठकीनें मला दडाला धरून हालविली व ती म्हणाली, "चल, आपण तिकडे बायका बसल्या आहेत तिकडे जाऊ. " मी शुद्धीवर आल्यासारखी होऊन इकडे तिकडे पाहिलें, मला अतिशय गहिंवर आला, माझें रडें मला आवरेना आणि मी डोळे पुशीत पुशीतच ठकी, वारी याच्यामागून काहीं एक न बोलता बायकामध्यें जाऊन बसलें " (वरातीची धादल).

पुष्कळदा असें आढळून येतें कीं, सुरवातीला सर्वांच्या मतें पसंत पडलेलें चांगलें स्थळ बघून समाधानानें मुलगी देतात. पण त्यानंतर काहीं दिवसानीं दुर्दैवानें असें घडतें कीं, तेंच चांगलें स्थळ म्हणजे नुसता कैदखाना होऊन बसतो. आणि अशा कैदखान्यात नाइलाज म्हणून शेंकडो नववधूंना डांबून घ्यावें लागतें. आजवरच्या रूढीप्रमाणें " पदरीं पडलें नि पवित्र झालें " अशा समजुतीवर " हेंच आपलें घर ", इथच आपला घास मापला आहे ", " इथच आपला देह झिजवायचा आहे", "आपल्या नशिबान खैर करून आपल्या वाट्याला दिलेली ती हीच जागा आणि म्हणूनच हेंच आपलं सार काहीं " अशा प्रकारच्या समजुतीनं सासरीं कितीहि त्रास होत असला, तरी स्त्रीला तिथें दिवस काढावे लागतात. अशा परिस्थितींत तिच्या मनाचा होणारा कोंडमारा काशीताईंनीं पुढील शब्दांतून व्यक्त केला आहे.

" ठकी म्हणाली, " थोड थोड उजाडल्यापासून माध्यानीपर्यंत आणसी च्यार वाजल्यापासून ते दिवे लागणीपर्यंत सारखं पाण्यात असायचं ! पाझला गेल

तर घरात आम्ही तीनचार माणस आहों, पण पाणी किती लागत त्याचा नाहीं सुमार ! ! मग, सकाळीं उठून केर काढायचा झाला तरी नदीच्या ताज्या पाण्याच्या दोन घागरी जेव्हा केरसुणीवर ओताव्या तेव्हा केर काढाना, तें झाल कीं गोऱ्या धुवायच्या, पहिल्यादा साध्या केरसुणीन, मग सराय्वान, आणखी तिसऱ्यादा काथ्याच्या घासणीन घासून काढायची, त्या प्रत्येक धुण्याला चारचार घागरी पाणी ओतायच, मग धुर्णी वाळत घालायची काठी धुवायची, घागरी घेऊन घासून घासून तिच्यावर दोन घागरी पाणी ओतायच म्हणजे ती धुर्णी पसरायच्या योग्यतेची सोवळीं झालीं ! ! " मी म्हटलें, "रोज वगाला काय्या सोडायच्या आणखी बाधायच्या ? " त्यावर टकी म्हणाली, "अग बाधलेल्या किंवा पक्क्या बसविलेल्या काठ्याची नाहीं ना प्रक्षाळपूजा करायची!".

"...रोजचीं धुर्णी सात वेळ पाणी घालून, आपण ओल नेसून आणखी जनश पोटीं वाळत घालावीं लागतात. इतक्या सोवळ्यात अगदीं जवळ करण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, त्याना भट्टीवरचे डाळे चिरमुरे चालतात ! ! चिवडा खाण्यास हरकत किंवा सोंवळ आड येत नाहीं. मला बरीक पाणी आणता आणता पुरे- वाट होते. दिवसातून कमींत कमी शभर घागरी पाणी लागत. बिचारा गावणींना बैल आणखी मी सारख्या नदीच्या खेपा करीत असतों. सैपाकाला आणखी प्यायला पाणी आणायच असत त्याचीहि अशीच गमत आहे. जाताना घरातल पाणी एका कळशींन घ्यायच, कमरेवर रिकामी घागर घ्यायची, आणखी हातातल्या कळशीन प्रत्येक वेळीं पाय द्यायच्या जागीं पाणी टाकून त्यावर पाय द्यायचा ! ! अस करीत करीत नदीवर जायच आणखी तसच करीत परत यायच "...

या कादंबरीच्या उत्तरार्धांत या प्रकारच्या पूर्वार्धापेक्षा अगदीं वेगळें जगें संस्थानी वातावरण विशेष आलेलें आहे. त्यामध्यें रिजताईसारख्या राणीनें स्त्रियांच्यासाठीं खास असें जें कार्य अंगिकारिलें त्यास विशेष स्थान आहे. "पालखीचा गोंडा " हें कादंबरीचें नाव शेवटीं संस्थानच्या नामाभिनाशीं निगडित झालें आहे. त्याबद्दल काशीताई लिहितात—

"शिक्षिका विद्यालयात ज्या स्त्रियाना किंवा मुलींना घेतल्या जातात, त्या बहुतेक लहानपणीं लग्न होऊन पुढ नवऱ्यानीं आवडत नाहीं म्हणून टाकलेल्या, नवऱ्यानीं आवडीच्या बायका करून पहिलीचा छळ होत असलेल्या, नवरे मरून गेले असल्यामुळ अनाथ झालेल्या, नवरा व्यसनाधीन झाल्यामुळ नित्य मारहाण करून घराबाहेर घालवून दिलेल्या असाच तरुण होतकरू अनुदार मुलींच्या साठीं शिक्षिका विद्यालय काढल..."

या कादंबरीतहि काशीताईंची वर्णनशैली अपूर्व अशी साधली आहे. समोर दिसेल त्या प्रसंगाने या व्यक्तींचें हुबेहूब चित्र वाचकाच्या मनावर ठसेल

याची त्यानीं विशेष दक्षता घेतली असावी, असें काहीं वर्णनावरून दिसून येतें आजच्या वाङ्मयात स्वतंत्र रीतीनें रूढ होऊ पहात असलेल्या शब्दचित्राची सुरवात लेखिकाच्या वाङ्मयाच्या दृष्टीनें काशीताईंच्या या कादंबरीमधून झालेली दिसते! हरिभाऊंच्या सहवासानें काशीताईंची लेखणी किती वास्तव चित्रें रगवू शकली याचें हें उत्तम उदाहरण आहे वर्णन करायला लागल्या म्हणजे काशीताई आपल्या लेखणीशीं त्यातील वर्ण्यविषयाशीं, किती एकजीव होऊन जात हें पहावयाचें असेल, तर पुढील भाग उदाहरणादाखल घेता येईल —

"ताई त्या दिवशीं पादर शुभ्र जरी काठाच रेशमी पातळ नेसली होती, अगात तसाच लाब बाह्याचा जरी पीत लावलेला शिरणीला मोतीं जडवलेला असा लाब टोणा घातला होता कबरेला हिरे-मोतीं वगैरे बसवलेला पट्टा घालून त्याला मधून मधून सोन्याच्या शेंग्या आहेत अशा म्यान्याची व जडीत मुठीची चिमुकली तरवार लटकावली होती डोकीस हिरे बसविलेली मुकुटवजा टोपी घातली होती, व तिच्यावर मोत्याचा तुरा लटकत होता. कपाळाला कस्तुरी टिळा व केशराची चिरीहि, कुकू लहान दोन्ही भिवया मध्येंच लावल होन कानात लाब लाब पाचेचे लोलक लोंबत होते अगोदरच ताई फार सुदर, त्यातून तो आजचा पोशाख फारच नामी दिसत होता तिच तें सरळ नाक, विस्तीर्ण भालप्रदेश, आकर्ण नयन, पोवळ्याच्या सरासारखे ओठ आणि कमळाच्या पाकळीप्रमाण गुलाबी छटादार कपोल, याला तो पोषाख अनुरूपच दिसत होता खरोखरच ताई त्या दिवशीं साक्षात् सरस्वति किंवा लक्ष्मीच आहे असा भास होई " (दरबार पहिला)

"सूर्य खालीं जाऊन लालभडक झाला होता त्याचा तो वाटोळा गरगरीत टोळा, जसा चेंडू उडया मारता तसा उडया मारीत होता आभाळ वरती अगदीं मोरपिशी बागड्याच्या रगाचें झाले होतें जशी काहीं दोन रगाच्या कापडाची एक रेशमी दुलईच शिवावी, असें दिसत होत किंवा दोन रगाचे शाल एक ठिकाणीं जोडून त्याचा पडदा सूर्यानें आपल्या विश्रांति घेण्याच्या खोलीच्या दाराला लाविला आहे, असें मला वाटलें

या ज्या सर्वत्र पसरलेल्या चादण्या आहेत, त्या काहीं तरी युक्ति करून वर जावें आणि आपल्या साडीच्या ओच्यात गोळा कराव्या म्हणजे मग आपल्याला रत्नच रत्नें होतील एकदा वाटे कीं, तीं सगळीं रत्नें गोळा करून एक ढीग करावा आणखी मग आपल्या मैत्रिणींना गमत दाखवायला बोलावून सगळ्यानीं मन पूत उडवावीं तीं खूप उच उच फेकून, सागरगोट्यासारखीं झेलावीं त्याचे सागरगोटे करून या आकाशातच बसून एकमेकींवर आटक्या लावाव्या "
. (आमचा प्रवास)

अशा प्रकारचें काशीताईचें हें कल्पनावैभव खास स्त्रीस्वभावाला उठून दिसेल असें वैशिष्ट्यपूर्ण झालें आहे. कारण इथें प्रकट झालेले उपमा दृष्टांत आणि वर्णन ही स्त्रीच्या लेखणींतूनच निघू शकतील अशीं आहेत.

या कादंबरींत मधून मधून प्रसंगानुरूप—"खरच बाई, ताईच्या गुणाहृपासारखा जर नवरा मिळाला असता, तर मला वाटतें आज हा जो तिला आईच्या म्हणण्याप्रमाणे पाल्खीचा "गोंडा" मिळाला आहे, त्याच कौतुक झाल असत. पण अशा या प्रकारामुळें तो "गोंडा" नमता मिळाला तरी पुरवता. पण मुख्य सगग नीट पाहिजे होत." आत्याबाई म्हणाल्या, "तिणेन् देवापाशीं पुष्कळ दौलत दिलीन् पण शकर चागला पुजला नाहीं, त्यास काय करावें?" असें या प्रकारें लिहिलेलें संवादलेखन चित्तवेधक आहे.

काशीताईची या कादबरींतील भाषा अतिशय साधी, घरगुती, ओघवती आणि चित्तवेधक आहे. मधून मधून तींत आढळणारे काहीं तुरळक संस्कृत शब्द सोडले तर जुन्या मराठीचा एक चागला नमुना म्हणून तिच्याकडे पहावयास काहींच हरकत नसावी. स्त्रीस्वभावाचें वैशिष्ट्यपूर्ण दिग्दर्शन घडविणारी कादंबरी म्हणून या कादबरीचें स्थान मराठी सारस्वतात बरेंच मानाचें राहील. अर्थात् आजच्या कादबरीच्या तत्राच्या मोजमापानें त्याच्याकडे पाहून चालणार नाहीं. स्त्रीलेखिकानीं कादंबरीच्या प्रातात शिरून आपला मार्ग सुकर केल्याची ही पहिली वहिलीच निशाणी आहे. त्या दृष्टीनें पाहिलें तर काशीताईनीं यशालीचें यश मिळविलें असें म्हणावें लागल. येथें घोडनवरी, कापडचोपड, चौघडी, पैठण, मूठभर भात, विठाईत, समया, गव्हल्याच्या राशी, ल्गीनसाडी, घास देणें, सुनमुखाचा दिवस, बोंगाडा, प्रक्षाळ पूजा इत्यादि काहीं शब्दप्रयोग त्या काळच्या समाजाचा इतिहास दर्शवितात.

आत्मवृत्तपर कादंबरी लेखनाची सुरवात श्री. हरिभाऊ आपटे यानीं केली. तशीच ती काशीबाईनींहि केली. त्याचप्रमाणें त्यावेळच्या काळात जें कोणी नोंदून दाखवत नसे व जें कृतींत घडणें अशक्य होत असे अशा गोष्टींना हरिभाऊंनीं आपल्या लेखनातून वाचा फोडली. तसेंच काम थोड्या प्रमाणात का होईना काशीताईनींहि केलें. त्या काळातहि मुलगी अविवाहित राहू शकते. संस्कृताचें अध्ययन करू शकते, स्वत. राज्यकारभार पाहू शकते इत्यादि गोष्टींचें आग्रहाचें दिग्दर्शन काशी-ताईच्या "पालखीच्या गोंड्या"त झालेलें आहे.

"रगराव" आणि "पालखीचा गोंडा" या दोन कादबऱ्याप्रमाणें काशीताईनीं लघुकथाहि लिहिलेल्या आहेत. "चादण्यातील गप्पा" (१८९८) या त्याच्या कथासग्रहातलीं कथावर हरिभाऊच्या कथालेखनाची छाप पडलेली दिसते.

आज आपण ज्या कथेला लघुकथा म्हणतो तिचा आजचा साज शृंगार हरि-भाऊंच्या वेळीं नव्हता. त्या वेळच्या गोष्टी म्हणजे एखाद्या लहानशा कादंबरी

एवढ्या मोठ्या असत. त्या वेळचें कथेचें एकंदर स्वरूपच निराळें होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं. परिणामकारक कथानक, भावनेची उत्कटता, रचनेंतील कुशलता, प्रसंगाची निवड आणि त्याचा कथानकांत होणारा योग्य तो उपयोग वगैरे प्रकारची आजच्या कथेची आवश्यक अशी सजावट हरिभाऊंच्या वेळच्या कथामधून तितकीशी आढळत नाहीं. तथापि ह्या कथा घरगुती प्रसंगावर आणि सामाजिक पार्श्वभूमीवर आधारलेल्या असल्यामुळें वास्तवतेच्या दृष्टीनें त्यांत कुठेंच कमतरता दिसत नाहीं. शिवाय या कथांची धाटणी उपदेशप्रधान असल्यामुळें कलाविलासाच्या आजच्या कल्पना त्या वेळीं ध्यानांत घेतल्या जात असत, असें म्हणतां येणार नाहीं. समाजसुधारणा हाच हरिभाऊंचा मुख्य हेतु त्यांच्या कथा-लेखनाच्या बुडाशीं होता, आणि तो त्यांनीं उत्तम रीतीनें पार पडला, असें "दुर्गाताईची ओवाळणी" ह्या कथेसारख्या त्यांच्या कथावरून म्हणावयास हरकत नाहीं.

काशीबाई कानिटकर यांनीं आपल्या कथामधून नीति आणि धर्म यांचीं तत्त्वें वाचकांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या कथांवर जुन्या कहाण्यांची जी छाप पडलेली दिसते तिचे कारणहि तेंच असावें. स्त्रीस्वभावाला अनुसरूनच काशीबाईंनीं आपल्या ह्या कथा देवावर विश्वास ठेवून आणि देवावर हवाला टाकून लिहिलेल्या दिसतात. त्यामुळें त्यांच्या नित्येक पात्राचा तोंडावळा सारखा झाला आहे! स्वभाववैचित्र्य त्यामधून फारसें आढळत नाहीं. रचनेच्या दृष्टीनेंहि त्यांच्या कथा आजच्या कथेच्या मानानें ढिल्या झालेल्या आहेत. लघु-कथेऐवजीं त्यांनीं हरिभाऊंच्या दीर्घ कथाप्रमाणें त्या लिहिलेल्या आहेत. त्यामुळें त्यांच्या "शिळोप्याच्या गोष्टी" किंवा "चादण्यातील गप्पा" यामधील कथांना लघुकथेची संज्ञा देता येणार नाहीं. गोष्ट लिहितांना त्यांनीं वापरलेली कथनकला ही एका ठिकाणीं जमलेल्या मडळींनीं एकामागून एकानें गोष्ट सांगावी तशी आहे. या पद्धतीस चौसरची पद्धति असें मानण्यात येतें. काशीबाईंनीं सर्रास याच पद्धतीचा अवलंब केलेला आहे.

काशीबाईंची कथा म्हणजे जशी घडेल तशी माहिती देणारी एक दीर्घ कहाणी आहे. अंतरंग सजविण्यापेक्षा बाह्यांग सजविण्याकडेच काशीबाईंचा ओढा अधिक दिसतो. सूक्ष्म अवलोकन, निसर्गाची मानवी मनोगताशीं होणारी संगति, आकर्षक वर्णनशैली आणि हृदयंगम भाषा हीं त्यांच्या कथेचीं वैशिष्ट्यें आहेत.

काशीबाईंची कल्पनाशक्ति आणि वर्णनशैली मात्र अपूर्व अशी आहे. स्त्रीहृदयाला शोभेल अशा विशिष्ट उपमादृष्टांतांनीं त्यांनीं खुलविलेलीं वर्णनें त्या करायला लागल्या म्हणजे मागें सांगितल्याप्रमाणें शिवरामपंत परांजपे यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. "मारुतीचा प्रसाद" या कथेंत मकर संक्रांतीच्या वेळीं आकाशात दिसून येणारें निसर्गाचें वैभव रंगवितांना त्या लिहितात —

" त्या दिवशीं मकरसंक्रात होती. सकाळचे पाच वाजले होते सागरगडच्या डोक्यावर शुक्र चांदणी नुकतीच वर आली होती. ती पाहून असें वाटे कीं, जणु काय एखाद्या भव्य स्त्रीने वेणीफणी करून आपल्या काळ्याभोर केशकलापात हा हिरेजडित असा सुंदर दागिनाच घातला आहे पलीकडचा पूर्वेकडील भाग अरुणप्रभेमुळें तांबडागल झाला आहे...जणु ती स्त्री कुंकू लावीत असता लगबगीत पिंजरेचा करंडा खालीं लवंडला व त्यामुळे तो भाग लालभडक झाला ! अथवा, नैष्ठिकांनीं रक्तचंदन व तांबडीं फुलें घेऊन भगवान् दिनमणीला अर्घ्य दिलें व त्यामुळे ती दिशा लाल झाली पश्चिमेकडे सर्व नक्षत्रगण खालीं सरकत होता. जणु काय हा नवरत्नाचा हार तुटून त्यांतील रत्नें खालीं ओघळत आहेत !"

सामान्यत बहुधा सर्व स्त्रियांना आपल्या माहेरचें वेड फार असतें सासर कितीहि चांगलें असू दे आणि तेथील माणसें कितीहि प्रेमळ असू देत, स्त्रीला माहेराचें सारच आगळें वाटायला लागल आपल्या ह्या मनोवृत्तीचा त्या ठाव घ्यायला लागल्या कीं, त्याच्यासमोर येणाऱ्या प्रत्येक गोष्टीला त्या अवस्थेप्रत नेऊन भिडविण्याचा मोह त्यांना होत जातो काशीताई तरी ह्या मनोवृत्तीला कशा अपवाद ठरणार ? " वनवास " या कथेमध्ये वहाणाऱ्या नदीच्या प्रवाहाला उद्देशून त्या लिहितात —

" तिचा प्रवाह खालीं चालला होता त्यामुळें असें वाटे कीं, एखादी लाडकी माहेरवाशीण सासरीं जाताना जशी खिन्नवदन, अश्रुपूरित नेत्रांनीं माता पित्याचें घर सोडत, व जोपर्यंत माहेरचीं माणसें, तें घर, निदान तो गाव दिसत असतो तोंपर्यंत मागें वळून पहात असते. त्याप्रमाणें ती जणू पितृगृहाकडे वारंवार पहात आहे व खिन्नवदन करून मार्ग आक्रमीत आहे ! राजकन्या असो वा रंक कन्या असो, पितृगृह सोडताना वाटणार दु ख दोघींनाहि सारखेंच बायकांचें अंत करण बायकांनाच ठाऊक व त्यांनाच मुलींच्या मनाची स्थिति जास्त ठाऊक म्हणूनच कीं काय द्यारूप स्त्रिया नदीला पोटाशीं कवटाळून धरीत व कडेरूपी निर्दय पुरुष मोठ्या निष्ठुरतेन तिला फराफरा ओढीत ! . "

काशीबाईंचे हे उपमाद्गार स्त्रीच्या अनुभवातून निघणाऱ्या भावनेचे बोल आहेत. परकाया प्रवेश करून स्त्रीचें चित्र रेखाटणाऱ्या पुरुषाला स्त्रीच्या स्वाभावातील एवढा बारकावा कवेत आणणें कठीण होईल ! बाईंची भावना बाईंना चांगली रंगविते असं म्हणायला हा आधार पुरेसा होईल

स्वभावचित्रणाच्या बाबतींतहि काशीबाईंनीं बरेंच यश मिळविलेलें आहे हरिभाउच्या स्वभावलेखन कलेचें सौंदर्य इथं आढळत नसलें, तरी प्रामाणिकपणानें रंगविलेलीं वास्तवचित्रें म्हणून केव्हाहि या स्वभावचित्रांची किंमत राहीलच या स्वभावचित्रात वैचित्र्य फारसं नसलं तरी वास्तवता मात्र बरीच आहे.

"सारसबाग" या कथेंत काशीबाईंनी नवऱ्यानें सोडून दिलेल्या मथुराबाई या स्त्रीची हृदयभेदक कहाणी सांगितलेली आहे. हें स्वभावचित्र करुण रसानें ओथंबलेलें आहे. "हृदयावर दु:खाचा भार अतिशय होऊन तो असह्य झाला म्हणजे त्या दु:खाला, देवासमोर बसून, नेत्रावाटें बाहेर लावतात. त्याच्या मनांतील विचार, कल्पना वगैरे कांहीं एक मनुष्याला कळत नाहीं." अशी ही मथुराबाईची मन:स्थिति लेखिकेने उत्कृष्ट रीतीनें रंगविली आहे. गणपती मंदिरांत सन्यस्तवृत्तीनें देवाचें गुणगान करीत जीवन चालविणाऱ्या ह्या मथुराबाईच्या दर्शनानें वाचकाला बाणाच्या कादंबरींतील महाश्वेतेची आठवण आल्याशिवाय रहात नाहीं. "लावण्यवती" या कथेंत प्रियकराबरोबर पळून गेलेली विधवा राजकुमारी अखेरीस विरक्त जीवन घालवीत असलेली दिसते. "वनवास" मध्यें मानवी जीवन आणि निसर्ग यांची सुंदर संगति दाखवून लेखिकेनें अद्भुत आणि शृंगार या रसांच्या परिपोषाच्या पार्श्वभूमीवर चपी व मानाजीराव यांचीं सुंदर स्वभावचित्रे रेखाटलेलीं आहेत. "मारुतीचा प्रसाद" या कथेंत दारूचे दुष्परिणाम चांगल्या रीतीनें दाखवीत असतानाच आनंदा व तुळशीराम या परस्पर विरोधी पात्रांचें स्वभावरेखनहि लेखिकेनें मोठ्या कौशल्यानें केलेलें आहे.

काशीबाईंच्या बहुतेक सर्व कथांमधून स्त्रीजीवनाचंच चित्रण प्रामुख्यानं आलेलें आहे. या सर्व चित्रणामधून कल्पनेपेक्षा लेखिकेनें वस्तुस्थितीचेंच विशेष चित्रण केलेलें दिसून येतें. त्यावेळच्या काळांत स्त्रीला एखाद्या दासीप्रमाणे समाजांत स्थान दिलें जात असे. या परिस्थितीचें वास्तवचित्र रेखाटण्याचा लेखिकेनें येथें यशस्वी प्रयत्न केलेला दिसून येईल.

कथा आणि कादंबरी यांच्या जोडीलाच काशीबाईंनीं चरित्र लेखनासहि हातभार लावलेला आहे. चरित्र वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीनं पाहिलं तर महानुभाव पंथांतील महींद्रव्यासाचें "लीळा चरित्र" हें पुस्तक म्हणजे मराठींतील चरित्र वाङ्मयाची सुरवात असें म्हणावयास हरकत नाहीं.

"राष्ट्राचा इतिहास, राष्ट्राचें जीवन याचा आदरयुक्त अभिमान प्रत्येकास वाटतो. तद्वतच राष्ट्राचें जीवन ज्यांनीं निर्माण केलें त्यांच्या चरित्राविषयींहि आदर आणि अभिमान वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. या आदर भावनेच्या पोटींच चरित्र वाङ्मयाचा जन्म होतो. चरित्र लिहितांना, कीर्तिरूपानें उरलेल्या लोकमान्याच्या कीर्तिरूपास चिरंतनता देण्याचा चरित्रकाराचा उद्देश असतो. केवड्याच्या पानाचा सुगंध वाऱ्यावर विरून जाण्यापूर्वी स्त्रिया नाहीं का तो आपल्या पुस्तकांच्या करंड्यांत सामावून ठेवीत!

इटालीचा कवि ॲरिओस्टो यानें या संबंधीं एक रूपक रचलं आहे. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्याच्या दोरीला एक रूपक बांधलेलें असतें. त्यावर त्याचें नांव कोरलेलें असत. जेव्हा मृत्यु ही आयुष्याची दोरी तोडतो त्यावेळीं काळ हें पदक

घेऊन विस्मृतीच्या नदींत फेंकून देतो, परंतु यापैकीं कांहीं—अगदीं थोडीं पदकें—विस्मृति नदींत पडतां पडतांना हंस तीं झेलतात आणि चिरंतनतेच्या मंदिरात नेऊन तेथें त्यांची प्राणप्रतिष्ठा करितात. ॲरिओस्टोनें सांगितलेले हंस म्हणजे आपले चरित्रकार होत. "*

चरित्र आणि चरित्रकार यांची ही भूमिका लक्षात घेता असें दिसून येतें कीं, रामायणमहाभारतातूनहि चरित्रवाङ्मयाचें अस्तित्व असलेलें पहावयास मिळतें. मात्र त्यावेळचीं हीं चरित्रें म्हणजे सामान्य माणसापेक्षा उच्च कोटींतील अशा थोर विभूतींचीं चरित्रें होतीं विशेषत: या चरित्रामधून देवादिकांचीच चरित्र नायकाचे जागीं निवड होत असे. ही परिस्थिति शके १६०० च्या सुमारास झालेल्या *नाभाजीच्या ग्वालेरी भाषेंतील " भक्तमाले " पासून बदलली. आपल्या सभोंवतालीं* वावरणाऱ्या थोर विभूतींना देवादिकांच्या बरोबरीनें समजून चरित्रलेखन करण्याची प्रथा पडत गेली. महिपतीनें लिहिलेली संतांचीं चरित्रें याच मनोवृत्तीनें लिहिलेलीं आहेत. महिपतीची चरित्र नायकाकडे पहाण्याची दृष्टि आदराची आणि विभूतिपूजेची होती. शाहीर कवींनीं थोर पुरुषावर जे पोवाडे रचिले त्यांच्या बुडाशीं मात्र विभूतिपूजेशिवाय पुरुषार्थांना गौरव करण्याची आणि स्फूर्ति मिळवून राष्ट्राच्या कार्यासाठीं प्रवृत्त होण्याची लौकिक दृष्टि दिसून येते.

त्यावेळीं चरित्रलेखनाकडे कला या दृष्टीनें फारसें पाहिलें जात नसे. " चरित्रलेखनाचा कला या दृष्टीनें विचार करून चरित्रनायकाचें व्यक्तित्व आणि त्याचें जीवनरहस्य हृदयंगम रीतीनें वाचकाच्या मनावर ज्या योगानें ठसविता येईल, अशा पद्धति चरित्रलेखनासाठीं आपण अवलंबिल्या पाहिजेत, अशी जाणीवहि फार काळपर्यंत कोणाच्या मनात उत्पन्न झाली नव्हती. "‡ पण इंग्रजी वाङ्मयाच्या अवलोकनानंतर विष्णुशास्त्री चिपळोणकरांनीं लिहिलेल्या ' डॉ. जॉन्सन् ' या चरित्र ग्रंथानंतर ही स्थिति बदलली आधुनिक दृष्टीनें लिहिलेलें मराठींतील हेंच खरें खुरें पहिलें चरित्र आहे.

" याच सुमारास एक चरित्रलेखनाचा अपूर्व प्रयत्न झाला. तो एका स्त्रीकडून झाला. हीच त्याची अपूर्वता आहे, असें नव्हे. चरित्र विषयीभूत व्यक्तीची माहिती तिच्याशीं निकट संबंध आलेल्या व्यक्तींकडूनच मिळवून व तिचीं पत्रें संपादन करून तिचें चरित्र लिहिण्याचा केलेला प्रयत्न, या दृष्टीनेंच त्याची अपूर्वता मुख्य आहे. कारण अशा यथाविधि लिहिलेल्या चरित्रामध्यें श्री. काशीबाई कानिटकर यांनीं लिहिलेलें " डॉ. आनंदीबाई जोशी " ( १९१२ द्वितीयावृत्ति ) हेंच बहुधा पहिलें होय. सहजसुंदर भाषा, हृदयास जाऊन

---

* " मराठींतील चरित्रवाङ्मय ", प्रदक्षिणा—प्रा. र. श्री. जोगळेकर

‡ चरित्रवाङ्मय, अर्वाचीन मराठी साहित्य पा. २५९ प्रो. श्री. ना. बनहट्टी.

भिडणारीं वर्णनें व चरित्र लेखिकेनें मधून मधून काढलेले भावनात्मक उद्‌गार या योगानें हें चरित्र रमणीय झालें आहे " ( अर्वाचीन मराठी साहित्य )

डॉ आनंदीबाई जोशी यांच्याबद्दल काशीबाईंना विलक्षण आदर आणि किंवा आपुलकी वाटत असावी इतका घरगुतीपणा या चरित्राला आलेला आहे. चरित्रनायिकेच्या जीवनातील सर्व बारीकसारीक गोष्टींची माहिती येथे काळजी पूर्वक नमूद केलेली दिसून येईल.

" यमू लहान, दोनतीन वर्षांची होती, तेव्हा फारच गोजिरवाणी दिसे. तिचा वर्ण साधारण गोरा होता. गाल लाल होते. केश काळेभोर असून कुरळे होते आणखी पोर मोठी खिलाडू आणि स्वच्छ होती.. झोपाळ्यावर बसून ओव्या म्हणणें, त्याप्रमाणें घरें बांधणें, देव मांडून त्यांचा उत्साह करणें, असे खेळ खेळे .." अशा लहानपणाच्या हकीकतीपासून तो अमेरिकेंत उच्च शिक्षणासाठीं गेल्यानंतर त्यांनी तेथील लोकांना हिंदी पद्धतीची मेजवानी देऊन आणि आपली डॉक्टरची पदवी मिळवून परत मायदेशीं आल्यापर्यंतची हकीकत येथें सविस्तरपणें आलेली आहे. अमेरिकेंतील मेजवानीचा हिंदी थाट वर्णन करताना काशीबाई लिहितात —" आनंदीबाईंनीं त्या दिवशीं, स्वत च सैपाक केला होता. पात्रें अठरा होतीं. पक्वान्नें वगैरे थाट इकडच्यासारखा. सर्व स्त्रियांना आनंदीबाईंनीं आपलीं लुगडीं नेसावयास दिलीं होतीं. त्यांच्या हातात बांगड्या घातल्या होत्या, कपाळाला कुंकवाचे टिळे लाविले होते त्यांना अगदीं आपल्यासारख्या बनविल्या होत्या जेवावयास वडाच्या व पळसाच्या पत्रावळी लाविल्या होत्या बसावयाला पाट मांडिले होते. गुलाल रांगोळीसुद्धा सर्व थाट ! ! पानसुपारी खावयास बसावयाला भुईवर बैठक घातली होती अत्तर गुलाब व फुलें दिलीं पण खरेंच, मी हें जें आपल्या नीरस शब्दांनीं सांगत बसल्यें, ती काय म्हणून ? कार्पेटर मावशीनें या सबधाने जें वर्णन केलें आहे, तें दिल्यानें किती मौज होईल ? आता तसेंच करितें म्हणजे आपल्या पदार्थांचीं नांवें घेण्यास त्यांना कसें जड जातें, भोजन करण्याच्या पद्धति त्यांना कशा जड जातात, आणखी आपलें अन्न त्यांना किती उत्तम वाटतें, वगैरे गोष्टी चांगल्या कळतील "

कार्पेटरबाईंना लिहिलेल्या अगदीं सुरवातीच्या पत्रातील पुढील मजकुरा प्रमाणें—" हेतु हा कीं, अज्ञानांधकारात गढून गेलेल्या व संसार यातनांनीं ग्रस्त होऊन सदैव निराश व निरुत्साह झालेल्या माझ्या असंख्य स्वदेश भगिनींनीं त्यापासून स्वदेशप्रीति, दृढनिश्चय, दीर्घोद्योग, निर्व्याजानंद, अनेकविध उदात्त कल्पना, इत्यादि गोष्टी शिकाव्या " एका विशिष्ट हेतूनें काशीबाईंनीं या चरित्राचें लेखन केलेलें आहे, हें उघड आहे त्यावेळच्या काळाच्या मानानें आनंदीबाईंनीं घेतलेलं शिक्षण आणि त्यासाठीं सोसलेले कष्ट खरोखरच विशेष आहेत जुन्या काळच्या हिंदु समाजातील एक स्त्री जननिंदेची पर्वा न करिता

उच्च शिक्षण घेते ही कल्पनाच मुळीं एखाद्या अद्‌भुतरम्य कथेसारखी आहे. त्यावेळच्या स्त्रिया साधें प्राथमिक शिक्षण घेण्यास देखील राजी नसत किंवा त्यानीं तें घ्यावें अशी अनुकूल परिस्थिति त्याच्याभोंवतीं नसे. स्त्री म्हणजे कुणी एक दासी अशीच जणु प्रत्येकीची भावना. नवऱ्याला देव मानून तो सांगेल त्या आदेशा नुसार वागण्यात परमसौख्य लाभतें, अशी त्याची कल्पना झालेली. स्त्रीचा दर्जा पुरुषापेक्षा खालच्या प्रतीचा अशी रूढीनें त्यांच्या मनावर पकड बसविलेली! आणि अशा परिस्थितींत स्वत च्या मानसिक सामर्थ्याच्या बळावर आणि कथाळू जीवनावर विसंबून शिक्षण घेणारी एक महिला इतरानाहि आदर्शभूत व्हावी या हेतूनें लेखिकेनें हे लेखन केलेले आहे. त्या दृष्टीनें चरित्र नायिकेची थोरवी कोणासहि अमान्य होण्याचे कारण नाहीं.

डॉ. आनदीबाई जोशी याच्या एकदर जीवनाकडे ओझरता दृष्टिक्षेप टाकला तर त्याच्या चरित्रावरून, एक गोष्ट प्रामुख्यानें ध्यानात येते ती म्हणजे त्याना सुरवातीपासूनच आपल्या भोंवतालच्या परिस्थितीशीं एकसारखी झुज खेळावी लागली ही होय.

"माझ्या आईनें देखील ममतेच्या शब्दाचा उपयोग केला नाहीं. मला शिक्षा करावयाची ती लहानशा दोरीनें किंवा वादीनें नव्हे, तिने नेहमीं दगड, लाकडें व विस्तव याच्याशीं गाठ ठेवली होती .." आपलें लहानपण खुद्द चरित्र नायिकेनेंच या शब्दातून व्यक्त केलेले आहे. त्यानतर मुंबईस त्या शाळेंत जात असताना लोकानीं त्याना दिलेला त्रास काशीबाईनीं पुढीलप्रमाणें सागितला आहे—

"एस् पी. जी. ख्रिस्ती—धर्म प्रचारक मडळीच्या शाळेंत दुसऱ्या ज्या हिंदु मुली अर्धवट इग्रजी पोशाक करून जात, त्या मुंबईंत मोठ्यात मोडणाऱ्या लोकाच्या होत्या, म्हणून त्याच्याबद्दल निंदेचा शब्दहि कोणी उच्चारीत नव्हते पण आनदीबाई तशा पोषाकानें शाळेत जात असता लोकानीं त्याची निंदा करावी, त्याच्याकडे पाहून हसावें, त्या शाळेंत जाऊ लागल्या म्हणजे आपल्या घराच्या खिडक्या मुद्दाम उघडून त्याच्याकडे पहात रहावें, आणि कोणी कोणी तर निंदास्पद शब्द उच्चारून त्याजवर खडेहि फेकावे! वाणी, तांबोळी, उदमी अशा जातींचे लोक त्याच्याकडे पाहून खाकरत " कलकत्याला जाऊन तेथें आनदीबाई स्थिर झाल्या परंतु तेथेहि त्याना अशाच प्रकारचा अगदीं वाईट अनुभव आला. तथापि मनानें त्या अतिशय खबीर असल्यामुळें त्यानीं सगळे निभाऊन नेले इतकेंच काय ते. आनदीबाईनीं अशा प्रकारचा इतरापासून होणारा त्रास सहन केला. पण त्या अमेरिकेंत गेल्यानतर त्याच्या पतींनीच जेव्हा अधून मधून त्याच्यावर काहीं आरोप केले व त्यामुळें गैरसमज निर्माण झाला तेव्हा मात्र त्याना कल्पनातीत दु ख झालें. आपली ही मन.स्थिति रगविताना एका पत्रात त्या म्हणतात, "... आपल्या अत करणास इतका त्रास झाला, त्याबद्दल

दंड देण्यास अश्रु देखील मजजवळ राहिले नाहींत. तसेंच एखादा उसासा टाकीन म्हटलें, तर त्याला देखील मी समर्थ नाहीं. आपल्या गरम अथवा थंड अशा बोलण्याने, वितळणारें किंवा थिजणारें असें फक्त "काळीज" मात्र मजजवळ उरलें आहे..."

मधून मधून या पुस्तकांत घातलेलीं चरित्र नायकेचीं, त्यांचे पति गोपाळराव यांचीं व कार्पेटर मावशी यांचीं जीं पत्रें आहेत तीं विशेष उल्लेखनीय असून तोच या पुस्तकाचा प्रमुख विशेष आहे. त्या त्या वेळचीं विशिष्ट अशी सामाजिक परिस्थिति या पत्रांवरून फारच चांगल्या रीतीनें प्रतीत झालेली आहे. एखाद्या व्यक्तीच्या मनांतील भावना ओळखून त्याबद्दल इतरांनीं कांहीं लेखन करणें यापेक्षां खुद्द त्या व्यक्तीनेंच आपल्या भावना शब्दांमधून खेळवणे यांत जमीन असमानाइतका फरक असतो! आणि तेंच काम या पत्रांनीं येथें केलेलें आहे. काशीबाईंनीं ही विविध पत्रें गोळा करून योग्य जागीं त्यांचें संपादन केलें ही फार महत्त्वाची गोष्ट होय.

या चरित्र लेखनाचा काशीबाईंचा म्हणून चटकन् डोळ्यांत भरणारा असा वैशिष्ट्यपूर्ण भाग म्हणजे त्यांनीं वापरलेली अगदीं घरगुती अशी भाषा. स्त्रीची म्हणून खास अशी विशिष्ट भाषा या ठिकाणीं पदोपदीं आढळून येते. या संदर्भात पुढील भाग पहाण्यासारखा आहे.

"आनंदीबाई मावशीला पोंहोंचवून, परत आपल्या बिऱ्हाडीं आल्यावर त्यांना अगदीं उदास वाटूं लागलें. मावशी गेल्यावर दोन तीन दिवसांत त्यांना जेवणखाण किंवा कोणाशीं बोलणें चालणें कांहीं एक गोड लागेना. बापड्या आपल्या हातांनींच स्वैपाक करीत व एकट्या टुकटुक जेवायला बसत!"...

त्या दृष्टीनेंच उपसंहारांतील पुढील भागहि पहावी :—

"बये आर्यमाते! किती ग बाई तू फुटक्या नशिबाची तरी! अग, अशा कोणत्या सटीची तुला बाधा झाली तरी? कीं, ज्यामुळे तुझीं चांगलीं मुलें वाचेनातशीं झालीं आहेत!..."

"माझ्या वाचनांत चरित्रें आलीं नव्हती, त्यामुळें मला चरित्र लिहावें कसें हें कळण्याला मार्ग नव्हता." असें प्रस्तावनेंत काशीबाई म्हणतात. परंतु त्यांनीं आपल्या पतीच्या मदतीनें इंग्रजींतील चरित्रलेखनाची कल्पना आत्मसात् करून आपली ही पहिली वहिलीच कलाकृति इतकी सुंदर चित्रित करून ठेवलेली आहे. आनंदीबाई ह्या शिक्षणप्रेमी व स्वदेशाभिमानी होत्या हें दर्शविण्यासाठीं काशीबाईंनीं अनेक पानें इथे खर्चीं घातलेलीं आहेत. संधि सांपडेल तेथें त्यांनीं चरित्र नायिकेच्या या गुणांचा उठाव केलेला असल्यामुळें सुरवातीपासून अखेरपर्यंत आनंदीबाईंची व्यक्तिरेखा वाचकाच्या मनावर कायमचा ठसा कोरीत जातांना दिसून येते. अशा ह्या आनंदीबाई अमेरिकेंत असतांना देशी माल कमा वापरीत हे लेखिकेनें मोठ्या खुबीनें सांगितलें असून अखेरीस त्या अमेरिकेहून

परत आल्यानतरचें वर्णन अशा रीतीनें केलेलें आहे...." ...अमेरिकेंत त्याचा गुजराथी पोषाख असे, परंतु त्या जेव्हा उतरल्या ( बोटींतून ) तेव्हा नारायण पेठी काळी चंद्रकळा नेसल्या होत्या. कपाळास साधारण कोंकणस्थाच्या बायकाप्रमाणें कुंकवाची टिकली लाविली होती. अगात खणाची चोळी, पायात बूट व स्टॉकिंग, नाकात नथ, आणि कानात कुडी अशा थाटानें त्या खालीं उतरल्या..."

उच्च दर्जाचा कादबरीकार ज्याप्रमाणें एखादी जिवत माणसाची भूमिका निर्माण करतो व त्या भूमिकेशीं समरस होऊन आपलें लेखन करतो, त्याप्रमाणेंच चरित्र नायकाच्या भूमिकेशीं चरित्रकारास एकजीव व्हावें लागतें. तो चरित्र नायकाच्या जीवनाशीं तन्मय झाला तरच त्याच्या हातून निर्माण होणारें चरित्र सर्वांगीण व जिवत होतें. काशीबाईंनीं ही भूमिका अतिशय यशस्वीपणें पार पाडली आहे यात शका नाहीं.

• • •

## रमाबाई रानडे

काशीबाई कानिटकराच्या नंतर मराठी साहित्यात नाव मिळविलेल्या अशा लेखिका म्हणजे श्रीमती रमाबाई रानडे या होत. " आमच्या आयुष्यातील काहीं आठवणी " या त्याच्या आत्मचरित्रानें मराठी सारस्वतात मानाचें स्थान मिळविलेलें आहे. इ. स. १९१० सालीं रमाबाई रानडे यानीं लिहिलेलें हें पुस्तक म्हणजे स्त्रीनें लिहिलेलें असें मराठींतील बहुधा पहिलेंच आत्मचरित्र होय.

उतार वयात मनाला विरगुळा मिळावा म्हणून माणूस ज्या गोष्टी करीत रहातो, त्यापैकीं आजवरच्या जीवनाचा मागोवा घेत रहाणे हा एक त्याच्या आवडीचा छंद होऊन बसतो. आपलें आयुष्य कोणत्या परिस्थितींत आपण कसें घालविलें याचा हिशोब कुणापुढें तरी माडला कीं त्याला आनद होतो. श्रीमती रमाबाई रानडे यानीं आपल्या आत्मचरित्रात हाच आनद भरपूर लुटलेला आहे आणि तो लुटत असताना अत्यत मोकळ्या मनानें जें घडलें तें प्रामाणिकपणें सागून टाकलें आहे. स्वत च्या जीवनाविषयीं बोलतानाच त्यानीं समाज जीवनाच्या इतिहासाचेंहि जाता जाता दर्शन घडविलें आहे.

" आमच्या आयुष्यातील काहीं आठवणी " या पुस्तकात त्यावेळच्या स्त्रीशिक्षणाबद्दलची माहिती देताना व आपली काय अवस्था झाली हें सागताना रमाबाई लिहितात—

".. ते ( माझे वडील ) गेले ( आपल्या घरीं ) त्या दिवशीं सध्याकाळीं सुमारें ६॥ वाजता कोर्टातून घरीं आल्यावर मला गच्चीवर बोलावून नेऊन विचारलें, " गेले का तुझे वडील ? " मी " होय " म्हणून सागितलें. पुन्हा

विचारलें, " तुझें माझ्याशी लग्न करून दिलें आहे. पण मी कोण, माझें नाव काय ? वगैरे तुला माहीत आहे काय ? "

मी " होय " म्हणून मानेनें सांगितलें.

" मग सांग पाहू माझें नाव काय तें ? " अशी आज्ञा होताच मी सर्व नाव जसें लोक म्हणत होते तसें सांगितलें (लाजेचा भाग जसा समजावा तसा समजत नव्हता. कांहीं का असेना पण तें ऐकून एक प्रकारचें समाधान झाल्यासारखें दिसलें असें मला पक्कें आठवतें.) नंतर माझ्या माहेरची सर्व हकीगत विचारली, व मीहि ती मला माहीत होती तशी सर्व सांगितली लिहिण्यावाचण्याची चौकशी केली पण मला कांहीं येत नव्हतें. (माहेरची हकीकत — माझ्या माहेरचीं माणसें म्हणजे जुने मराठमोळा ठेवणारे जाहागीरदार. त्याच्या घरीं माहेरवासीणी व आठ वर्षांवरच्या मुलींनीं वडिलांचे समोर ओटीवर सुद्धा जावयाचें नाहीं, मग खेळणें, अगर गाणीं वगैरे म्हणणें कसलें ? लिहिण्याचें तर नाव नाहीं ? माझी एक वडील आत्या, जिचें सासर ब्रह्मावर्तांत होतें, ती मात्र व्यंकटेश स्तोत्र वगैरे वाचावयास शिकली होती. तिला पुढें दुर्दैवानें वैधव्य आल्यापासून आमच्या वडील चुलत्यांनीं ठरविलें कीं, आमच्या घरात बायकांनीं लिहिणें, वाचणें, शिकणें धार्जिणेंच नाहीं. झालें. असें ऐकल्यावर नुसता लिहिण्यावाचण्याचा विचारहि मनात आणला तर पाप लागेल कीं काय अशी घरातील सर्व बायकांची समजूत होण्यास काय उशीर? त्यामुळे आम्हा मुलींना लिहिण्यावाचण्याचा गंधहि नसणें स्वाभाविकच होतें .....) म्हणून त्याच रात्रीं एक पाटी व पेन्सिल आणवून श्रीगणेशाचा पहिला सात अक्षरीं धडा घालवून दिला. हा वेळपर्यंत मला पाटीची अगर अक्षराची ओळख नसल्यामुळें तेवढीं सात अक्षरें न पाहता काढण्यास व ओळखण्यास जवळ जवळ दोन तास लागले, तेव्हा ती कोठ पक्कीं झालीं. दुसरे दिवसापासून दररोज रात्रीं दोन तास मला शिकविण्याकडे घालावयाचा क्रम ठेविला, व मुळाक्षरें, बाराखड्या वगैरे शिकवून सुमारें पंधरावे दिवशीं माझ्याकडून पहिल्या पुस्तकाचा पहिला धडा वाचविला व त्या दिवशीं पुष्कळ बरें बरें वाटलेंसें दिसलें...

आमच्या घरीं पुरुषांना बायकांनीं लिहिणें वाचणें शिकावें अशी आवड असल्यामुळें वन्सना व सासूबाईना मामजींनीं स्वत लिहिणें वाचणें व जमाखर्च मांडणें हें कामापुरतें शिकविलें होतें यावद्दल त्या दोघींना भूषण व अभिमान वाटे .....असें असून माझ्या शिकण्याच्या वेळीं त्यांना त्याची सहानुभूति तर नव्हतीच पण उलट त्या अतिशय रागावत व तिटकारा करीत...रोज रात्रीं मी माडीवर गेल्याबरोबर वाचनास आरंभ व्हावयाचा. यावेळीं दक्षिणा प्राइझ कमिटीचीं पुस्तकें व मराठी दुसरें सर्व वाचनाचें काम मजकडेच असल्यामुळें पुस्तक गद्यात्मक असेल तर कांहीं नाहीं, सहज वाचून जाई, पण पद्यात्मक असले

म्हणजे तें वाचण्यास संकोच वाटे. कारण पदें, आर्या श्लोक, वगैरे जें काहीं असेल तें गळ्यावर मोठ्यानें वाचावें लागे. तसें वाचल नाहीं, संकोचानें हळूहळू वाचलें, तर राग येई, व मोठ्यानें वाचावें तर सांगितलेल्या बायकापैकीं (नातलग, पाहुण्या) कोणीना कोणी तरी जिन्याशीं अगर दाराशीं उभ्या असावयाच्याच, ह्या दुसरे दिवशीं, रात्रीं वाचलेली चाल अगर कडवीं लक्षांत ठेवून, तसेंच हेल काढून वडील बायकांच्या देखत गळा वेडावून दाखवावयाच्या, चिडवावयाच्या व लाजवावयाच्या "...

इंग्रजी शिक्षणास आरंभ केल्यानंतरची माहिती देतांना रमाबाई सांगतात— "मी माजघरातील केर काढीत होतें. अर्धा मुर्धा केर काढून झाल्यावर केरात इंग्रजी वर्तमानपत्राचा एक कपटा सांपडला. आधींच माझा पोरपणा, त्यामुळे कोणत्याहि गोष्टीला आरंभ केला नाहीं तोंच ती साध्य झाली असें वाटून त्याबद्दल उतावीळपणानें मी हातातील केरसुणी खालीं ठेवून तो कपटा वाचीत उभी राहिलें ..नुसतीं अक्षरेंच पहात उभी राहिलें. आपण खाली आहोंत ही मला आठवणच नाहीं. ह्यावेळीं आजे सासूबाईची ( सासूबाईच्या आईची ) नजर मजकडे गेली व त्यांनीं जवळ असलेल्या बायकांना हळूच खूण केली. त्याबरोबर दोघी तिघींनीं दारात येऊन मला पाहिलें, पण मला याचा पत्ताहि नव्हता ! मी आपली तशीच नादात आहे, हे पाहून वन्संना फारच राग आला व त्या मोठ्यानें ओरडून म्हणाल्या, "तुमचें हापीस माडीवर आहे, तेथे तुम्ही वाचा कीं नाचा, आमचा अपमान केला तर खबरदार ! तीच आमची पहिली वहिनी नव्हती का ? तिला दादांनीं लिहिण्यास वाचण्यास सर्व शिकविलें होतें. ती आमच्या बरोबरीची होती, तरी देखील तिनें आमच्या देखत एक अक्षरहि वाचलें नाहीं. तिला इंग्रजी शिकण्याबद्दल त्यांनीं जंग जंग पछाडलें, पण त्या माउलीनें तिकडे लक्षच दिलें नाहीं. आता तीहि त्यांची बायको होती. तिला दहा गोष्टी सांगितल्या तर एखादी तरी करावी लागेल, पण असा नाचरेपणा नव्हता !..."

इ. स. १८७५ च्या सुमारची ही स्त्रीशिक्षणाची अवस्था पाहिली म्हणजे आज नवल वाटतें. पण त्यावेळीं स्त्रियानीं शिकावयाचें मनांत आणलें तर त्यांनी अडीअडचणींतून तिला जावें लागे, याची कल्पना या हकीकतीवरून येते. रमाबाई रानडे ह्या स्वत आपल्या पतींना देवाप्रमाणें अक्षरश. मान देत. त्यामुळें त्यांच्या इच्छेसाठीं त्यांनीं हें सर्व सहन केलें आणि आपला शिक्षणक्रम अखंड चालू ठेवला. त्याबद्दल त्या लिहितात, ".. या शिकण्याच्या पायीं मला घरांतील सर्वच बायकांकडून प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुष्कळच जाच सोसावा लागला, पण मी अभ्यासक्रम सोडला नाहीं....स्वत. यांचे शांत, गंभीर व अतिशय प्रेमानें केलेला उपदेश, या सर्व गोष्टी सोसण्यास मला आधारभूत झाल्या...."

काळ जसजसा बदलत गेला तसतसा स्त्री शिक्षणाचा पसारा व्यापक

होत गेला. इंग्रजांच्या चालीरीति आणि वाङ्मय यांच्याशीं परिचय झाल्यानंतर स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न पुरुषवर्गानें नेटानें हातीं घेतला. त्यांत महात्मा जोतिबा फुले, आगरकर वगैरे मंडळींनीं पुढाकार घेऊन स्त्रियांसाठीं स्वतंत्र शाळा स्थापन केल्या. पण त्या सधीचा फायदा काहीं सर्व स्त्रियांनीं घेतलाच असें नाहीं. समाजसुधारकांच्या टीकेचे घाव अंगावर घेण्याइतपत सर्वांची ताकद ह्या लोकांना अजमावयाची संधीच काहीं स्त्रियांनीं येऊं दिली नाहीं. त्यामुळें पुन्हा घरगुती शिक्षण होईल तेवढेंच पदरीं पाडण्याची स्त्रियांनीं तयारी दर्शविली. मात्र ही गोष्ट समाजरचनेच्या एकंदर ठेवणीकडे लक्ष देऊन स्त्रिया आपल्या नवऱ्यांखेरीज इतरांजवळ व्यक्त करीत नसत. रमाबाई रानड्यांच्या वरील हकीकतीवरूनहि हेंच प्रत्ययास येतें.

रमाबाई रानडे यांनीं ' असे पति देवचि ललनांना ' या काव्य पंक्तीप्रमाणें स्वतःचें सारें आयुष्य घालविलें. त्यांच्या आयुष्यातील आठवणी या पुस्तकाच्या पानापानावर याची सत्यता पटवितात. रानड्यांचेबद्दल त्यांना नितांत आदर होता. एकदा रानडे आजारी झाले त्यावेळीं रमाबाईंच्या मनानें धीर सोडला. त्यावेळची मनःस्थिति सांगतांना त्या लिहितात:—

...." आतां पटकीचीं सर्व लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं आवाज अतिशय खोल गेला. बोललेला शब्द तोंडाशीं कान लाविल्याखेरीज ऐकूं येत नसे. बोलावयाचें तर काय? दिवसभराल " तूं घाबरूं नकोस, भिऊं नकोस लक्ष लावून बाटलीवरचीं अक्षरें नीट वाचून मग औषध देत जा, घाबरेपणानें भलतेंच देशील," वगैरे धीर देण्याचें बोलणें, दिवसातून किती एक वेळां चाललें होतें. प्रकृतीचें मान घडघडीत उघड दिसत होतें, त्यामुळें माझा जीव अगदीं भेदरून गेला होता व वारा प्याल्यासारखा झाला होता.

वर लिहिल्याप्रमाणें स्वतःचें धीराचें बोलणें ऐकिलें कीं माझ्या जीवांत नवीन जीव आल्यासारखें होऊन तशा स्थितींतहि मला त्यातल्या त्यांत हुषारी वाटे, पण तें बोलणेंहि आतां बंद पडल्यामुळें माझा सर्वस्वीं धीर सुटला. धरणी आणि आकाश याशिवाय आपलेपाशीं आतां दुसरें कोणी नाहीं. दयाळू आणि सर्वांच्या धावणीला धावणारा तो करुणाळू परमेश्वर यावेळीं कोठें आहे? माझा विश्वास आजपर्यंत सर्वस्वीं त्याच्यावर आहे. त्याच्यावाचून यावेळीं मला दुसरें कोणी नाहीं, हें त्याला समजत नाहीं काय? वगैरे मी आपल्या मनाशीं पुष्कळ बोलून रडलें व चारवून बसलें होतें त्यांना ' मी जरा आंत जाऊन येतें ' असें सांगून त्या देवळांत आम्ही उतरलों होतों, त्याच महादेवाच्या गाभाऱ्यात देवासमोर जाऊन बसलें.

ही वेळ रात्रीची तीन वाजण्याची होती. आंत एक म्हातारी गुरवीण निजली होती, तिला चादर जाग्याच सांगितलें. पणतींतील नंदादीप अगदीं मंद

जळत होता. तेंहि मला बरेंच वाटलें. कारण, यावेळेस मनाची वृत्ति अशी झाली होती कीं, देव आणि आपण याशिवाय तिसरें येथे कोणी नको, दिवासुद्धा नसता तर बरें झालें असतें, असें वाटलें. होता तो मात्र मालविण्यास हात धजेना. तसें मनातसुद्धा आणणें अशुभ आहे, असें वाटून मी देवापुढें थोडी प्रमिष्टास[रखी बसलें. तोंडातून कसला उच्चार होईना म्हणून डोकें टेंकून हळूच पण पुष्कळ मन मोकळें करून रडलें... ''

एकदा रानड्याच्या प्रबळ इच्छेमुळें रमाबाईनीं तासगावच्या मुलींच्या शाळेंतील बक्षिस समारभाचेवेळीं भाषण करण्याचें ठरविलें. त्यावेळची आपल्या मनाची झालेली परिस्थिति रगवितांना त्यांनीं म्हटलें आहे—

"...बक्षिस समारभाची जागा तासगावकर ताईसाहेब याने दिवाणखान्यात केली होती. त्या व गावातील पन्नास पाऊणशें बायका हजर होत्या. नेमलेल्या वेळीं मी तेथें गेलें मुलींनीं काहीं कविता म्हटल्या व मास्तरानीं रिपोर्ट वाचल्यावर मुलींना उपदेशपर दोन शब्द सागण्याची माझी वेळ आली. मी उठून उभी तर राहिलेंच, पण दम लागल्यासारखें होऊन हातपाय कापू लागले. अशी स्थिति दोन तीन मिनिटें झालीं, तरीहि मी बोलावयास सुरवात केली व कोण जाणें कसें झाले ते पाचपचवीस वाक्यें मी झपाट्यानें व न अडखळता बोलून गेले खरी. सभेंत उभें राहून प्रमुखपणानें बोलण्याचा हा माझा पहिलाच प्रसग होता... ''

" स्वभाव दर्शन '' किंवा " व्यक्ति दर्शन '' हा वाङ्मयातील एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या स्वभावछटा त्या व्यक्तीच्या मनोविकारातून सूचक व परिणामकारक रीतीनें रेखाटणें ही एक कला आहे. या आत्मचरित्रातून ह्या कलेचा आविष्कार अतिशय सुदर रीतीनें झालेला आहे.

न्यायमूर्ति रानड्याचे स्वभावाबद्दल लिहितांना रमाबाई म्हणतात —

" ...नाशकाला गेल्यावर पहातों, तों बाई लवकर मिळेना. बाई शोधण्यात महिना दीड महिना गेला. तोंपर्यंत सवय नसल्यामुळें ससारासबधीं प्रत्येक काम मला अवघड जाऊ लागलें व त्यामुळें माझ्या मनाचा अगदीं गोंधळ उडे, व सोईचें कामसुद्धा अशा धादलींत बिघडून जाई. माझी ही स्थिति पाहूनच कीं काय, पदार्थ खारट, तिखट कसेहि झाले तरी स्वतः नावें म्हणून ठेवावयाचीं नाहींत व रागवावयाचें नाहीं. स्वयपाकाची सवय नसल्यामुळें, तो बिघडेल म्हणून भीतीनें जी माझी धादल उडे त्यात कधीं कधीं मीठच घालण्यास विसरावयाचें व कधीं कधीं तर विसरून दोन वेळा घालावयाचें, तरीसुद्धा स्वतः कधीं राग किंवा तिरस्कार करावयाचा नाहीं...स्वतः जेवण होऊन कोर्टात गेल्यावर मी जेवायला बसें, तेव्हा खारट किंवा आळणी जें काय झालें असेल त्याबद्दल मनातल्या मनात वाईट वाटे व सध्याकाळचा स्वयपाक मी अगदीं लक्ष देऊन करीन, विसरणार नाहीं असा निश्चय करी. त्यामुळें खरोखरीच बरा स्वैपाक झाला असला तर

मात्र स्वत. विनोदानें म्हणावयाचें कीं, "का रे आचा, आता भाजी खातोस, आणि दुपारीं दोन पदार्थ जास्त असूनसुद्धा का बरें खाल्ले नाहींस ? त्यात काहीं बिघडलें होतें कीं काय ? "

त्यावर ते हसून म्हणत, "दुपारची भाजी काय ? त्यातली एक तर आळणीच होती. भजीं खारट खारट, फक्त आमटी व भाजी मात्र बरी होती, तेवढी खाल्ली ! "

तेव्हा म्हणावयाचें कीं, "विद्यार्थ्यांचें लक्ष खारट, तिखट, आळणी ह्याकडे असू नये; जें काय मिळेल तें मुकाट्यानें खाऊन जावें, मी बघ कधीं काय नावें ठेवितों की काय ? मुकाट्यानें जे काय मिळेल तें खाऊन जातों. "

अशा एखाद्या वेळीं मी धीर करून म्हणे कीं, "मला वेळेलाच कळेल तर आळणी पदार्थांत मीठ तरी घालता येतें पण मी जेवायास बसतें तेव्हा काय तें कळतें व भारी लाज वाटते."

तेव्हा म्हणावयाचें कीं, "त्याला काय उपाय आहे ? असल्या गोष्टी सांगत बसण्यापेक्षा ज्याच्या त्यालाच अनुभवानें समजलेल्या बऱ्या. मनुष्य सावध राहून जास्त लक्ष ठेवितें. आज मी तुझ्याकरिता एक सूप शास्त्राचें पुस्तक आणविलें आहे. तें सर्व वाचून पहा व त्यात लिहिलेल्या कृतीप्रमाणें रोज एक एक पदार्थ करून पहा म्हणजे झालें. त्याला लागणारे पदार्थ नीट मोजून घेऊन स्वस्थ मनानें करावें. जिन्नस करावयाचा साधला तर बरेंच, नाहींतर करमणूक होईल, मनुष्यानें पूर्ण लक्ष दिलें तर सर्व काहीं होईल .. "

..."दुपारीं जेवण झाल्यावर व तिसरे प्रहरीं ताजीं फळें, बदाम, पिस्ते, खाण्याचा स्वत चा पाठ असे व तीं रोज तिसरे प्रहरीं ताजीं फळें, बदाम मीच घेऊन गेलें पाहिजे, असें असल्यामुळें, मीच नेऊन देत असे. ज्या दिवशीं शनिवार असेल, त्या दिवशीं दोन वाजल्यापासून मला स्वत' बजवावयाचें कीं, 'पहा तुला सभेला जावयाचें आहे, आज शनिवार आहे, त्याची तुला आठवण आहे ना ? वेळ चुकवू नकोस, नाहीं तर विसरलें, खालीं कोणीं काहीं काम सांगितलें, अशी सबब सांगितलीस तर मला खपावयाचें नाहीं. एकदा नेमलेल्या कामाकडे दुर्लक्ष करू नये, त्याबद्दल पहिल्यानें त्रास हा होणारच, तो सोसला पाहिजे. " वगैरे सांगितल्यावर मी लागलीच खालीं येऊन सभेची वेळ चुकू नये म्हणून सभेची वेळ झाली कीं, "मी जाऊन येतें " असें मुठींत जीव धरून भीत भीत वन्संना सांगून त्यांची होय म्हणण्याची वाट न पाहाता, एकदम बाहेर पडावयाची"....

एकदा सातारा जिल्ह्यात रानड्यांच्याबरोबर रमाबाईहि दौऱ्यावर होत्या. त्यावेळीं नदीवर सकाळचे प्रातर्विधि उरकल्यानंतर उशीर झाला म्हणून गाडींतून न जाता रानड्यांनीं पायीं जायचें ठरविलें. त्याविषयीं रमाबाई लिहितात—

..." इतक्यांत सांगितलें कीं, " आज उशीर झाल्यामुळें चालणें झालें नाहीं, तर असा थोडा सडकेने पुढें होतो. तीं माणसे आलीं म्हणजे तूं गाडी जोडवून लवकर ये. "

" पुढें जाणे झाल्यावर मी करमणुकीकरितां म्हणून तेथे असलेला घोड्याचा चाबूक हातांत घेऊन जवळच एक आंब्याचें ठेंगणें झाड होते तेथें गेलें व चाबकानें दोन तीन फटकारे मारले. त्यात पांच पंचवीस कैऱ्या पडल्या, तेवढ्यानें तृप्ति न होता आणखी पडाव्यात म्हणून जोराने जो फटकारा मारला, त्यासरशीं चाबकाचा बारीक शेवट हातातील छंदाला अडकून चाबकाच्या जोरानें छंदहि वर उडून गेला, लागलीच समजून आला; पण वरून तो कोठें पडला हें दिसलें नाहीं. मीं आणि शिपायानीं झाडाखालीं आसपास पुष्कळ शोध केला, पण आमचा शोधणाराचाच कीं काय, त्याजवर चुकून पाय पडून तो वाळूत गेला किंवा झाडावर कोठें अडकून राहिला,'काय झाले कोण जाणें ? पुष्कळ शोधला, पण सापडला नाहीं खरा ?

" इतक्यात गाडी तयार होऊन आली. तींत बसून मी पुढें चाललें. आतां ज्वळ काय सागावें ? छंद हरवल्याबद्दल काय वाटेल, आपण आंबे काढण्याचा लोभ धरला हें चागले केलें नाहीं, असा पश्चात्ताप पावून भीति वाटली. इतक्यात एक बैलगाडी आली, तरी स्वतःची गाठ पडली नाहीं. तेव्हा मी घाबरलें व माझ्या वेडेपणामुळें व नादिष्टपणामुळें स्वतःला अशा उन्हाच्या वेळीं कितीतरी चालावें लागलें, याबद्दल मला फार वाईट वाटलें. पण उपयोग काय ? दुसऱ्या मैलावर स्वतःची गाठ पडली व गाडींत बसणें झाले. गाडी चालू झाल्यावर " आज माझ्याकडून एक मोठी चूक झाली आहे, " वगैरे छंदाची हकीकत मी सांगितली. सर्व ऐकून घेतल्यावर बऱ्याच वेळानें व शांतपणानें म्हटलें " लोकाचे आंबे तूं न विचारता पाडलेस हें वाईट केलेंस. याबद्दल तुझी तुला शिक्षा व्हावी व आठवण रहावी, कीं पुनः असें करू नये, म्हणून तुझा छंद हरवला आहे. मी त्या छंदाचा शोध करणार नाहीं व पुनः नवाही करणार नाहीं; म्हणजे आठवण राहील. "

" हें बोलणें अगदीं नेहमींसारखें चाललें होतें; पण ही गोष्ट आवडली नाहीं, असें मुद्रेवरून दिसत असल्यामुळें हें साधें भासणारें बोलणें मला शिक्षेसारखें वाटलें. जास्त राग येण्यास जागा होऊ नये, म्हणून तो सर्व दिवस आपलें नित्याचें काम न चुकता खिन्न मनाने मी करीत होतें. रात्रीं जेवायास बसल्यावर नेहमींसारखें पण ब्राह्मणाला हाक मारून म्हटलें, " बजाबा, आज सकाळच्या पाऊणशें रुपयांचें लोणचें घाढावयास तरी आण ! "

" तो बिचारा काय आणील ! येवढेसें तोंड करून उगीच उभा राहिला. लोणचे केलें होते कोणीं ? कैऱ्या सकाळपासून जागच्या जागीं पडल्या होत्या.

सकाळपासून त्या आत्याकडे नुसतें पहाणें देखील शिक्षेप्रमाणें वाटे. कोणीच काहीं बोलत नाहीं व लोणचेंहि कोणी आणीत नाहीं, हे पाहून मला सांगितलें, " दुसऱ्या गोष्टी ध्यानात ठेवाव्या पण छंद हरवला यात इतकें खिन्न होण्याचें कारण नाहीं. माझ्याकडूनहि आज तुझ्यासारखीच गोष्ट घडून आली आहे. आज दुपारीं माझी तपकिरीची डबी कोठें पडून हरवली. माझा एक जिन्नस हरवला. व तुझा एक जिन्नस हरवला. तू म्हणशील ती जस्ताचीच होती, तिची किंमत काय ? किंमतीचा विचार यावेळीं न करता उपयोगाचे दृष्टीनें माझा जिन्नस जास्त होता, कारण त्याचाचून अडेल, जिन्नस हरवणें म्हणजे सावधपणा व हुशारी कमी, एवढाच दोष येतो. तो येण्यास जपावें हें बरें. पण त्याचाचून सगळा दिवस इतकें खिन्न का व्हावें ! हंसून खेळून समाधानानें रहावें म्हणजे दुसऱ्यालाहि बरें वाटतें. "

"झालें. यावर पुन: त्या हरवलेल्या जिनसाबद्दल नावहि काढलें नाहीं...."

रमाबाईंच्या या पुस्तकाची मांडणी अतिशय आकर्षक झालेली आहे. त्याची भाषाशैली आणि वर्णनशैली इतकी चटकदार झाली आहे कीं, हें पुस्तक वाचीत असताना त्यावेळचा काळ, समाजामधील स्त्रियांची परिस्थिति, त्यांचें शिक्षण व रानड्यांसारख्या थोर व्यक्तींचें जीवनदर्शन घडल्याविना रहात नाहीं. वाचकाला त्या काळात खेंचून नेण्याचें सामर्थ्य या पुस्तकात आहे. स्वभाव-लेखनाच्या कलेंत रमाबाई निष्णात असलेल्या दिसतात. तसेंच स्वतःच्या आयुष्याचें त्यांनीं केलेलें हें चित्रणहि त्यांच्या प्रामाणिक मनोवृत्तीची साक्ष पटवितें.

या पुस्तकात मधून मधून आलेलीं "डॉक्टरास बोलावू पाठविलें." " मला बमते करा, " "गाडींत बसणें झालें," "तेव्हा म्हणावयाचें कीं," " पुढें जाणें झाल्यावर " इत्यादि वाक्यरचना आणि रानड्यांबद्दल सर्वत्र आलेला " स्वत " हा शब्द रमाबाईंच्या स्त्रीहृदयाची कल्पना देणारा आहे. भाषेचा जुनेपणाहि या वाक्यावरून दिसून येतो.

रमाबाईंच्या स्त्रीहृदयाचा हळवेपणा, संकोचवृत्ति, सोशीकपणा व पतीचें मन सांभाळण्यासाठीं केलेली पराकाष्ठेची धडपड या पुस्तकात त्यांनीं स्वतःच अतिशय जिव्हाळ्यानें व्यक्त केलेली आहे. त्यामुळें वास्तवतेच्या दृष्टीनेंहि हें पुस्तक परिणामकारक झालेलें आहे.

• • •

## सौ. गिरजाबाई केळकर

हरिभाऊ आपट्यांच्या पद्धतीनें लेखन करणाऱ्या काशीबाई कानिटकरा सारख्याच आणखी एक लेखिका म्हणजे गिरिजाबाई केळकर या होत. काशीबाई

कानिटकराच्या या समकालीन लेखिका. या दोघींच्या लेखनाची पद्धति एकाच प्रकारची असली, तरी त्यांनीं केलेलें प्रतिपादन मात्र भिन्न आहे. काशीबाईप्रमाणें निसर्गाचीं वर्णनें करण्याकडे गिरिजाबाईंच्या मनाचा कल मुळींच नाहीं, असें म्हटले तरी चालेल. वर्णनाची त्यानाहीं हौस आहे, पण त्या शैलीचा उपयोग त्यांनीं घरगुती चालीरीति, जुन्या काळची समाजरचना आणि त्यावेळच्या माणसाच्या कल्पना रंगविण्याकडे केलेला आहे.

आपल्या आयुष्यात स्वत ला आलेला जुना बाळबोध अनुभव जमेस धरून स्त्रीजीवनाविषयीं सडेतोडपणें आपले विचार माडणें हें सौ केळकरांचें वैशिष्ट्य आहे.

" गृहिणी भूषण " ( १९१० ) या पुस्तकात सौ. केळकरानीं स्त्री शिक्षण विषयक आपले विचार माडणारी स्फुट विचारमाला गुंफिलेली आहे. स्त्रीला जें शिक्षण द्यावयाचें तें केवळ स्त्रियाची थोरवी गावयाची म्हणून न देताना सामाजिक जीवनाचा अभ्यास करून व्यावहारिक जीवनाला उपयोगी पडणारे असें तें दिलें जावे, हा आपला विचार माडताना या पुस्तकात त्या स्पष्टपणें सागतात की—

" माता सुशिक्षित असल्याशिवाय कोणत्याहि देशाची खरी उन्नति होणें शक्य नाहीं, असें माझें ठाम मत आहे...स्त्रियानीं जे शिकावयाचें ते नोकरी मिळविण्याकरिता नव्हे, पण आपल्या मुलाबाळाना सुशिक्षित करण्याकरिता व ससार उत्तम तऱ्हेने पार पाडण्याकरिता. "

या प्रकारचे असे विचार माडताना या पुस्तकात इग्रजी राजवट व त्याचे शिक्षण आणि चालरीति याचा परिणाम म्हणून आपल्याकडील नीतिशिक्षण कमी झाल्याचा व आपले रीतरिवाज आपल्या लोकादून कमी होत चालल्याचा दावा लेखिकेनें केला आह.

स्त्रीशिक्षणाविषयीं लिहिताना सौ. केळकर पुढें म्हणतात, " स्त्रियाना आवश्यक असें अवघड शिक्षण देण्याचा प्रयत्न केला म्हणजे मेंदूचें स्वास्थ्य नाहींसें होतें, व त्यात गृहव्यवस्थेची जोखीमदारी शिरावर पडली म्हणजे स्त्रियास करावे लागणारे शारीरिक व मानसिक श्रम व त्यातच पुरुषाप्रमाणें इतर व्यवसाय करण्याची जाज्वल्य उत्सुकता ह्या दुहेरी श्रमाचा परिणाम त्याच्या शारीरिक स्वास्थ्यावर होतो व त्यामुळें निपजणारी प्रजा अशक्त होते आम्ही जर पुरुषाप्रमाणें नोकऱ्या करण्यास जाऊ लागलो किंवा सभेचीं कामें करू लागलों, तर घरात येणाऱ्या पैशाचा योग्य व्यय कोणीं करावयाचा? पुरुषाना सुग्रास अन्न शिजवून घालण्याची काळजी कोणीं करावयाची? बालकाचें पोषण कोण करणार? धर्माचें रक्षण कसें होणार?.. स्वयपाकघर हें गृहिणीची परीक्षा पहाण्याची जागा आहे .."

लग्न झाल्यानतर प्रत्येक मुलीनें सासर हें आपलें घर आहे, असें समजून तेथील माणसावर प्रेम करावें असें लेखिकेनें मोठ्या आस्थेनें व आपुलकीनें येथें सुचविलें आहे. अनुभवाच्या पार्श्वभूमीवर आधारलेलें हें लेखन अगत्यामुळें त्यास

विशेष महत्त्व आहे. त्यावेळीं स्त्रिया फारशा शिकलेल्या नव्हत्या. त्यामुळ परंपरेन चालत आलेल्या समजुतींना अनुसरून त्या वागत असत. हिंदु संस्कृतीचा पगडा त्यांच्या मनावर बसलेला असे. त्याला अनुसरूनच लेखिकेनें सासरीं कसें वागावें याचें उदाहरण म्हणून पुढीलप्रमाणें दिग्दर्शन केलेलें आहे:—

" नणद म्हणजे माहेरवाशीण. ती चार दिवस आपल्या घरीं आली म्हणजे तिच्या मर्जीनुसार वागलें म्हणजे झालें. ती वेणी घालायला बसली म्हणजे कुठें तोंड पुसायला पाणी दिलें, अग धुण्याचें पाणी उपसलें, लुगड्याच्या निऱ्या करून ठेविल्या, जेवायला बसताना एखादा चांगलासा पाट मांडला, मोठें ताट ठेविलें, भांडें घासून पुसून ठेविलें, जेवून उठल्यावर विडा सुपारी काय तें दिलें म्हणजे झालें. इतकेंहि करून जर एखादी नणंद चांगली वागली नाहीं तर आपण आपलें कर्तव्य करीत आहोंत असें समजून मनात संतोष ठेवावा. पण निती झालें तरी वाकडेंच, असें म्हणून आपलें कर्तव्य सोडूं नये. "

गिरजाबाईंची या पुस्तकातील भाषा प्रौढ व घरगुती असून त्यांनीं आपले विचारहि स्पष्टपणें मांडलेले आहेत. त्यांच्या विचारसरणींत स्त्रीजीवनाविषयीं एक प्रकारचा जिव्हाळा आहे असें दिसून येते. घरगुती प्रसंगाचा उठाव त्यांनीं चांगला केलेला आहे. तसेंच उपदेशात्मक असे मांडलेले त्यांचे विचारहि वाचनीय झालेले आहेत.

१९१२ मध्यें गिरिजाबाईंनीं " पुरुषाचें बंड " हें एक सामाजिक नाटक लिहिलेलें आहे. एखाद्या लेखिकेनें मराठींत लिहिलेलें असें हें पहिलेंच गद्य नाटक होय. स्त्रियांनीं पुरुषाना सोडून दिलें तर संसार एखाद्या स्मशानासारखा वाटू लागेल, जिकडे तिकडे शून्य आणि उदास वातावरण निर्माण होईल; व संसार-चक्रच बंद पडेल, हें तत्त्व प्रतिपादण्याकडेच या नाटकाचा प्रमुख रोख आहे. स्वभाव परिपोषापेक्षा येथें लेखिकेनें संविधानकाकडेच विशेष लक्ष दिलेलें दिसतें. एका प्रवेशामध्यें तर स्त्री पुरुषाचा परस्पराशीं येणारा संबंध हा दोषी आहे किंवा नाहीं याची शास्त्रीय चर्चा गिरिजाबाईंनीं केली आहे! संवादलेखन चांगलें साधलेलें आहे.

आपल्याकडील लोकाना इंग्रजाचा सहवास जसा घडत गेला, तसा त्यांच्या विचारसरणीचा पैलावहि इकडे होऊ लागला. आपल्या लोकाना त्यांचें अनुकरण करण्यात धन्यता वाटू लागली. इंग्रजाच्या चालीरीति उचलताना त्यांनीं ज्या सुधारणा घडवून आणल्या त्या सुधारणाचे आपल्या समाजावर जे दुष्परिणाम घडत गेले, तें गिरिजाबाईंनीं प्रामुख्यानें आपल्या कथामधून गोंवून दाखविलेलें आहेत. " समाजचित्रें " ( भाग १ व २ ) व " केवळ विश्रांतीसाठीं " हे त्यांचे कथासंग्रह याच विचारसरणीनें लिहिलेले आढळून येतील.

गिरिजाबाईंच्या कित्येक कथा लांबीच्या दृष्टीनें पाहिल्या, तर एखाद्या लहानशा कादंबरीसारख्या झालेल्या दिसून येतात. कादंबरीप्रमाणेंच या कथामधून त्यांनीं प्रकरणेंहि पाडलेलीं आहेत तथापि अतिशय वास्तव व परिणामकारी घरगुती वातावरण त्यांनीं कौशल्यानें चित्रित केलें असल्यामुळे, या कथांना आकर्षकता प्राप्त झालेली आहे.

इ. स. १९२३ सालीं सौ केळकरांचें "समाज–चित्रें" हें पुस्तक प्रकाशित झालें या पुस्तकाची दुसरी आवृत्ति इ स १९२९ मध्य व तिसरी इ. स १९५५ मध्य प्रकाशित झाली या पुस्तकात लेखिकेनें स्त्रीजीवनाबद्दल लिहिताना दोन्ही दृष्टींनीं विचार केलेला आहे. संसारी स्त्री व समाज जीवनातील स्त्री या स्त्रीजीवनातील भूमिका लक्षात घेताना त्यांनीं स्त्रियांना आपल्या पायातील वहाण समजणाऱ्याचा खरपूस समाचार घेतला आहे, तर कारण नसताना स्त्रियांना डोक्यावर घेऊन नाचणाराचीहि कान उघाडणी केलेली आहे ! त्याचप्रमाणें स्त्रीला स्वतंत्र व्यक्तित्वाची जाणीव करून देताना त्यांनीं जवळ्या जिव्हाळ्यानें उत्तेजनाची गोष्ट काढली आहे, तेवढ्याच चिडीनें त्यांनीं विवाह व संसार या विरुद्ध बंड उभारणाऱ्या सुशिक्षित स्त्रियांना फटके मारले आहेत त्यांच्या मतें स्त्रियांना स्वतंत्रता हवी पण ती स्त्रीनें आखून घेतलेल्या कार्यक्षेत्रापुरतीच मर्यादित हवी आहे म्हणजे पुरुषाच्या राज्यात स्त्रियांची ढवळाढवळ जशी त्यांना खपत नाहीं, तशीच स्त्रियांच्या स्वराज्यातील पुरुषाचा चोंबडेपणाहि त्यांना चालत नाहीं ! सुधारणेच्या काळात, अनेक सामाजिक स्थित्यंतराचा व मतमतांतराचा सुळसुळाट झालेल्या काळात, सौ केळकर या प्रकारें नव्याजुन्याच्या सीमारेषेवर भक्कम विचारांनीं उभ्या आहेत त्यासाठीं त्याच्या लेखणीनें अगदीं घरगुती वातावरणात संचार केलेला आहे बारीकसारीक बोलणीं केलेलीं आहेत खेळीमेळीचीच पण चटकदार भाषा वापरली आहे त्या दृष्टीनें "चतुर्थीचा चंद्र" या समाजचित्राची पुढील सुरवात पहाण्याजोगी होईल—

"पावसाळी दिवस भरपूर पाऊस पडून संतोषित झाल्यामुळें वसुधरेनें उल्हासित मुखानें सर्वोकडे बघितलें होत आनंदित वसुधरा आपल्या सर्व अलंकारानीं एकजात नटली होती नवजीवनान प्राप्त झालेल्या आनंदात वृक्षवेली गुरफटल्यामुळे त्या अतिशय शोभायमान दिसत होत्या माणसाना जीवन देणारीं धनधान्यानीं भरलेलीं शेतेंही त्याच्याशीं आपली स्पर्धा करण्याकरिता गोंड्या डोलानें डोलत होतीं आणि तो पिकाचा आनंद त्याचा मालक शेतकरी त्याच्याही तोंडावर दृग्गोचर होत होता "

"माझा प्रवास" या कथेंत लेखिकेनें विनोदाला बराच वाव दिलेला दिसून येतो. स्त्रियांनीं तोंडाला साबण लावल्यामुळें आश्चर्य वाटणें, स्टोव्हमुळें मनात गोंधळ निर्माण होणें आणि सोड्याच्या बाटलीच्या आवाजाला बंदुकीचा

आवाज समजून तो घरात कसा निघावा याबद्दल विस्मय वाटणें इ. जुन्या माणसाच्या मनाला धक्का देणाऱ्या गोष्टी, विनोदी वातावरण निर्माण करून लेखिकेनें मोठ्या युक्तीनें माडलेल्या आहेत. उदा. म्हणून भाच्याकडे जाताना करावी लागणारी तयारी लेखिकेनें कशी सागितली आहे ती पहा:—

"भाचा श्रीमंत तेव्हा आपणहि तेथें नीटनेटकेपणानें जावे, असा विचार करून मी माझी ठेवणीचीं दोन लुगडीं, पाच पाच, सहा सहा रुपये किंमतीचीं, बरोबर घेतलीं. गळ्यात ठुशी, वीस पुतळ्याची मध्यें कारले घातलेली माळ, टिका, हातात एकेक गोट वगैरे सगळे दागिनेहि बरोबर घेतले. नको नको म्हणत असता हट्टान जवळून माझी थोरली दोनशें रुपयाची नथ मागून घेतली. बबीचेहि गळ्यात गाठलें व गोदीच्या गळ्यात हसळी लटकावून दिली"

जुन्या काळच्या स्त्रीच्या या अशा प्रकारच्या कल्पना लेखिकेनें येथें मोठ्या गमतीनें माडलेल्या आहेत. गिरिजाबाईंच्या बहुतेक सर्व कथामधून स्त्रीस्वभावाला अनुसरून "सादर्णे, खाडपोळ्या" इत्यादि पदार्थ करण्याची पद्धति, सणावाराच्या गोष्टी, माघारपणाला जाणें, बाळतविडा तयार करणें इत्यादि प्रकारच्या विविध चालीरीति व त्याच्या भोंवतालचें घरगुती वातावरण सर्वत्र पसरलेलें आहे. लेखिका या चालीरीति रगविताना त्या घरगुती वातावरणात विशेष रगून गेलेली दिसून येते. त्या दृष्टीनें "पुरी हौस फिटली" या कथेंत लेखिकेनें मगळागौरीच्या प्रसगाचे केलेलें पुढील वर्णन एका स्त्रीहृदयाचा आविष्कार म्हणून पहाण्यासारखें आहे:—

"श्रावणाचा महिना. झिम् झिम् पाऊस पडत आहे. रस्त्यात चोहोंकडे रिप् रिप्. जिकडे पहावें तिकडे चिखल. सूर्यनारायण आपलें दर्शन केव्हा देईल म्हणून सगळेजण आशेनें वाट पहात आहेत. त्यातून आज सोमवार. मग काय विचारावयाचें? साबाच्या देवळात जाणाऱ्या स्त्रियाच्या दाटीकडे तर पहावयाची सोयच नाहीं. तशातून नववधूची धादल तर पुसूच नका. सोंवळ्या पैठ-ण्याच्या बोजात, दागदागिन्याच्या ओझ्यात, जपून पडणारा तो तोरड्याचा पाय, आपल्या मधुर आवाजानें त्या वधूचा मानीपणा दाखवीत होता. नागगोड्याच्या वेढ्यानीं नटलेल्या बालिका हातात पूजेचे साहित्य घेऊन चालताना चिखलात पाय घसरू नये म्हणून एकसारख्या जपत होत्या व बरोबरीच्या मुलींना तुझें शिवामुठीचें कितवें वर्ष म्हणून विचारीत चालल्या होत्या बरोबर येणाऱ्या पोक्त बायका त्याना समोर पाहून लवकर चला म्हणून आग्रह करीत होत्या."

गिरिजाबाईंनीं "प्रेमाचें रुपातर" सारख्या मनोरजक गोष्टी आणि "*अगठीचा प्रभाव*" *सारख्या बोधपर गोष्टीहि लिहिलेल्या आहेत. मात्र त्याच्या* लेखनात इतराहून अगदीं वैशिष्ट्यपूर्ण असें काहीं आढळत नाहीं. घरगुती प्रसगाची सुदर सजावट हा एक भाग नाहीं म्हणायला वैशिष्ट्यपूर्ण आहे. पण

त्यापलीकडे त्याच्या कथेचें दुसरे ठळक वैशिष्ट्य सांगता येणें कठीण आहे. त्याच्या कथामधून येणारीं कित्येक पात्रें अगदीं ठराविक साचाचीं आहेत त्यात विविधता एकदरींनें कमीच. त्याप्रमाणें कलात्मक लेखनाला हानिकारक होणारा त्याचा तत्त्वबोधाकडे असलेला ओढा येथे ध्वनिरूपानें त्याना मांडता आला नाहीं उलट, त्यामुळें रचनेच्या दृष्टीनें विस्कळीतपणा झालेला दिसून येईल याच कारणामुळें गिरिजाबाईंच्या कथा आजच्या कथाच्या मानानें कलेच्या दृष्टीनें कमी प्रतीच्या आहेत असें दिसून येईल.

या कथामधून "वाचकहो, आता आपण अमुक एक करू या" अशा प्रकारची आलेली निवेदन पद्धति सकृद्दर्शनीं फारच चमत्कारिक आहे असें दिसून येते. वास्तविक गोष्ट जशी घडत गेली तशी सांगण्याची पद्धति लेखिकेनें एकदा स्वीकारल्यानंतर अशा प्रयोगाची त्याना आणखी काय म्हणून जरुरी भासावी कळत नाहीं.

गिरिजाबाईंची भाषा मात्र बरीचशी घगुरती असून सोपी आणि सुटसुटीत झालेली आहे. तसेच "भीड भिकेची बहीण," "आधींच तार त्यात विरल वार", अशा वाक्प्रचाराचा मोह त्याना बराच झालेला दिसतो. त्याचप्रमाणें "मला सांगावयाला झालें कीं", "तिकडे म्हणावयाचें झालें, "हट्टानें जवळून नथ मागून घेतली" अशा प्रकारच्या जुन्या काळच्या घरगुती बोलीचाहि वापर त्यानीं येथें यशस्वीपणें केलेला आहे—

● ● ●

## सौ. काशीबाई हेर्लेकर

यानंतरच्या काळात स्त्रियाच्या लेखणीनें थोड्या वेगळ्या दृष्टीन आपलें पाऊल टाकायला सुरवात केली केवळ आदर्श गृहिणीचें अगर प्रेमळ मातेचें चित्रण न करताना ससारातील विविध प्रश्न लेखनाद्वारें हाताळण्यास आरंभ केला इ. स. १९१७ मध्यें चवथी आवृत्ति म्हणून प्रकाशित झालेलें "संसारातील गोष्टी" हें सौ काशीबाई हेर्लेकर याचें पुस्तक त्या दृष्टीनें लक्षात घेण्याजोगें असें अगदीं सुरवातीचें पुस्तक होय येथें एकूण २६ प्रकरणामध्यें लेखिकेनें आपले विचार मांडलेले आहेत एका सुखी कुटुंबाचा आदर्श डोळ्यापुढें ठेवून लेखिकेनें ससारातील विविध प्रश्नाची येथें छाननी केली आहे. घराविषयींच्या आपल्या कल्पना मांडताना लेखिका इथें म्हणते—

"गरीबाची खोली जरी दिसण्यात अशी होती, तरी तिच्यामुळें तेथें जमलेल्या त्या आनंदी मुलाच्या आनंदाचा विरस झाला नव्हता. उलट त्याच्या त्या परस्परावर असलेल्या निष्कपट प्रेमामुळें व त्या लहान मुलाच्या इच्छा-

खेळण्यानें व उडण्याबागडण्यानें तिला मोठी रमणीय शोभा आली होती खरेंच, कुटुंबातील माणसे परस्परांशीं शुद्ध प्रेमभावानें वागत असतील तेथें बाह्य सौंदर्याची कांहीं गरज असते असें नाहीं. अशालाच घर हें नाव शोभतें नाहींतर चागला सुरेख सात मजली वाडा आहे, पण आत रहाणाराचा नेहमीं बारावा बृहस्पति असें असले तर त्याला कोणी घर म्हणेल का ?

"मुलें बाळें आहेत त्या घरातील माणसानीं काकणभर अधिक मेहनत करावी पण खाण्यात कद्रुपाई कधींहि करू नये घरातील रहाणाऱ्या माणसानीं घराची चागली ओज ठेवून, ती साफसूफ ठेविल्यावाचून घरें कधींहि चागलीं दिसत नाहींत . शेजार चागला असावा.. ."

या पुस्तकाचें एकदर वातावरण अतिशय घरगुती असून मधून मधून या सुखी कुटुंबातील वडीलधाऱ्या मडळींकडून लहानाना केलेलें मार्गदर्शनहि वाखाणण्या सारखें आहे. अगदीं नव्यानें ससारात पडणाऱ्या मुलींना या लेखनाचा उपयोग खात्रीनें होईल इतका उपदेशहि यात आलेला आहे. वाढावें कसें, सैपाक कसा करावा, विविध पदार्थ नव्यानें कसे तयार करावेत, घरचा हिशेब कसा ठेवावा, काटकसरीनें कसें वागावें, धुणेंपाणी कसें पहावें, घरगुती औषधोपचार कसा करावा इत्यादि प्रकारची सविस्तर माहिती येथें देण्यात आलेली आहे.

त्याचप्रमाणें "मायेचा बोल, सुखाचा शब्द आणि खायला प्यायला पोटभर असल्यावर कामानें शरीरावर चागलाच परिणाम होतो." अशा विचाराची पखरणहि येथें आढळून येते. म्हणजे या पुस्तकाची रचना केवळ स्त्रियासाठींच झालेली आहे असें येथें पानापानावर आलेल्या मजकुरावरून म्हणावयास मिलकूल हरकत वाटत नाहीं.

कौटुंबिक जीवनाचें ओझरतें दिग्दर्शन घडवीत असतानाच स्त्रियाचा ज्याच्याशीं पदोपदीं सबध येतो अशा सैंपाक घराचें वर्णन लेखिकेनें पुढीलप्रमाणें विशेष जिव्हाळ्यानें केलेलें आहे —

"स्वयपाक घर चागलें स्वच्छ दिसत आहे व त्यातहि उजेड आहे. चुलीच्या वरच्या अगास छप्पर काळे होऊन घरोसा लागलेला दिसत नाहीं. चुलीवर रात्रीं उजेड चागला पडावा म्हणून डाव्या बाजूला कदील आहे. चूल मातीनें सारवलेली असून पोतेरें नुकतेंच दिलेलें असल्याने जिकडे तिकडे स्वच्छ दिसत आहे पाण्याचीं भाडीं नीट लावून ठेविलीं आहेत, तींहिं स्वच्छ आहेत एका फडताळात दहीं, दूध वगैरे ठेवलेलें आहे व त्याच्यासमोर चुलीच्या डाव्या अगास फडताळ आहे त्यात तिखट, मीठ, मसाला वगैरे सामानाचे कित्येक डबे आहेत. स्वयपाकाचीं भाडीं ह्याच्याजवळ मजलेदार फळ्यावर रागेनें ठेविलीं आहेत पलिकडे चहाचीं भाडीं दिसत आहेत व दोन तीन मोठीं स्वयपाकाचीं भाडीं राख लावून फळ्यावर तयार ठेवलेलीं आहेत .."

* हें वर्णन वाचीत असताना वादीनार्ड कानिटकरांनीं " रंगराव " मध्यें दिलेलें घराचें वर्णन लक्षात आल्याखेरीज रहात नाहीं.

## सौ. जानकीबाई देसाई

जानकीबाई देसाई यानीं वैवाहिक जीवनावर आधारलेल्या अशा चार-सहा कादम्बऱ्या लिहिलेल्या आहेत. " गृहलक्ष्मी " ( १९१५ ) ही त्याची सुरवातीची कादबरी या कादबरींत त्यानीं यमुना नावाच्या एका तरुण गतभर्तृकेची कहाणी करुण रसाचा सुदर आविष्कार करून सागितलेली आहे. येथें अनेकदा सक्टें आलीं असता दारिद्र्याच्या परानाष्टेस पोंचलेल्या स्त्रिया सदाचारापासून ढळत नसल्याचें नायिकेच्या व तिच्या बहिणीच्याद्वारें फार चागल्या रीतीनें दाखविलें आहे. या कादबरीची भाषा साधी, सहजसुदर व आकर्षक झालेली असून एका असहाय स्थितींतील गरीब हिंदु कुटुबाच्या रहाणीचें मनोरम चित्र लेखिकेनें येथे सहृदयतेनें चित्रित केलेलें आहे.

जानकीबाईच्या विचारसरणींत त्यावेळच्या मानानें क्रांतिकारक विचाराची गुफण झालेली आढळून येते " सौभाग्यतिलक " ( १९१७ ) मध्यें आपल्या पसतीस उतरलेल्या वधूशीं विवाहबद्ध झाल्यामुळें वडिलाचा रोष पत्करावा लाग णाऱ्या नायकास घर सोडावें लागल्याची कल्पना आलेली आहे तसेंच "चारगात्री" ( १९२० ) मध्यें मद्रासी नायक आणि वग नायिका याच्या मीलनाची कहाणी लेखिकेनें सागितलेली आहे ! जुन्या सस्कृतीचा पगडा मनावर असणाऱ्या स्त्रीच्या लेखणींतून त्या काळात इतकी क्रांतिकारक विचारसरणी बाहेर पडावी, ही कल्पनाच मुळीं आश्चर्यकारक आहे, असें म्हणावें लागेल. स्त्री शिक्षणाच्या फैलावा-बरोबरच स्त्रिया स्वतत्र रीतीनें विचार करू लागल्याचा हा प्रारभ होय ! त्या दृष्टीनें जानकीबाईच्या कादबऱ्या वैशिष्ट्यपूर्ण होत.

स्त्रियानीं लिहिलेल्या या कालखडातील या प्रकारच्या गद्यलेखनाबरोबरच त्याच्यापैकीं काहींजणींनीं केलेलें काव्यलेखनहि येथें अवश्य लक्षात घेतलें पाहिजे.

### काव्य

सामान्यत: १८८५ ते १९२० पर्यंतचा काळ म्हणजे काव्याच्या दृष्टीनें क्रांतीचा काल असें समजतात. " कारण या कालात मराठीचें जुनें वळण जाऊन इग्रजी कवितेचें वळण या काव्यास सपूर्णपणे लागलें असें दिसून येते. १९२०पर्यंत हें वळण लावण्यास कमीअधिक हातभार लावणारे सारे लोक म्हणजे केशवसुत, दत्त, विनायक, माधवानुज, गडकरी, बालकवि आणि टिळक हे एकामागून एक

आपापलें कार्य करून अस्त पावलें." * या कालामध्यें पुरुषांनीं लिहिलेल्या काव्यात असा बदल झाला असला व त्यास नवें वळण मिळालेलें असलें तरी स्त्रियांनीं जें काव्य लिहिलें त्यात मात्र याहि कालात काव्याचें जुनेंच वळण जास्त राहिलेलें दिसून येतें.

सरस्वतीबाई टिपणीस यांचीं "अंतर्गृहातील गीतें" (१९१५), राधाबाई आपटे यांचें "कीर्तनसुधा" (१९१८), मनूबाई भोरकर यांची "फेरांचीं गाणीं" (१९१२), राधाबाई महेश्वरकर यांची "बायकांच्या सभेंतील गाणीं"(१९०८) गंगाबाई विजापूरकर यांचें "सावित्रीचें गाणें" (१९१३) इत्यादि अनेक कवयित्रींची ही कामगिरी लक्षात घेता मराठी काव्यात पडून आलेल्या क्रांतीचा त्यांना मागमूसहि नव्हता असें दिसून येतें. आपल्या धार्मिक रूढि आणि जुन्या चालीरीति यांच्याबाहेर त्यांचे काव्याचे विषय जाऊ शकत नव्हते. कारण त्यावेळीं स्त्रीशिक्षणाचा प्रसार फारसा झालेला नव्हता आणि दुसरें म्हणजे त्यावेळच्या स्त्रियांनीं आपल्या शिक्षणाच्या मानानें काव्याचा अभ्यासहि केला नसावा. तथापि वर दिलेल्या कवितेप्रमाणेंच काव्यलेखन करणाऱ्या काहीं कवयित्रींच्या काव्याचें स्वरूप कसें आहे तें आता पहावयाचें आहे.

० ० ०

## पार्वतीबाई गोखले

"स्त्रीगीत रत्नाकर" (१९०३) या पुस्तकात पार्वतीबाई गोखले यांनीं अप्रकाशित अशीं काहीं गाणीं दिलेलीं आहेत. हीं गाणीं लहान मोठ्या स्त्रियांनीं म्हणावयास व ऐकावयास योग्य अशीं असून तीं देवादिकावर रचलेलीं आहेत. उदाहरणार्थ या पुस्तकातील खालील "गौळण" या संदर्भात पहावी.—

"गौळणी सांगती गाऱ्हाणी, रात्रीं आले चक्रपाणी ॥
खातो दहिं, दुध, तुप, लोणी, फोडिल्या अवघ्या विरजणी ॥
हरि बाई कोणास आवरेना ॥ यशोदे बाळ तुझा कान्हा ॥
कुठवर सोसुं मी धिंगाणा ॥..."

या गौळणींत कृष्णाच्या किती तरी लीला याचप्रकारें वर्णिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें 'रासक्रीडा' मधील कृष्णाची लीला कशी रंगविली आहे पहा—

"वृंदावनीं सह गोपि हरी, रास मंडळीं क्रीडा करी ॥ धृ०॥
रुक्मिणी वाजवि सारंगी, सगुणि थाप दे मृदंगीं ॥
सन्मुख गायन करि रंगी, चागुणि डोळे चवरंगी ॥

---

* रा. श्री. जोग, मराठी साहित्य, पा. २

गुलाल झोकिति नारगी, खेळति टिपऱ्या सारगी ॥
उडे रगाची पिचकारी ॥ "

या गीताची भाषा जुन्या थाटाची व रचनाहि जुन्या पद्धतीचीच आहे. स्त्री स्वभावातील भावनाविष्कारापेक्षा येथें भाबड्या अत करणातून निघणारे देवाविषयींचे बोलच अधिक आढळतात.

० ० ०

# कृष्णाबाई गाडगीळ

"मानसगीत सरोवर" ( १९१३ ) या पुस्तकात कृष्णाबाई गाडगीळ यानीं भगवताच्या गुणलीलावर रचलेलीं गाणीं दिलेलीं आहेत कोल्हापूरच्या देवीवर रचलेलें त्याचें गाणें त्या दृष्टीनें उदाहरण म्हणून येथें पहाण्यासारखें आहे–

" चला सख्यानो करविर क्षेत्रीं जगदबा पाहू ॥
हळदी कुकू तार्टि भरोनी आनदे वाहू ॥ धृ ॥ .
लाल पैठणी नेसुन ल्याली कचूकी अगा । कचूकी. ॥
नेत्रीं अजन कुकुम मळवट भरि शेंदूर भागा । केशर कस्तुरि चदन
मिश्रित सुगध सर्वांगा ॥ सु ॥ कुसुमहार तो गळा घालनी शोभे धवलगा ।
सागरतनया श्रीविष्णूचे त्यागुनि अर्धांगा ॥ दीन अनाथा
उद्धारास्तव आली असे वेगा ॥ लक्ष चौऱ्याशि योनि हिंडुनी किती
तरि जिव श्रमवू ॥ कि. ॥ पुरे पुरे या प्रपच लाटा कवणे परि साहू ॥
चला. ॥ वेणि शेषसम गोंडे फुलाची पाठिवरी लोळे ॥ पाठि ॥
बिंदि बिजवरा काप बुगड्या नथ नाकीं डोले । मगळसूत्र तन्मणि
लफ्फा पुतळ्या कारलें ॥ पुत ॥ चद्रहार सरि झगझग चमके कर्टि पट्टा
आवळे । गोठ पाटल्या छद तागड्या पुढें ताशिव तोंडे ॥ पुढें ॥ दर्डी
बाकी बाजूबदाचे लोंबति लाल गोंडे । कृष्णेच्या करिं शनकाकडा उचलुनिया
पाहू ॥ उ ॥ मम कुलदैवत श्री जगदबा पदकमलीं वाहू ॥ २ ॥

कृष्णाबाईच्या या गाण्यात स्त्रीस्वभावाचें वैशिष्ट्य सुदर रीतीनें आविष्कृत झालेलें आहे. अशीं किती तरी गाणीं व आरत्या त्यानीं या पुस्तकात दिलेल्या असून त्या आकर्षक झाल्या आहेत. त्याच्या लेखनात निढाळा असला तरी त्याच्या लेखनावर सस्कृताची बरीच छाप पडलेली दिसून येते. "सागरतनया" "धवलगा", असे किती तरी सस्कृत शब्द त्यानीं येथें योजिलेले आहेत त्याच्या काव्यात प्रसाद व माधुर्य हे काव्य गुणहि चागल्याप्रकारें प्रकट झालेले आहेत

० ० ०

# लक्ष्मीबाई वेहेरे

इ स.१८९६ ते १९१४ या कालखडात लिहिलेल्या लक्ष्मीबाईच्या कविता "सुमन माळ" या काव्यसग्रहात समाविष्ट झालेल्या आहेत. या कविता मात्र देवादिकाचें मनावरचें मोहपटल बाजूला झुगारून वैयक्तिक मुखदु न्यांनीं नटलेल्या आहेत. एकनिष्ठ व उत्कट प्रेमाची भावना या कवितामधून अतिशय कौशल्यानें सूचित झालेली असून तीच या काव्याचा प्रमुख विशेष आहे. हा विशेष दर्शविणाऱ्या "प्रियकरा!" या कवितेंत प्रेमपत्राबद्दलची आपली अपेक्षा व्यक्त करताना कवयित्री म्हणते —

अपराध काय मीं केले ?<br>
का त्यजुनी जाणें झालें ॥ प्रियकरा ॥<br>
सोडुनी सर्व रागातें ।<br>
पाठवा प्रेमपत्रातें ॥ प्रियकरा ॥<br>
जो प्रेम तरु लावियला ।<br>
सुकुनी का आज तो गेला ॥ प्रियकरा ॥<br>
सिंचुनी प्रेम जल वरतें ।<br>
वाढवा तया वृक्षातें ॥ प्रियकरा ॥ . "

म्हणजे इग्रजी कवितेची छाप या काव्यावर पडलेली असली तरी "असे पति देवचि ललनाना" ही भूमिका मात्र येथें कवयित्रीनें सोडलेली नाहीं हें विशेष होय

इ. स. १८७४ ते १९२० या कालखडामधील स्त्रियानीं लिहिलेलें वाङ्मय हें अशा प्रकारचें आहे. सख्येच्या मानाने तें फारच कमी आहे, अशी वस्तुस्थिति दिसत असली तरी तो दोष काळाचा आहे असे म्हणावें लागेल. कारण त्या वेळची सामाजिक परिस्थिति आणि स्त्रीशिक्षण याचा समन्वय घातला तर त्यामानानें हें वाङ्मय बरेंच आहे असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं.

वास्तविक हा काल एक प्रकारच्या सामाजिक आणि राजकीय क्रातीनें भरून गेलेला असा आहे. त्याचे पडसाद पुरुष लेखकाच्या लेखनात भरपूर उमटलेले दिसून येतात त्याच्या अगदीं उलट स्थिति या स्त्रियाच्या लेखनात आढळून येते या काळातील हें स्त्रियाचें वाङ्मय अतिशय मर्यादित क्षेत्रातून निर्माण झालेलें दिसतें. अनेक लेखन प्रकार स्त्रियानीं हाताळलेले असले तरी "शिवरामपत ही एक व्यक्ति नव्हती. शिवरामपत ही स्फूर्ति होती शिवरामपत ही शक्ति होती. शिवरामपत ही चेतना होती. शिवरामपत ही विचाराची सुवर्ण खाणी होती. शिवरामपताची मोठी मर्दुमकी म्हणजे सर्व महाराष्ट्रभर त्यानीं उत्पन्न केलेली स्वातत्र्याची प्रीति होय! शिव-

रामपताच्या पूर्वी राजकारण सत्तेशी संगनमत करणारे होतें. शिवरामपताच्यापूर्वी स्वातंत्र्य हा शब्द महाराष्ट्राला नवखा होता .....स्वातंत्र्याची कल्पना प्रथम शिवरामपतांनीं पुढें माडली.. प्रत्येकाच्या रसनेस त्यानीं स्वातंत्र्याची चटक लावली..." (अच्युतराव कोल्हटकर) असे वैशिष्ट्यपूर्ण उद्‌गार कोणत्याहि लेखिकेबद्दल निघालेले नाहींत ! तथापि येथें एक गोष्ट प्रामुख्यानें सागावी लागेल कीं, स्त्रियानीं स्वतःच्या म्हणून ज्या भावना आहेत त्या ज्या उपमादृष्टातानीं व ज्या कल्पनानीं चितित केल्या त्याची सर कोणत्याहि पुरुष लेखकाला न येण्यासारखीच आहे ! अर्थात् हा भाग अगदीं अल्पप्रमाणात आहे हें कबूल केलें, तरी तो आहे त्याच मोजक्या प्रमाणात का असेना पण आपलें वैशिष्ट्य दर्शविणारा आहे, यात शका नाहीं.

हरिभाऊच्या कादबऱ्याचें वैशिष्ट्य, त्याची स्वभाव-लेखनाची अप्रतिम कला किंवा विषय माडण्याची अवर्णनीय हातोटी आणि विषयातील विविधता, काशीबाईच्या लेखणींत तितक्या उत्कटत्वानें आढळत नसली, तरी काशीबाईच्या कादबऱ्यातून झालेला स्त्री हृदयाचा आविष्कार केव्हाहि वैशिष्ट्यपूर्ण आहे आणि म्हणूनच त्याना लिहिलेल्या एका पत्रात खुद्द हरिभाऊच लिहितात कीं —

"आपली कादबरी वाचून मला आपल्यास प्रख्यात इग्रजी कादबरी लिहिणाऱ्या ज्या मिस् ऑस्टेनबाई, किंवा फ्रेंच कादबऱ्या लिहिणाऱ्या जॉर्ज सॉन्‌डई, त्याच्या जोडीला बसवाव्या असें वाटतें. मि. रा. गोविंदराव याचा हेतू आपण जॉर्ज ईलिअट व्हावें असा दिसतो; परतु माझ्या पामर बुद्धीला असें वाटतें कीं, आपण जेन ऑस्टेनचेंच अनुकरण करावें. जॉर्ज ईलिअटचें अनुकरण करणे इष्ट नाहीं. खरोखर साधेपणात जी काय मौज आहे ती कशात नाहीं. अव्याज मनोहरत्व हें काहीं निराळेच आहे. त्याची बरोबरी कशासहि यावयाची नाहीं मी आपणास जेन ऑस्टेनची उपमा देतों याचें कारण तरी आपल्या भाषेचें अव्याज मनोहरत्व, हेंच होय...माझी तर आजमितीला अशी खात्री आहे कीं, "गृहसौख्य" व "सुखकरदर्शी" हे दोन भाग जसे तुम्हाला साधले आहेत तसे मला कधींहि साधले नसते ..राधाबाईचें पात्र...जर जुन्या काळच्या प्रेमळ, सुशील प्रश्रा पोक्त स्त्रीचें चित्र मला दाखवा असें कोणी म्हणेल तर मी त्यास चटकन् आपली कादबरी वाच म्हणून सागेन..... अहाहा ! काय हा राधाबाईची बोलणीं ! ....." (डेक्कन कॉलेज, पुणें. ६ मे १८८५.)

शिवरामपताच्या काव्यमय भाषाशैलीचें व वर्णनशैलीचें सौंदर्यहि काशीबाईच्या लेखणींतून पुष्कळ ठिकाणीं दिसून येतें.

रमाबाई रानडे याच्या आत्मचरित्राचें वैशिष्ट्यहि अपूर्व आहे. त्याकाळच्या स्त्रीयांच्या सामाजिक इतिहासाचा तो अतिशय सुदर व वास्तव असा चित्रपटच आहे.

अतिशय मोकळ्या मनानें स्त्री लिहावयास बसली, तर तें लेखन किती परिणामकारी होऊं शकतें, याचा तो एक आदर्श नमुनाच होय.

काव्याच्या आणि निबंधाच्या बाबतींत मात्र स्त्रियांची या कालांतील लेखणी फारच मर्यादित क्षेत्रांतून वावरत असलेली दिसून येते. १९२० नंतर ही परिस्थिति पालटून गेली. पहिल्या महायुद्धानंतर आपल्या देशांत स्थित्यंतरें घडून आलीं; त्यांचा परिणाम विशेषतः स्त्रीजीवनावर फारच मोठ्या प्रमाणांत झाला. त्यामुळेंच त्यांच्या वाङ्मयाचेंहि स्वरूप बदलत गेलें. काळाच्या गतीबरोबर जाण्याचें सामर्थ्य त्यांच्या लेखनांतहि येत गेलें. पुढील प्रकरणांत त्याचाच विचार करावयाचा आहे.



## ६.

# ललित वाङ्मयाचा विकास

मागील प्रकरणांत ललित वाङ्मयाच्या प्रारंभ कालांतील स्त्रियांच्या लेखनाचें कांहींसा विस्तारानें विवेचन केलें. या प्रकरणात इ. स. १९२० ते १९६० या कालखंडांतील ललित वाङ्मयाच्या विकासाचे मूल्यमापन करावयाचें आहे. म्हणजे या कालखंडांतील स्त्रियांनीं जी लेखननिर्मिति केली तिचें स्वरूप या प्रकरणांत लक्षांत घ्यावयाचें आहे. या कालखंडांत स्त्रियाच्या शिक्षणाची वाढ झाली असून त्यांचें लेखनहि बरेंचसें विकसित झालेलें आहे. नवीन नवीन लेखिका या काळात उदयाला येऊन मान्यवर झालेल्या आहेत. त्यांचें लेखनहि पूर्वीच्या स्त्रियांच्या मानानें भरपूर झालेलें आहे. त्या कारणानें जुन्या काळच्या लेखिकाच्या मानानें या कालांतील लेखिकाच्या लेखनाचा विचार काहींशा संक्षेपानेच करण्याचा विचार आहे.

इ. स. १९२० नंतरच्या स्त्रियाच्या सामाजिक जीवनांत व पूर्वीच्या मानानें शिक्षणात बराचसा फरक पडत गेला. इंग्रजांच्या सहवासानें व शिक्षण पद्धतीमुळें दिवसेंदिवस भारतामधील लोक अधिक सुशिक्षित होत गेले. त्यांच्या अंगीं समाज सुधारणा बाणली गेली. स्वातंत्र्याचा विचार त्याच्या मनात फोफावत गेला. नव्या विचाराची सर्वत्र पेरणी होत गेली. त्याचा परिणाम लेखनावरहि होत गेला. इंग्रजींतील साहित्याच्या वाचनानें व पठणानें मराठी साहित्यात अनेक वाङ्मय प्रकार नव्याने जन्माला आले. जुन्या लेखनप्रकाराला नवजीवन लाभलें, बहर येत गेला. आणखी मुख्य म्हणजे समाज-सुधारणा वाढीस लागल्या. बदलत्या जगाचे पडसाद स्वाभाविकपणेंच वाङ्मयाच्या प्रांतांत उमटूं लागले. ह्या परिस्थितीचा परिणाम स्त्रीजीवनावर चांगलाच झाला. म. ज्योतिराव फुले, आगरकर यांच्या सामाजिक सुधारणेमुळे स्त्रीशिक्षण वाढीला लागलें आणि हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्याच्या वाचनामुळें स्त्रीजीवनाला खरी वाचा फुटली. स्त्रियांची लेखणी अधिक स्वतत्रपणें विचार करूं लागली. आपलें म्हणून वेगळें कांहीं मांडण्याकडे तिच्या मनाचा कल झुकूं लागला. त्याच्या विचारास वेगळे वळत मिळत गेलें. स्वतःची प्रत्येक भावना घरगुती वातावरणांत कां होईना, पण निःसंकोचपणें मांडण्याचें मत स्त्रीच्या लेखणीनें अंगिकारिलें. त्याचा

आविष्कार त्यांच्या लेखनात होत गेला. आणि हिंदुस्थानातील स्त्री ही एकल कोंडी, दुबळी, खुळ्या धार्मिक समजुतींनीं बुरसटलेली, पुरुषाच्या इच्छाआकांक्षाना बळी पडणारी, अशी जी समजूत समाजात कितीतरी वर्षे रूढ झाली होती तिला एकदम भगदाड पडलें अशिक्षितपणामुळें तिच्या ठायीं वसणारें न्यूनगंडत्व लय पावू लागलें. शिक्षणामुळें तिला एक प्रकारच आगळें सौंदर्य लाभलें तिचें मानसिक परिवर्तन घडत चाललें. मनात येईल तें बेधडक लिहिण्याची मोकळीक तिला लाभली विभावरी शिरूरकरांनीं आपल्या लेखनद्वारें या परिवर्तनाची नांदी गाइली. स्त्रीजीवनात नवा प्रकाश येत चालला स्त्री ही पुरुषाच्या दृष्टिकोनातून त्यांच्या लेखनात प्रकट व्हायची ती तिच्याच जीवाभावाच्या लेखणीच्या माध्यमातून खरीखुरी अशी प्रकट होत चालली. नव्या स्त्रीच्या जीवनाचा साक्षात्कार घडविण्याचें सामर्थ्य स्त्रियांच्या लेखणीला आलें ! नव्या जगातील नवी स्त्री व तिचे जीवन कसें असतें याचा चमत्कार मराठी रसिकांनीं उपभोगला !! स्त्रियांची लेखणी अधिक मोकळ्या मनानें आपला व जगाचा विचार करायला शिकली, ही घटनाच या कालखंडाच्या प्रारंभाला मोठी क्रांतिकारक अशी ठरली

इंग्रजी व इतर परभाषेंतील वाङ्मयाच्या परिचयामुळें मराठींत जसे वेगवेगळे वाङ्मयप्रकार नव्यानें रूढ झाले व जुने वाढीला लागले, तसेच वाङ्मयातील कलाप्रकाराचा तंत्र म्हणून अभ्यासहि आपल्याकडे सुरु झाला इ. स. १९२० नंतरच्या कालखंडातील ही उल्लेखनीय गोष्ट होय या कालखंडात परभाषेंतील वाङ्मयाच्या भाषांतराची पैदास जरी झपाट्यानें झाली तरीच ती स्वतंत्रपणें होणाऱ्या लेखनाचीहि झाली तंत्रात्मक अभ्यास होऊन हें लेखन होत गेलें हें इथें अवश्य लक्षात घेतलें पाहिजे

कथा, काव्य, कादंबरी, निबंध, नाटक इत्यादि अनेक प्रकारचे वाङ्मयीन कलाप्रकार या कालखंडातील लेखिकांनीं हाताळले व आपलें लेखन कलेच्या दृष्टीनें देखील सरस होईल याबद्दल दक्षता राखली संख्येच्या दृष्टीनें हे विविध प्रकारचें वाङ्मय विपुल असल्यामुळें विभागश त्याचा पुढें विचार केलेला आहे त्याचप्रमाणें कवयित्री व लेखिका याचाहि स्वतंत्रपणें त्यांच्या लेखनासहित इथें उल्लेख करण्याचें ठरविलें आहे.

o o o

## काव्य

मराठी कवितेला जशी सात शतकाची उज्ज्वल परंपरा लाभलेली आहे, तशीच ती मानवजातीच्या भावनेचा आविष्कार करणारी पहिलीच श्रेष्ठ अशी वाङ्मयीन कलाकृति होय माणूस पहिल्यादा बोलू लागला तें प्रामुख्यानें काव्यात !

त्या कारणानें कवितेचा म्हणून असा इतिहासहि तसा फार जुना आहे पण म्हणून कविता कधीं तरी जुनी होणारी नसते कारण काव्य हें नेहमींच नित्य नवें असतें, ताजे असतें, त्याची वृत्ति प्रफुल्लित असते व म्हणून तें कधींच जुने होऊ शकत नाहीं.

आचार्य अत्रे यानीं म्हटल्याप्रमाणें "काव्य म्हणजे कांहीं छंद नव्हे, किंवा शब्द नव्हेत. छंदात आणि शब्दात नवेजुनेपणा होऊ शकतो. काव्य म्हणजे कल्पना नव्हे कालमानाप्रमाणें कल्पनाही जुन्या होतात काव्य म्हणजे रस. काव्य म्हणजे गंध. काव्य म्हणजे तेज काव्य म्हणजे ध्वनि आणि ह्या सर्व गुणाचा हृदयस्पर्शी समन्वय म्हणजे सुद्धा काव्यच प्रस्तर युगापासून तो अणु युगापर्यंत मानवाची केवढी उत्क्रांति झाली? जीवन आमूलाग्र बदललें म्हणून मनुष्याचें हृदय बदललें का? निसर्ग जसा बदलला नाहीं तसं मनुष्याचें हृदयही बदललें नाहीं. लक्षावधि वर्षे झालीं तरी फूल, मूल, झरा, सकाळ अन् चांदणें होतें तसेंच आहे. त्याना बघून माणसाचं हृदय पूर्वी जसें नाचत होतें तसें तें आजही पण नाचतें आहे. वसंत ऋतूतील कोकिळेचा मुहूरव ऐकून जगाच्या प्रारंभीं त्याच्या हृदयात जी हुरहुर उत्पन्न होत होती, तशी ती आजही पण होत आहे . जगातलें सौंदर्य, सुगंध आणि संगीत ह्यांचा आस्वाद घेण्याचें मनुष्याच्या भावनेंतलें सामर्थ्य जोंपर्यंत जुनें होत नाहीं, तोंपर्यंत काव्य हें नेहमींच नवें राहाणार."*

कविता ही एखाद्या नदीप्रमाणें मानवी संस्कृतीची जननी तशीच धारिणीहि आहे गद्याचें तसें नाहीं. गद्याचा विकास हा मानवी विचारांच्या प्रगतीबरोबर होत गेलेला आहे "त्यामुळें राष्ट्राच्या वैचारिक परंपरेचें वैशिष्ट्य आणि सातत्य हें जितकें त्याच्या कवितेंत प्रगट झालेलें असतें आणि प्रत्ययाला येतें, तितकें तें गद्यात दिसून येत नाहीं "†

आधुनिक मराठी कवितेचा उदय झाला त्यावेळीं आपल्या देशाचा काळ एक प्रकारच्या राष्ट्रीय पुनरुज्जीवनाचा होता राजकारणाच्या धाळवडून गेलेल्या क्षितिजावर मानवी अंतःकरणातील प्रक्षोभक विचारानीं उभारलेल्या ध्येयाचीं उप प्रभा नुकतीच पसरू लागलेली होती पण त्याचे पडसाद म्हणावे तसे केशव सुताच्या काव्यात देखील उमटलेले दिसत नाहींत! इंग्रजाच्या भौतिक संस्कृतीच्या प्रभावानें आपल्या लोकांचीं अंतःकरणें त्यावेळीं दिपून गेलीं होतीं त्याचा परिणाम असा झाला कीं, इंग्रजाचें अनुकरण करण्याशिवाय आपल्या उन्नतीचा दुसरा कोणताच मार्ग आपल्या लोकाना दिसेना. या अनुकरणाच्या भावनेमधूनच अनेरीत आधुनिक कवितेचा उदय झाला. तिचें पूर्वीचें आंतर्बाह्य स्वरूप पार बदलून गेलें.

---

* तापीतीर, प्रस्तावना पा ५

† ग. त्र्य माडखोलकर, अर्वाचीन मराठी साहित्य पा. ५

जुन्या काळच्या कवितेचें वळण जुनें होतें, घडणहि जुनी होती. पण बहुजनसमाजाच्या काळजाला हात घालण्याचें सामर्थ्य तिच्यात होतें. आधुनिक कवितेचें मात्र तसें नाहीं "तिची हाक फक्त इंग्रजी शिकलेल्या पांढरपेशा सुशिक्षिता पुरतीच मर्यादित आहे किंबहुना त्या वर्गांतल्याहि शेले प्रभृतींच्या कवितेंत रंगलेल्या आणि प्रणयमैत्रींच्या कल्पनांत गुंतलेल्या फक्त तरुण, स्वप्नाळू जीवानाच तिची ती प्रीतीची भाषा उमजते, आवडते"* त्यामुळें बहुजन समाजाच्या हृदयांत ती भावनांची कारंजीं उठवू शकत नाहीं. कारण आधुनिक कवींच्या भावना ह्या स्वतःपुरत्या मर्यादित झालेल्या दिसतात ! त्या कवीच्या दृष्टीनें सहजस्फूर्त आणि प्रामाणिक असल्या तरी बहुजनसमाजाच्या त्या ओळखीच्या वाटत नाहींत एवढें खरें श्री माडखोलकरांनीं म्हटल्याप्रमाणें "आधुनिक कवितेतील सर्वांत मोठी उणीव किंबहुना वैगुण्य जर कोणतें असेल तर तें हें आहे कीं, तिच्यात देश्य असें वातावरण अगदीं कमी आहे, तिच्यांतून व्यक्त होणाऱ्या कल्पना आणि कामना, विचार आणि विकार, संकेत आणि संप्रदाय हीं परभृत असतात. कुठल्या तरी अगदीं परकीय वातावरणांतून उचलून आणलेलीं असतात. आधुनिक कवी समाजसुधारक आहेत आणि देशाभिमानीहि आहेत. पण ज्या समाजाच्या सुधारणेची ते चिंता वाहतात त्याच्या राहणीची त्याना जाणीव नाहीं आणि ज्या देशाच्या ऊर्जिततेचा ते अभिमान वाहतात तोहि त्याच्या डोळ्यापुढें नसतो" अशी आधुनिक कवितेची पार्श्वभूमि आहे. श्री. माडखोलकरांचें हें म्हणणें प्रामुख्यानें पुरुषाच्या काव्यनिर्मितीस धरून असें आहे. स्त्रियांच्या कवितेचें स्वरूप याहूनहि मर्यादित असें दिसून येतें"

काव्याच्या बाबतींत वेगवेगळी वृत्तरचना स्त्रियांनीं हाताळलेली असली तरी वैचारिकदृष्ट्या प्रामुख्यानें त्यात त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक जीवनाचीच बाजू अधिक आलेली आहे. स्त्रीशिक्षण वाढत गेलें तसें स्त्रियांचें मतपरिवर्तनहि घडत गेलें. स्वतन्त्रपणें त्या विचार करूं लागल्या व त्या विचाराचे पडसाद स्वाभाविकच त्यांच्या लेखनात उमटूं लागले.

○ ○ ●

## लक्ष्मीबाई टिळक

एखाद्या कवीच्या काव्यात त्याचें जीवन भरलेलें असते आणि त्याच्या जीवनातच त्याचें काव्यहि फुललेलें असतें, असें काहीं बोलावयाचा मोह एखाद्याच कवीकडे बघून रसिकाला होतो श्रीमती लक्ष्मीबाई टिळक ह्या याच प्रकारचें

---

* श्री. ग. त्र्य. माडखोलकर, अर्वाचीन मराठी साहित्य, पा. ३

बोलणें त्यांचेबद्दल करावेंसें वाटावें, अशा भाग्यवान कवयित्री आहेत. वास्तविक इ. स. १८९४ त याची पहिली कविता जन्माला आली परंतु कवयित्री म्हणून जगापुढे त्यांचें नाव यायला पुढें १९०७ साल उजाडलें इ. स. १८९२ च्या सुमारास त्यांना अक्षर ओळख झाली. आणि त्यांच्या ओठावर त्यांच्या मनातील भाव घडाघड बोलता होत गेला परंतु घरगुती शिक्षण घेतलेल्या ह्या स्त्रीनें मराठी वाचकाला व आता परभाषेंतील वाचकालाहि थक्क करून सोडणारें लेखन केलें लक्ष्मीबाईंच्या 'स्मृतिचित्रांनीं' मराठी शारदेला जणु हिऱ्यामाणकांचा साज घातला ! आणि त्यांच्या कवितेनें मराठी काव्यात एक नवीनच पायंडा घालून दिला आर्य पतिव्रता म्हणून जन्म काढला पाहिजे अशा भावनेनें सनवि लेल्या हिंदू संस्कृतीत बालपणीं वाढलेल्या लक्ष्मीबाईंनीं सुधारणेच्या नव्या जगातील बऱ्याचशा गोष्टी आत्मसात् केल्या आणि मनात येईल तें बेधडकपणें आपल्या लेखनात मांडायला सुरवात केली. जीवनात येणाऱ्या सुखदु खांना निर्भयपणानें अंगाखांद्यावर झेललें आणि स्त्रीजीवनाचा एक वेगळाच साक्षात्कार मराठी मुलखाला घडविला. त्यांचे ठायीं मुळातच असलेलें प्रतिभासंपन्न मन त्यांचे पति रे. टिळक यांच्या सहवासात पालवलें. अधिक सुसंस्कृत बनलें. धीट झालें. स्वाभिमानानें बोलत राहिलें.

लक्ष्मीबाईंची कविता संख्येच्या दृष्टीनें कमी आहे, परंतु गुणाच्या दृष्टीनें भारी आहे. तिचे विषय अनेक आहेत आणि वृत्ति चौखदळ आहे. तिचा भाव साधाभोळा घरगुती असा आहे. परंतु आशय प्रतिभावंतांनीं लक्षात घेण्याजोगा आहे या कवितांचीं पुस्तकरूपानें जुळणी झाली ती " भरली घागर "च्या रूपानें इ. स. १९५१ सालीं. यावेळीं मराठी रसिकाच्या लक्षात एक गोष्ट प्रामुख्यानें आली. ती अशी कीं, एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात निर्माण झालेली लक्ष्मीबाईंची कविता ही चालू काळातहि काहीं नाविन्य बाळगून आहे आणि ह्याच या कवितेचा प्रमुख गुणविशेष होय.

लक्ष्मीबाईंनीं मराठी काव्याच्या प्रांगणात पाऊल टाकलें त्यावेळीं एक वेगळेंच नवल घडलें त्यांच्या पूर्वीच्या पिढीनें–स्त्रियांनीं–कविता रचली ती रामाचें गाणें, द्रौपदीचा धावा, सीतेचे डोहाळे, निरनिराळ्या प्रकारच्या झोपाळ्यावरील ओव्या वगैरे पुराण्या प्रकारची अशी रचली परंतु लक्ष्मीबाईंनीं आपल्या कवितेला नव्या नव्या तऱ्हा व चाली शिकविल्या काव्याचे प्रांतात धडाडी दाखविली. त्या कारणानें इतर भगिनींना मोठा धीर आला. त्यांचे मुकें व लाजरें मन बोलकें झाले ! त्यामुळें लक्ष्मीतनया, लक्ष्मीबाई वेहेरे, शारदाबाई परांजपे, हिराबाई पेडणेकर, शांताबाई पणसे, मनोरमाबाई रानडे इत्यादि कवयित्री पुढें आल्या. अर्वाचीन कवयित्रींच्या परंपरेचा आरंभ हा त्यामुळेंच लक्ष्मीबाई टिळकांपासून होतो.

मनोरंजन मासिकाच्या इ. स. १९०९ च्या दिवाळी अंकात लक्ष्मीबाईंची

" करंज्यातला मोदक " ही प्रेम मीमांसापर व कल्पनापूर्ण भावकविता प्रकाशित झाली आणि उभ्या महाराष्ट्राला त्यांची ओळख घडली. पापड व लाटी, कानवला व करंजी या खाद्यपदार्थांच्या जोडीला पाहूनच " नरनारी सगम जिकडे तिकडे बाई !' असले तात्त्विक विचार लक्ष्मीबाईंना सुचले व ते त्यांनी आपल्या कवितेत गोवून टाकले.

लक्ष्मीबाईंच्या कवितेंत भक्ति, करुण आणि वात्सल्य या रसाचा सुंदर आविष्कार आढळून येतो. त्यांच्या 'खिस्तायना'त त्यांचा भक्तिभाव जेवढ्या प्रकर्षानें आढळून येतो, तेवढ्याच जोमानें त्यांच्या 'सौभाग्य लयाला गेलें' किंवा 'मी तुझी मावशी' या कवितांतून करुणरस फुल्लेला दिसून येतो आणि त्यांच्या 'वसंता' मध्ये वात्सल्य कसें उरीं दाटल्या पान्ह्यासारखें उफाळून वर आलेलें आढळून येतें.

" काव्य म्हणजे व्याकरण नव्हे, काव्य म्हणजे शुद्धलेखन नव्हे, काव्य म्हणजे अलंकार नव्हे. काव्य म्हणजे काव्यच. आधीं सौंदर्य व मग उपचार. सौंदर्य असलें म्हणजे सारें आलें " ही काव्यासंबंधींची रे. टिळकांची कल्पना लक्ष्मीबाईंच्या कवितेला चांगलीच लागू पडते.

दारुण दुःखानें माणसाचें मन कसें काजळून जात व मुकें बनतें. परंतु लक्ष्मीबाईंच्या मनानें खंबीरपणें वागणूक ठेवली व आपल्या भावनेला वाचा फोडली. रे. टिळकांनीं धर्मांतर केल्यानें त्यांना विलक्षण यातना झाल्या. अशा वेळीं त्यांनीं आपल्या मनाची समजूत घालतांना जी भाषा केली ती " नवरा " या कवितेंत पुढीलप्रमाणें प्रकट झालेली दिसून येते—

" गुणरूपानें मनासारखा परंतु झाला पिसा
साजणी हा तरि नवरा कसा ॥ ध्रु० ॥
आशा, मनिशा, तृष्णा, जावा ह्या माझ्या तिघिजणी
ममता सासू करिती माझ्या जीवाची खेळणी
हा क्रोध खाटिक मुरा
हा निर्दय मम सासरा
नाहिं दिराया षड्रिपु दारा गाजिति रात्रदिनीं
तरी नच पाहति पति ढुंकुनी
माय बाप तर दूर राहिलीं विवेक नवरा असा
न कळे माझा जीव याचला आवरी गे कसा ! "

घरगुती जीवनाचें हें एक रम्य रूपकेंच लक्ष्मीबाईंनीं अशा रीतीनें आपल्या या प्रकारच्या भावनांतून व्यक्त केलें आहे.

वैधव्य प्राप्त झाल्यानंतरची मनाची व्याकुळता कवयित्रीनें पुढीलप्रमाणें चित्त थरारून सोडणाऱ्या भावनेंतून हृदयंगमपणें व्यक्त केली आहे. टिळक

गेल्यानंतर सांत्वनपर आलेल्या पत्रावर श्रीमती हें नाव त्यांच्या नावामागें चिकटलेलें बघून वाटणारें दु ख या काव्यात आलेलें आहे

" श्रीमती नाव मज आलें । सौभाग्य लयाला गेलें ॥ ध्रु० ॥
या माझ्या दुर्दैवानें । हा कसा साधिला दावा
हा ओघ कार्यगंगेचा । निमिषात कोरडा व्हावा
तें जीवन मम जीवाचें । मी मत्सी त्यातिल देवा
जीवनाविणें ही बाई
देहाची झाली लाही
जीवात जीवही नाहीं
दिन माझे सपत आले । सौभाग्य लयाला गेले ॥ "

आणि ह्या प्रसंगानंतर जेव्हा लक्ष्मीबाईंना नातू झाला तेव्हा आपल्या दु खात सुख मानून आजीच्या भूमिकेवरून त्या म्हणतात,

.. वंशवृक्ष हा माझा फुलला, बघुनी त्याच्याकडे
शिंपिलें अश्रूचे मी सडे
सुखदु खाचा वाटेकरी मम माझ्याजवळीं नसे
पाहुनी मजला स्वर्गी हसे
हसे फुलाचें सदा जयाच्या हृदयामध्यें वसे
तयाला दु ख पहावें कसें ?
तो देवाजवळीं काय विनती करी
ही रिती जहाली जागा परतुनि भरी
जगिं सेवा माझी नाहिं जहाली पुरी
म्हणुन धाडली जोड नवी ही माझ्या बाळाकडे
चिमुकलें बालक माझ्यापुढे

ल्हान मुलें लक्ष्मीबाईंना फार आवडत स्वत च्या पोराप्रमाणेच अनेक पोरक्या पोरांचेंहि त्यांनीं मोठ्या आपुलकीनें पालनपोषण केलें या संदर्भात " मी तुझी मावशी तुला न्यायला आलें " ही लक्ष्मीबाईंची कविता अवश्य विचारात घेण्यासारखी आहे

लक्ष्मीबाईंची कविता जेवढी हृद्य, जेवढी घरगुती आणि जेवढी जिव्हाळ्याची तेवढीच प्रामाणिकहि आहे नाशिकच्या कविसंमेलनाच्या स्वागताध्यक्षाच्या भाषणास सुरवात करताना व्यासपीठावर उभ्या राहून त्या म्हणाल्या,

" आपण आला बरें जाहलें, मन्मन पाहुनि धालें !
कविरसिकाचें स्वागत करण्या, सरसावुनि मी आलें !
खरें सागतें, मला ह्यातलें ज्ञान मुळीं तें नाहीं,
चुकेन तेथें क्षमाहि करितिल भगिनी माझे भाई ॥ "

सामाजिक जीवनांतील सुखदुःखांचा विचार करतांना पतिता स्त्रीबद्दलची वाटणारी तळमळ लक्ष्मीबाईंनीं "बहिष्कृत याला आधीं करा" या कवितेत मोठ्या कठोरपणानें व्यक्त केली आहे.

> " नाना रंगीं खेळ खेळुनी जगांत रमता असे ।
> ईश्वरा येई तुमचें हंसें ॥
> ही पतिता म्हणुनि हिला दूर लोटितां ।
> ती पतित पावन पावे अधिकारतां ।
> हा न्याय कोठला, परि तुमची मान्यता ।
> उघडा डोळे, पुरा ओळखा कोण पतित हा खरा ।
> बहिष्कृत याला आधीं करा ॥ " *

लक्ष्मीबाईंनीं आपल्या काव्यकौशल्यानें श्री. टिळकांच्या ह्यातींत त्यांच्या अपूर्ण राहिलेल्या " ख्रिस्तायना "सहि हातभार लावलेला असून तो प्रयत्नदेखील उल्लेखनीय असा झालेला आहे.

• • •

## बहिणाबाई चौधरी

लक्ष्मीबाई टिळकांच्या समकालीन परंतु अगदीं अलिकडे ज्यांच्या नांवाचा बोलबाला सगळीकडे झाला, अशा एक नामवंत कवयित्री म्हणजें बहिणाबाई चौधरी या होत. मराठींतील एक प्रसिद्ध कवि श्री. सोपानदेव चौधरी यांच्या या मातोश्री. पण त्यांचा ठावठिकाणा १९५१ च्या दिवाळींत महाराष्ट्राला अचानकपणें कळला. एखाद्या भूमीचें उत्खनन व्हावें आणि जुन्या परंपरेचा रत्नां माणकांना लाजवणारा वारसा संशोधकाच्या हातीं यावा तसें बहिणाबाईच्या कवितेचें झालें. त्यांच्या सुपुत्रानें आचार्य अत्र्यांच्या करवीं आपल्या आईच्या काव्याची गोणी मराठी रसिकांना उघडून दाखविली. आणि मग अवचीतच एक सुंदर काव्य मराठींत अवतीर्ण झालें ! त्याची अपूर्वाई मी मी म्हणणारांनीं चाखली. तोंडांत बोट घालायला लावणारा चमत्कार मराठीच्या साहित्यक्षेत्रांत दिसून आला.

बहिणाबाई म्हणजे एक साधी, शेतकरी खानदेशी स्त्री पण तिच्या काव्यांतील शब्दाशब्दामधून तिची प्रतिभा जणुं झिरपते आहे. लोकगीतांनीं पिढ्यान्‌पिढ्या सजविलेल्या अमृतकुंभाची याद करुन देते आहे. जिवाभावाच्या पण सुंदर विचारांनीं नटलेली बोलणी करते आहे.

---

* गृहलक्ष्मी पतिता अंक १९२८ जून.

प्रतिभा ही कवीला लाभलेली निसर्गाची देणगी असते आणि म्हणून तिच्या फुलोऱ्यासाठीं प्रयत्नाची गरज फारशी भासत नाहीं, याची प्रचीति बहिणाबाईंच्या काव्यानें येते इथें बहिणाबाईंनीं फार सुंदर असा जिवाभावाचा हुंकार घातलेला आहे कवितेनें त्यांच्या काळजातून उसळी मारलेली आहे ही साधी निरक्षर बाई पण तिनें घरच्या विद्यापीठात आणि देवादिकांच्या मंदिरात माणुसकीच्या गाथा वाचल्या त्यावर आपल्या भावनांची शिंपण केली, आणि मग आपल्या कल्पनांची भराभर पेरणी सुरु केली तिच्या दर श्वासागणिक काव्य बाहेर आलें ! काम करताना त्या काव्याचा तिनें शिडकावा केला धरित्रीला जगु थाण दिलें !

येहरींत दोन मोटा
दोन्हींमधीं पानी एक
मोट हाकलती एक
जीव पोसतो नितीक !

वसाडली मोट
करे धो धो थायन्यात
हुदडत पानी
जस ताह् पाळण्यात !

बहिणाबाईंच्या प्रतिभेनें या प्रकारचें सुंदर चित्र रेखाटलें आणि अहिराणींतील काव्यात मोलाची भर घातली त्यांचे उपमादृष्टांत एकदम निराळे ठरले त्यांची भाषा खेडेगावच्या वातावरणात सुखावली आणि तिनें जी कल्पनेची भरारी मारली ती—

ऊन वाऱ्याशीं खेयता
एका एका कोंबातून
पर्गटले दोन पान
जसे हात जोडीसन
टाया वाजविनी पान
दंग देवाच्या भजनीं

या पद्धतीनें ! स्त्रीच्या लेखणीला एकदम हें केवढें ऐश्वर्य लाभलें ! लोकगीतांच्या सानिध्यांत वाढलेल्या बहिणाबाईंनीं साध्यासोप्या शब्दांची पेरणी करीत मोठ्या सुंदर काव्याला जन्म दिला जानपद काव्य कसें असावें तें मराठीच्या लेखकाला शिकविलें ! आणि या संदर्भांत आपल्या कविनेच्या जन्माची कहाणी सांगितली ती कशा भाषात पहा —

अरे घरोटा घरोटा
तुझ्यातून पडे पीठी

तसं तस माझ गान
पोटातून येत व्होटीं !

आणि आपल्या ससारातील कर्मकथा सागताना स्त्रीस्वभावाला धरून भाषा केली की—

पेट पेट धुक्येला—
किती घेसी माझा जीव
आरे इस्तयाच्या धन्या
रस जाळ तुले हींव !

घरच्याबरोबरच नतर बाहेरच्या निसर्गाशीहि बोलणें केलें. शेतावर जाताना दिसणाऱ्या झाडाझुडुपाचा देखणेपणा बोलून दाखविला—

हिरवीं हिरवीं पान
लाल फळ जशी चोंच
आलें वडाच्या झाडाला
जस पीक पोपटाच !

जुन्या काळच्या स्त्रियाच्या कवितेपेक्षा त्याच्या कवितेनें वेगळें जग दाखविलें. नव्या कल्पना सागितल्या. कथापुराणाच्या श्रवणाने बुद्धीला आलेली धार मोजक्याच पण वेंचक शब्दातून दाखविली. बाळबोध वळणाचें काव्य कसें असावें त्याचा दाखला दिला आणि असें करताना आपल्या मनाची अवस्था काय होते, तें आगळेपणानें सागितलें—

मन पाखर पाखरू
त्याची काय सागू मात ?
आता व्हत भुईवर
गेलं गेल आभाळात !

रचनेच्या, कल्पनेच्या आणि भाषेच्या दृष्टीनें बहिणाबाईचें काव्य आधुनिक आहे. खानदेशातील अहिराणींत घाटावरील मराठीमाय त्यानीं जिव्हाळ्यानें मिसळली आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक कवितेंत एक वेगळा विचार दिला आहे. त्याच्या कवितेंत विस्तार असा कसलाच नाहीं. ती कधी अगदीं आटोपशीर आहे पण तिनें मोठा आशय ऐकवला आहे. त्या कारणाने त्याची कविता वाचताना लक्षात येतें कीं, ह्या बाईची आपल्या भाषेवर केवढी मालकी आहे ! आणि सारे रस त्याच्यापुढे कसे हात जोडून उभे आहेत ! !

साध्याच पण सुदर शब्दाची पेरणी, सहजसुलभ भावनाविष्कार, जातिवत जिव्हाळा, कल्पना वैभव आणि असामान्य प्रतिभासपन्नता हे बहिणाबाईच्या काव्याचे विशेष होत त्या कारणानें त्यानीं—

मानसा, मानसा,
कधीं व्हशील मानूस

या प्रकारचें मानव जातीला केलेलें हृदयस्पर्शी आवाहन वैशिष्ट्यपूर्ण वाटतें. एवढेंच नाहींतर स्त्रीच्या लेखणीला असले तात्विक विचार देखील पेलू शकतात याचें प्रत्यंतर येतें. त्याच बरोबर—

लपे करमाची रेखा
माझ्या कुंकवाच्या खालीं
पुमोनिया गेलं कुंकू
रेखा उघडी पडली

असलें हृदयभेदक करुण काव्यहि या स्त्रीच्या लेखणीनें जगापुढें केवळ्या कल्पकतेनें ठेवलें याचा अचंबा वाटूं लागतो.

बहिणाबाईंच्या या काव्यानें मराठी मनाला मोहिनी घातली आणि भाषेचा, विचाराचा व कल्पनेचा स्तिमित करून टाकणारा गोडवा मराठी सारस्वतात असू शकतो, याचा उल्लेखनीय दाखला दिला.

• • •

## सौ. मनोरमा रानडे

रविकिरण मंडळाच्या एक प्रमुख सदस्या या नात्यानें सौ. मनोरमा रानडे यांनीं इ. स. १९१२ ते १९२५ या कालमर्यादेंत आपलें काव्यलेखन केलें. मनोरमाबाई ह्या रविकिरण मंडळाच्या एक प्रकारें सात्त्विक शक्ति होत्या. त्यांचें जीवन आणि काव्य ह्यात निराळेपणा नव्हता. परस्पराच्या पडछाया एकमेकांत पडाव्यात एवढें त्यांचें काव्य व जीवन एकत्र आलें होतें.

मनोरमाबाईंनीं स्वत: प्रेमविवाह केलेला असल्यामुळें त्यांची अशी उत्कट श्रद्धा होती कीं, माणूस हा एकदाच व एकाच माणसावर प्रेम करूं शकतो. त्यांच्या कवितेनें त्यांचा हाच भाव उचलून प्रीतिरंगाग खेळविलें.

"जीवाचें सार्थक" या कवितेंत आपल्या पतीबद्दल लिहिताना त्या म्हणतात—

"तुझी थोरवी कशी गाऊं मी ! मूक तुझी कांता
हृदय उघडुनी सत्तेचें बघ, प्रीति रची गाथा"

नवऱ्याच्या वैभवात आपलं वैभव पाहणाऱ्या व स्वत:च्या कुटुंबातच आपलें सौख्य शोधणाऱ्या मनोरमाबाई आपल्या कल्पनेप्रमाणेंच आपलें जीवन जगत होत्या.

"मोहना" या कवितेंत त्या लिहितातः—

"मोहना ! राजीव नयना ! देइ आर्ता दर्शना
तापलें विरहानलानें पुरे झाल्या यातना !
प्रेम अपुलें सांधलें दृढ हेतु आला जीवना
लपुनी बससी दूर देशीं काय मनिं तव योजना !
"पीडलों तव विरह-तापें" गोड वच हें बोलना !
"त्यजुनी नाहीं जात" स्वप्नीं येउनी तर सांग ना !"

स्वतःच्या मुलांविषयीदेखील मनोरमाबाईंनीं विशेष जिव्हाळ्यानें अनेक कविता लिहिल्या आहेत. या मनोभावनेनें सजलेली त्यांची कविता सुंदर आहे. आई म्हणून त्यांच्या उरीं दाटलेलें वात्सल्य प्रकट करतांना "छबुडी" या कवितेंत त्या लिहितात—

"...छबुदी माझी राजसबाळी मोनी ही छकुली...
...यांतच साऱ्या उपमा घे तुज सरस्वती थकली..."

आपणावर सरस्वतीचा वरदहस्त आहे असें मानणाऱ्या मनोरमाबाईंनीं स्त्रीजीवनाचें वैशिष्ट्य सांगणाऱ्यादेखील कांहीं कविता लिहिल्या. त्यांपैकीं "सागरगोटा" ही कविता उल्लेखनीय आहे. ही कविता म्हणजे एक नाट्यगीत असून लहान मुलींच्या जीवनांत पदोपदीं हर्षयुक्त अंतःकरणानें संगत देणारा सागरगोट्यांचा खेळ त्यांत वर्णन केलेला आहे. या कवितेंत मनोरमाबाई सांगतात—

"दुरखाइ बने ! अजुन ग !" "हप्पी ! चुकलं तुजं गं !"
टाळ्या ऐकुनी जागी झालें ! जिन्यावरुनी हळूं पाहिलें
सागरगोटे खेळत होती यमी आमुची माडीवरती
पाय न वाजवितां वर गेलें पाठीमागें उभी राहिलें !
"दुरसाइचा...तिरसार्दशी" बोलत होती अशी कायशी
खडा टाकिला वांकुनि खालीं "बने ! खडा !" वर बघूं लागली
बंधमुक्त खग उडे जसा नभीं पळाला खडा तसा
"गंमत करण्या छान वेळ ही" ऐसें माझ्या मनांत येई
हळुंच झेलला सागरगोटा "दे रे नाना ! लबाड मोठा !"
मागें वळुनी रागें पाही "हें ग काय ? अं – बघ ग आई !"
"यद्दा" – उठली, सोगे धरिले ! पाय उंच – छे वाया गेलें
"बघ हं ताई तूं ! दे बरं कां ? आई मारते बघ तुज हाका !"
"पुराणास कधिं गेली आई जसें काय हं – माहित नाहीं !
परत हवा कां सागरगोटा ऐकशील कां पण – वाः ताठा !"
"हं तर म्हणुंया ?" मान हलविली. खेळासाठीं अधीर झाली,
"सांग सांग ना लवकर आतां बनी थांबली माझ्याकरितां"
"कांहीं नाहीं; पापा गोड –" "अं–अं–उं-उं–हं–हं–सोड"

" भावकुसुमांजली " ( १९३१ ) वरून दिगून येतें. मनोरमाबाईंची ही कविता भावपूर्ण असून मुख्यतः सौख्यमय प्रीतीचा सूर तिला लागलेला आहे. मनोरमाबाईंस सारें विश्वच प्रेमाच्या साम्राज्यात सुखानें डुबत असलेलें दिसत असावें, असें त्यांच्या पुढील कवितेवरून म्हणावयास हरकत नाहीं—

" प्रेम साम्राज्य ! प्रत्यक्ष पसरलें चहूकडे अव्याज ।
आकाश फुलानीं भरलेलें ! मी डुगुनिया गुगुनी गेलें ।
प्रेमाचें साम्राज्य पसरिलें चौहिकडे भूतलीं । मेदिनी आनंदी झाली ।
प्रेमाविण जगतीं शून्य दिसे । "

किंवा

" अवनिवरि स्वर्ग दिसे । प्रेमाचें जग भासे ।
प्रणयाचें रम्य पिसें । हसवि का फुला । स्वर्ग थाटला ! "

इंद्रायणीचा वेग बघत असतानाहि याच दृष्टीनें आपल्या मनाची ठेवण ठेवून त्या म्हणतात—

" अविरल प्रेमें मानस भरलें । दडपित असता अधिक उसळलें ।
कणकण उन्मादानें भरलें । मग बधन कसलें त्या राही ।
इंद्रायणि ! का इतुकी धाई ! "

एक स्त्री या नात्यानें मनोरमाबाईंच्या प्रकट झालेल्या खालील भावना अतिशय हृद्य आहेत. आईचें हृदय व्यक्त करताना,

" हीं फुलें विकसलीं चोहीकडे
चल उचलुनि चुंबूं त्यासि गडे "

असें त्या म्हणतात तर बालमाताना बघून,

कोंवळी । अजुनि ही कळी
लाल पोंवळीं । जिव्हा अधरींची
उमल्लीं न पुरती तोंच धाई खुडण्याची

अशी हळहळ त्या व्यक्त करतात. एक स्त्री निवर्तल्यानतर पतीनं दुसरें लग्न केलेलें बघून मनोरमाबाईंच्या अतर्वेदनेमधून पुढील उद्गार बाहेर पडतात.

" पाण्यावरचे काय बुडबुडे प्रेम तसें हें दिसे
मनाची लाजहि गेली असे । "

मनोरमाबाईंची ही कविता शुद्ध व कोमल आहे आणि तिच्यात स्त्रीसुलभ मार्दवताहि आहे.

० ० ●

# सौ. विमलाबाई देशपांडे

विमलाबाई देशपांडे यानीं आपले पति श्री. पु य देशपांडे याच्या समवेत प्रकाशित केलेल्या "निर्माल्य–माला" (१९३३) मधील "माला" भावनामय स्वरूपात गुंफिली आहे पतिप्रेमाची अतिशय नाजुक परंतु उन्मादक अशी तन्मयता येथें दिसून येते निस्सीम भक्ताला वाटणारी एकतान भक्ति, स्वत च्या पामरपणाविषयीं होणारी जाणीव, आपणातलें जें जें चागलें ते पतीच्या प्रसादाचें फल असल्याची भावना, आणि शेवटीं त्या भक्तींतच जीवनसर्वस्व मिळाल्याची वृत्ति या कवितांना व्यापून राहिली आहे

"वाढते ही विश्ववेली प्रीतिचैतन्यामुळ
मुकुनि ती जाईल सारी, तोडिलें जरि मूळ ते
जीवितार्चे भ्रमण सारें मावळे प्रीतीमवें"

परस्पराच्या गाढ प्रेमसागरात बुडून जाऊन मिळविलेल्या अशा एकतानतेचा हा अद्वितीय नमुना या कवयित्रीच्या काव्यात आढळून येतो

• • •

# काशीताई नाटेकर

काशीताई नाटेकर याच्या १९३३ मध्यें प्रकाशित झालेल्या 'गवाक्षगीता' तील बालगीतें मनोरम आहेत. लहान मुलाशीं हितगुज करण्यात स्त्रीस्वभाव जात्याच कुशल असतो. काशीताईंना ही अशा काव्याची देणगी निसर्गत च प्राप्त झालेली असून सोपी व आटोपशीर भाषा हा त्याच्या काव्याचा विशेष होय त्याच्या "भजनी बाहुली", "नव्या बाहुलीच लग्न" इत्यादि कविता चटकदार आहेत. "पूर्वपश्चिमेचें भाडण" या काव्यातील सूर्याला चेंडू समजून त्याच्या प्राप्तीसाठीं दोन दिशाचें भाडण लागल्याची काशीताईंची कल्पना अप्रतीम आहे

"शिल्पकार तेथें आला। अवचित।
देखुनी। शिला घेउनी। गृहा नेउनी।
मूर्ति घडविली। मूर्ति घडवीली।
प्रत्यक्ष राम ती झाली। नवल हें।
सामर्थ्य येतसे मग त्या। दुसऱ्यासी उद्धाराया। भाग्य हृ।"

शीळेच्या उद्धाराची ही काशीताईंची कल्पना जेवढी नाविन्यपूर्ण आहे तेवढीच चमत्कृतिपूर्णहि आहे काशीताईंचें हें कल्पनावैभव जसें आल्हादकारक आहे तसेंच तें चटकदारहि आहे

• • •

जीवन हें केवढें करुणरम्य महाकाव्य असतें याची कल्पना यशवंताच्या कविते-प्रमाणेंच तिनेंहि दिली.

सुमारें इ. स. १९२९ पासून आज तागायत इंदिरा संतांचें काव्यलेखन असंडपणें चालू आहे. **शेला, मृगजळ** आणि **मेंदी** हे त्यांचें काव्यसंग्रह आहेत.

" इंदिराबाईंच्या काव्यांत जीवनातला विशाल विरोध दर्शविणारी किंवा त्यात खोल बुडी मारून तळाचीं मौक्तिकें वेचून आणणारी चिंतनशीलता नाहीं. पण त्यांची अनुभूतिसुद्धा अत्यंत दाहक आहे. निसर्ग आणि मनुष्य यांच्या आंतरिक नात्याचा मोठ्या कुशलतेनें उपयोग करून या कवित्रींतील आर्तता त्यांनीं वृद्धिंगत केली आहे. त्यांच्या कवितेंत झंझावाताचें आणि त्याच्या साद्यावर बसून क्रीडा करण्याकरता पृथ्वीवर उतरणाऱ्या पर्जन्याचें वर्णन आहे. पण या कवितेच्या पुनर्वाचनाच्यावेळीं ओळींतून मनाला डसणारे चटके कांहीं त्या त्या पावसानें कमी होत नाहींत. उलट त्याच्या पार्श्वभूमीवर ते अधिकच दाहक वाटू लागतात "*

इतर आधुनिक कवयित्रींच्याप्रमाणेंच इंदिराबाईंच्या कवितेचा " प्रेम " हा प्रमुख विषय आहे. पण हें प्रेम विविधतेनें नटणारें आहे. मुग्ध व रसिक वृत्तीनें वावरणारें आहे. साधी, सोपी व सुटसुटीत रचना करतांना ती संयमानें वावरते आहे. आपण पाहिलेल्या व अनुभवलेल्या स्त्रीहृदयांतील मनोभावांचा प्रामाणिक-पणें उमाळ्यानें आविष्कार करणें हें तिचें वैशिष्ट्य आहे. ती स्वानुभवाची भाषा करते. प्रसाद हा तिचा मोठा गुण आहे.

आपल्या जीवनांत प्रीतिविवाहाचें सौख्य भोगल्यानंतर आपल्या प्रियकरा-विषयीं व स्वतःविषयीं इंदिराबाई अगदीं निःसंकोच मनानें सांगतात कीं—

" तुझा माझा सहवास
जसा पहाटेचा वारा
फुले फूल झर झरा
तुझा माझा सहवास
झिरीझिरी चांदण्याचा
मधुरसा उन्मादाचा
तुझा माझा सहवास
तुझ्या हृदयींची तार
छेडीतसे गोड सूर "

परंतु दुर्दैवानें इंदिराबाईंना हें सौख्य फार काळ लाभलें नाहीं. श्री संत यांनीं मधेंच संसाराचा खेळ मोडला व ते स्वर्गवासी झाले. त्यामुळें इंदिराबाई

* वि. स. खांडेकर यांच्या प्रास्ताविक, पा. १७

दुःखाच्या खाईत लोटल्या गेल्या. त्यांचें प्रीतिपुष्प जळून खाक झालें. जीवनाला काजळी चढली. आणि अशा असह्य विरहवेदना उपभोगतांना त्यांच्या कवितेनें म्हटलें कीं--

" ठरविते किती मी यावें तुझियाकडे
मन निघे घेऊनी वाऱ्याचें रूपडें
लगबगा निघोनी येतें दाराकडे
अन् पुढें सुचेना जावें कोणीकडे
अंगणीं उभे हे तुझे मिती सोबती
" ही तुझ्या सख्याची वाट " मला सांगती.
हें निळें पांखरूं म्हणते " ये इकडुनी "...
हें इंद्रधनू तर धरुनी मज बोलवी
ही पाऊसधारा हातानें पालवी
हा समोर येऊन कानाशीं लागतो
चल तुझ्या सख्याची वाट तुला दावितो.
हा चन्द्रकिरण ये धरावया अंगुली
अन् निशा म्हणे " मम सोबत तुज चांगली "
...मीं सावरिलें मन सावरिला अंचल
अन् पुढे निघाया उचलें हें पाउल.
अडखळे उंबरा, होऊन काया कुळी
कोसळे खालती--काहीं न कळतें मुळीं ! "

इंदिराबाईंनीं आपल्या पतीप्रमाणेंच आपल्या मुलाच्यासंबंधींहि अनेकदां काव्यलेखन केलेलें आहे. त्यांचीं हीं वत्सलगीतें मोठीं सुंदर आहेत. त्यांनीं आईच्या मनाचा गाभा उकलून दाखविला आहे. आपलें बाळ शाळेला जाणार म्हणून सुखावलेली त्यांच्यामधली ' आई ' तो प्रत्यक्ष शाळेला गेल्यावर त्याचें तिथें कसें होईल या काळजीनें व त्याच्या विरहानें व्याकळून जात म्हणते कीं—

घर वाटे ओकें, नाहीं आज घरात लडिवाळ
झालें अंतर व्याकुळ
घेई घास मुखीं, येई परी बाळाची आठवण
घास पडे मुखातुन
" आई दूध ताक घालं " चाले आग्रह बाळाचा
आज आग्रह कोणाचा ?
करी कामधाम परी कांहीं जुळे न सारखें
वाटे चुकल्यासारखें

बाळ नाहीं आज, मधें मधें कराया लुडबूड
नाहीं हांसणें तें गोड
कसें करमेना कुठें, अंग टाकी विसाव्याला
गाल अश्रूंनीं नाहला
आज बाळ नाहीं अंगावरी लोळाया मस्तीनं
झोंप येणार कोठून ?

असे घरगुती प्रसंग रंगवितानाच रेखीव व उठावदार शब्दचित्रांची उभारणी करणें हा इंदिराबाईंचा आणखी एक काव्यगुण आहे. सांडगे घालत असलेल्या नववधूचें वर्णन सांगणारी त्यांची कविता किंवा ' तुझ्या घराला ' ही त्यांची दुसरी कविता या संदर्भात जरूर पहाता येईल.

" दाराशीं तूं उभी नेसुचें लुगडें गुंजेपरी
लालभडक अन् तंग नेसणी तशीच गुडघ्यावरी
उभार उघडी, नुसती चोळी तारुण्याखावरीं
लाल मण्याच्या गळ्यात मोती, मधें रुप्याची सरी "

हें वर्णन मोठें रेखीव आहे. इंदिराबाईंच्या या काव्यातून त्यांची रंगांची आवड व बामळी काटेरी ओढणी पाघरण्याच्या आवडत्या कल्पनाहि एकाच वेळीं लक्षात येतात.

सामान्य स्त्रीच्या उपमा दृष्टांताच्या कल्पना पुष्कळदा सांसारिक जीवनातील असतात. इंदिराबाईंनींहि त्याचा वापर मोठ्या कुशलतेनें केला आहे. " बंगली " मध्यें त्या सांगतात की,

निवांत दूर एकली मुग्ध छान बंगली
बालिकाच कटिवरी घेइ तटिनी सुंदरी

त्याचप्रमाणें " ही निळी पाढरी " या कवितेंत शरदांतील दुपारीचें वर्णन करतांना त्यांनीं दुपारच्या उन्हाला गरोदर स्त्रीची दिलेली उपमा कशी उल्लेखनीय आहे पहाः—

का गोड जाड्य हें पसरे धरणीवरती
रेंगाळत का हें सौख्य तरी गंभीर
टाकीत पावलें चाले रम्य दुपार

" गूढ " ह्या कवितेंत सूचित होणारी कवयित्रीची कल्पना स्त्रीहृदयांतील एक नाजूक भाव मोठ्या युक्तीनें दर्शवीत आहे. तो विशिष्ट भाव सूचित करतांना इंदिराबाई लिहितात—

पहिला वहिला वेलीला बहर
कळ्या मनोहर धोसावती
त्याच वेचीला, जा, जाऊनी विचार

काय हुरहूर तुझ्या मनीं
घेऊनी चोंचींत सूत, पीस, काडी
पाखराची जोडी विहरते
राणी पाखराची करी चिवचिव
नाजूक राजीव शोभतसे.
तिला एकटीला गाठून विचार
काय हुरहूर तुझ्या मनीं...
कशी सागू तुला माझी हुरहूर
कशानें अंतर उजळलें
नाहीं ती भावना शब्दीं मावणार
कशी सागणार तुला तरी !...

सूर्योदयाचें स्वागत करतेवेळीं इंदिराबाईंच्या स्त्रीसुलभ भावनांनीं खालील कल्पना रंगविली आणि स्त्रीला स्वतःच्या घराइतकें व मुलाइतकें दुसरें काहींहि प्रिय नसतें ही गोष्ट जणू पटवून दिली—

याहो सूर्य नारायणा या हो या लौकर
सोन्याच्या पावलानीं भूषवा हें घर...
सोन्याच्या वेशींतून निरोप घेताना
याहो या अंगणात सूर्यनारायणा.
आईच्या मायेहून कोमलकरानीं
गोंजारा बालकाना खेळती अगणीं.
रगवा तावदान शिणलें अतर
गुलाबी आनंदात न्हाऊ दे ससार

अशा प्रकारची इंदिराबाईची ही कविता कोमलतेचें व सूक्ष्मतेचें आवरण पाघरून जगासमोर झालेली आहे. प्रीतीनें पोसलेल्या हृदयाचा भावमधुर नादतरंग जसा तिनें घुमविला तसाच जीवनाच्या जलाशयावर घटोघडीं उठणारा जलतरगहि हळुवार मनानें गोंवून दाखविला आहे. ही कविता दिसायला साधी असली तरी खेडेगावच्या माणसात आढळणारा उमाप जिव्हाळा तिच्या ठायीं आहे. स्वानुभवाच्या कक्षेबाहेर ती फारशी गेली नाहीं आणि म्हणूनच तिचें स्थान या मर्यादित जगापुरतें का होईना हृद्य ठरेल. भावना, कल्पना, रचना आणि शब्दयोजना ह्या सर्व दृष्टींनीं इंदिराबाईंची कविता हृदयंगम झाली असून स्त्रीहृदयाचा आविष्कारहि तिनें उत्तम रीतीनें केलेला आहे.

परंतु इंदिराबाईंच्याकडून याहिपेक्षां काहीं वेगळ्या कवितेची अपेक्षा आहे. "आजच्या मराठी कवितेनें प्रेमाचं आणि माणुसकीच वतन अजून सुरक्षित आहे याची ग्वाही दिली तरी पुष्कळ आहे" असें त्या सागतात. पण त्याच्या

लेखणींत देशप्रीतीची गाथा निर्माण करण्याचेंहि सामर्थ्य आहे हें त्यांनीं लक्षात घेतलें पाहिजे, आणि त्यांनीं उगाच नव काव्याच्या जोपासनेच्या मानगडींत पडून आपल्या काव्याचें सौंदर्यहि घालविता कामा नये. आजच्या काळाचा कांहीं आणखी वेगळा महिमा आहे. याची जाणीव इंदिराबाईंच्या कवितेनें राखली पाहिजे असेंहि वाटतें. कारण आजच्या काळात सामाजिक व राजकीय अशीं क्रांतिकारी स्थित्यंतरें होऊन राहिलीं आहेत, याचा विसर कोणत्याहि जाणत्या कवीला पडता कामा नये अशी रसिकाची अपेक्षा आहे.

• • •

# सौ. संजीवनी मराठे

मराठींतील काव्याचीं लक्षणें अभ्यासताना व त्याचा पडताळा घेताना ज्या अनेक गोष्टींनीं काव्याचें सौंदर्य लक्षात येतें त्यांपैकींच गेयता ही एक प्रमुख गोष्ट आहे. निदान अलिकडे अलिकडे तरी या गेयतेचा अधिक विचार रसिक मडळी करू लागले आहेत. इ. स. १९३२ मध्यें कोल्हापूर येथें भरलेल्या साहित्यिकाच्या मेळाव्यात संजीवनी मराठे ह्या आपल्या काव्याच्या याच प्रमुख लक्षणामुळें रसिकाच्या ओळखीच्या झाल्या. तेव्हा त्यांच्या काव्याच्या दृष्टीनें तरी ही गेयता विशेष महत्त्वाची मानावयास हरकत नाहीं. कारण आपल्या कवितेबद्दल बोलताना "गाण्याला कांहीं शब्द असावेत म्हणून हीं गीतें मीं लिहिलीं आहेत." असें संजीवनीबाईंचेंच म्हणणें आहे. आणि एक उत्कृष्ट भावगीत गायिका वा काव्यगायिका म्हणून त्यांचा लौकिकहि आहे त्यांची कविता प्रथम भावरूपानें त्यांच्या मनात जन्मली व नतर अभिव्यक्तीच्या वेळीं ती शब्द स्वरातून पाझरत कागदावर आली असेंहि तिचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. एवढेंच नाहींतर संजीवनी-बाईंचे काव्य हें जणु त्यांचें खरें जीवनच आहे असें त्यांच्या काव्याचे वाचनानतर लक्षात येतें. प्रसगानुरूप जे जे भाव मनातून उफाळून वर आले ते ते त्यांनीं आपल्या कवितेचे विषय म्हणून मानले त्याप्रमाणेंच काव्यलेखनहि केलें.

संसार, राका, छाया, भावपुष्प आणि चित्रा हे संजीवनीबाईंचे काव्य-संग्रह आहेत आणि प्रेम हा त्यांच्याकवितेचा जणु स्थायिभाव झालेला आहे. प्रीति विषयक मुग्ध सार्थी बोरणीं करतानाच त्यांच्या कवितेनें वत्सलरस मोठा सुरेख आळविला आहे. त्याचप्रमाणें प्रार्थना, गीतें, भजनें, गौळणी, निसर्गगीतें, राष्ट्रीय गीतें व मगल सस्कार घडविणारीं संस्कृतिविषयक गीतेंहि संजीवनीबाईंनीं लिहिलीं आहेत.

भाषा व रचना-कौशल्य या दृष्टीनें संजीवनीबाईंची कविता खमारदार आहे; तशीच ती नादमधुर व डसडशीतहि आहे.

सजीवनीबाईंच्या " ससारा " त प्रामुख्यानें प्रणयपर कविताचाच भरणा अधिक झालेला आहे. मात्र या प्रणयपर कविताचे अतरग त्या प्रातातील नानाविध रग खुलविण्यात सजविलेलें आहे हें विशेष होय. " नव समोहन " मध्यें प्रणयराग आळविणाऱ्या कवयित्रीची पहिलीवहिली भावना आलेली आहे. प्रथम परिचयाचा हा अनुभव सजीवनीबाईंनीं एखादा मनोभाव अतिशय नाजुक कलानुसरीनून व्यक्त व्हावा तसा व्यक्त केला आहे. जीवनाला नदनवनाचें सौख्य अनुभवायला मिळून अतरग उजळून गेल्याचें येथें कवयित्री सागते " वसता " मध्यें तर कवयित्रीनें स्पष्ट सागून टाकलें आहे कीं,

" आज माझ्या अगणात वसताचा खेळ
पानोपान बहरली माझी मनोवेल "

आणि " सधिकाल "मधेंहि

"सधिकाल पातला जवळि घे सख्या मला
जें कधीं न गायिलें
गीत मन्मनातलें
सूर सूर आळवून ऐकवीन रे तुला ! "

अशी स्पष्ट भाषा केली आहे.

कवयित्रीचे हे विचार वाचीत असताना स्त्रीचें प्रेम तिला किती धीट बनवितें याची कल्पना वाचकाच्या मनात डोकावून जाते, आणि त्यानतर लगेच सहवासाच्या स्मृति घोळवीत.बसणाऱ्या प्रेमी मनाचें अतरगहि पहावयास मिळतें.

" नयनात नीज मी साठवितें
तें स्वप्न गोड मनिं आ'वितें ! "

अशी कै ताव्याची आठवण देणारी कल्पना ह्या कवयित्रीच्या लेखणींतूनीहि बाहेर पडलेली दिसते. त्यानतर आणि थोडें पुढें जाऊन पाहिलें तर स्त्रीलाहि स्वत चें मन असल्याची ग्वाही " प्राणपाखरू "मध्यें कवयित्रीनें दिली असल्याचें दिसून येते कोणाच्याहि हातातील बाहुली बनायची तिची तयारी नसते आणि त्याचवेळीं

नका सावरू नका आवरू
हें रस–लोटप प्राणपाखरू ! !

असेंहि ती सागून टाकते.

" शातसागरीं कशास उठविलीस वादळे ?
हृदय–कोट भेदिला कशास, कोणत्या बळें ?
काय हें तुझ्यामुळें
देहभान हरपलें ?
युगसमान भासतात आज नाचरीं पळें ! "

संजीवनीबाईंनीं प्रीतीचें हें रूपकहि मोठ्या हृदयंगम रीतीनें वर्णन केलेलें आहे. स्त्रीजीवनात डोकावणाऱ्या अनेक प्रीतिकथा ह्या विविध कवितांतून कवयित्रीनें सांगून टाकल्या आहेत.

संजीवनीबाईंचे खरें वैशिष्ट्य त्यांच्या वत्सलगीतांमधून आढळतें. आईच्या भूमिकेवरून त्यांनीं लिहिलेली " स्वागत " ही कविता स्त्रीजीवनातील वात्सल्याचा एक सुंदर आविष्कार म्हणून पहाण्यासारखी आहे.

" जन्मजन्मीं गुंतलेले पाश बाळा आपुले
आज म्हणुनी गेह माझें मंगलाने नाहलें...
ये ग्रहाला बाळराणा जीवनाचा माझिया
स्वागताची सिद्धता ना काय अर्पूं मी तया ?
हृदय माझें अथरोनी घालूं का शय्या मऊ ?
दाटलें वात्सल्य पोटीं पाजुनी का शातवूं ?..."

" बाळ करीं झोंपला " हें काव्यहि याच मनोवृत्तीचें द्योतक म्हणून पहाता येईल.

मज नको अर्पिली कुणीं
नव सौख्यें पदिं आणुनी
मज एक हवें निशिदिनीं असावा बाळ करीं झोंपला.

आईच्या अंतःकरणातील हा भाव खरोखरच नितांत रम्य आणि वास्तव आहे.

" शिशुपाठ "मधील पुढील उपमा आईच्या हृदयाची द्योतक म्हणूनच ध्यानात घेण्यासारखी आहे—

" पलिकडे पहा तो भागडलों निर्झर
धावेल तसा मम तान्हा दुडदुड उभ्या घर भर."

" छाया "मधील काहीं कविता ग्रहिणी जीवनाच्या दृष्टीनें मोलाच्या ठरतील. स्त्रीला स्वतःच्या घराबद्दल वाटणारी श्रद्धा संजीवनीबाईंनी,

" ग्रहिणी येथ मी, हें माझें घर
ये घडिभरि अतरीं मुसाफिर। "

अशाप्रकारें व्यक्त केलेली आहे.

आपली आई आपल्या घरीं यावयाची आहे ह्या कल्पनेनें स्त्रियांच्या मनाचा बराच गोंधळ उडून जात असतो. यावेळीं त्यांचें मन आनंदानें हुरळून गेलेलें असतें; आणि म्हणूनच आई आल्यावर आपलें घर नीटनेटकें दिसावें यासाठीं त्यांच्या जिवाची धादल उडून जाते. आपल्या मनाची ही स्थिति व्यक्त करताना संजीवनीबाई लिहितात—

आज घरास यायची माझी माउली मायेची
माझ्या संसारावरती तिची दृष्टी फिरायाची

माझा जीव आनंदानें आला बाई मोहरून
उत्साहाचें गीत माझ्या मुखीं आलें ओथंबून
सारे पसारे ठेविले आवरून सावरून
घरकूल ठेवियेलें नटवून सजवून
माझ्या माहेराची रीत वठवीतें रहाणींत
माते ! तुझी शिकवण आहे माझ्या स्मरणांत...
पडो माझ्या संसारांत माझ्या मायेचें पाऊल
माझ्या सुखसर्वस्वाची तिला घेऊं दे चाहूल.''

" छाये " मधील या कवयित्रीचें दुसरें प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे तिनें भारत स्वतंत्र झाल्यानंतर प्रकट केलेली देशप्रीति हें होय. स्वतःच्या भावनांना काव्यांतून गुंफित असतांना कालाचें वैशिष्ट्य आविष्कृत करण्याचें स्त्रीच्या लेखणींतील सामर्थ्य येथें प्रकट झालेलें आहे. संसार करीत असतांनाच देशसेवा करणें किंवा संसाराबाहेरच्या जगांतहि आपलें कार्यक्षेत्र निर्माण करणें, ही अलीकडच्या स्त्रीची मनोवृत्ति संजीवनीबाईंच्या लेखणीनें कशी सांगितलेली आहे पहा—

" माझ्या प्रतिभे ! घेऊं नको गऽ कोमल हळवी तान
सरसावुनि हो सज्ज गावया कडक रांगडें गान
प्रणयाकुल गुगुलास गुंगुं दे फुलल्या कुंजांतुन
वत्सलतेचा झरा उसळुं दे जननी कंठामधुन
सृष्टीचें सौंदर्य यापुढें कुंचलीस प्रकटूं दे
माझ्या प्रतिभे ! चल ये आतां नाचत सर्वापुढें..."

या भावनाविष्कारावरून एवढें दिसून येईल कीं, देशप्रीति व्यक्त करतांना देखील स्त्रीला आपल्या नेहमींच्या आवडत्या भावनांनाच आवाहन करावें असें वाटतें आहे.

गांधीजींचा मृत्यु ही भारतांतील एक अतिशय शोकदायी अशी घटना आहे. भारताच्या या सुपुत्राचा वध झाला, त्यावेळीं अनेक कवींनीं आपल्या हृदयांतील शोकाकुल भाव व्यक्त केला. संजीवनीबाईंनींहि या घटनेवर कविता-लेखन केलें; आणि

" नभोवाणीवर घुमूं लागली शोकाकुल गाथा
आणि अचानक वसुंधरेचा नत झाला माथा
भारतभूमिचा लाल लाडका गतप्राण झाला
सुतरुधिरानें पदर तियेचा ओलावून गेला..."

अशा प्रकारें स्त्री हृदयांतील दुःखाचा वैशिष्ट्यपूर्ण अविष्कार केला आहे.

संजीवनीबाईंनीं या भावगीतांप्रमाणेंच रागदारीला अनुकूल अशीं पदेंही लिहिलेलीं आहेत. या पदाची रचना गायनानुकूल झालेली आहे. तांच्या

काव्याची छाप संजीवनीबाईंच्या काव्यावर बरीच पडलेली दिसते. ताम्बाच्या प्रणयप्रभेचें दर्शनहि अधूनमधून येथें घडतें. " काव्यानुकूल विषयाची निवड, आवश्यक तो भावनास्पर्श व रचनेचा बराचसा संक्षेप या तीन गुणांनीं आधुनिक कवयित्रींमध्यें संजीवनीबाईंनीं आपलें स्थान अगदीं वरचें करून ठेवलें असलें, तरी विचाराचा किंवा विषयाचा त्यांचा आटोप मर्यादित आहे.... त्यांची कविता बहुतेक सारी आत्मनिष्ठ असल्यानें ताम्बे यांचीं नाट्यगीतें त्यांना साधलेलीं नाहींत.' *

संजीवनीबाईंचें काव्य दिवसेंदिवस मनानें मोरलें व अनुभवानें उत्कट होत आहे. संजीवनीबाईंच्या गीतांतील शब्द कोमल असतात व रचना रेखीव असते... भावनानुकूल चालींमुळें त्यांचीं काव्यें ऐकायला गोड वाटतात . .' ‡ तसेंच त्यांच्या काव्यांत प्रसाद व माधुर्य हे काव्यगुण भरपूर आढळून येतात.

• • •

## सौ. अपर्णा देशपांडे

" पर्णकुटी " ( १९४६ ) या काव्यसंग्रहांत प्रकाशित झालेली अपर्णा देशपांडे यांची कविता जुन्या वृत्तीच्या प्रामाणिक, प्रेमळ आणि प्रगतिपर मनोधर्माचें दर्शन घडविणारी अशी उतरलेली आहे. पतिपत्नीमधील प्रेमापेक्षा इतर कौटुंबिक प्रेमबंधनाचाच आविष्कार येथें कवयित्रीनें प्रामुख्यानें केलेला आहे. विशेषत: " कन्यादाना " पासून तों " तान्हुलीस पाहून " या कवितेपर्यंत कवयित्रीनें रंगविलेलें संसाररहस्य मनोहर झालेलें आहे.

' मम कंठींची मोहनमाळ
असे बाळी ही प्रिय वेल्हाळ
माया ममतेच्या मखमल पोटीं
केली पितयानें जपणूक मोठी
नव्या तेजानें उजळून कांहीं । दिली पदरात घ्या वरमाई ॥ "

आईनें विहिणीला दिलेला हा निरोप कवयित्रीनें जेवढ्या जिव्हाळ्यानें येथें मांडला, तेवढ्याच जिव्हाळ्यानें तान्हुलीच्या दर्शनानें उत्सुक होणाऱ्या मातेचीहि भावना तिनें रंगविली आहे.

अपर्णाबाईंच्या कवितेचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे त्यांनीं लिहिलेलीं विडंबन काव्यें. या काव्यांत सर्वत्र विखुरलेला विनोद मोठा रम्य आहे. उदाहरणार्थ त्यांची पुढील कल्पना पहा—

---

* रा. श्री. जोग, अर्वाचीन मराठी काव्य, पान ३११.

‡ भ. श्री. पंडित, इंग्रजी राजवटींतील मराठी कविता.

" आतां रिकामी मी कोठली ! आतां बाई " पेन्सल " " धरि " घेतली ॥
लवकर उठणे जळलें मेलें । बरें भाळिचें म्हटलें चुकलें
परि नशिबाला उलटें आलें । " झोंपच उडूं लागली " ॥ १ ॥ "

स्त्रियांच्या मनाचें अगदीं हुबेहूब चित्र येथें उमटलेलें दिसून येतें.

अपर्णाबाईच्या कवितेचें आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे आपल्या कवितेंत कवयित्रीनें देशांतील चालू परिस्थितीवरील कल्पनांचा केलेला आविष्कार. बडोद्याच्या माणिकरावांच्या संग्रहीं असलेली पुरातनकालचीं शस्त्रास्त्रें बघून मनांत उचंबळून येणाऱ्या भावनेमधून कवयित्रीची देशप्रीति पुढीलप्रमाणें व्यक्त झाली आहे—

" हे दुर्दैवी शस्त्रांनो ! तुम्हां बघुनि दाटतो ऊर !
शिवकरींची असिलता ही
तळपतां, विद्युल्लताही—

* * *

गडप भूमीच्या उदरीं होई ती लाजेनें मनिं चूर..."

स्वातंत्र्यवीर सावरकर आणि महात्मा गांधी यांच्याविषयीं कवयित्रीनें वाहिलेली काव्यकुसुमांजलीहि अशीच हृद्य आहे.

अशा रीतीनें अपर्णाबाईच्या पर्णकुटींतील कवितेत " साधेपणा आहे पण बेडौलपणा नाहीं; शृंगार आहे पण नखरा नाहीं; भावना आहेत पण विव्हलता नाहीं...तथापि सऱ्या रसिकाला ह्यांत नव्या चालीच्या पण जुन्या वृत्तीच्या प्रामाणिक, प्रेमळ व प्रगतीपर मनोधर्माचें सुंदर प्रतिबिंब आढळेल. "* तसेंच त्यांच्या कवितेची भाषा सोपी व चटकदार असून स्त्रीहृदयाच्या वैशिष्ट्यपूर्ण भावनांची उकल करण्याचें सामर्थ्यहि तिच्यांत आहे, याची जाणीव होईल.

" निवारा " ( १९५३ ) हा अपर्णाबाईंचा दुसरा काव्यसंग्रह. या संग्रहांतील काव्याच्या प्रतिभेचें तेज हें एखाद्या दीपकळीसारखें शांत, स्नेहमयी व सजीव आहे. तसेंच ह्या कवितेचें अंतरंग हें जुन्या काळच्या लोकगीतांसारखें जिव्हाळ्यानें नटलेलें आहे. ही कविता सर्वत्र जेवढी गोडवा घेऊन आली आहे तेवढाच अधून मधून अभिजात विनोदहि घेऊन आलेली आहे.

" हिंदलक्ष्मीस ", " हे अमोल हीरक मम सदनीं " किंवा " राष्ट्रवीरांना पंचारती " या कवितांतून अपर्णाबाईंनीं आजच्या काळाला शोभेल अशी राष्ट्रभक्ति प्रकट केलेली आहे.

अपर्णाबाईच्या या संग्रहांतील काव्यात वात्सल्य आहे, सात्त्विक भाव आहे, जिव्हाळा आहे व निरागस हृदयांतील आनंदाची लकेरहि आहे. आणि मुख्य म्हणजे इथें निराशा नाहीं हें विशेष होय.

" नवीं मंगल गीते " हें या संग्रहाचें आणखी एक वैशिष्ट्य होय. आपल्याकडील संस्कार गीतात या गीतानीं मोठी चांगली भर टाकली आहे. लग्न मुंजीसारख्या मंगलप्रसंगीं जुन्या रूढीनुसार म्हणावयाचीं हीं नवीन गीतें आहेत. जुनीं गीतें – लोकगीतें – जुन्या पिढीबरोबरच मागें सरत चालल्यानें ती उणीव भरून काढण्याचें काम या गीतानीं केलेलें आहे.

ऋद्धिसिद्धि घरा येई । हिच्या पुण्यपावलानीं
झाकेल घर माझ । सोनियाच्या कवलानीं
कुलवंताची ही बाळ । माझ उजळीत कुल
सत्यवानाची सावित्री । घाली ज्ञानवंता भूल

" घरभरणी " मधील या ओळी या संदर्भात अवश्य लक्षात घेता येतील. ह्या काव्यातील भावना सुसंस्कृत मनोवृत्तीची, सहजरम्य भाषाशैलीची व सद्भावनाची अपर्णाबाईंच्या ठायीं किती उपासना झाली आहे याची साक्ष देते.

अपर्णाबाईंनीं या प्रौढ काव्याप्रमाणेंच काहीं शिशुगीतें मोठीं परिणामकारी अशीं लिहिलेलीं आहेत. त्याचा विचार बालवाङ्मयाच्या विभागात पुढें स्वतंत्रपणें केलेला आहे.

० ० ०

## सौ. पद्मा गोळे

कवितेच्या अंतरंगाचा तपास लावताना जगाच्या पाठीवर असलेल्या श्रेष्ठ साहित्याचा आधार जेव्हा घेण्यात येतो, तेव्हा परमार्थंतील कवींच्या काव्यविषयक विचाराची पुढयात पेरणी होते. अशा वेळीं काव्य नेहमीं दिसतें त्यापेक्षा काहींसें भव्यदिव्य असें रूप धारण करून नजरेत भरतें. मनाला त्यामुळें एक प्रकारचा भक्कम दिलासा येतो. भवितव्याबद्दलची चिंता क्षणार्धात दूर होते. नजरेसमोर आशेचे दीप पाजळू लागतात. आणखी वर्ड्स्वर्थनें जगप्रसिद्धपणा मिळविताना सांगितलें आहे त्याप्रमाणें " कविता हें सर्व ज्ञानपुष्पाचं अत्तर आहे" याचा अर्थ समजून येतो. त्याचा सुवास विचारी मनाला भुलवून टाकतो ह्या सुगंधापासून निर्माण होणारें तेज जीवनाला उभारी आणून टाकतें.

याच पार्श्वभूमीवर आधुनिक कवि जीवनातल्या अतिसूक्ष्म व मुग्धावस्थेत असणाऱ्या सौंदर्याची उकल करून दाखवीत असतो. पण याचवेळीं ह्या सौंदर्याच्या पूजेला आजच्या काळात किंमत नसल्याचें कटु सत्य तो लपवून ठेवू इच्छित नाहीं. कारण चालू युगात केवळ सौंदर्याच्या निष्क्रिय अशा उपासनेपेक्षाहि त्यास सामर्थ्याची व सभ्यतेची जोड द्यावी असें त्यास मनापासून वाटतें.

केशवसुताच्या ' तुतारी ' पासून तों कुसुमाग्रजाच्या कोलंबसाच्या ' गर्वगीता ' पर्यंत आधुनिक काव्याच्या सुधार वृत्तीच्या सामाजिक पण प्रभावी परिवर्तनाच्या छटा निदान तरी दहापधरा कवितामधून दिसून येतात. कविमनाचा कोमलपणा व त्याचें शूरत्व याचें प्रतिबिंब या कवितातून आढळून येतें. माधव ज्यूलियन, सावरकर, कुसुमाग्रज, कवि अनिल इत्यादि या प्रकारच्या काव्याचे पुरस्कर्ते होत. स्त्रियाच्या दृष्टीनें विचार करावयाचा तर या मालिकेंत पद्मा गोळेंचा काहीं प्रमाणात समावेश करता येईल.

पद्माबाईचें काव्य हें विषयाच्या दृष्टीनें विविध प्रकारचें आहे. भावना विष्काराच्या दृष्टीनें वैचित्र्यपूर्ण आहे प्रभावी विचाराच्या दृष्टीनें सामर्थ्यवान आहे. त्यामुळें त्याचें काव्य वाचलें म्हणजे उद्याच्या भारतातील स्त्रीच्या आशा-आकाक्षाची व जीवनातील कार्यक्षेत्राची त्याना जरूर जाणीव आहे असें लक्षात येतें. त्याचें आयुष्य एका खानदानी व श्रीमत कुटुबात गेलेलें असल्यानें त्याचें काव्य शालीनतेनें रुबाबदार झालें आहे. सयमानें प्रभावी ठरलें आहे. काहींशा मुग्धतेनें सुसस्कृत बनलें आहे. त्याची साक्ष त्याची " आम्ही कुलीनाच्या कन्या " ही कविता जरूर देते आहे

प्रणयी जीवनाचीं विविध चित्रें त्यानीं आपल्या काव्यात पेरलेलीं असलीं तरी त्यानीं या चित्रातून प्रणयाची चिरनूतन व चिरयौवन प्रेमभावनाच प्रकट होईल हें आवर्जून पाहिलें आहे. आणि मुख्य म्हणजे सफल होणाऱ्या प्रेमाचीच आराधना त्या करीत बसल्या नाहींत तर—

प्रेम जरी माझ्यावर
सोडी धिकाराचे शर
जावोत भेदून माझी नीच दुर्बलता

अशा काहींशा लढाऊ वृत्तीचा त्यानीं अगिकार केला आहे ! प्रेमभावनेचें हें नवेंच दर्शन घडविण्याचें धैर्य पत्करल्यामुळें त्याची कविता एकदम उठून दिसते.

नव्या युगातील स्त्रीजीवनाचें वैशिष्ट्य दर्शविणारे सौ. पद्मा गोळे याचे " प्रीतिपथावर " (१९४७) व " नीहार " (१९५४) हे काव्यसग्रह चित्तवेधक भावनाविष्काराचें एक उत्तम चित्र या दृष्टीनें सरस झालेले आहेत. या सग्रहातील जवळजवळ निम्मी कविता प्रेमगीतानीं नटलेली असून तिचें स्वरूप भावगीतासारखें आहे सौ. पद्मा गोळे याच्या कवितात नव्या युगातील स्त्रीचा जो आदर्श ठेवण्यात आला आहे, तो वस्तुनिष्ठ, पण विलोभनीय आहे " ही स्त्री सर्वसाधारण स्त्रीप्रमाणें प्रेमात पडते आणि—

" तूच मला शिकविलेंस प्रेम कराया
तूच अर्थ निर्मिलास जीवनात या "

असेंहि म्हणते.

स्वातंत्र्याच्या लढ्यात भाग घेऊं इच्छिणारें तिचें मन अभिमानानें उफाळून येऊन स्वतंत्रतेला आवाहन देते कीं—

" सर्वस्वहि लाविन आज पणा
आणीन तुला परि निजसदना "

शतकानुशतकें परदास्यात असलेल्या स्त्रीच्या मनाची केवढी ही तयारी?

सौ. पद्मा गोळे यानीं लिहिलेलीं, वत्सलरसानें भरलेलीं गीतेंहि अप्रतिम आहेत. स्वतःला लवकरच होणाऱ्या मुलाचें स्वागत करणाऱ्या मातेचे भाव रंगविताना स्त्रीच्या मनांतील आनदोर्मि वर्णन करतांना, कवयित्री म्हणते—

" अमूर्त कोणी हृदयीं माझ्या गाइ सुमंगल गान
अपूर्व हुरहूर वाटे कसली
नव भावोर्मि हृदयिं उसळली
तनु भीतीनें कापे तरि ये आनंदास उधाण "

त्यानंतरची स्वत ची भूमिका कशी राहील याचेंहि स्पष्ट उत्तर ती देऊन टाकते—

" युगधरा मी नव्या युगाची
मानवतेचा ध्वज करिं धरुनी
उंच स्वरानें स्वतन्त्रतेचीं
गाइन उज्ज्वल मगल गाणीं "

पण अशा स्थितींतहि स्वतःच्या मुलाचा विसर न पडता उलट

" बाळें चिमणीं गृहरत्नें मम
परि न शृंखला त्या पायींच्या
विकास त्यांचा, विकास माझा
विकास यातचि मम राष्ट्राचा "

असेंच ती अभिमानानें म्हणते आहे.

अशा प्रकारचें नव्या स्त्रीचें चित्रण मोठ्या दमदारपणानें व कणखरपणानें करीत असतानाच " कधीं कधीं "सारख्या कवितेंत त्या प्रेमभावनाचींहि चित्रें काढूं इच्छितात. आपल्या शृंगारानें आपण आपल्या पतीला भुलवून टाकावें व नपस्येने वेडें करून सोडावें असेंहि त्याना वाटतें!

परंतु इतर कवयित्रींच्याप्रमाणें केवळ घरातच त्याचें मन रमत नाहीं. संसारी जीवनाची बारीकसारीक चित्रें रेखाटूनहि त्याना

" वाटे अतरीं या अजूनि अगूदे
ध्येयात्म तें जीवन।
जेथें शैशवीं यौवनीं विहरलें सौंदर्यवेडें मन।
दूंते शांति कुठुनि दुर्बल जिवा, लाभेल या जीवनीं?"

अशा प्रश्न करावासा वाटतो. त्यामुळें त्यांच्या ठायींच्या चिंतनशील मनाची कल्पना येते.

'अभिलाषा' व 'मी माणूस' या त्यांच्या कवितांनीं ज्वालामुखीसारखा स्फोट केला आहे! स्त्रीकडे उपभोगाची दृष्टि ठेवणाऱ्या पुरुषीमनाची त्यांनीं सडेतोडपणें व कलात्मक अशी 'अभिलाषा'मध्यें मांडणी केली आहे. इथे कवयित्रीच्या मनाला होणारा अनावर क्षोभ प्रकट झालेला आहे. 'मी माणूस' या कवितेंत त्यांनीं जीवनाकडे किती निर्भयतेनें पाहिलें आहे याची कल्पना येते. ही कविता पराक्रम दर्शविणारी आहे. जगातील दंभ, खोटेपणा व स्वार्थ यांचें हें एक सुंदर व रेखीव चित्रण आहे.

सौ. पद्माबाईंची अशी ही कविता मोठी ओघवती व सहज सुंदर भाषेनें नटलेली आहे अलीकडे नवकाव्यात ती शिरू पहाते आहे. परंतु तरीहि तिची वर्णनशैली आकर्षक आहे तिनें जुन्या छंदाचा स्वीकार केलेला असला तरी ती विविध अंगांनीं नटलेली आहे. मात्र अधून मधून कुठें तरी यतिभंगाचाहि दोष तिनें स्वीकारला आहे! तरी परंतु तिच्याठायीं प्रसाद आहे, माधुर्यहि आहे.

० ० ०

# शांता ज. शेळके

एखाद्या झाडाला जशी पानें येतात तशी कवीला कविता सुचली पाहिजे असें प्रसिद्ध आंग्लकवि कीट्स् यांचें म्हणणें आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें कवीच्या जीवनातून कविता स्फुरली पाहिजे नव्या जीवनाला तिनें स्फूर्ति दिली पाहिजे. ज्ञानदेवादि जुन्या काळच्या कवींनीं कीट्सची अपेक्षा पुरी केली आहे, नव्हे त्याहिपेक्षा अधिक असें असामान्यत्व त्यांनीं आपल्या कवितेंतून प्रकट केलें आहे. त्यामुळें त्यावेळच्या व आजच्याहि जगाला स्फूर्ति मिळाली आहे, मिळते आहे. आजच्या जगातहि असे कांहीं कवि आहेत कीं, ज्यांच्या जीवनातून काव्य उमलतें, फुलतें. अशाच कांहीं कवींच्या मेळाव्यात शांता ज. शेळके यांचें नाव घेण्यासारखें आहे कारण—

प्रिय सखये! तव संगतींत मीं
रंगविलें अवघें मम जीवन
स्निग्ध निव्हाळा तुझा लाभता
पाझर फुटले पाषाणातुन
हर्ष उरीं दाटून जेधवा
मधुर भाव उसळले मन्मनीं

त्या भावाची अखिल माधुरी
तुझ्यामध्यें मीं दिली ओतुनी ?

अशी त्यानीं आपल्या कवितेशींच बोलणीं केलीं आहेत !

वर्षा ( १९४७ ) व रपसी हे शांताबाईंचे दोन कवितासंग्रह. या कवितांतून त्यानीं स्वत च्या जीवनातील सुखदु खाचा प्रामाणिकपणे आविष्कार केलेला आहे. त्यामुळें आजच्या कविमंडळात त्याना मानाचें स्थान मिळालेलें आहे त्याची कविता ही बरीचशी आत्मलेखनपर अशी झालेली असून " विशिष्ट अनुभूतींचीं स्मारकें म्हणून आणि विशिष्ट आकांक्षाचीं चित्रें म्हणून माझ्या कविता मला आवडतात " असे खुद्द शांताबाईंचेंच म्हणणें आहे शांताबाईंची ही कविता म्हणजे केवळ शुद्ध, सरळ आणि निरागस असा आत्माविष्कार आहे त्यामुळें ही कविता सर्वसामान्य लोकानाहि समजेल अशी सोपी झालेली आहे तिच्यामध्यें " असामान्य " असें काहींहि नाहीं.

" गगनोदरातील मेघाचीं पटलें भेदून सचार करणारा गरुड आपण नसून, हिरवळींत जेथें कोमल फुलें बहरतात तेथें झुलणारें फुलपाखरू असल्याचें " त्याची कविता सागत आहे " आपल्या तळपण्यानें घन तिमिराला उजळून टाकणारी विद्युल्लतिका आपण नसून गगनागणात दिसणाऱ्या ढगाच्या आडून चमकणारी इवलीशी चादणी आपण आहोंत " असे तिचें म्हणणें आहे " उद्दाम सुगध उधळणाऱ्या गुलाबकलिकेपेक्षा पर्णांतरीं लपून राहणारी तुळशी मजरी "ती आहे दुदुभीप्रमाणें आसमन्त घुमविणारे हें सागरगर्जित नसून तो निर्झराचा अस्फुट कलरव आहे तें द्वेपाचें ताडव नसून निमण्या गालावरील अकारण हास्याची ती माधुरी आहे स्वत च्या आणि स्वत च्या काव्याच्या मर्यादा आणि गुण विशेष दुसऱ्या कोणाहि कवीस इतक्या नेमक्या आणि सुदर रीतीनें सागता आल्या नसत्या *

शांताबाईंनीं स्वत चें आत्मनिरीक्षण आणखी एका कवितेंत केलें आहे

" माझिया हृदयाचें पाखरूं
अस्थिर, चचल भारी बाई कसें तया आवरूं ?
निळें निळें नभ येता दिसुनी
फडफड करिते अधीर होउनि
इवल्या पखानींच आपुल्या गगन पाहते भरूं ?
कुठें ताटवा दिसे बहरला,
हर्ष तरी या होई आगळा
मजुळ, अस्फुट, कोमल गुजन याचें होई सुरू

* रा. श्री. जोग, वर्षा, प्रस्तावना.

निज जातीचें दिसता कोणी
खुळें तयाला बसे बिल्गुनी
शब्दहीन भाषेत आपुल्या हितगुज लागे करूं ? "

असें शाताबाईंनीं स्पष्टपणें म्हटलें आहे. या हृदयपाखराच्या डोळ्यामधून अनत स्वप्नें फुलून लपून बसलीं आहेत, आणि त्या स्वप्नाच्या सुखद माधुर्यात जीवनामधील दु:ख तें विसरून जातें, असा या कवितेचा शेवट आहे.

" काहीं अमूर्त ध्येयाचा, वेध सारखा घेऊन ! कापितसे जीव उगा वाळवंट हैराण " असें आपलें जीवन चाललें असल्याची जाणीव कवयित्रीला होते आहे ! " माझे मींच घेतलं हो मरण हे ओढवून " असें सागून त्या दु:खी जीवनाची जबाबदारी आपणावरच आहे असें ती म्हणतेहि. त्यामुळे कित्येकदा

" सदाच मी एकली, जीवनीं सदाच मी एकली "

अशी रुखरुख मात्र तिच्या मनाला लागून रहाते. तथापि शाताबाईंच्या काव्यात निर्भेळ निराशा मात्र बिल्कूल आढळत नाहीं उलट " नैराश्यातहि त्याना एक आधार वाटतो व तो म्हणजे ईश्वरावरील श्रद्धेचा. कविजनाच्या अलीकडील पिढीमध्यें न आटळणारी परमेश्वरावरील श्रद्धा त्याच्या काव्यात प्रकट झाली आहे. बुद्धीपेक्षा श्रद्धेवर त्याचा अधिक भर आहे. मूर्तिभजकाच्या या युगात मूर्तिपूजेचें आणि ती पाठीमागील भावनेचें त्यानीं समर्थन केले आहे. तेजोनिधि भास्कर, पर्जन्याच्या धारा, वसताचें आगमन, सुमनाचा सुगध, भव्य सागर या गोष्टींमध्यें प्रभूचा साक्षात्कार त्याना होतो, व त्यामुळेंच क्वचित् " आज सारे मम एकाकीपण " असेंहि त्याना वाटतें. "

शाताबाईंना निसर्गाचें प्रेम फार आहे. निळें आकाश तर त्याचे अत्यत प्रिय असें समाधानाचं स्थान आहे. रातराणीचें त्याना फार वेड आहे असें त्याच्या विविध प्रकारच्या उल्लेखनात येणाऱ्या तिच्या उल्लेखावरून दिसून येतें.

" पाऊस " " हिरवळ " आणि " पावसानतर " या कवितामधूनहि त्याचें निसर्ग प्रेम असेंच व्यक्त झालेलें आहे. शाताबाईचें हें निसर्ग प्रेम त्याच्या मनातील मूळच्या जिव्हाळ्याने निर्माण झालेले आहे, आणि म्हणूनच त्यानीं आपल्या एका काव्यसग्रहास " वर्षा " असें नाव दिलें असावें.

शाताबाईंच्या काव्याचें स्वरूप हें असें आहे. त्याच्या काव्यात स्वत च्या जीवनातील सुखदुःखाचें लेखन आहे. पण तें स्वयकेंद्रित व पुनरुक्ति यापासून अलिप्त आहे. त्यात कोठेंहि अतिरजन, आधिक्य अथवा उथळपणा नाहीं. त्याचें स्वरूप निर्मळ व निरामय आहे.

शाताबाईंच्याजवळ असणारी शब्दार्थाची उपस्थिति व त्याचें पद्यरचनेवरील प्रभुत्व वाखाणण्यासारखें आहे. आधुनिक कवयित्रींमध्यें कोणाहिमध्यें हें प्रभुत्व इतक्या प्रमाणात मला दिसलें नाहीं, एवढेंच नव्हे तर अनेक कवींमध्येंहि तें दिसत

नाहीं." उत्कट भावनेच्या जिव्हाळ्याची देणगी शांताबाईंना लाभली असल्यामुळे आदळआपट किंवा धादल गडबड न करता त्यांची कविता रेखीव आणि चटका लावणारी झाली आहे.

० ० ०

## सौ. शांताबाई जोशी

घरगुती पाळणाऱ्या आणि देवादिकांना आळवण्याच्या कविता लिहिणाऱ्या शांताबाई जोशी यांची प्रसिद्धि ध्वनिमुद्रिकांसाठी काव्य लिहिणाऱ्या म्हणून विशेष आहे. त्यांच्या कवितांचे गायन अनेक नामवंत व होतकरू गायिकांनीं व गायकांनीं केलेलें आहे.

चंद्रकला ( १९४५ ) व भावरेषा ( १९५८ ) हे शांताबाईंचे दोन कविता संग्रह आहेत. त्यांच्या कवितेनें अतिशय चिकाटीनें, मयमान व हौसेनें मराठीची सेवा केलेली आहे. "भावनांचा पाळणा फारच हेलकावे खाऊ लागला कीं, आपोआपच कवितेचा जन्म होतो" अशी माहिती शांताबाईंनीं स्वतःच आपल्या काव्यनिर्मितीबद्दल दिलेली आहे.

मन माझें वेडें भारी धावतें कल्पनामागून
कधिं असता निरंतित दाणे
चिउताई पुढें चिवचिवते
ते तिचे पंख चोरुनिया
मन वाऱ्यामागें जातें .

आणखी असा खुलासा करताना भावरेषा घालून घेतली आहे.

सोज्ज्वल प्रेमभावनेचा आविष्कार, ईश्वरविषयक भक्तिभाव, निसर्गाचा स्नेह, लहान मुलांच्याबद्दलचें वात्सल्य आणि थोरामोठ्यांच्या विषयीं आदरभाव हें शांताबाईंच्या कवितेचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळें—

आभाळींचा चांद माझ्या आज अंगणात
पंढरीचा राया दळी जनीच्या घरात

अशा कृष्णदेवाच्या व जनाबाईच्या सहकारी जीवनाचं कौतुक त्यांनीं मोठ्या तन्मयतेने केलेलें आहे त्यांची कविता अशी साधी आहे घरगुती आहे.

० ० ०

## स्फुट काव्यलेखन

या कालखंडातील ज्या कवयित्रींचा विचार येथवर झाला त्यांच्याशिवाय आणखीहि इतर कवयित्रींनीं मराठी काव्यात हातभार लावलेला आहे.

उमाबाई सहस्रबुद्धे, सुशील मराठे, उषा लिमये, सरिता पत्की, शिरीष पै, पद्मा गोळे, योगिनी जोगळेकर, लीलाराजे पटवर्धन, ललितकुमारी भट इत्यादींचा समावेश या कवयित्रीमध्ये होतो. त्यांचेपैकी काहीं जणींचें काव्य ग्रथरूपानें प्रकाशित झालेले आहे तर काहींजणींचें वेगवेगळ्या नियतकालिकांतून वाचकांचे समोर आलेलें आहे. संख्येच्या मानानेंहि तें परेसम झालेलें आहे. परतु यापूर्वीच्या कवयित्रींच्यापेक्षा काहीं खास असे वेगळें वैशिष्ट्य त्यात दिसून न आल्यामुळे त्याचा येथें निराळा विचार केलेला नाहीं. तरीपण या सदर्भात नमुन्यादाखल म्हणून "गृहलक्ष्मी"च्या १९२८ सालच्या अकात आलेली उमाबाई सहस्रबुद्धे याची 'सायकाळ' ही कविता इथें देत आहे. स्त्रीस्वभावाला धरून उमाबाईंनीं सध्यादेवीच्या अगावर चढविलेले अलकार या कवितेंत कसे गोविले आहेत तें पहाण्याजोगें आहे—

"मुग्ध बालिका सध्यादेवी खुलली अनुरागानें
उत्सुक झाली निशा सखीला भेटाया मोदानें
यौवन पूरित आल्हादाची छटा विराजे वदनीं
उभी ठाकली हासत हासत रम्य वसतोद्यानीं
चकमक वलयें करात ल्याली सुदर रविकिरणाचीं
भूमितलावर प्रभा फाकली अतुल अशा स्वरूपाची
इद्रधनूचा नवरत्नाचा दाम खुले कमरेला
हेमवर्ण तो गगन मडळीं पाचरिला जणु शेला
शालुबुट्याचा रग जाभळा शोभवि केतकी तनुला
धवल यशाची हालत कठीं सुदर मौक्तिक माला
वन पुष्पाचा हार करामधिं फिरवि चहुकडे डोळे
सुवर्ण रग परि कुणीं शिंपिला विश्वावरती नकळे."

ललितवाङ्मयाच्या विकासकाळीं स्त्रियांच्या लेखणींनें कसा प्रकारचें काव्य लिहिलें याचा हा धावता इतिहास आहे. तो लक्षात घेता एक ठळक गोष्ट लक्षात येतें ती अशी कीं हें काव्य बहुताशी व्यक्तिनिष्ठ आहे. स्वतःच्या भावभावनापलीकडे त्याची मर्यादा फारशी गेलेली नाहीं. आणि स्त्रियांच्या गद्य लेखनाच्या मानानें त्याचा पसाराहि मर्यादित आहे. खेरीज आणखी एका ठळक गोष्टीचा उल्लेख करावयाचा म्हणजे तो असा कीं कुसुमाग्रजाच्या 'पृथ्वीच्या प्रेम गीता'सारखी कविता लिहिणें स्त्रियाना अद्याप जमलेलें नाहीं! प्रतिभासपन्न अशा त्याच्या काव्याचा काहीं थोडा भाग सोडला, तर अद्यापहि स्त्री ही काव्याचा विषय म्हणूनच अधिक लोकप्रिय आहे!!

याच कालखडातील पुरुषानीं लिहिलेलें काव्य लक्षात घेता असें दिसून येतें कीं, स्त्रियांचें काव्य हें अगदींच मर्यादित वातावरणातून भटकते आहे. वैयक्तिक

सुखदुःखाच्याच गोष्टींची विशेष वाच्यता करते आहे. त्यामुळें "कविता ही कालबरोबरच प्रगमन करीत असते. कविता ही चेतना आहे. कविता ही गति आहे, कविता हे स्फूर्तीचें अतरतेज आहे, भविष्याचा मार्ग प्रकाशित करणारी ती दिव्य चांदणी आहे. घोर अरण्यातून पलीकडे जाणाऱ्या वाटसरूस वाट दाखविणारी ती ज्वलद्दीपमाला आहे ! कविता ही विस्तवाच्या पखानीं युक्त अशी धमक आहे. उदात्त विचाराची— आत्मत्यागाचें बल अंगात सचरणाऱ्या उदात्त विचाराची— ती दिव्य मूर्ति आहे," हे जोसेफ मॅझिनींचें म्हणणें स्त्रियाच्या कवितेला न पेलणारें आहे ! ही धमक त्यांच्या कवितेंत येण्यासाठीं त्यांच्या कल्पनेला अजूनहि विशाल दृष्टिकोन लाभणें अगत्याचें आहे.

देशभक्तीनें प्रेरित झालेल्या भावना या कालखडात विशेष प्रमाणात उफाळून वर आल्या असतानाहि फारच थोडे अपवाद सोडले, तर स्त्रीच्या लेखणीनें काव्य-लेखनाचे वेळीं त्याचा विचार करू नये याचें मोठें आश्चर्य वाटतें स्त्रीशिक्षण वाढलें, स्त्रिया वेगवेगळ्या कार्यक्षेत्रात भाग घेऊ लागल्या, त्यांच्या कार्याचीं क्षितिजें विस्तारलीं, घराबाहेरच्या जगात त्यानीं प्रवेश करून स्थान मिळविलें, तरीहि त्यांच्या कल्पनेला म्हणावी तशी विशाल नजर न मिळाल्यामुळें त्यांचे काव्य बऱ्याच अशीं घरातच घुटमळलें. स्वतःविषयींच बोलत राहिलें. त्यामुळें पुरुषाच्या व त्यांच्या काव्यलेखनात बरीचशी तफावत राहिली ! त्याचा परिणाम काव्याच्या इतिहास लेखनात किंवा आढाव्यात स्त्रियांच्या लेखनाचा विचार जाणत्या टीकाकारानीं न करण्याकडे झाला. कदाचित् असें घडण्याचें आणखीहि कारण असू शकेल. परतु ही गोष्टहि नजरेआड करण्यासारखी उचितच नाहीं

वास्तविक इदिरा सत, पद्मा गोळे, शाता शेळके वगैरे कवयित्रींच्या ठायीं कालमानाप्रमाणें स्फूर्ति घेऊन उठणारें काव्य निर्माण करण्याची शक्ति जरूर आहे. त्याचें शिक्षणहि पुष्कळ झालें असल्यानें परभाषेंतील व स्वभाषेंतीलहि काव्य त्यानीं अभ्यासिलें आहे. तत्र म्हणूनहि त्यानीं काव्याचा विचार केला आहे. परतु "स्त्री ही स्फूर्ति देवता आहे " हें सिद्ध करणारी कविता त्यानीं थोडासा अपवाद सोडला, तर का लिहू नये याचें नवल वाटू लागतें.

स्त्रियानीं लिहिलेल्या काव्याचा आणखी एक प्रकर्षानें जाणवणारा दोष म्हणजे त्यानीं जानपद जीवनाला बिल्कूलच हात न घालताना आपलें काव्य लिहिलें हा होय ! अर्थात् एकट्या बहिणाबाई चौधरी या गोष्टीला अपवाद आहेत. त्याचें जीवनच वेगळें. परतु इतरानीं अजिबातच हा जानपद भाव का डावलावा आणि ग. दि. माडगूळकर किंवा नामदेव व्हटकरासारखें खास ग्रामीण काव्य लिहायचा प्रयत्न त्यानीं का करू नये कळत नाहीं. कारण शाता शेळके, सजीवनी मराठे किंवा इदिरा सत यानीं ग्रामीण जीवन जवळून पाहिलेलें आहे ! फार काय त्या खेड्यात राहिलेल्याहि आहेत.

मराठी भाषेबद्दल बोलतांना खेड्यांतील स्त्रियांनीं तिची अजूनहि चांगली जोपा केली आहे असें अभिमानानें बोललें जातें. आणि अशिक्षित किंवा शिक्षित स्त्रियांच्या बोलण्यांत मायबोलीचाच वापर अधिक असतो ही वस्तुस्थिति आहे.

एवढेंच नाहींतर आपल्या मायबोलींतच आपल्या जीविताचें वेड किंवा अंतरींची ओढ आहे हें माडगूळकरांप्रमाणें त्यांच्या लक्षांत येऊनहि तसें बोलायचें त्यांना जमलें नाहीं. किंवा मराठीच्या नगरींत फेरफटका करुन तिच्या घरचा जातीवंत खजिना सांगण्याचाहि मोह कुणाला झाला नाहीं, ही माझ्या मतें मोठीच दुर्दैवाची गोष्ट होय.

या कालखंडांत " रविकिरण मंडळानें " मराठींत विविध काव्यकलाप्रकार आणण्याची यशस्वी कामगिरी केली. तशा प्रकारची—नवें वृत्तप्रकार मराठीला देण्याची—कामगिरी स्त्रीनें केलेली नाहीं, असें या कवितेच्या एकंदर थाटावरुन दिसून येतें. गिरीशांप्रमाणें खंडकाव्याची रचना, माधव ज्यूलियनप्रमाणे प्रीतिरसाचा उठाव किंवा यशवंतासारखी " आई " कोणत्याहि कवयित्रीनें कां निर्माण करुं नये, याचें आश्चर्य वाटतें !

संजीवनी मराठे यांनीं तांब्यांच्याप्रमाणें भावगीतें लिहिलेलीं असलीं तरी तांब्यांच्या ठिकाणीं असलेली " मनाला सृष्टींतील सौंदर्याचे साक्षात्कार व्हावे, त्या साक्षात्कारांच्या चिंतनांत बुद्धि रंगून जावी व त्या उन्मनी स्थितींत प्रतिभेला गीतांचा फुलोरा फुटावा, या गोष्टी घडावयाला जी सूक्ष्मग्राही, सौंदर्यप्रवण पण शुचि मनोवृत्ति असावी लागते "* ती मात्र त्यांच्याजवळ तितक्या उत्कटत्वानें असलेली दिसत नाहीं.

हें सर्व मान्य करुनहि या सर्व पुरुषांचे जवळ नाहीं तें या कवियित्रींनीं यशस्वीपणे कमाविलेलें आहे, असें मात्र बिनदिक्कतपणें म्हणावयास हरकत वाटत नाहीं. वत्सलरस स्त्रियांनीं इतक्या उत्कटत्वानें हाताळलेला आहे कीं, त्याची सर कोणत्याहि कवीच्या त्या पद्धतीच्या काव्याला येऊं नये ! तीच गोष्ट स्त्रीसुलभ अशा इतर प्रामाणिक भावनाविष्काराच्या बाबतींतहि म्हणतां येईल. स्त्रियांचें काव्य एकदम डोळ्यांत भरणारें नसलें तरी त्यास लाभलेली स्त्रीसुलभ शालीनता आणि शुचिता हृदयंगम आहे.

शेवटीं या काव्यासंबंधीं अच्युतराव कोल्हटकर यांनीं म्हटल्याप्रमाणें असें म्हणतां येईल कीं, " कवितेचें खरें लक्षण म्हटलें म्हणजे, हृदयांतील तरंगाचें रूप व्यक्त करुन दाखविणें...कवितेस काल लागत नाहीं, चाल लागत नाहीं अथवा अलंकाराची शालहि लागत नाहीं...मानवी अंतःकरणाच्या किनखापी पिशव्या

* श्री. माडखोलकर, अर्वाचीन मराठी साहित्य, पा. २२

रसिक समाजापुढें भरभरून ओतून दाखविणें म्हणजेच काव्य "* आणि त्या दृष्टीनें स्त्रियांचें हें काव्यलेखन केव्हाहि मराठीला भूषणावह होईल यांत शंका नाहीं.

० ० ०

## लघुकथा

मराठी वाङ्मयातील लघुकथा हा कलाप्रकार एका बाजूनें आधुनिक म्हणून जेवढा लक्षात येतो, तेवढाच तो दुसऱ्या बाजूनें विशेष प्राचीन असल्याचें ध्यानात येतें. माणूस जन्माला आला आणि दुसऱ्याशीं बोलण्याची कला त्याला प्राप्त झाली तेव्हापासूनच कथेचा जन्म झाला व गोष्टीवेल्हाळ म्हणून माणसाची जगाला ओळख झाली. एवढेंच नाहीं तर सांगणाराची कुवत आणि ऐकणाराची संस्कृति या दोन मुख्य बाबींवर कथेचें संगोपन होत गेलें. तिची उभारणी झाली ती सामाजिक जीवनातील सुखदु:खावर, त्यामुळें उचंबळून येणाऱ्या भावनांवर आणि त्या संबंधित झालेल्या चिंतनावर. त्या कारणानें कधीं ती आकारानें प्रदीर्घ होई तर कधीं आटोपशीर होई. आजकालचें लघुकथेचें वाङ्मयीन प्रकाराचें तंत्र त्यावेळीं तिला ठाऊक नव्हते. परंतु त्याकाळचें तिचें स्वरूप या नवीन तंत्राच्या दृष्टीनें अगदीं अस्सल असल्याचें दिसून येतें. या संदर्भात इसापनीति, पंचतंत्र, हितोपदेश यामधील कथा अवश्य पडताळून पहाण्यासारख्या आहेत.

मराठीतील कथेचा प्रारंभ संस्कृत मधील हितोपदेशात आलेल्या कथांमधून आढळतो. आख्यायिका, लोककथा, सुरस गोष्टी, नवकथा, चातुर्याच्या गोष्टी वगैरे सर्व प्रकार याच वाङ्मयप्रकारात मोडतात. मानवाच्या कल्पनेला, भावनेला, रचनेला आणि विचाराच्या जोडणीला जें जें म्हणून गम्य होईल तें तें सगळें या कथेच्या कक्षेत येतें. त्यामुळेंच कथा सुंदरीनें होमर व्हर्जिल्सारख्यांच्या इलियड-ओडिसीमधून अगर व्यास—वाल्मिकींच्या महाभारत रामायणातून आपलें पद्य स्वरूप; बायबलाच्या जुन्या नव्या करारातून गद्य स्वरूप, पंचतंत्र, हितोपदेश, इसापनीति वगैरेंतून बोधस्वरूप; ठकसेन राजपुत्राच्या व बिरबल आणि बादशहाच्या गोष्टींतून चतुरस्वरूप, लावण्या -पोवाडे, रोमॅनिकल्स, बॅलेड्स वगैरेंतून आपलें रंगेल मर्दानी स्वरूप वेळोवेळीं निरनिराळ्या समाजस्थितीला दृग्गोचर करतेनें आतापर्यंत पटवून दिलेलें आढळून येतें.

अगदीं सुरवातीच्या कथा देवादिकांच्या व उच्च कोटींतील लोकांच्या पराक्रमावर उभारलेल्या असत. या कथांमधून प्रामुख्यानं बोधवादाचा स्त्रि

---

* मराठी काव्याची प्रभात.

तात्पर्याचा पुरस्कार केला जात असे. त्याचप्रमाणें या कथेचा आणखी एक विशेष म्हणजे तिचें कथानक अद्‌भुतरम्य घटनांनीं घडविण्यात येत असे.

इंग्रजी राजवट सुरू झाल्यानंतर मात्र लघुकथेच्या आंतर्बाह्य स्वरूपात बदल होत गेला. तिला एक प्रकारचें कलात्मक स्वरूप प्राप्त होऊं लागलें आणि ती पुष्कळशी आटोपशीर होत चालली. तरीपण पंचतंत्र किंवा इसापनीतीमधील कथा कांहीं या नव्या स्वरूपाला हार गेल्या नाहींत. उलट एच्. ई. बेट्स या सुप्रसिद्ध इंग्रज कथालेखकानें तर मोपाँसा, चेकॉव्ह, गॉर्की व जॉइस यांच्या उत्कृष्ट गोष्टींच्या जोडीनें बायबलमधील गोष्टी व अँडरसनच्या परीकथांचा विचार केला आहे !

आजकालच्या लघुकथेचें प्राचीनकाळच्या लघुकथेशीं असें साम्य आढळत असलें तरी बदलत्या कालमानानुसार तिचें अंतरंग व बहिरंगहि पार बदलून गेलें आहे. इंग्रजांच्या राज्याबरोबरच शिक्षण, साहित्य, राजकारण, समाजकारण व मानवी जीवन याकडे पहाण्याचा दृष्टिकोनच बदलला. अद्‌भुतरम्यता जाऊन वस्तुस्थिति अधिक मानली जाऊं लागली. बहिरंगापेक्षा अंतरंग वर्णन करण्याकडेच मानवी मनाचा कल झुकूं लागला. म्हणजे थोडक्यात बोलावयाचें तर मराठी मनाचा मोहरा हा पारमार्थिकाकडून ऐहिकाकडे वळत गेला. जीवनमूल्येंच त्यामुळें वेगळीं झालीं व त्याचा परिणाम स्वाभाविकच साहित्यावर होत गेला. एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व विशेषतः अखेरीच्या पंचवीस एक वर्षांत निबंध, नाटक, कादंबरी, कविता आणि कथा या सर्वांनीं अगदींच नवीन रूपें धारण केलीं. परभाषेंतील वाङ्मयाचें मराठींत भाषांतर झालें व त्याप्रमाणें नवनिर्मितिहि होऊं लागली.

तरीपण इ. स. १९२० पावेतों एक कलात्मक वाङ्मयप्रकार म्हणून मराठींतील लघुकथेचा विचार झाला नाहीं. मात्र हरिभाऊ आपट्यांच्या कथांनीं आपली लोकप्रियता एव्हाना निश्चितपणेंच मिळवून ठेवली होती. त्यामुळें १९२० नंतर कथेचा विकास व्हावयास ही गोष्ट विशेष उपयोगी पडली. टागोर, ओ. हेन्री, मोपाँसा, चेकॉव्ह इत्यादींचा आदर्श नजरेपुढें ठेवून दिवाकर कृष्ण, फडके, खाडेकर, दौंडकर, माजरेकर वगैरे लेखकांनीं आपल्या कथा लिहिल्या.

लघुकथेच्या विकासाला या पुरुष लेखकांच्या प्रमाणेंच स्त्रियांनींहि आपला यथाशक्ति हातभार लावलेला आहे. १९३० नंतर लघुकथेला एक नवी पिढी मिळाली असें म्हणतात. त्या दृष्टीनेंहि स्त्रियांनीं लिहिलेली कथा लक्षांत घेण्याजोगी आहे. या नव्या कथेची ओळख " प्रतिभा साधनात " प्रा. ना. सी. फडके यांनीं " शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें आणि शक्य तितक्या कमी पात्र प्रसंगाच्या

सहाय्यानें सांगितलेली एकच एक गोष्ट म्हणजे लघुकथा " † या कल्पनेमधून केली व त्याप्रमाणें स्वत तिची निर्मितीहि केली.

परंतु लघुकथेची ही कल्पना तिच्यामधून होणाऱ्या एकाच प्रमुख संस्काराच्या परिणामाच्या दृष्टीनें, वातावरण किंवा पात्रे यांचें बंधन घालून भागण्यासारखी अनेकांना वाटली नाहीं कारण त्यांच्या मतें अशा बंधनांना जखडून घेऊन लेखक लिहायला बसत नसून उलट तंत्रच त्यांच्या मागून धावतें! तरी परंतु या मतभेदांतून एक गोष्ट निश्चितपणें साध्य झाली ती अशी कीं, कलेच्या दृष्टीनें लघुकथा ही पूर्वीपेक्षा अधिक आकर्षक होत गेली. विशेषत' १९४० च्या आस पास या गोष्टींचा अधिक उलगडा होत गेला. ही दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीची वेळ होती. ज्या मध्यमवर्गांतून आपले बहुतेक लेखक निर्माण होत आले होते, त्यांच्या अशत: सुस्थिर अशा जीवनमंदिराला या काळानंतर एकामागून एक असे नवे सुरुंग लागू लागले. गेल्या आठनऊ वर्षांत या वर्गाचें जीवन किती उध्वस्त झालें आहे, त्यानें पिढ्यान् पिढ्या उरार्शी कवटाळून धरलेल्या जीवन मूल्यांचें वास्तव स्वरुप त्याला कसें प्रतीत होऊ लागलें आहे, हें कांहीं कुणाला सांगायला नको! या नव्या जाणिवेचा परिणाम गेल्या सात आठ वर्षांतील वाङ्मयातल्या काव्य व कथा या दोन क्षेत्रांत अधिक स्पष्टपणें दिसून येत आहे.*

लघुकथेच्या या जडणघडणीचें अलिकडचें हें स्वरुप या परीनें क्रमक्रमें क्रमश विकसित होत गेलें त्याचा आता स्त्रियांच्या कथेच्या दृष्टीनें येथें विचार करावयाचा आहे. या कालखंडातील कथा ही अधिक कलात्मक, आटोपशीर, जिव्हाळ्याची, वास्तव, संयमी, भावनापूर्ण अंत करणाची व नव्या पिढीचे विचार सांगणारी अशी झालेली आहे आणि तिनें आपली पार्श्वभूमि ही राजापासून रंकापर्यंतच्या वातावरणातून उभारलेली आहे. त्यासाठीं दिवाकरकृष्ण, फडके, खांडेकर, चोरघडे, दौंडकर, मांजरेकर, लक्ष्मणराव सरदेसाई, य. गो जोशी, काणेकर, माटे, ठोकळ, व्हटकर, दि. द. पाटील, दिघे इत्यादींनीं आपली शक्ति वेचलेली आहे. तेव्हा या संदर्भात स्त्रियांच्या कथेचा विचार करताना जो प्रारंभ आढळून येतो तो सौ. आनंदीबाई शिर्के यांच्या कथेपासून होय.

● ● ●

---

† " The aim of a short story is to produce a single narrative effect with the greatest economy of means that is consistent with the utmost emphasis " ( The Art of Fiction p 177. )

क्लेटन हॅमिल्टन

* वि. स. खांडेकर. पाच कथाकार. प्रस्तावना. पा. ३७

# श्री. आनंदीबाई शिर्के

१९२० नंतरच्या काळात स्त्रीशिक्षणात बरीच प्रगति होत चालली. स्त्रियांचें वाचन वाढतें राहिलें समाजातील कामकाजात त्या लक्ष घालू लागल्या. स्वतः काहीं काम करण्याची त्यांना इच्छा झाली सामाजिक जीवनाचा अभ्यास त्यांनीं सुरू केला. त्यांची विचारशक्ति विकसित होत चालली. स्वतःची भावना प्रामाणिकपणें बोलून दाखविण्याचें धारिष्ट्य त्यांनीं बाळगलें त्यामुळें स्वाभाविकच त्यांच्या लेखनाला वेगळें वळण मिळत गेलें त्याचा परिणाम असा झाला कीं, संसार चित्राचे बरोबरच इतर काहीं वेगळ्या कल्पनांचाहि त्या वापर करू लागल्या. जुन्या रूढींतील बेंगरूळपणा किंवा मागासलेपणा बाजूला सारून नवीन विचार सामाजिक जीवनात पेरण्याला त्यांनीं सुरवात केली

सौ. आनंदीबाई शिर्के यांनीं या पार्श्वभूमीवर आपल्या लेखनाला प्रारंभ केला. आपल्या अनुभवाच्या जोडीला त्यांनीं कालमानाप्रमाणें नवीन विचाराचा स्वीकार केला. वास्तविक त्या तशा जुन्या पिढींतल्याच लेखिका. परंतु त्यांनीं आपलें लेखन मान काळ बदलेल त्याप्रमाणें निर्माण होणाऱ्या विविध प्रसंगावर आधारित असें ठेविलें. त्या कारणानें जुन्या काळचें " शारदाबाईंचें संसारचित्र " त्यांनीं जेवढ्या जिव्हाळ्यानें रेसाटलें, तेवढाच जिव्हाळा अगदीं अलिकडच्या त्यांच्या " कुछ नहीं समझते ! " मध्येंहि आलेला आहे.

"कथाकुंज", " कुंजविकास " (१९३३) " भावनांचे खेळ " "जुईच्या कळ्या" (१९३९) आणि "तृणपुष्पें" ( १९५८ ) हे आनंदीबाईंचे चार कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. या सर्व कथांचे वातावरण प्रौढ आहे. लहान मुलांची धांदल अथवा गडबडीची किंवा थिल्लरपणाची वृत्ति त्यात नाहीं. सारें काहीं सहज-सुलभ आणि शांत आहे. नुसत्या कलाविलासापेक्षा कला आणि जीवन यांच्या सीमारेषा त्यांनीं मोठ्या कुशलतेनें आपल्या कथेंत मिसळलेल्या अशा दाखविल्या आहेत विशेषतः स्त्रीहृदयातील खऱ्याखुऱ्या भावनांचे पडसाद सहृदयतेनें उमटविण्यात त्या बऱ्याच वाकबगार झाल्या आहेत. त्यांच्या लेखणींतून उतरणारी भाषा साधी, सोपी आणि सहजसुलभ आहे त्यांच्या कथेबद्दल लिहिताना " कथा-कुंजा"च्या प्रस्तावनेंत श्री. कोल्हटकर यांनीं म्हटलें आहे कीं—

" त्यांच्या लेखनातील सूक्ष्म अवलोकन, कथानकाची चमत्कृतिपूर्ण व रहस्यमय घडण, उत्तरोत्तर रसोत्कर्ष होत जाण्यास अनुकूल अशी कथाभागाची गुंफण, कथानकाचा व स्वभावाचा विकास पायऱ्या पायऱ्यांनीं झालेला दाखविण्याची कुशल हातोटी, क्षुल्लक दिसणारे पण हृदयस्पर्शी प्रसंग, कथानुरोधानें गोंविलेला बोध, भाषेचा सरळपणा व गांभीर्य इत्यादि गुणांमुळें या कथा चित्ताकर्षक व

वाचनीय झाल्या आहेत इतर कथालेखिकांच्या कथात जें पवित्र व निरागस वातावरण दिसून येतें, तें याहि कथात दिसून येईल "

जुन्या वळणाच्या आणि परभाषेशीं फारसा संबंध न येणाऱ्या स्त्रीची मराठी भाषा अधिक चांगली असते, असें कै या म. जोशी यांनीं अनेकदा बोलून दाखविलें होतें. सौ शिर्के यांची ही मराठी भाषा या कसोटीस चांगली उतरेल असें म्हणावयास हरकत नाहीं त्यांच्या "शारदाबाईंचें संसारचित्र" या कथेमधील पुढील भाग या दृष्टीने पहाण्यासारखा आहे —

" मावशी म्हणाल्या, 'सकाळीं हपिसात उपाशींच जायचं झालं सल्ला चुलीवर चहासुद्धा करता येईना. मग "टी" वर (स्टोव्हवर) करून दिला." मीं म्हटलं, "डब्यातून फराळाचं तरी काढून खायचं" पण नाहीं तिन्हेंगोडाचा अगदीं वटाळा. म्हणून म्हटलं, पिठलभात तरी कर येऊन दोन घास खातील तरी. पण तेवढंसुद्धा तिला धड करवेना. लहान का ती? सासरीं सासू, नाहीं तरी कोणी तरी वडील मनुष्य असल्याशिवाय मुलींना वळण लागत नाहीं म्हणतात तेंच खरें!' एवढें बोलून मावशी दिवाणखान्यात जाऊन बसल्या "

सौ. शिर्के यांच्या कथामधून जुन्या काळच्या कथेप्रमाणें सदुपदेशहि आलेला आहे "टी पार्टी" या कथेत त्यानीं स्त्रियांचा अत्यंत आवडीचा असा जो हळद कुंकवाचा समारंभ, तो स्नेहवर्धनाच्या दृष्टीनें कसा उपयोगी आहे हें दर्शविलें आहे. "बांगड्यावर बहिष्कार" या कथेत कासारणीकडूनच बांगड्या भरवून घ्याव्यात, कासाराकडून त्या भरवून घेण्यात स्त्रीच्या चारित्र्यास धोका असल्याचें दर्शविलें आहे. मात्र हा धोका दर्शवीत असताना एखाद्या पापी मुसल्मानानें जबरदस्तीनें काहीं अतिप्रसंग आणल्यास आपण भ्रष्ट झालो, या समजुतीनें हिंदु स्त्रीनें आत्महत्या करू नये, ही कल्पना येथें अस्पष्टरीत्या मांडली आहे. तिचा व्हावा तसा उत्कट आविष्कार न झाल्यानें मात्र येथें थोडें खटकल्यासारखें होतें शिर्केबाईंची "वटसावित्री"ची कल्पना मात्र अपूर्व आहे असें म्हणावें लागेल आजवरच्या या विषयावरील कथामधून हाच पति जन्मोजन्मीं लाभावा हें रूढीनें चालत आलेलें तत्त्व गोविलें गेलें होतें.

"पत्नीनें आपला पति आजारी असता वटसावित्रीची पूजा करण्यात किंवा वटसावित्रीविषयींचें व्याख्यान ऐकण्यात वेळ न घालविता त्याची सेवा केली, तर ती त्याला यमाच्या पाशातून सोडवून आणू शकेल," हें तत्त्व या गोष्टींत रस परिपोषक प्रसंगाच्या व मार्मिक विधानाच्या कोंदणात बसवून मधुरतेनें सादर केलें आहे

"मुशीलेचा विचार" या कथेत नवऱ्यानें टाकलेल्या बाईच्या दु खाचे पडसाद लेखिकेने उमटविलेले आहेत नवऱ्यानें दुसरी बायको केली व आपणाला सोडून दिलें या कल्पनेचें दु ख होण्यापेक्षा, आपलीं मुलें आपणाकडे कोणत्या

दृष्टीनें पहातील, यावेंच या स्त्रीला येथें कल्पनातीत दुःख होत आहे. त्या स्त्रीचे हेच विचार लेखिकेनें या कथेंत व्यक्त केले आहेत.

वत्सल रस रंगवितांना शिरेंबाईची लेखणी विशेष प्रभावी ठरते असें म्हणावें लागेल. ग्रामीण जीवनाचें दर्शन घडविणारी त्यांची " छोटा जगू " ही कथा या दृष्टीनें अत्यंत सुंदर झालेली आहे. आजी आणि तिचा पोरका नातू यांच्यामधील परस्परावरील प्रेम अत्यत उत्कटतेनें येथें चित्रित झालेलें आहे. त्यामुळें स्त्रीच्या स्वभावाचें वास्तव दर्शन येथें घडल्याविना रहात नाहीं. विशेषतः " आई ग, तूं मला फसवतेस ! तूं नाहीं जा माझी आई. दगू म्हणतो तूं आजी आहेस. अन् दगूची आईपण तसंच म्हणते. मग दगूच्या आईसारखी कुकूं लावणारी माझी आई अन् बाबा कुठं आहेत ? सांग ना ! " असें हट्टाला पेटून रडत रडत विचारणारा जगू आणि " सगळ्यांना निर्दाळून बसला... " " दळभद्री मेला " असें एकसारखें त्याला म्हणणारी त्याची आजी त्याचे हे प्रश्न ऐकताच किती भांबावून जाते, तिच्या हृदयाच्या कशा चिंधड्या उडतात, या संबंधींचें हें हृदयस्पर्शी लिखाण अत्यंत परिणामकारक झालेलें आहे.

"स्त्री " या कथेंत मातृहृदयाची फार सुंदर कल्पना लेखिकेनें मांडलेली आहे. या कथेचें स्वरूप स्वप्नमय आहे. त्यामुळें स्त्री जीवनातील विविध दृश्यांचें दर्शन येथें घडतें.

" बेगम दिल आरा " सारख्या विस्मयकारक प्रीतिकथाहि आनंदीबाईंनीं अतिशय जिव्हाळ्यानें लिहिलेल्या आहेत. त्याची कथा म्हणजे नव्या आणि जुन्या संसाराचें दिग्दर्शन उत्तम रीतीने घडविणारा एक हृदयंगम दुवाच आहे.

o o o

## कृष्णाबाई

स्त्रीशिक्षणाची वाढ झपाट्यानें होत गेली तशा अनेक स्त्रिया पदवीधर होऊं लागल्या. परकीय भाषेंतील वाङ्मय त्यांनीं आपल्या ओळखीचें करून घेण्यास सुरवात केली. विशेषतः इंग्रजी भाषेंतील कथा–कादंबऱ्याचा अभ्यास झाल्यामुळें त्या पद्धतीचें लेखन करण्यास त्यांनीं सुरवात केली. त्यामुळें आपल्याकडील कथेला आपोआपच इंग्रजींमधील कथेचें वळण मिळत गेलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, सुचत गेलें तसें किंवा घडत गेलें तसें न लिहिता, एखाद्या विशिष्ट तंत्राच्या दृष्टीनेंच पण चित्ताकर्षक कथालेखनाचें नवें युग आपल्याकडे सुरू झालें.

" कृष्णाबाई " या पदवीधर लेखिकेनें या नव्या धाटणीचें कथालेखन आपल्या " मानसलहरी " या कथासंग्रहात सुरू केलें. १९३३ सालीं हा कथा-

संग्रह प्रसिद्ध झाला आहे. येथें त्यावेळच्या काळानुसार लेखिकेनें समाजात दिसून येणारें स्त्रीजीवन चित्रित केलेलें दिसून येतें.

भरीव कथानकाची निवड हा "कृष्णाबाईंचा" प्रमुख विशेष होय त्याचप्रमाणें मानसशास्त्राचा आधार घेऊन त्यांनीं आपल्या कथेमधील पात्रांचें स्वभावचित्रणहि केलेलें दिसून येईल.

"आमचे दास" या कथेंत लेखिकेनें समानहक्कानें जगू पहाणाऱ्या एका स्त्रीची कहाणी सांगितलेली आहे आपल्या प्राध्यापक पतीचें घर सोडून त्याच्या इच्छेविरुद्ध पदवीधर होण्याच्या ईर्षेनें ही स्त्री माहेरीं जाते. तिचे वडील सुधारणा वादी असल्यामुळे ती माहेरीं राहून पदवीधरहि होते पण त्या आनंदानें हुरळून जाण्याऐवजीं ती म्हणते "..चार वर्षें आनंदात काढलीं. पण काय असेल तें असो, अलीकडे माझ्या मनाला कसली तरी टोंचणी लागली होती ज्या स्वात ऱ्याच्या व बुद्धिमत्तेच्या अभिमानावर मी बी. ए. झालें, त्याचा आनंद मला दिवसेंदिवस सोडून जाऊं लागला होता बाबांच्या, स्त्री स्वातंत्र्याच्या भोक्त्याच्या, दृष्टीनें मी पतीच्या दास्याला न जुमानता ज्ञानार्जन केलेली बाणेदार स्त्री होतें. पण घराच्या मर्यादा सोडून जगाच्या आखाड्यात पाऊल घातल्यापासूनच माझा दुबळेपणा मला जास्त जाणवत चालला होता."

एका सुशिक्षित स्त्रीच्या मनातील हे आंदोलन लेखिकेनें मोठ्या कौशल्यानें येथें नमूद केलेलें आहे मात्र ह्या घटनेबरोबरच एका रांगत्या मुलाला बघून संसाराकडे धाव घेण्याची व पायाची दासी होण्याची त्याच स्त्रीची मनोवृत्ति जी येथे दाखविली आहे ती तितकीशी स्वाभाविक दिसत नाहीं कारण हेंच दृश्य तिनें गेल्या चार वर्षांच्या काळात अनेकदा पहाणें शक्य होतें मग असें असताना शिक्षणक्रम पुरा झाल्यावरच तिच्या या भावना एकाएकीं एवढ्या प्रकर्षानें कशा उचंबळून येतात हे कळत नाहीं समान हक्काच्या जोडीलाच स्त्रीची गृहिणीपदाची जाणीवहि लेखिकेनें एकत्र दाखविल्यामुळे, तशी अस्वाभाविकता आली असावी असें दिसतें

"वर्षाव" ह्या कथेंत लेखिकेनें सुशिक्षित स्त्रीच्या जीवनाची आणखी एक वेगळी बाजू रंगविली आहे येथें आपल्या अध्ययनातच गढून गेलेली गणित विषयाची एक प्राध्यापिका स्वतःच्या रूपाबद्दल बेफिकीर असलेली अशी लेखिकेनें दाखविली आहे पण ह्याच प्राध्यापिकेला जेव्हा तिच्याच कॉलेजमधील भाषा विषयाचा प्राध्यापक आपल्या बाहुपाशात ओढतो, तेव्हा ती त्यास अजिबात प्रतिकार न करताना दाखविलेली आहे! उलट तिची प्रतिकार शक्ति अजिबात नाहींशी झाल्याचें सांगितलें आहे या प्रसंगामुळे जीवनाचा खरा अर्थ तिला समजतो आणि बाहेरच्या सृष्टींत पावसाच्या वर्षावामुळें येणारा गारवा तिच्या जीवनातहि निर्माण होतो, असा या कथेचा शेवट आहे.

" अनिरुद्ध प्रवाह " हा याच लेखिकेचा दुसरा कथासंग्रह पहिल्या कथा-संग्रहाच्या मानानें बराच श्रेष्ठ ठरेल. या पुस्तकात स्त्रीच्या अंतःकरणामधून होणारा वैशिष्टयपूर्ण भावनाविष्कार पुष्कळसा आढळतो. या पूर्वीच्या संग्रहात लेखिकेचें हें वैशिष्टय ठळकपणें आढळत नाहीं. मनात आलेली भावना निःसंकोच-पणें येथें " सरक्षक " या कथेंत प्रकट झालेली दिसून येते. या ठिकाणीं एका अविवाहित पण एकाकी जीवन घालविणाऱ्या स्त्रीचें स्वभावचित्रण लेखिकेनें फार सुंदर रीतीनें केलेलें आहे.

" पावित्र्य विडंबन " या कथेंत विवाहाचे वेळीं भटजींकडून म्हटल्या जाणाऱ्या मंत्राच्या श्रवणानें पावित्र्य निर्माण होत, ही परंपरेनें रूढ झालेली पावित्र्याची कल्पना लेखिकेनें झुगारून दिली आहे. आपली ही कल्पना मांडताना या कथेची नायिका म्हणते, " ही निष्ठा माझी नाहीं, माझ्यावर ती लादली आहे, संस्कारानीं लादली आहे ! ज्या संस्कारात मी वाढलें, त्या संस्कारानीं सत्याच्या समोर ताठ्ठपणानं उभं राहायला मला शिकवलच नाहीं, डोक्यावर कातडं ओढून स्वतःची फसवणूक करायला शिकवलं .लग्नाच्या वेळीं मला वाटलं आपण त्यागाचं समाधान तरी मिळवू ..कुठला त्याग ! प्रतिकाराचं सामर्थ्य नसलेल्या दुबळ्या जीवानीं निर्माण केलेले शब्दाचे कोटकिल्ले ! पण त्यात माझी तरी काय चूक ? . "

स्त्रीच्या अंतःकरणातील एखादी विशिष्ट भावना कृष्णाबाईंनीं अशा रीतीनें अतिशय सहृदयतेनें मांडलेली आहे. त्यामुळें या कथामधील भाषाहि चटकदार झालेली आहे

# विभावरी शिरूरकर

१९३४च्या ऑक्टोबरात "कळ्याचे निःश्वास" हें पुस्तक प्रकाशित झालें; आणि एखादी अवर्णनीय अशी अद्भुतरम्य गोष्ट घडून तिजविषयीं कुतूहल निर्माण व्हावें, त्याप्रमाणें मराठीच्या साहित्यमंडळात या पुस्तकाबद्दल कुतूहल निर्माण झालें " विभावरी शिरूरकर " ह्या लेखिकेच्या टोपण नावानेंच समाजाला पहिला धक्का दिला ! आणि या पुस्तकातील सडेतोड आणि निर्भय विचारसरणीनें समाजाला दुसरा धक्का दिला ! कारण आजवर स्त्रीनें जें जें लिहिलें होतें, तें ते आजवरच्या संस्कारानीं मनाभोंवतीं निर्माण केलेल्या बंधनाना झुगारून न देता लिहिलें होतें. चारचौघात बोलले तर स्त्रीस्वभावाला सहन शोभून दिसेल अशाच कल्पना स्त्रियानीं आपल्या लेखनातून रंगविल्या होत्या, त्यामुळें स्त्रीच्या भावनाची व्हावी तशी उकल या कल्पनामधून झालेली नव्हती ! आणि पुरुषवर्गानें स्त्रीचें

जें चित्र रंगविलें होतें, तें परकाया प्रवेश करून लिहिलेलें असल्यामुळें, याची तशी स्वाभाविकता त्याहि भावनाना आलेली नव्हतीच ! त्यामुळें विभावरीचें पुस्तक वाचून होताक्षणींच वाचणाराच्या मनाला जबरदस्त धक्का बसला! सारें कांहीं जगावेगळे घडत आहे, अशीच जणु सर्वांची समजूत झाली आणि मराठी साहि त्याच्या प्रांतात एक प्रकारची जबरदस्त अशी खळबळच उडून गेली.

अनुभूतीचा स्पर्श झाल्याशिवाय चित्तवृत्ति उत्कटत्वानें थराऊन सोडणारें ललितवाङ्मय कधींहि पैदा होत नाहीं त्या दृष्टीनेंहि प्रौढ कुमारिकेला परिस्थिती नुसार सोसाव्या लागणाऱ्या अनेक प्रकारच्या यातना " कळ्यांच्या नि श्वासानीं " प्रतिध्वनित केल्यामुळें या पुस्तकाची किंमत मोठी आहे. ललित साहित्याला लागणारा गाभा येथें अतिशय उत्कृष्ट रीतीनें वापरलेला दिसून येईल आणि हेंच या पुस्तकाचें खरें वैशिष्ट्य.

" विभावरी शिरूरकर " हे नाव एखाद्या स्त्रीचेंच आहे कीं, या नावामागें बुरखा घेतलेला कुणी पुरुष आहे, अशी दाट शंका या पुस्तकाबद्दल कित्येकांनीं व्यक्त केली होती इतक्या मोकळ्या मनानें एखादी बाई लिहिणेंच शक्य नाहीं अशी या लोकांची समजूत ! पण अगदीं अलिकडे हा भ्रमाचा भोपळा फुटला आणि विभावरी शिरूरकर म्हणजेच सौ. मालती बेडेकर ( बाळूताई खरे ) असे खुद्द लेखिकेनेंच जाहीर केलें ! ! अर्थात् त्यामुळें एका स्त्रीची कलाकृति म्हणून या पुस्तकाकडे पहावयाचा मार्ग आपोआपच खुला झाला

विभावरींच्या या पुस्तकाबद्दल अनेकांनीं आपापलीं मतें त्यावेळीं प्रकट केलेलीं आहेत. त्यांच्या या कथाची घडण उकलून दाखवितांना साहित्यसम्राट कै. तात्यासाहेब केळकर म्हणतात, " चिनी कंदिलाप्रमाणें या लेखिकेनें मनाच्या अनेक घड्या आपल्या नाजूक लेखणीनें उकलून त्यांतील भावना स्पष्टपणें दाखविलेल्या आहेत "*

१९३४ सालीं मुंबईच्या मराठी ग्रंथसंग्रहालयात भाषण करतेवेळीं श्री मामा साहेब वरेरकर यांनीं या पुस्तकासंबंधीं म्हटलें आहे कीं, " स्त्रियांच्या मनोभावना ह्या पुस्तकात आहेत त्या भावना पुरुषांस सांगता येणार नाहींत. महाराष्ट्रांतील बड्या बड्या लेखकांस आजपर्यंत रेखाटतां आले नाहींत, असे अनेक विषय या पुस्तकात आलेले आहेत

या पुस्तकास लिहिलेल्या प्रस्तावात डॉ. श्री व्यं. केतकर यांनीं म्हटलें आहे कीं—

" स्त्री आणि पुरुष यांच्यामध्यें जो जातिल भेद आहे, त्यामुळें पुरुषांना स्त्रियांचें मन केवळ आपल्या मनावरून तर्क काढीत गेल्यानें समजणार नाहीं.

---

* विभावरीचे टीकाकार.

स्त्रियांचें मन समजावून देण्यास स्त्रियाच पाहिजेत...प्रस्तुत संग्रहांत आलेली लेखिकेची प्रत्येक गोष्ट स्त्रीस्वभाव परिचयाच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे."

या सर्व अभिप्रायांवरून एकच प्रमुख गोष्ट नजरेसमोर येते आणि ती म्हणजे या पुस्तकांत स्त्रीहृदयाचा अत्यंत वास्तव असा आविष्कार झालेला आहे ही होय. त्या दृष्टीनेंच या कथांचें मोल मापावयास हवें.

"कळ्यांचे निःश्वास" या कथेंत लेकिकेनें आपल्या या लेखनाची पार्श्वभूमि रंगविलेली आहे. आपल्या भावनाशील हृदयाचें चित्रण करतांना लेखिका म्हणते—

"सुकलेल्या कळ्या! त्यांना पाण्यांत थिजत घालून मी मोठ्या आशेनें *त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलें. माझा नित्याचा हा क्रम असे.* सहानुभूतीचा सुखमय स्पर्श झाला म्हणजे अंग थरारतें. त्याप्रमाणें शीतल जीवनानें होरपळलेल्या त्या कळ्यांना किंचित् टवटवी येत असे. त्यांचीं कोमेजलेलीं तोंडें पाहून मला अगदीं गहिंवर येई. नेत्रांतील अश्रू कळ्यांना भिजवून पाण्यांत मिसळून जात...

....दुःखानें वेधून ज्यांना मुक्याच बनवल्या, अशा कळ्या कुठल्या दिवसभर बोलणार? त्यांचीं दुःखे त्यांच्या चेहेऱ्यावर मुद्रित झालेलीं असतात. त्यांच्याकडे पाहून माझ्या पोटांत कालवाकालव होते. वाटतं, मुक्या दुःखानें या कळ्या कायमच्या करपतील. त्यांनीं एक तरी अश्रू गाळावा, एक तरी शब्द बोलावा.

...पण हें पहा! मी पाण्यांत टाकलेल्या या कळ्या निःश्वास टाकूं लागल्या! तुम्हांला नाहीं एकायला येत? अगबाई, त्या बोलायला पण लागल्या!!"

तरुण स्त्रीच्या आशा आकांक्षांचा झालेला भंग येथें प्रत्येक कथेंत लेखिकेनें सहृदयतेनें व्यक्त केलेला आहे.

"बाबांचा संसार माझा कसा होणार?" ही कथा वस्तुस्थितीचें एक उत्कट चित्र आहे. प्रत्येक स्त्रीला स्वतःचा संसार प्रिय असतो. पण लग्नापूर्वी जेव्हां ती माहेरीं असते तेव्हां तिला आपल्या वडिलांचा संसार हा आपला वाटत नाहीं. पण तिला तसें वाटावें असें तिच्या आई वडिलांना वाटत असतें! ही कल्पना आणि त्यामुळें दोन पिढ्यांच्या मनोवृत्तींत चालणारा संघर्ष दाखवितांना लेखिका म्हणते, "हे त्यांना कळत नाहीं म्हणूनच मला कधीं कधीं वाटतं कीं, आईबापाचें प्रेमहि व्यापारी प्रेम असतं. मुलांकडून मोबदला न मिळाला तर तें प्रेमाचें नाणेंहि *खणखणीत वाजत नाहीं. मग त्याला हवं तर व्यवहार म्हणा;* पण त्या मोबदल्याकरितां मन थोडेंतर विकृत होईलच होईल. माझ्या भवितव्याचा विचार करूं लागलें कीं, बाबा मला स्वार्थी म्हणतात, पण त्यांच्या संसाराकरितां कां होईना, माझ्या भावना झुगारून देणारे बाबासुद्धां त्याच दोषांचे मालक होत नाहींत काय?"

अशा प्रकारें या कथेंत दारिद्र्यामुळें मिळवत्या मुलीच्या विवाहाच्या आड तिचा बापच कसा येतो व त्यामुळें तिच्या अंतःकरणाची कशी लाही लाही होत जाते, याचें दारुण चित्र लेखिकेनें अतिशय सहृदयतेनें रेखाटलें आहे.

" अंतःकरणाचे रत्नदीप " या कथेंत एका कुरूप मुलीच्या द्वारें आंतरजातीय विवाहाचा प्रश्न सांगोपांगरीत्या सोडविण्याचा लेखिकेनें प्रयत्न केला आहे. ही मुलगी स्वतःच्या भावना प्रकट करताना म्हणते,

" नसेल माझ्या ठिकाणीं रूप, पण अंतःकरणाचा पवित्र दीप तर आहे ना ? माझ्या नेत्रांच्या पुष्करणींत अंतःकरणाचें कांहींच आकर्षक प्रतिबिंब पडणार नाहीं का ? तें पाहून ज्याचें अंतःश्चक्षू माझ्याकडे येतील, त्यालाच मी पत्करीन. माझ्या अंतःकरणाच्या दीपाच्या उजेडात, ज्याला आपल्या आयुष्याचा मार्ग स्वच्छ व स्पष्ट दिसेल त्यानेंच मला पत्करावें. ज्याच्या अंतःकरणाचे नेत्र मला खेंचतील, त्यालाच मी ' माझा ' म्हणेन. "

विभावरीबाईंनीं तरुण स्त्रीच्या मनाचे असे कितीतरी धागे हळुवार मनानें उकलून दाखविलेले आहेत. त्यांच्या कथा मनोविश्लेषणाच्या दृष्टीनें फारच उत्तम झालेल्या आहेत. या कथांची भाषा चटकदार असून विषय प्रतिपादनातहि नाविन्य आहे. सोप्या आणि सुटसुटीत शब्दरचनेमुळें भाषेला येणारें मार्दव येथें अनेकदा आढळतें.

उपमादृष्टान्तांचा लेखिकेनें जो वापर केलेला आहे तो देखील तिचें वैशिष्ट्य ठळकपणें नजरेत भरविणारा आहे. उदाहरणार्थ—" न कळत धक्का लागून रुईचें बोंड फुटावें व आंतील कापूस भरभर उकलून बाहेर यावा, तशी त्याच्या या प्रश्नानें माझ्या मनाची अवस्था झाली. "

विभावरीचें हें वाङ्मय म्हणजे स्त्रीच्या बंडखोर मनानें जगाला निर्भयपणें केलेलें एक अभिनव आव्हानच होय.

● ○ ▫

## सौ. कमलाबाई टिळक

उच्च प्रकारचें महाविद्यालयीन शिक्षण घेतल्यानंतर परभाषेंतील वाङ्मयाचा अभ्यास माणसाच्या हातुन स्वाभाविकपणेंच घडतो. शिवाय या अभ्यासामुळें परक्या संस्कृतीची व परदेशांतील लेखन पद्धतीचीहि त्यास ओळख होते. त्यामुळें अशा माणसाच्या लेखनावरहि कळत वा नकळत त्याचा बरावाईट परिणाम होतो. आपलें लेखन शक्यतोंवर रेखीव करण्यासाठीं त्याची धडपड चालू रहाते. सौ. कमलाबाई टिळक या लेखिका याच प्रकारच्या माणसांत मोडतात.

रचनेचा रेखीवपणा हा आधुनिक लघुकथेचा एक प्रमुख विशेष मानला जातो. त्या कारणानें सुप्रसिद्ध आग्ल लेखक श्री. गॅल्सवर्दी यानीं आधुनिक लघुकथेला एखाद्या कोळ्यानें विणलेल्या नाजूक पण आकर्षक जाळ्याची मोठी सार्थ उपमा दिली आहे. ‡ आजकालच्या लघुकथेत केवळ बौद्धिक चमत्कृतीच्या बळावर हें जाळें कोणी विणू म्हणेल तर तें त्यास जमणार नाहीं. कारण त्यासाठीं बुद्धिमत्तेबरोबरच उत्कट अशा भावनात्मक अनुभूतीचीहि अत्यत आवश्यकता असते शिवाय या कथेसाठीं बाह्यागापेक्षा मानसिक आदोलनें दर्शविणाऱ्या अतरगाची व प्रसग लेखनापेक्षा स्वभावलेखनाची अधिक गरज असते त्याखेरीज मानवी जीवनात येणाऱ्या आकस्मिक घटनांच्यापेक्षा इथें चिरकाल टिकणारी सहृदयता विशेष मोलाची असते. आणखी मुख्य म्हणजे ही लघुकथा लिहिण्याची जाणीव लेखकाला विशेष प्रकर्षानें झाली पाहिजे.

सौ. कमलाबाई टिळक यानीं लिहिलेल्या लघुकथा ह्या आधुनिक लघुकथेच्या कसोटीला उतरतील इतक्या रेखीव झालेल्या आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं आपल्या कथेला त्यानीं अगदीं साधें, सरळ आणि बाळबोध थाटाचें वळण दिलेलें आहे. त्याच्या कथेचें एकदर स्वरूप अगदीं स्वाभाविक आहे. त्यात कसलीहि ओढाताण आढळावयाची नाहीं.

दिवसेंदिवस स्त्रिया कथालेखनाश विशेष प्रवृत्त झालेल्या बघून कै. वा. म. जोशी यानीं म्हटलें आहे —

" लघुकथा लेखिकाच्या लघुकथा वाचून माझ्या मनाला मीं असा प्रश्न केला कीं, " इतर बाबतींत काहींहि असो लघुकथाच्या बाबतींत तरी स्त्रियाची कामगिरी पुरुषाच्या कामगिरीच्या जोडीला नःशरमता ठरविता येण्याजोगी किंबहुना " काकणभर अधिकच " आहे किंवा नाहीं ? " आणि या प्रश्नाचें प्राजलपणें मनाला उत्तर द्यावें लागलें, " होय " आहे यात शकाच नाहीं " * आणि कमलाबाईच्या कथा वाचून तर त्यानीं स्पष्टच म्हटलें आहे कीं, " लहान मुलींची व बायकाची वर्णनें तर बायकानींच करावींत असें वाटू लागलें आहे .." तिच्या कानातील सोन्याच्या बेडौल बुगड्या चागल्या झाकल्या जातील अशा बेतानें मीं तिचीं कर्णाग्रें केसानीं झाकून टाकलीं " ‡अशा प्रकारची अनुभवप्रेरित वाक्ये पुरुषाच्या वर्णनात कशीं येणार ? "

‡ As the untaught spider spins his delicate rose-window and assures it against wind and rain by sheer adjustment-not a thread too many or too few--so let us writers try to spin out the round and threaded marvel ( Caravan )

* प्रस्तावना – हृदयशारदा. ‡ हृदयशारदा – नजर पा. ६

कमलाबाईंच्या अनेक कथामधून स्त्रीस्वभावाची वैशिष्ट्यें पहावयास मिळतील. वास्तविक त्यांनी उच्च शिक्षण घेतलेलें आहे. तेंव्हा खरें म्हणजे परभाषेंतील कथाच्या वाचनानें त्यांच्या कथावर परकीय सस्कृतीची किंवा लेखनाच्या घाटणीची छाप पडणें स्वाभाविक होतें. परतु तसें घडलें नाहीं, हे विशेष होय. हिंदु सस्कृतीचे सस्कार परपरेनें मनावर घडत गेलेली एक स्त्री या नात्यानेंच त्यांनी आपल्या कथा लिहिल्या दिसतात.

" नजर " या कथेमध्यें स्त्रीहृदयातील वात्सल्याचा झालेला आविष्कार अप्रतिम आहे. स्त्री सुशिक्षित असो कीं अशिक्षित असो आपल्या तान्हुल्याला कुणाची दृष्ट होऊ नये असे तिला अत करणापासून वाटत असत

कमलाबाईंचा "आकाशगगा" हा १९४४ मध्यें प्रसिद्ध झालेला कथासग्रह पूर्वीच्या त्यांच्या कथा लेखनाइतकाच चटकदार झालेला आहे या सग्रहात पूर्वीपेक्षा विषयाची विविधता भरपूर आहे. त्याचप्रमाणें वास्तवतेचें प्रमाणहि अधिक आहे.

" पूर्वस्मृति " ही कथा अतिशय नाविन्यपूर्ण असून हृदय थरारून सोडणारी आहे. मृत्युशय्येवर पडलेल्या म्हातारीच्या आपल्या बाळपणापासूनच्या आठवणीच्या स्मृति येथें मोठ्या खुबीनें एकत्र आणलेल्या आहेत. भाषेचा सहज सुलभ वापर या कथेंत अत्यत कौशल्यानें झाला असून भावनावश स्त्रीनें कुणाशीं तरी हितगुज करावें इतकें हें स्वभावचित्र जिवत झालेले आहे

मध्यमवर्गाबरोबरच बहुजनसमाजातील कथाविषयहि लेखिकेनें तितक्याच जिव्हाळ्यानें हाताळलेले आहेत. " शाति " या कथेंत शातीची सासरीं जाताना उडालेली गडबड या सदर्भात अवश्य पाहता येईल.

कमलाबाईंची भाषा साधी, सरळ आणि आकर्षक आहे. त्या भाषेंत एक प्रकारचा जिव्हाळा आहे. त्यांच्या कथेत ' लुगडें पालटणे " व " छोटेसें खपरेल " इत्यादि प्रादेशिक थाटाचे अधून मधून आलेले वाक्प्रचारहि मनोरम असून योग्य जागीं पडलेले आहेत. मात्र " हा फोटो माझ्या सपत्नीचा होता " ( पान ८० ) अशी सस्कृत प्रचुर शब्दाची पेरणी मधून मधून क्वचित् प्रसगीं कमलाबाईंनी केल्यामुळें त्यांच्या भाषेला काहींशी कृत्रिमतेची झाक आलेली आहे. परतु असलीं वाक्यें फार थोडीं असल्यामुळें त्यांचा हा दोष सहज डोळ्याआड होण्यासारखा आहे. मनोविश्लेषणाची कला मात्र त्याना उत्तम साधलेली आहे.

o o •

# कु. पिरोज आनंदकर

स्त्रीजीवनातील गुणदोष निर्भयपण सागणाऱ्या लेखिका म्हणून पिरोज आनदकर याचा लौकिक आहे. सख्येच्या मानानें त्याचा कथाप्रपंच अगदींच

छोटासा दिसेल पण त्या लहानशा पसाऱ्यातच त्यांनी आपल्या कथेला एक विशिष्ट ध्येय नजरेसमोर ठेवून वागायला प्रवृत्त केली आहे त्याचप्रमाणें आपल्या कथेसाठीं त्यांनी विषयालाहि बरेंच मोठें क्षेत्र मोकळें ठेविलेलें दिसतें लघुकथेला कोणताहि विषय चालतो "रोमांचकारक घटनापासून त्याच्या त्यालासुद्धा स्पष्टपणें न कळणाऱ्या संवेदनापर्यंत सर्व अनुभूतींतून लघुकथा निर्माण होऊ शकते" असें बेन्स् म्हणतो तेंहि याच दृष्टीनें +

"फुलमाळीण"° या कथेंत पिरोजबाईंनीं द्वितीय विवाहाचा प्रश्न चर्चिलेला आहे नवऱ्यानें सोडून दिलेली निरपराधी राधा स्वत चें पोट भरण्या साठीं फुलमाळिणीचा धंदा पत्करते पण दुर्दैवानें याच धंद्यामुळें ती न कळत आपल्या सवतीशीं–पद्मेशीं–मोठ्या आपुलकीनें वागते. रोजरोज तिला ताजी वेणी आणून देण्यात तिला आनद होतो परतु काहीं दिवसानीं पद्माला राधा म्हणजे *आपली सवत आहे असें जेव्हा समजतें, तेव्हा ती आपल्या पतीविरुद्ध बंड पुकारण्यास* तयार होते. त्यामुळें ती आपल्या नवऱ्याला स्पष्ट विचारते, "आपल्या पत्नीच्या ससाराची चिता धाड्धाड् जळत असताना इतक्या स्वस्थ चित्तानें माझ्याबरोबर ससार तरी कसा करवला? का साऱ्याच पुरुषांचीं मन पाषाणाचीं बनविलेलीं आहेत?" पण राधेला जेव्हा पद्मेचें आणि तिचें नाते समजतें तेव्हा पदर पसरून पोटात अपराध घालण्याची मनाची तयारी करून ती पद्मेला कळवळून म्हणते, "ताई, त्याची माझी दृष्टिभेट घडवून द्याल? एका स्त्रीला तिच हरवलेल धन मिळवून देण्याच पुण्य तुमच्या पदरात पडेल! तुम्हीहि एक स्त्रीच आहात "

पिरोजबाईंची ही कथा खरोखर विचार करण्यासारखी आहे स्त्री–जीवनाकड किती वेगवेगळ्या दृष्टिकोनातून त्या बघू शकतात याचेंच हें द्योतक नव्हे का?

"१५ मे" सारख्या प्रीतिकथाहि लेखिकेनें लिहिलेल्या आहेत या कथामधील प्रणय अप्रतिम आहे यात वाद नाहीं. योगायोगानें एकत्र येणारे सुरेंद्र व मदाकिनी कसे विवाहबद्ध होतात याची सुदर खुलावट लेखिकेनें येथें केलेली आहे. तथापि "माझ सुखस्वप्न"* या कथेंत येणारा प्रीतिरसाचा ध्येयवादी आविष्कार यापेक्षा कितीतरी सरस आहे यात वाद नाहीं. योगायोगानें जमणाऱ्या प्रीतीपेक्षा स्त्री ही पराक्रमाला प्रीतिमाळ अर्पण करते हा या कथेचा गाभाच मुळात आकर्षक आहे या कथेची नायिका मालती हिला मनोहर हवा असतो. पण त्यासाठीं त्यानें काहीं पराक्रम करून वीराचें जीवन जगावें, अशी तिची उत्कट

---

+ Modern Short Story – Page 15

° रशना (कथासग्रह)

* स्त्री, नोव्हेंबर १९४८

इच्छा असते. त्याबद्दल ती त्याला तसें वजावतेहि. त्यामुळें मनोहर तिचें प्रेम जिंकण्यासाठीं मोठ्या दिव्यातून पार पडतो. त्यावेळीं मालती म्हणते, "त्याच्याकडे पाहताना मला अभिमान वाटत होता. देशाच्या आकांक्षा अल्प काळात सफल करणारा हाच तो माझा मनोहर ! आणि मी त्याची पत्नी हेंच माझं मुस्वप्न आता प्रत्यक्षांत उतरलं होतं !"

स्वतंत्र भारतातील सुशिक्षित व जाणत्या स्त्रीनें काढलेले उद्गार खरोखरच महत्त्वाचे आहेत. स्वतःच्या अपेक्षा आणि त्याहि पतीच्या निवडीच्या वेळीं प्रकट झालेल्या, निर्भयपणें बोलून दाखविण्याचें स्त्रीमध्यें आलेलें धैर्य पिरोजबाईंनीं या कथेंत मोठ्या कौशल्यानें खुलविलें आहे यात वाद नाहीं.

स्त्रीजीवनाकडे अतिशय जिव्हाळ्याने पहावयाचे आणि स्त्रीच्या सर्व भावना मोकळेपणाने मांडावयाच्या हें पिरोजबाईंचें व त्यांच्या कथाचें प्रमुख वैशिष्ट्य आहे. त्यांची भाषा सफाईदार आहे व विचाराची मांडणीहि ठसठशीत आहे. स्त्रीजीवनाप्रमाणेंच पुरुषाच्या जीवनाकडेहि लेखिकेनें सहृदयतेनें पाहिलें आहे, हें त्यांच्या "बोलका चित्रपट" या कथेवरून दिसून येईल.

● ● ●

## सौ. कुसुमावती देशपांडे

मराठी लघुकथा बाळसेदार व्हायला लागली तेव्हा अनेक स्त्री-पुरुष लेखकांनीं तिच्या विकासासाठीं अविश्रांत श्रम घेतले. विकासाबरोबरच तिला कांहीं स्थैर्य प्राप्त व्हावें यासाठींहि त्यानीं जिवापाड मेहनत घेतली. आणि हें सर्व करीत असताना या मंडळींनीं केवळ कथा-लेखनच केलें नाहीं तर लघुकथेबद्दल आपले विचार प्रकट करणारें टीकालेखनहि केलें. त्यासाठीं मराठींतील लेखकाचा व लघुकथाचा आढावा त्यानीं घेतला. त्यावेळीं प्रत्येक कथाकाराचा प्रामाणिकपणें विचार झालाच असें मात्र घडलें नाहीं. व्यक्ति तितक्या प्रकृति या न्यायानें ज्याला जें आवडेल तें त्यानें निवडलें व त्यासंबंधीं बोलून दाखविलें. त्यामुळें यापैकीं कांहीं लेखकानीं कथाकाराची व टीकाकाराची अशी दुहेरी भूमिका पार पाडली.

प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे या अशाच प्रकारच्या एक लेखिका आहेत. महाविद्यालयीन शिक्षण घेऊन त्यानीं महाविद्यालयात अध्यापनाचें काम केलें आहे. त्या कारणानें त्यांचा अभ्यास विशेष झाला. वाचन विस्तृत झालें. मनन व चिंतनहि त्यामुळें घडलें. त्या कारणानें त्यांच्या लिखाणाला एक प्रकारची निराळी धार आली. आणि मुख्य म्हणजे मराठींतील नामवंत लेखकात त्यांची गणना केली जाईल हें त्यांच्या लेखनाच्या चाहत्यानीं अवश्य पाहिलें. त्या कारणानें त्यांची कथा एकदम उठावदारपणें वाचकांच्यासमोर आली. मराठींतील एक प्रसिद्ध लेखक

श्री. वि. स. खांडेकर यांनीं "साहित्या"च्या ऑगस्ट १९४८ च्या अंकात कुसुमावतींच्या कथाबद्दल लिहिताना म्हटलें कीं,

"कथा विषय निवडताना त्यांचा सहानुभूतीपूर्वक दृष्टिकोन जसा स्पष्टपणें दृष्टीला पडतो तसा त्यांचा विकास होताना त्यांचे कविमन, त्यांचा कलापूर्ण संयम, अनुभूतींकडे आत्मनिष्ठेबरोबर वस्तुनिष्ठेनें पाहण्याची दृष्टि, त्यांची मानवतेवरली श्रद्धा इत्यादींचाहि वाचकाला परिणामकारक प्रत्यय येतो."

"त्यांच्या कथा ह्या जाईजुईच्या फुलासारख्या आहेत. त्या जशा आकारानें लहान आहेत, तसा त्यांचा सुगंधहि सौम्य आहे. त्यांच्या आकर्षणात कुठल्याहि प्रकारची उग्रता नाहीं, भपकारा नाहीं, भडकपणा नाहीं, अतिरेक नाहीं . आपण ज्या दृष्टीनें कविता वाचतों त्या वृत्तीनें त्यांच्या कथा वाचल्या पाहिजेत. तरच त्यांचा रसास्वाद आपणास घेता येईल कवितेंत व्यक्त सौंदर्यापेक्षा सूचित सौंदर्य अधिक असतें. कुसुमावतींच्या कथांचें असेंच आहे ..जीवनातला हरतऱ्हेचा विरोध त्या मोठ्या कुशलतेने टिपून घेतात आणि त्यांची कल्पनाचित्रें अथवा विचारचित्रें जवळजवळ ठेवून त्या त्याला कथारूप देतात "

"दीपकळी", "दीपदान" व "मोळी" हे कुसुमावतींचे तीन कथासंग्रह १९३५ ते १९४७ या कालखंडातील आहेत. प्रत्यक्षातील अनुभवाचें अधिष्ठान त्यांच्या कथेला लाभलेलें असतें, हाच त्यांच्या कथांचा प्रमुख विशेष म्हणता येईल. स्वतःच्या किंवा इतरांच्या सहानुभूतीपूर्व अनुभवाचे धागे वाचकांना उकलून दाखवून व त्यांची कलात्मक मांडणी करून कुसुमावतींनीं आपलें कथेचें मंदिर उभारलें आहे.

काव्यमय वर्णनशैली हें कुसुमावतींच्या कथांचें आणखी एक प्रमुख आकर्षण आहे. सृष्टिसौंदर्याची खुलावट करीत असताना त्यांची लेखणी जणु त्या विशिष्ट वातावरणात धुंदच होऊन जाते, इतकीं हीं वर्णनें चटकदार आहेत.

काव्याच्या थाटानें कथालेखन करूनहि कुसुमावतींनीं सामाजिक तसाच वैयक्तिक जीवनातला हरतऱ्हेचा विरोधदेखील मोठ्या कौशल्यानें आपल्या मनात साठवून कथेच्याद्वारा आविष्कृत केलेला आहे. अशा वेळीं कित्येकदा त्यांची कथा लघुनिबंधाच्या तर कित्येकदा शब्दचित्र व निबंध यांचें मिश्रण झालेल्या कथेंत अवतीर्ण झालेली दिसून येते. "मोळी" मधील "जाभईऽऽ" ही त्यांची कथा या पद्धतीची आहे.

कुसुमावतींच्या आविष्काराच्या या विशिष्ट पद्धतीबरोबरच त्यांच्या मनात वसत असलेली विशालता व सूक्ष्मता आणि चमत्कृति व अनुभूति मोठी कलापूर्ण आहे. "मध्याह्न", "चंद्रास्त" किंवा "मध्यरात्र" हे त्यांचे लघुनिबंध या दृष्टीनें पहाण्यासारखे आहेत.

कुसुमावतींचे हे तीन कथासंग्रह वाचीत असताना बदलत्या काळाप्रमाणे लेखिकेच्या मनोवृत्तींत पडणारा फरक निश्चित दिसून येतो. त्यांच्या कथांमधून होणारा सामाजिक जीवनाचा आविष्कार हा सहजस्फूर्त आहे, "अनुभवाची उत्कटता, तो अनुभव समग्रतया व्यक्त करण्याचें तंत्र, आणि त्यातून होणाऱ्या अभिव्यक्तीचा आनंद हे "दीपकळी"तल्या कथांचे विशेष आहेत. "दीपदानात" स्वतः लेखिका व वाचक ह्यांच्या निराळ्या अस्तित्वाची जाणीवच दिसत नाहीं. कवीच्या मनात जशी कविता सहज स्फुरते, तसाच प्रकार "दीपदाना"तील कथांचा आहे "दीपकळी" दैनंदिन व्यक्तित्वाच्या त्या पातळीवरच्या अनुभवाच्या कोंडीत होती. "दीपदाना"मध्यें त्या व्यक्तित्वाच्या मर्यादा व त्यातील जडता ह्यांचा निर्बंध उरलेला नाहीं. एका सूक्ष्म अनुभूतींतून प्रतिसृष्टि निर्माण झाली आहे.

"मोळी" मध्यें लोकजीवनाविषयीं दृष्टि अभिमुख झाली आहे. हलक्या मानलेल्याच्या जीवनातील प्रामाणिकपणा, धडाडी, हिंमत ह्यांची साक्ष पटली आहे."*

कुसुमावतींची भाषा जशी काव्यात्मक तशीच घरगुती उपमा दृष्टांतानींहि ती आलंकृत झालेली आहे. "उफाळून वर येणाऱ्या दुधावर पाण्याचा हबका दिला म्हणजे तें कसें एकदम खालीं बसतं! पर्वणीच्या आनंदात लगबगून जाणारी ती एवढीशी पोर, आपल्या मोकळ्या डोक्याच्या, घामट चेहेऱ्याच्या जाणिवेन पार हिरमुसून गेली" कुसुमावतींनीं योजिलेली ही कल्पना त्यांच्या ठिकाणी असलेल्या स्त्रीमनाचीच साक्ष देत आहे

"एकटीच", "चिमणी" या कथांतून कुसुमावतींनीं स्त्रीमनातील शल्यें चित्रित केलेलीं आहेत व दलितांच्या बद्दलचा जिव्हाळा सांगितला आहे. या कथांची काव्यात्मक मांडणी व त्यासाठीं वापरलेलें अभिनव तंत्र उठावदार आहे

"अप्सराची भेट 'माऊली' व 'पिसारा' या तीन कथांतून कुसुमावतींनीं स्त्रीजीवनातील तीन अंगांची मांडणी मोठी आकर्षक रीतीनें केलेली आहे. यापैकीं पहिलींत सामाजिक परिस्थितीवर विदारक प्रकाश टाकलेला असून दुसरींत नव्या काळच्या स्त्रीमनाचा पैलू प्रकट केला आहे

कुसुमावतींच्या कथा या अशा प्रकारें वाचनीय आहेत. काव्यात्मक मांडणी, स्त्रीजीवनातील समस्यांचें चिंतन व सामाजिक विषमतेची तीव्रता हे त्यांच्या कथेचे विशेष गुण आहेत तसेंच त्यांच्या कथेंतून सूचित होणारा जीवनविषयक आशावादहि उल्लेखनीय आहे. तरीपण कुसुमावतींच्या कथानीं सामान्य वाचकाचें मन जिंकलेलें नाहीं, हें इथें अवश्य लक्षात घेतलें पाहिजे याचें कारण असें कीं, अनेक

---

* सुलभा पाणंदीकर—साहित्य, कुसुमावतींच्या कथा, आक्टो. १९५९

ठिकाणीं बुद्धीनें भावनेवर केलेली कुरघोडी किंवा काव्यात्मतेतला कठोर संयम सामान्याच्या आवाजात येऊ शकला नाहीं.

०  ०  ०

# सौ. शांताबाई नाशिककर

शांताबाई नाशिककर यांनीं आपल्या कादंबरी लेखनाच्या मानानें कथा-लेखन बरेंच कमी केलेलें आहे. तथापि त्यांनीं ज्या थोड्या फार कथा लिहिलेल्या आहेत, त्यामधून कल्पविलासापेक्षा जीवनदर्शन घडविण्याचा विशेष प्रयत्न केलेला आहे. स्त्री आपल्या जीवनाबद्दल अलीकडे विशेष विचार करूं लागली आहे, असें शांताबाईंच्या कथावरून म्हणता येईल.

"काळसर्पाचा विळखा" या कथेंत एखाद्या सर्वसामान्य स्त्रीला स्वतःच्या प्राणाहून प्रिय वाटणाऱ्या मंगलसूत्रास लेखिकेनें काळसर्पाचा विळखा असें संबोधिलें आहे! येथें अनुताई व डॉक्टर यांच्या प्रेमभंगाची गोष्ट सांगितलेली असून घटस्फोटाच्या प्रश्नाकडे कांहींशी वेगळ्या रीतीनें पाहिलें आहे. "बनविलेली बाहुली" या कथेंत नवऱ्याच्या प्रतिष्ठेवरून आणि पैशावरून बायकोची किंमत जग ओळखतें, म्हणजे अशा वेळीं पुरुष आपल्या बायकोच्या आयुष्याशीं खेळतो असें स्पष्टपणें नमूद केलेलें आहे. "प्राणदान" या कथेंत स्त्रीच्या ठायीं निसर्गतःच वसत असलेल्या त्यागाची कल्पना फारच विस्मयकारक अशा घटनेनें दिलेली आहे. स्वतःचा नवरा घरात आजारी असताना केवळ कर्तव्य म्हणून डॉक्टराच्या भूमिकेवरून उर्मिलाबाई दवाखान्यातील रोगी वाचविण्याची पराकाष्ठा करतात. त्यामुळें पतीकडे त्यांचें स्वाभाविकच दुर्लक्ष होतें! त्याचा परिणाम म्हणून विधवेचें जीवन त्यांच्या वाट्याला येतें! यावेळीं उर्मिलाबाई म्हणतात, "माझ्या सुखाची होळी झाली, पण गणूच्या कुटुंबात तरी आनंदाची वृष्टि झाली ना?" स्वार्थत्यागाचें केवढें अप्रतिम समाधान येथें प्रकट झालें आहे!

०  ०  ०

# आनंदीबाई जयवंत

जुन्या काळच्या कथेचें वैशिष्टय कायम ठेवून आजच्या बदलत्या काळात कथालेखन करणारी जी अनेक लेखक मंडळी सापडतात, त्यांच्यापैकींच आनंदीबाई जयवंत याहि एक लेखिका होत.

"पारव्या" आणि "मेघयन्ती" हे आनंदीबाईंचे दोन कथासंग्रह

आहेत. त्यांच्या लेखनाचा काल बराच मागचा आहे. तरीपण या संग्रहातील कथांनीं त्यांची चांगली ओळख मराठी रसिकांना करून दिलेली आहे.

आनंदीबाईंची कथा ही तशी साधी पण मनाची मोकळी आहे. वैवाहिक जीवनातील अनेक प्रमेयें तिनें मोठ्या परिणामकारक रीतीनें वाचकाच्या समोर मांडलीं असून त्यांच्या विचारांना चालना देण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्याच प्रमाणें जीवनाचें अवगाहन करून त्यातलीं सूक्ष्म सत्यें शोधून काढणाऱ्या लेखकाच्या दृष्टीबरोबरच तीं सत्यें थोड्याच परंतु परिणामकारक रेघांनीं रेखाटणारी चित्रकाराची कलाहि आनंदीबाईंच्या कथेला साधली आहे त्यांच्या कथेंतील निरनिराळीं पात्रें रेखीव तशींच मनोज्ञ असून जिवंतहि आहेत. त्यांची वाणी रसाळ तशीच सुबोध व जिव्हाळ्यानें माखलेली आहे. सहृदयता व सहजता हा आनंदीबाईंच्या लेखनाचा प्रमुख विशेष होय.

आनंदीबाईंनीं आपल्या कथेंतून प्रकट केलेली "*मालती, मंजू, सुमित्रा, विद्या व इंदिरा*" हीं स्वभावचित्रें स्त्रीजीवनातील विविध रूपांचा आविष्कार करणारीं आहेत. त्यांच्यामुळें लेखिकेच्या मनुष्य स्वभावाच्या सखोल अभ्यासाची व त्या गहन स्वभावातील सूक्ष्म धागेदोरे हळुवारपणें उकलून दाखविण्याच्या कौशल्याची वाचकांना चांगलीच कल्पना येते.

o o o

## सौ. कमलाबाई बंबेवाले

बदलत्या कालानुसार स्त्रीच्या मनात डोकावणारी ध्येयनिष्ठा सौ. कमला बंबेवाले यांनींहि आपल्या कथांमधून रंगविलेली आहे आपल्या आयुष्याचा जोडीदार निवडतांना पौराणिक काळातील राजकुमारींचा आदर्श त्यांच्या डोळ्यासमोर असावा, असें त्यांच्या "अपमान कीं उन्मान" + या कथेवरून दिसून येईल. या कथेंत लेखिकेनें एका शूर वैमानिकाची प्रीतिकथा रंगविलेली आहे. मोहिनी नावाच्या एका उद्दाम पण सौंदर्यशालिनी तरुणीच्या प्रीतिला जिंकण्यासाठीं जयसिंगानें पत्करलेल्या अग्निदिव्याची ही चित्ताकर्षक कथा आहे. कॉलेजमध्यें असतांना क्रिकेटच्या सामन्यात विजयी झालेल्या जयसिंगाचा मोहिनीनें सन्मान करण्याचें नाकारलें, ही गोष्ट त्याला फार अपमानकारक वाटत असते. त्यामुळें एका क्षणापूर्वीं "जवळच एका टेबलावर गौरवाच्या व कृतज्ञतेच्या तारांचा आणि पत्रांचा ढीग पडला होता! प्रात:काळचीं सुंदर सोनेरी किरणें हीं जणु आमच्या वीराचें अभिनंदन करण्याकरिता त्याच्या खोलींतून डोकावून आत शिरत होतीं."

---

+ कमलाच्या पाकळ्या.

अशा अवस्थेत असलेला जयसिंग सेविकेनें दूध पाजल्यावर कृतज्ञतेनें तिला म्हणतो, लेडी जेसमिन् मी आपले किती आभार मानू !—पण खरच, आपण मला जग-विण्याकरिता एवढे श्रम का बरें घेता ? मीं आपल्याला सांगितलं कीं, मला मुळींच जगायच नाहीं " पण त्यानतर लगेच " हिंदी पुरुषोत्तमाला मोहि-नीचे शतश धन्यवाद मान्य असोत ! बाबा म्हणतात कीं, व्हिक्टोरिया क्रॉस तीन पिढ्याना विभूषित करितो. उद्दाम मोहिनी असल्या सन्मानाला पात्र होईल काय ? " ही केवळ वाचताच तो आनदानें बेहोष होत असल्याचें चित्र लेखिकेनें रेखाटलेलें आहे. स्त्री ही पराक्रमावर प्रेम करते हें तत्त्व पिरोजबाई आनदकरा प्रमाणेंच कमलाबाईनींहि मोठ्या कौशल्यानें येथें माडून दाखविलें आहे.

" अठरा धान्याची कडबोळीं " या कथेंत लेखिकेनें विवाहित स्त्रीनें आपल्या पतीशीं समरस होऊन ससार करणें किती इष्ट आहे हें चागलें दाखविलें आहे, समाजसेवा अगिकारीत असतानाच घरच्या मुलाबाळाची व पतीची सेवा अगोदर होणें इष्ट आहे हा कथाभाग येथें आलेला आहे.

ससारात पति आणि पत्नी याच्यामध्यें तडजोड असणें किती आवश्यक आहे हें या लेखिकेनें विविध प्रसगानीं परिणामकारक रीतीनें रगविलेलें आहे. स्त्रीच्या मनाची ही एक अगदीं वेगळी बाजू आहे. घरगुती वातावरणाचा सुदर उपयोग करून लेखिकेनें आपलें हें विशिष्ट मनोगत उत्तम प्रकारें प्रकट केलेलें दिसून येतें.

• • •

## सौ. मालतीबाई दांडेकर

सौ. मालतीबाई दाडेकर यानीं " विसाव्याचे क्षण ", " कथामालती ", " मी तुझीच का ? ", " प्रतिमा ", " चद्रज्योति ", " विवाहानतर ", " आशाकुर " या कथासग्रहामधून अनेक कथा लिहिलेल्या आहेत. १९३५ ते १९५० या कालखडातील त्याचें हें लेखन आहे.

मालतीबाईंच्या कथामधील प्रसग नित्य परिचयाचे असल्यामुळें सर्वसामान्य वाचकाच्याहि ते ओळखीचे असतात त्याच्या बहुतेक सर्व गोष्टींमधून बायकाची दु खे त्यानीं अतिशय तन्मयतेनें ओळखून व जाणून घेऊन सहृदयतेन चित्रित केलेलीं आहेत. त्याची दृष्टि मात्र केवळ मध्यमवर्गापुरतीच मर्यादित असल्यामुळें एकागीपणाचा दोष त्याच्या वाट्याला येणें स्वाभाविक आहे तथापि कै वा. म. जोशी यानीं म्हटल्याप्रमाणें मालतीबाईंची भाषा साधी, सरळ व सुबोध आहे. त्याचप्रमाणें यथार्थ निरीक्षण, सहानुभव, सद्विचार व सद्भावनाचें वातावरण, उचित भाषा पद्धति इत्यादि गुणानीं त्याच्या कथा गुफल्या गेल्या आहेत. स्त्री

जीवनातील विविध प्रश्नावर मालतीबाईंची लेखणी वावरत असून पुरोगामी विचारसरणीचाहि त्यांनीं अवलंब केलेला आहे संख्येच्या मानानें पाहिलें तर त्याच्या कथा इतर लेखिकांच्या मानानें कदाचित् सर्वात जास्त भरतील !

"बाटलींतली फुलं" या कथेंत स्त्रीचें जीवन हें एखाद्या बाटलींतील शोभेच्या फुलासारखें आहे, असें मालतीबाईंनीं दाखविलेलें आहे "रेखा" या गोष्टींत स्त्रीचें खरें सौंदर्य हे सुदृढ शरीरयष्टींत सामावलेलें असून तें नाजुकपणात नव्हे याचें मोठें मार्मिक प्रतिपादन त्यांनीं केलेलें आहे

"अहिल्या" ही कथा एका गणिकेच्या जीवनावर आधारलेली आहे गणिका समजली गेलेली स्त्रीदेखील मनात आणील तर अतिशय तापसी वृत्तीनें राहू शकते ती गाण्यावर जगत असली तरी तिच्यात माणुसकी असते तेव्हा स्त्रीला केवळ ती गणिका आहे म्हणून समाजानं दूर न करता सावरून धरून माणसात येऊ देणारेहि रघुवीरासारखे लोक जगात असतात, अशी एक स्वागतार्ह कल्पना लेखिकेनें मोठ्या हळुवार मनानें येथें चित्रित केली आहे.

मालतीबाईंचीं कथानकें आटोपशीर असलीं, तरी त्यात क्षणिक प्रसंगाची निर्मितीच अधिक आहे असें म्हणावें लागेल त्यामुळें माणसाच्या सुप्त मनाला डिवचून, जागें करून, त्यास विचार करावयास लावणारी खोली या कथामधून आढळत नाहीं आपल्या कादंबऱ्यामधून आलेल्या कथाविषयाशीं त्या जेवढ्या जिव्हाळ्यानें समरस झालेल्या आहेत, तेवढा जिव्हाळा त्यांनीं या कथाप्रांतात वापरलेला नाहीं असें म्हटलें तर फारसें वावगे होणार नाहीं तथापि मालतीबाईंनीं ज्या कथा लिहिलेल्या आहेत त्यात वर्णित विषयाबद्दलची त्यांची सहानुभूति मात्र भरपूर दिसून येते त्यांच्या कथाना एक प्रकारचें बालबोध वळण आलेलें आहे, तो या सहानुभूतीच्या पार्श्वभूमीचाच परिणाम असला पाहिजे

"दूरदेशच्या प्रीतिकथा" हा मालतीबाईंचा अगदीं अलिकडचा कथा संग्रह आहे या कथासंग्रहात त्यांनीं अनेक देशामधील प्रीतिकथा त्या त्या देशाच्या स्थलकालाच्या परिस्थितीनुसार सांगितलेल्या आहेत मूळ कथाविषय परकीय असला तरी त्यांची मांडणी मात्र लेखिकेनें अतिशय रसपूर्ण रीतीनें केली आहे, असे म्हणावयास हरकत नाहीं त्या त्या विशिष्ट देशाच्या चालीरीतींचा मालतीबाईंनीं अतिशय सूक्ष्मतेनें अभ्यास केलेला आहे, हें या पुस्तकावरून दिसून येईल लेखिकेनें येथे योजिलेली भाषाहि चमत्कदार आहे.

● ● ●

## सौ. आनंदीबाई किर्लोस्कर

सौ आनंदीबाई किर्लोस्कर ह्या अलिकडच्या काळातील एक नामवंत लेखिका होऊन गेल्या प्रतिबिंब, अंतरंग व ज्योति हे त्यांचे तीन कथासंग्रह प्रसिद्ध

झालेले आहेत. स्त्रीजीवनातील एखाद्या छद्र प्रसगावर आधारलेली कथा अगदी स्वाभाविक आणि वास्तववादी वातावरणात रगविण्यात आनदीबाई वाकबगार आहेत. थोडक्यात भरपूर आशय ध्वनित करण्याची त्याची हातोटी उत्कृष्ट असून स्त्रीच्या मनातील भाव नाजुक पद्धतीने वर्णन करण्यात तर त्यानी बरेंच यश मिळविलेलें आहे.

" सावत्र आई " या कथेंत बालमनावर शेजाऱ्याच्या सागण्यावरून आपली नवी आई म्हणजे कोणी भयकर बाई आहे अशी एका लहान मुलीला धास्ती पडते. परतु प्रत्यक्षात मात्र तसें न घडल्यामुळें त्या बालमनास कल्पनातीत आनद झाल्याचें येथें दर्शविलेलें आहे. मनाला चटका लावणारा हा प्रसग लेखिकेनें या कथेंत फारच आकर्षक रीतीनें रंगविला आहे.

आनदीबाईच्या कथात प्रेमकथाचा भरणा अधिक आहे. " खळबळ " ह्या कथेंत प्रौढ कुमारिकेच्या मनात आपल्या प्रियकराविषयीं चाललेलीं आदोलनें लेखिकेनें मोठ्या कौशल्यानें चित्रित केलीं आहेत.

" खानदान " ही आनदीबाईची कथा प्रीतिकथाच्या दृष्टीनें आकर्षक झालेली आहे. खानदानी घराण्यातील एका विधवेच्या प्रेमाचा आविष्कार येथें झालेला आहे आणि तो वस्तुस्थितीला धरूनहि उत्तम रीतीनें सजविलेला दिसून येतो. पद्मावती आणि तिच्या वडिलाचे घरातील तरुण कारकून वामन याच्या परस्पराच्या विवाहाबद्दल झालेल्या चादण्या रात्रींतील आणाभाका रगविणारा प्रसग अप्रतिम आहे.

आनंदीबाईच्या कथाचें स्वरूप हें असें आहे. स्त्रीच्या मनात खुपणारें दु.ख त्यानीं जितक्या तन्मयतेनें रगविले, तितक्याच तन्मयतेने स्त्रीची धडाडीहि त्यानीं रगवायला हवी होती, असे मात्र काहीं वाचकाना वाटल्याशिवाय राहत नाहीं. त्यामुळें त्याच्या या कथा पुष्कळशा प्रमाणात एकागी झालेल्या दिसून येतात.

● ● ●

## सुशीला शिंदे

" *चित्ररेखा* " *ह्या आपल्या कथासग्रहात सुशीला शिंदे यानीं स्त्रीजीवनाची* वास्तव बाजू रगविणाऱ्या कथा लिहिलेल्या आहेत. विभावरी शिरूरकरानीं स्त्रीच्या मनात आजवर सुप्तावस्थेंत वसत असलेल्या भावनाना वाचा फोडली होती. त्याच मनोवृत्तीमधून सुशीलाबाईच्या कथाचाहि उठाव झालेला आहे. आपल्या वर्णित विषयाशीं त्या अतिशय जिव्हाळ्यानें एकजीव झालेल्या दिसून येतात.

" उफाळलेल्या भावना " ही त्याची एकच कथा घेतली तरी त्याच्या कथालेखनाचें वैशिष्ट्य सहज पडताळून पहाता येईल. ही कथा अतिशय हृदय-

स्पर्शी आहे. विधवेच्या मनात उचंबळून येणाऱ्या भावनांचें हें उल्लेखनीय असें एक दारुण चित्र आहे. घरातील नातेवाईकांची " वैवाहिक सुखें बघून अस्वस्थ झालेली मालती पुनर्विवाहास प्रवृत्त होताच तिची आई तिला म्हणते, 'बेशरम कार्टे ! उलथली का नाहींस या परीस ? यासाठीं का ग तुला शिकायला घातली ? नवऱ्याला गिळलंस आणि आता वर आमची बेअब्रू करायला निघालीस?...' हें ऐकून मालतीच्या भावना बड पुकारायला प्रवृत्त होतात. जिनें आपल्याला नऊ महिने आपल्या उदरात सांभाळली आणि जी सत्तावीस वर्षें अव्याहतपणें संसार-सुखाची अवीट गोडी अनुभवीत होती, त्या आईच्या ह्या उद्गारानें मालतीस आपल्या मनाचे भावबंध आवरणें कठिण झालें. घरातील दादा वहिनींचें प्रेम आणि रमेशाचा प्रेमळ सहवास या दुहेरी भावनांनीं तिला पुनर्विवाहाच्या मार्गानें मनाला सुख मिळविण्याची दिशा दाखविली.

घरगुती वातावरणाचा उत्तम परिपोष, विषयाबद्दलची आत्मीयता आणि सहानुभूतीनें प्रकट होणारे स्त्रीजीवनाबद्दलचे विचारप्रवाह हें सुशीलाबाईंच्या कथेचें विशेष होत. त्यांची भाषा अतिशय चटकदार आणि ओघवती आहे.

• • •

## सौ. सिंधु गाडगीळ

सौ. सिंधु गाडगीळ यांचा " अंतरिक्षा " कथासंग्रह आजवरच्या सर्व स्त्री लेखिकांपेक्षा अगदीं निराळा असा आहे. काळाच्या वाढत्या ओघाबरोबर सुशिक्षित महिलेने विविध प्रकारची विद्या आत्मसात् करण्याचा चालविलेला यशस्वी प्रयत्न या पुस्तकाच्या रीतीनें आविष्कृत झाला आहे. विमान विद्येमधील विविध घडा-मोडींचें धावतें दर्शन घडविणारा हा एक चित्तवेधक चित्रपटच आहे, असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं.

आकर्षक वर्णनें, विमानविद्येची सूक्ष्म माहिती, विस्मयाचा धक्का देणारी विविध स्थळें आणि त्यामुळें कथानकाला येणारें सौंदर्य, घरगुती प्रसंगाची सुंदर पार्श्वभूमि आणि तरुणाच्या भावनांची वेचक शब्दांत झालेली उकल हे या कथा-संग्रहाचें वैशिष्ट्य आहे.

" स्ट्रवरडेस " ही एक प्रीतिकथा आहे. येथे विमानाच्या घडणाऱ्या अपघाताचें चित्त थरारून सोडणारें दृश्य लेखिकेनें रेखाटलें आहे.

वैमानिकाच्या आयुष्याचीं विविध अंगें दाखवीत असतानाच लेखिकेनें वैमानिकाच्या पत्नीचा करून दिलेला परिचय स्त्रीच्या अंतःकरणाची साक्ष पटवितो. " स्ट्रवरडेस " मधील वीणा आपल्या वैमानिक पतीस म्हणते, " विनू, तूं गेलास म्हणजे फार काळजी वाटते तुझ्याबद्दल. नुसत्या

काळजीनं अर्धमेला होतो माझा जीव व करमत नाहीं. इतके दिवस एकटं एकटं! कंटाळा यायला लागला आहे मला या एकलकोंड्या आयुष्याचा. एवढं सगळं वैभव आहे, नोकरचाकर आहेत, सर्व साधनं उर्मी आहेत हात जोडून माझ्या चाकरीला. पण तू!.. तू आता खूप खूप रहा ना माझ्याजवळ. कधीं रहाशील? का नाहींच रहायचास कधी?... ''

• • •

## शांता ज. शेळके

शांता ज. शेळके यांच्या ''मुक्ता'' आणि ''गुलमोहर'' या दोन लोकप्रिय कथासंग्रहांतून विविध विषयावरच्या कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. भावनेची उत्कटता, प्रणयाची रसभरित वर्णनें, आकर्षक निवेदन आणि वाचकाच्या मनाला भुरळ पाडणारी भाषाशैली हे शांताबाईंच्या कथेचे विशेष होत. त्यांच्या कवितेप्रमाणेंच त्यांची कथाहि प्रामाणिक आहे. जें काहीं सांगावयाचें असेल त्यात गडबड गोंधळ, आदळआपट काहीं नाहीं. सारें काहीं ओघाओघानेंच जाताना दिसून येतें.

प्रणयाचा विकास आणि भग हें शांताबाईंच्या अनेक कथाचे विषय आहेत. या एकाच विषयाच्या विविध छटा दाखविण्यात त्या मोठ्या वाकबगार आहेत. ''गुल्मोहोर ''मध्यें प्रेमभंगाचें दर्शन घडविताना लगेच त्यांनीं '' यौवनात'' त्याचा विकास दर्शविला आहे. प्रणयाचीं चित्रें रंगविताना त्यांची लेखणी धुंद होऊन जाते. जें सांगायला एखादी सर्वसामान्य बाई मनात चरकेल, तें सांगायला शांताबाईंची लेखणी निर्भयपणे पुढें सरसावते.

'' सतीचा वाडा '' ही शांताबाईंची कथा खानदानी घराण्यात पिचून गेलेल्या हिरा नावाच्या एका सौंदर्य—संपन्न स्त्रीची कहाणी आहे. स्त्रीहृदयाचा होणारा कोंडमारा लेखिकेनें येथें उत्कृष्ट रीतीनें दाखविला आहे.

शांताबाईनीं आपल्या कथामधून विविध प्रकारचीं स्वभाववैशिष्ट्यें दर्शविलेलीं आहेत. अगदीं अवखळ मुलापासून तों जख्खड म्हाताऱ्यापर्यंत त्यांच्या कथांतून निरनिराळी पात्रें आलेलीं आहेत. ''राधाराणीची साडी'' या बंगालमध्यें पूर्वींच चालू असलेल्या हिंदुमुसलमानांच्या दंग्याच्या पार्श्वभूमीवर आधारलेल्या कथेमधील बापलेकीचीं स्वभावचित्रें लेखिकेनें फारच परिणामकारक रीतीनें लिहिलेलीं आहेत.

• • •

## सौ. कमला फडके

प्रा. ना. सी. फडके यांच्या भाषाशैलीचें ज्या अनेकांनीं अनुकरण करण्याचा प्रयत्न केला त्यांच्यामध्यें सौ. कमलाबाई फडके या प्रमुख होत. कमला-

बाईंनीं बरेचसें लेखन परभाषेंतील वाङ्मयीन कलाकृति अनुवादित करताना केलें आहे. परंतु त्यांच्या या अनुवादाचा येथें विचार करावयाचा नसून त्यांच्या स्वतंत्र कथालेखनाचाच तेवढा विचार करावयाचा आहे.

"गुलमोहोर", "एक होता राजा", "तेरी चुप मेरी चूप" व "तीन उणे दोन = शून्य" हे कमलाबाईंचे कथासंग्रह आहेत. गेल्या दहा-पंधरा वर्षांतील त्यांचें हें कथालेखन आहे.

कमलाबाईंच्या लेखनाचा एक ठळक व प्रमुख असा विशेष सांगावयाचा म्हणजे त्यांनीं आपल्या कथामधून केलेली विनोदाची पेरणी हा होय. कमला बाईंचें हें वैशिष्ट्य इतर स्त्रियांना फारसें साधलेलें नाहीं. तरी परंतु कमलाबाईंच्या कथेनें फार वैशिष्ट्यपूर्ण असें स्थान मराठी साहित्यात मिळविलें आहे असेंहि म्हणता येणार नाहीं.

कमलाबाईंच्या कथेंतील काहीं विनोदाचा भाग सोडला, तर त्यांच्या कथेनें आणखी ठळक असें काहीं सांगितलेलें नाहीं. मध्यमवर्गीय कुटुंबामधील सामान्य स्त्रीप्रमाणेंच ती आहे. परंतु एका स्त्रीच्या लेखणींतून तिचा जन्म होत असूनहि त्या दृष्टीनेंसुद्धा ती फारसें वैशिष्ट्य दाखवीत नाहीं. तथापि स्त्रीमनाचा म्हणून तिनें जो थोडाफार उलगडा केला आहे त्याचें उदाहरण म्हणून १९४९ च्या "स्त्री" च्या दिवाळी अंकातील कमलाबाईंची "हारजीत" ही कथा घेता येईल.

"मग आम्हाला हव तरी काय?" ही कमलाबाईंची गोष्ट अशीच चित्तवेधक आहे. स्वतंत्र रीतीनें जगू इच्छिणारी स्त्री इच्छित स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं कशी झगडते व तें मिळाल्यावर पुन्हा बंधनात पडण्यासाठीं तिची कोण धडपड चालते, या स्त्रीसुलभ मनोवृत्तीची ही एक रोमहर्षक कथा आहे. "बायका त्या बायकाच!" या कथेंत ग्रामीण जीवन उपभोगणाऱ्या स्त्रीच्या पतीबद्दलच्या आकांक्षा लेखिकेनें सांगितल्या आहेत.

कमलाबाईंच्या कथेंतील असा काहीं भाग सोडला आणि त्यांच्या इतर कथा वाचनात आल्या, म्हणजे मग एक ठळक गोष्ट ध्यानात येते ती अशी कीं, आधुनिक काळातील वाढत्या स्त्रीस्वातंत्र्याचा व स्त्रीपुरुषांनीं एकमेकांचें अनुकरण करण्यात नव्यानेंच पडत चाललेल्या पायंड्याचा परिणाम त्यांच्या लेखनावर झाला असावा. नाहीं तर भरघोस स्त्रीजीवनाचा तरी आविष्कार त्यांच्या कथेनें केला असता किंवा विभावरी शिरूरकरांसारखें काहीं भव्य दिव्य तरी शोधून दाखविलें असतें.

प्रा. ना. सी. फडके यांची कथा त्यांच्या उतारवयातहि काहीं तरी नवीन सांगत असताना व उत्तम भाषाशैलीनें आपला वाचकवर्ग वाढता ठेवीत असताना कमलाबाईंच्या कथेनें अगदींच सामान्य का रहावें याचा अचंबा वाटतो.

# वसुंधरा पटवर्धन

गेल्या पाच दहा वर्षांत दरवर्षी निघणाऱ्या दिवाळी अंकातून चिकार लेखन करणाऱ्या लेखिका सौ. वसुधराबाई पटवर्धन यानी मराठींत थोड्या वेगळ्या धर्तीच्या कथा लिहिलेल्या आहेत. त्याची कथा बाध्याच्या दृष्टीने जुन्या काळचा पेहराव करते आहे व विचाराच्या दृष्टीनें अगदींच आधुनिक रीतीनें वागते आहे. अधूनमधून तिनें बरीचशी बडखोरीहि दाखविली आहे. तसंच मानवी मनाचें सूक्ष्म अवलोकन करून मानसशास्त्रीय अशी स्त्रीमनाची उकलहि करण्याचा प्रयत्न केला आहे.

त्यामुळें ही बाई पुरुषासारखें लिहिते असा आरोप वसुधराबाईंच्या बाबतींत अनेकदा केला जातो ! आणि त्यासाठीं त्याच्या कथाचे विषय, त्याची माडणी, भाषेची धाटणी व वर्णनशैली याचा दाखला देण्यात येतो. परतु एक गोष्ट खरी कीं, वसुधराबाईंच्या लेखणीनें पोटतिडकीची भाषा केली आहे. प्रखर पण मार्मिक असें व नेमकेंच तेवढें बोलूनहि दाखविलें आहे.

" एकेकाचा स्वभाव " व " चेहरा " हे वसुंधराबाईंचे दोन कथासग्रह. याखेरीज अलीकडील दोन तीन वर्षांतील त्याच्या इतरहि अनेक कथा वेगवेगळ्या मासिकातून प्रकाशित झालेल्या आहेत.

वसुधराबाईंच्या काहीं कथाचें वैशिष्ट्य हें कीं, क्वचित प्रसगीं पुरुषाच्या लेखकाला लेखन करताना जमणार नाहीं असें स्त्रीमनाचे वेगळें वैशिष्ट्य त्यानीं सागितलेलें आहे. या सदर्भात त्याची " का झाल अस— ? " ही कथा अवश्य पहावी.

वटसावित्रीचा युगानुयुगें चालणारा सर्वांच्या परिचयाचा प्रश्न येथें हाताळला आहे. आईवडिलाच्या अखेरच्या इच्छेसाठीं प्रेमभगाचें दु:ख सहन करणाऱ्या चंद्रावतीच्या अत:करणाचें प्रतिबिंब येथें जणु आरशात दिसावें तसें हुबेहूब उमटलेलें आहे. दिलीपशीं, जिवाभावाच्या मित्राशीं, विवाहबद्ध होता आले नाहीं म्हणून दु:खी झालेल्या चद्रावतीची कहाणी सागताना अखेरीस लेखिका म्हणते—
" आदर्श ससार करण्याचा तिचा ध्येयवाद, दिलीपशीं समरस होण्याचीं तिचीं सुखस्वप्नें हीं सारीं आता हातातून निसटून उडालेल्या पक्ष्याप्रमाणें झालीं होतीं. त्या पक्ष्याप्रमाणें धावण तिला अशक्य होत. आणि तो परत येईल म्हणून वाट पहात बसण्यासारखी परिस्थितीच उरली नव्हती.

" वटपौर्णिमेच पहिल वर्ष म्हणून चद्रावतीची पूजनाची सर्व तयारी झाली. पण श्रीमताच्या घरचा भरजरी शालू ती नेसली नाहीं. कोणतेहि दागिने तिनें घातले नाहींत. दिलीपनें वाढदिवसाला दिलेलें साधेंसुधें पातळ ती नेसली आणि वटवृक्षाची पूजा करू लागली. भटजी मत्र म्हणत होते. ती तत्र करीत होती. पण

तिचें अंतःकरण वटवृक्षाशीं निराळेंच हितगुज करीत होतें. ती त्याला विचारीत होती, ' वृक्षराज, आज शेंकडों वर्षे तूं पाहतो आहेस, आणि आम्ही तुझी किती तरी वर्षे पूजा करीत आहोंत. पण खर सांग, इथें येणाऱ्या सर्व स्त्रिया " जन्मोजन्मीं हाच पति लाभो " अशी तुझी खरीच प्रार्थना करतात काय ? तूं वयानें वृद्ध असलास तरी दरवर्षी पिकल्या पानाच्या रूपानं तूं आपलीं चुकीचीं जुनीं मतं बदलतोस आणि नव्या, चांगल्या कल्पनांची पालवी आपल्या पायांवर खेळूं देतोस. तुला माझं म्हणणं समजणार नाहीं का ? दिलीपच्या आठवणीनें करपून जाणाऱ्या या दुर्दैवी मुलीच्या अंतःकरणाची तुला दया येत नाहीं का ? प्रियकरासाठीं जीव टाकणाऱ्या सर्वच मुली उल्लू असतात, एखादीहि श्रद्धेनं प्रेम करणारी नसते असं आम्हां माणसांप्रमाणेंच तुलासुद्धां वाटतं काय ? इतकीं वर्षे अनुभव घेऊन समजस, प्रेमळ झालेल्या तुझ्या मनाला माझी प्रार्थना आहे कीं, श्रीमंतांचं चांगलं होऊं दे. पण देवा, पुढल्या जन्मीं दिलीपची, माझ्या आवडत्या दिलीपची, राणी होण्याचा आशीर्वाद मला दे. देशील का ? '

आणि तिनें डोळे उघडले, इतर बाया आपल्याकडेच पहात असल्याचें ध्यानात येताच ती चपापली. धडधडत्या छातीवर डावा हात दाबून धरीत ती मनाशींच म्हणाली, " *माझ्या मनातली गोष्ट यांना समजली तर नाहीं ?* " या शंकेनें ती धीट मुलगी कावरीबावरी झाली. गोंधळून गेली. का झालं असं !..."

*ग्रामीण जीवनावरहि लेखिकेनें " वहिनी ! मग कोण ? " या सारख्या सुंदर प्रीतिकथा लिहिल्या असून बोलीभाषेतील खटकेबाज संवादहि आत्मसात् करून लिहिलेले आहेत.*

" एकेकाचा स्वभाव " ही वसुधराबाईंची एक अभिनव कथा आहे. घरगुती प्रसंगातून अगदीं साध्या गोष्टींना कलात्मक घडण लाभली असतां, त्या किती आकर्षक होऊं शकतात याचें हे एक उत्तम चित्रण आहे. नणंद, जाऊ, दीर, पति व स्वतः आपण अशा विविध मनोवृत्तींच्या माणसांच्या स्वभावाचें मोठें मार्मिक विवेचन या कथेंत लेखिकेनें केलें असून ते अतिशय चटकदारहि झालें आहे.

वसुंधराबाईंची विचारसरणी बरीचशी पुरोगामी थाटाची आहे. " शोभा गेली " या कथेंत त्यांनीं आपल्या विधवा सुनेचा सासू सासऱ्यांनीं समाधानानें पुनर्विवाह घडवून आणल्याची माहिती दिली आहे ! वास्तविक सर्वसामान्य स्त्री-स्वभावाला ही गोष्ट पटण्यासारखी नाहीं. परंतु काळाचा महिमा लक्षांत घेऊन लेखिकेनें मांडलेली ही अशा प्रकारची विचारसरणीहि पुष्कळांना पटण्यासारखी आहे. वाचकांना कथेंत समाराचें वास्तवचित्र किंवा निदान ग्रह्य ठरेल असें सत्याभास निर्माण करणारें चित्र तरी हवें असतें. त्या दृष्टीनें पाहिलें तर वसुधरा-बाईंच्या कित्येक भावकथा अपवादात्मक कथेच्या सदरांत मोडतील असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं.

पुरोगामी विचारसरणीच्या जोडीलाच लेखिकेनें जुन्या काळच्या चालीरीतींनाहि जवळ केलेलें आहे. पुष्कळशा म्हाताऱ्या बायकांना उठता बसता म्हणींचा वापर करण्याची सवय असते. अशाच एका प्रेमळ म्हाताऱ्याबाईचें जीवनचित्र लेखिकेनें "सोडीव रे नारायणा !" या कथेंत चित्रित केलेलें आहे.

भरीव कथानक, पुरोगामी विचारसरणी, जुन्या चालीरीतींचा समर्पक उठाव, विषयाची विविधता, वास्तव चित्रण आणि चटकदार भाषाशैली हें या लेखिकेच्या कथेचें उल्लेखनीय वैशिष्ट्य आहे. परंतु अगदीं अलीकडच्या काळातील त्यांची कथा हे गुण सोडून अगदींच सामान्य होत चालली आहे.

गेल्या दहा-बारा वर्षांमध्यें येथवर विचार केलेल्या निरनिराळ्या लेखिकांच्याप्रमाणेंच काहीं जुन्या व नव्या लेखिकांनींहि आणखी बरेंचसें कथालेखन केलेलें आहे. अशा लेखिकांच्यामध्यें यमुनाबाई शेवडे, इंदिरा संत, सुमती क्षेत्रमाडे, नलिनी सुखटणकर, योगिनी जोगळेकर, शिरीष अत्रे, स्नेहलता दसनूरकर, प्रकाशीला गुप्ते, सुशीला चिकटे, तारा रेड्डी, नलिनी शहा, लता सप्रे, अनुजा सोनटक्के इत्यादींचा समावेश होतो. यापैकीं बहुतेक सर्वांचे कथासंग्रह प्रकाशित झालेले असून वेगवेगळ्या नियतकालिकांतूनहि त्यांचें लेखन पुष्कळशा प्रमाणात प्रकाशित झालेलें आहे.

परंतु काहीं अपवाद सोडले तर स्वातंत्र्यकाळातील लेखन म्हणून या कथांनीं काहीं घवघवीत भर मराठी साहित्यामध्यें टाकली आहे अशातली मात्र गोष्ट नाहीं. राजकीय वातावरणाची पार्श्वभूमि फार तर कोणी घेतली असेल, परंतु स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं किंवा स्वतंत्र विचाराच्या प्रेरणीसाठीं म्हणून खास असें कथालेखन स्त्रियांनीं केलेलें नाहीं, हें तितकेंच खरें आहे.

वास्तविक या कालखंडात स्त्रिया नोकरीच्या निमित्तानें, समाजकार्याच्या निमित्तानें, राजकारणाच्या निमित्तानें अशा घराबाहेर पडू शकल्या आहेत. बाहेरचें जीवन त्यांनीं अभ्यासिलें आहे. महिला मंडळाच्या किंवा इतर सामाजिक या राजकीय व्यासपीठावरून वक्तव्य करण्याची संधि त्यांना मिळालेली आहे. कित्येकींच्या घरात समाजकारण किंवा राजकारण शिजलें असण्याचीहि शक्यता आहे. तरीपण त्या वातावरणाचा ठसा पार्श्वभूमीपलीकडे त्यांच्या कथांतून उमटू नये याचें आश्चर्य वाटतें.

कथाविषयाचें क्षेत्र अलीकडे एवढें व्यापक झालें असूनहि त्याचा ठसा फारसा या लेखनात कुठें उमटलेला असू नये हेंहि नवलच होय. नाहीं म्हणायला नलिनी सुखटणकरांनीं पत्नीची बाजू मांडताना काहींसा बंडखोरपणा व्यक्त केला आहे. आणि तारा रेड्डींनीं दलितांचीं चित्रें काढताना समाजवादी वास्तववादाचा विचार मांडण्याचा प्रयत्न केला आहे नलिनी शहा किंवा अनुजा सोनटक्के यांनीं खेड्यातील जीवन आपल्या कथांतून आणलें, परंतु योगिनी जोगळेकरांच्या 'सरूआक्काचें

लगीन ' या कथेचें यश त्याना मिळालेलें नाहीं. त्याचप्रमाणे ' अनुराधे ' च्या १९६० च्या दिवाळी अकातील अवादास अग्निहोत्रींनीं चितारलेन्‍ी " मानिनी " पण कोणाला साधलेली दिसत नाहीं !

स्त्रियानीं लिहिलेल्या लघुकथेचा अशा पद्धतीनें येथवर विचार केल्यानतर एक गोष्ट ठळकपणें लक्षात येते ती अशी कीं, हा वाङ्मय प्रकार स्त्रियानीं अधिक मोठ्या प्रमाणात हाताळलेला आहे. तसेंच फारसे शिक्षण न घेतलेल्या स्त्रीपासून तों उच्च प्रकारचें शिक्षण घेतलेल्या स्त्रीपर्यंत सर्वांनीं या प्रातात लेखन केलेलें आहे. तसेंच मनात येईल त्या भावनेला कलात्मक वळण देऊन तिचा आविष्कार करण्यासाठीं लघुकथेचें माध्यम स्त्रियाच्या लेखणीन प्रामुख्याने स्वीकारलेलें आहे, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं.

मराठींतील लघुकथेची जोपासना स्त्रियाच्यापेक्षाहि अधिक मोठ्या प्रमाणावर पुरुष लेखकानीं केलेली आहे. तसेंच विषयाच्या दृष्टीनें व कल्पकतेच्या दृष्टीनें त्याची कथा ही अधिक विशाल क्षेत्रातून वावरते आहे. त्याचबरोबर शकर पाटील, रणजित देसाई, व्यकटेश माडगूळकर, ग. ल. ठोकळ, दिनकर द. पाटील, शकरराव खरात किंवा नामदेव व्हटकर व द. मा. मिरासदार याच्या सारख्यानीं भरघोस ग्रामीण कथालेखन केलेलें आहे. त्याचा स्त्रियाच्या कथालेखनात मोठाच अभाव दिसून येतो. तसेंच पु. ल. देशपाडे याच्या कथेसारखा सहजसुदर विनोदहि स्त्रियाच्या लेखनात फारसा आढळत नाहीं.

आजपर्यंत स्त्रियानीं जें कथालेखन केलें आहे, त्यामध्यें विषयाच्या दृष्टीनें पाहिलें तर असें दिसून येतें कीं, बहुतेक सर्व स्त्रियानीं आपल्या कथेचा विषय म्हणून स्त्रीजीवनातील विविध अगें आणि आपलें कुटुब याचीच प्रामुख्यानें निवड केली आहे. आणि त्याला कारण शोधावयाचें झालें तर स्त्रीचा मूळचा स्वभाव धर्मच तसा आहे, असें म्हणता येईल. स्त्री आणि पुरुष हीं एकमेकाना पूरक असलीं तरी ससारामध्यें त्याच्यावर पडणारी जबाबदारी मात्र भिन्न असते. पुरुष हा घराबाहेरचे उद्योग करुन आपल्या कुटुबाच्या पोषणासाठीं कमावीत असतो आणि आपलें घर मुलेंबाळें साभाळून स्त्री ही गृहिणीचें कर्तव्य पार पाडीत असते. म्हणून साहजिकच तिचा ओढा घरकामाकडे अधिक असतो. त्यामुळें तिच्या स्वभावाची घडण त्याच मार्गानें झाली असली, तर नवल नाहीं.*

---

* Women evinced a distinctive interest in domestic affairs and aesthetic objects and occupations, they distinctively prefer more sedentary and indoor occupations, and occupations more directly ministrative, particularly to the young, helpless, the distressed "

Psychometric Tests L M Terman and C C Miles

सामान्यतः उत्कृष्ट प्रकारच्या ललित वाङ्मयाच्या निर्मितीला अनुभूतीचा पहिला स्पर्श व्हावा लागतो. प्रसिद्ध हिंदी साहित्यिक स्वर्गीय श्री. प्रेमचंद यांनी तर " साहित्यका उद्देश "‡ या आपल्या निबंधात स्पष्ट म्हटलें आहे कीं, " कवि या साहित्यकारमें अनुभूतिकी जितनी तीव्रता होती है, उसकी रचना उतनी ही आकर्षक और ऊंचे दरजेकी होती है ! " त्यामुळेंच स्वानुभवाच्या लेखनाला केव्हाहि अधिक किंमत आहे; आणि दुसरें म्हणजे त्या एका विशिष्ट परिस्थितींत लेखकाच्या मनाची वाढ झालेली असते, त्याच परिस्थितीचें पडसाद त्या लेखकाच्या लेखणींतून उमटणें अगदीं स्वाभाविक असतें. त्या दृष्टीनें पाहिलें तर मागें आलेल्या अनेक कथामध्यें गुंफिलेले स्त्री-जीवनातील विविध अनुभव हे औरस संततीप्रमाणें त्याच स्वतःचे आहेत, आणि तशा प्रकारच्या अनुभवाची पुरुषांनीं आपल्या कथेंत केलेली गुंफण ही दत्तक घेतलल्या मुलाप्रमाणें आहे, असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं !

स्त्रियांनीं लिहिलेल्या या कथांचें वैशिष्ट्य साकल्यानें सांगावयाचें म्हटलें तर असें सांगता येईल कीं, कौटुंबिक जिव्हाळा, स्त्री जीवनाकडे विशेष सहानुभूतीनें महावयाची दृष्टि, स्त्री स्वभावानुसार होणारा उपमा दृष्टांताचा उपयोग, स्त्रीबद्दलचा समाजाचा विकृत दृष्टिकोन पाहून तिच्या मनात उत्पन्न होणारी अन्यायाची तीव्र जाणीव व तदनुसार झालेली विषयाची निवड आणि सहजसुलभ अशी घरगुती पण मसाईदार भाषाशैली, इत्यादि या कथांचे विशेष होत त्यामुळें असें झालेलें आहे कीं, या कथा एक प्रकारचें एकांगी जीवनदर्शनच घडवितांना दिसतात. सौ. सिंधु गाडगीळ यांच्या वैमानिक जीवनावरील कथासारख्या कांहीं थोड्या कथा सोडल्या, तर घराबाहेरचें जीवन फारसें कोठेंच आढळत नाहीं.

घरगुती जीवनाचा मात्र स्त्रियांनीं उत्तम रीतीनें आविष्कार केलेला आहे. अर्थात् हें मान्य केलें तरीं पुरुषांनीं आपल्या कथांमधून घरगुती जीवन अजिबातच रंगविलें नाहीं असें मात्र म्हणता येणार नाहीं श्री. य. गो. जोशी यांची " शेवग्याच्या शेंगा " ही कथा उदाहरण म्हणून घेता येईल. या कथेंत एकत्र कुटुंबात दिसून येणारा जिव्हाळा फारच सुंदर रीतीनें लेखकानें दर्शविला आहे. शेवग्याच्या शेंगामुळें बरेच दिवस दुरावलेलीं भावंडें येथें एकत्र आल्याचीं दाखविलीं आहेत

" वटसावित्री " सारख्या आख्यायिकेवर आजवर अनेकांनीं लिहिलें. पण त्या सर्वांमधूच " हाच पति जन्मोजन्मीं लाभावा " असाच सूर प्रामुख्यानें निघाला. पण वसुंधरा पटवर्धन यांनीं आपल्या " का झाल असं ? " या कथेंत मागें सांगितल्याप्रमाणें या विषयाला दिलेली कलाटणी अत्यंत अभिनव आहे.

---

‡ साहित्यका उद्देश, साहित्य-शिक्षा पान १०

वटवृक्षाला त्यानीं विचारलेला सडेतोड प्रश्न खरोखरच फक्त स्त्रीहृदयालाच जाणवणारा आहे. स्वानुभवाचें अधिष्ठान या भावनेच्या बुडाशीं आहे. नुसत्या कल्पनेनें मनात डोकावणारा हा प्रश्न नव्हे. तीच गोष्ट प्रो. ना. सी. फडके यांच्या "कश्मीर कहाणी"* बद्दलहि म्हणता येईल. या कथेंत काश्मीरच्या प्रवासात असताना घडलेल्या प्रसंगाना फडक्यानीं अतिशय जिव्हाळ्याने एकत्र गुंफिलेले आहे. स्त्रियाच्या लेखणींतून असलीं प्रसंगवर्णनें अनुभवाच्या अभावीं सहसा बाहेर पडावयाचीं नाहींत.

स्त्री आणि पुरुष याच्या अवलोकन क्षेत्राच्या भिन्न स्वरूपाचें द्योतक म्हणून हे दोन प्रसंग पहाण्यासारखे आहेत. श्री. वि. स. खाडेकर याच्या "नवा खिसा" या कथेमधील कल्पना देखील अशीच अभिनव आहे. पारिजातकाच्या नाजुक पण मोहक फुलाची जोपासना तितक्याच सहृदयतेनें व्हावी अशी कल्पना खाडेकरानीं येथें माडली असून, त्यासाठीं ह्या फुलाचें सौंदर्य रतिभरहि कमी होऊ नये म्हणून एक नवा खिसा हवा असल्याचें म्हटलें आहे. हीच गोष्ट जर स्त्रीनें लिहिली असती तर या फुलाची रवानगी पुष्कळ अशीं हातातल्या चिमुकल्या रुमालात ठेवण्यासाठीं नाहींतर वेणी माळण्यासाठींच होण्याचा सभव अधिक !

कलाविलासाच्या दृष्टीनें पाहिलें तर स्त्री आणि पुरुष या दोघानींहि लिहिलेल्या कथामधून गुणदोष हे सारख्याच प्रमाणात निघणें शक्य आहे तथापि स्त्रियानीं लिहिलेल्या या लघुकथामधील कलात्मकता व तत्राचा अभ्यासच पहावयाचा म्हटला तर तो भाग पुरुषाच्या मानानें काहींसा कमी आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण पुरुषाप्रमाणें स्त्रियाना कलेचा स्वतत्र अभ्यास करावयास म्हणावी तशी सवड मिळत नाहीं हें एक आणि दुसरें म्हणजे एखादा वाङ्मयीन कलाप्रकार अभ्यासून तो हाताळण्याकडे त्याच्या मनाची प्रवृत्ति अजून म्हणावी तशी वळलेलीहि नसावी ! शिवाय सर्वस्वीं भिन्न अशा परिस्थितीची गुफण करणाऱ्या या कथाना पुरुषाच्या कथेला लागणारी कसोटी लावून तरी कसें चालेल ? फार तर एवढें म्हणता येईल कीं, मराठींतील लघुकथेची तिच्या भिन्न लिंगी साहित्य भक्ताकडून होणारी जोपासना समाधानकारक रीतीनें प्रगतिपथावर आहे.

• • •

# कादंबरी

गोष्टीवेल्हाळपणा हा मानवी स्वभावाचा एक स्वाभाविक व प्रमुख असा विशेष गुणधर्म आहे. त्या कारणानें गोष्टी सागण्याचें व ऐकण्याचें वेड मानवी

---

* किर्लोस्कर, मार्च १९५०.

मनाला मानवाच्या जन्मापासूनचें आहे. स्थळकाळाचें किंवा वयोमर्यादेचें बंधन मानवी मनानें या वेडाच्या पूर्ततेच्या पायीं कधीं मानलें नाहीं. उलट या मनोभावात जीवनातील श्रेष्ठ प्रकारचा आनंदच उपभोगला. त्यामुळें इतर देशांच्या प्रमाणेंच भारतातहि गोष्टींची पैदास भरपूर झाली. जीवनात आलेल्या सर्व प्रकारच्या बऱ्यावाईट व्यावहारिक व अद्भुतरम्य कल्पनाची खैरात मानवानें या गोष्टींमधून केली. आणखी अद्भुताचें आकर्षण व जीवनातील आदर्शांचें चित्रण हीं वैशिष्ट्यें आपल्या प्रारंभीच्या कथासाहित्यात प्रामुख्यानें गुंफून दिली.

त्यामुळे आजच्या काळात साहित्याच्या क्षेत्रात आढळणारी लघुकथा किंवा कादंबरी ही वाङ्मय प्रकार म्हणून नवीन वाटत असली, तरी तिचें मूळ बीज फारच पुरातन आहे असें म्हणता येईल. जुन्या काळातील गुणाढ्याची ' बृहत्कथामंजरी ', सोमदेवाचा ' बृहत्कथासरित्सागर ', रामायण, महाभारत, आजीबाईच्या तोंडच्या नवलकथा, यक्षकिन्नराच्या गांधर्वकथा, कहाण्या, नीतिकथा इत्यादि कथा प्रकारामधून आजच्या कथा, कादंबरीचें अस्तित्व सापडतें.

एक काळ असा होता कीं, या जुन्या कथानीं आपला पसारा जगभर मांडला होता. प्रत्येक भाषेंत त्याचीं रूपांतरें झालीं होतीं. एवढेंच नाहींतर लोकजीवनाशीं त्याचा निकट संबंध होता. त्यामुळें भारतीय लोककथेबाबत बोलावयाचें म्हटले तर असें सांगता येईल कीं, " भारतीय लोककथा एका लोकसमुहापासून दुसऱ्या लोकसमुहाकडे इतक्या लवकर भटकत गेल्या कीं, आपणाला युरोप आणि आशियाखंडातील बहुतेक सर्व प्रदेशातून इतकेंच नव्हेंतर आफ्रिकन लोकातही त्या अशारूपानें दिसतात. "*

मराठी भाषेंतील गद्य व पद्य या दोन्ही वाङ्मयीन माध्यमातून जें कथावाङ्मय निर्माण झालें त्याचे धागेदोरे बाराव्या शतकात सापडतात. लहान मुलासाठीं त्याकाळीं नीतिकथा लिहिल्या गेल्या. महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्री चक्रधरस्वामींच्या कारकीर्दींत या कथाचा अवतार झाला. रसाळपणें त्याची जोपासना झाली. रामदेवरायाच्या सभेंत तर मराठी प्रबंधाचें वाचन केलें जाई ! आणि त्या संदर्भांत पुढें मग पौराणिक कथाहि रचल्या गेल्या.

परंतु इ. स. १३१८ त महाराष्ट्र देशावर मुसलमानाचें आक्रमण आलें व तेंव्हापासून पुढें ३०० वर्षें हा देश परक्याच्या ताब्यात गेला. त्यामुळें मराठी भाषेची दैना उडाली. फारशी शब्दाचा तिच्या अंतरंगात भरणा झाला. तरीपण मराठी कवितेनें महाराष्ट्राच्या आध्यात्मिक जीवनाचें संरक्षण केलें. त्या कामीं मराठींतील लोकसाहित्यानें राखलेली आपली शुद्ध मराठी ठेवण उल्लेखनीय आहे.

---

* महाराष्ट्रीय ज्ञानकोश. वि. १०

यानंतरच्या काळात छत्रपति शिवाजी महाराजांनीं जेव्हा स्वराज्याची मुहूर्तमेढ रोविली व महाराष्ट्रात एक प्रकारचें नवचैतन्य निर्माण झाले, तेव्हा " प्रत्येक बाबतींत स्वाभिमानी बाणा प्रचारात येऊ लागला. राज्यव्यवहारकोश निर्माण होऊन दरबारी भाषेचे स्वरूप पार बदललें. असंख्य संस्कृत शब्द पुनः प्रचारात येऊन मराठी भाषा प्रौढ व संपन्न बनली. त्याबरोबरच राष्ट्राचा व्यवहार बहुविध झाल्यामुळें विचारविनिमयाला नवे प्रांत लाभले व भाषेचा व्याप वाढला."‡ लष्कर, आरमार, किल्ले वगैरे प्रकारचें नवेंच जीवन निर्माण झाले. न्यायमनसुबा मराठी भाषेत होत गेला. इतिहासाचें लेखन घडू लागलें आणि याच संदर्भात पुढें बखरीचा जन्म झाला बखरवाङ्मयानें एक प्रकारचे नवीन कथावाङ्मय निर्माण केलें.

परंतु पेशवेकालानंतर इंग्रजी आमदान आली आणि कथेच्या विकासाला एक प्रकारें अडथळा निर्माण झाला. " स्वराज्य गेले आणि पाठोपाठ सरस्वतीहि आम्हास विन्मुख झाली !...जुने खानदानी राज्य भोगलेले मुत्सद्दी, सरदार वगैरे अंतर्धान पावल्याप्रमाणें झाले ! राष्ट्राची वाचाच बसली !* "

इंग्रजी अमदान सुरू होण्यापूर्वी कादंबरीलेखनाची पार्श्वभूमि मराठीच्या प्रांतात कितपत तयार होती याची एवढ्या विवेचनावरून कल्पना येते. म्हणजे चौकसपणाने जीवनमूल्याचा विचार करणें व कल्पकतेला धरून मानवी प्रश्नाचा मूलतः विचार करणें हा जो कादंबरीचा मूळ दृष्टिकोण त्याचें अस्तित्व मुळातच महाराष्ट्रात होतें असा याचा उघड अर्थ होतो.

ब्रिटिशांच्या सहवासामुळें परभाषेंतील वाङ्मयाचा मराठी मनाला परिचय झाला. उच्च शिक्षण मिळू लागले. आणखी एखाद्या वाङ्मय प्रकाराचे तांत्रिक-दृष्ट्या अध्ययन करता आले. त्या कारणानें मराठींत भाषांतराचे युग सुरू झालें. साचेबंद लेखनप्रकार आले. तसेंच इंग्रजी भाषेचे वळण असणारे लेखनहि अस्तित्वात आलें.

पण त्यापूर्वीच्या काळात हातिमताई, गुलबकावली व सिंहासनबत्तिशी यासारख्या कथासंग्रहानीं मराठी वाचकाच्या मनावर जबरदस्त मोहिनी घातली होती. अद्भुत रसाची बहार उडविली होती. तसेंच शृंगारालाहि वैचित्र्यानें खेळविलें होते त्याचा परिणाम कै. कृष्णशास्त्री चिपळोणकराच्या " अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी " हे भाषांतरित पुस्तक निर्माण होण्यात झाला आणि त्यामुळें कथावाङ्मयाची लोकप्रियता आणखीनच वाढत गेली.

इ. स. १८५७ मध्यें बाबा पदमजी याची " यमुनापर्यटण " ही

‡ मराठीशाहीतील गद्य रचना. गो. स. सरदेसाई. वि. ज्ञा. वि. पु. ४८.

* द. वा. पोतदार, मराठी गद्याचा इंग्रजी अवतार पा. १६

कादंबरी प्रकाशित झाली आणि मराठींतील कादंबरी वाङ्मयास प्रारंभ झाला. या कादंबरीसाठीं वापरण्यात आलेली " बाबाची भाषापद्धति खरोखरच फार गोड आहे. त्यात भक्तीचा जिव्हाळा आहे. समाज सुधारणेची तळमळ आहे. वाक्यें साधीं, शुद्ध, सरस व चटकदार आहेत. लिहिणें गभीर व प्रौढ आहे. शब्द वेचक आहेत. वळण जरा कोकणी आहे. त्याची गोड व सुदर टापटिपीची भाषा पाहता बाबाची गणना उत्तम मराठी लेखकात केली पाहिजे.* "

मराठींतील पहिल्या कादंबरीबाबत अनेक बरेवाईट मुद्दे उपस्थित झाले असले व मतभेदालाहि भरपूर वाव दिला गेला असला, तरीहि तिचें स्वरूप खात्रीनें महत्त्वपूर्ण आहे हे मान्य कोणीहि नाकबूल केलेलें नाहीं. या कादंबरीमधील खिस्ती धर्मांच्या पुरस्कारामुळें तिच्या लोकप्रियतेला बाध आलेला असला, तरी देखील बाबा पदमजींनीं आपल्या सूक्ष्म व व्यापक अवलोकनासाठीं वापरलेला नवा मानवतापूर्ण दृष्टिकोन उल्लेखनीय आहे.

इ. स. १८६१ मध्यें प्रकाशित झालेली कै. लक्ष्मणशास्त्री हळबे याची मुक्तामाला ही कादंबरी लेखकाच्या स्वभाषेवरील निष्ठेच्या दृष्टीनें विशेष आकर्षक झालेली आहे. या लेखनावर संस्कृतोद्भव शब्दकळाचा परिणाम झालेला असून साहित्यविषयक आदर्शहि त्यापुढे संस्कृत वाङ्मयातले आहेत. म्हणजे निर्मळ संस्कृत परंपरेवरून तिचा जन्म झालेला आहे असें थोडक्यात म्हणता येईल. संस्कृतातील प्रसिद्ध महाकाव्याचें बाह्य स्वरूप जरी पद्यात्मक असलें, तरी त्याची अंतरंगाची धाटणी ऐतिहासिक कादंबऱ्याप्रमाणेंच वाटते. महाकाव्याचे बाह्य गुणधर्म वाचीत असता आपण कादंबरीचें तंत्रच विचारात घेत आहोंत कीं काय असा भास होतो. महाकाव्याचे सर्ग म्हणजे कादंबरींतील प्रकरणेंच होत. त्यामुळेंच बाणभट्टाच्या " कादंबरी "स आदर्श मानून आपल्याकडील लेखकांनीं सुरवातीचें कादंबरी लेखन केलें आहे. अद्भुतरम्य कथानक हें त्यावेळच्या कादंबरीचा एक आवश्यक भाग झाला होता. शिवाय " रूढीच्या चाकोरींतून समाजाचा गाडा शतकानुशतकें चालत आला असल्यामुळें स्वातंत्र्य, ऐश्वर्य व प्रणय हें मानवी मनाला मोहिनी घालणारें त्रिभुवन त्याला सर्वस्वीं पारखें झाले होतें. कादंबरीचें विमान मिळताच समाजाचें मन या त्रिभुवनात स्वच्छंद विहार करू लागलें. तेव्हा संस्कृतातील बाणभट्टाच्या ' कादंबरी ' वरूनच तत्समान मराठी वाङ्मय प्रकारास कादंबरी हें नाव पडलें याची येथे स्पष्ट कल्पना येते.

इग्रजी अमदानींत मराठी भाषेचें पुनरुज्जीवन होत असताना मराठी भाषाशैलीनें दोन वळणें प्रामुख्यानें स्वीकारलीं. तीं म्हणजे इंग्रजी किंवा भाषांतरी हें एक वळण व शास्त्री किंवा संस्कृति हें दुसरें वळण होय.

---

* द. वा. पोतदार, मराठी गद्याचा इग्रजी अवतार पा. ९६.

यमुनापर्यटण आणि मुक्तामाला या कादबऱ्याच्या नतर रिसबुडाच्या कादबऱ्यानीं मराठींत एक वेगळेच दालन निर्माण केलें. अनुप्रास, शाब्दिक कोट्या, कृत्रिम उपमा व उत्प्रेक्षा याची त्यानीं रेलचेल करून सोडली. तसेंच पात्र योजनेप्रमाणें भाषेची स्वाभाविकताहि राखली नाहीं. आणि शृगारिकतेचा जसा जास्त प्रमाणात उपयोग केला तसाच कादबरीच्या रसपरिपोषासाठीं लोक-साहित्यातील कलाप्रकारहि वापरले !

यानतरच्या काळात मराठींत अद्भुत व ऐतिहासिक कादबरी निर्माण झाली. पण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस हरिभाऊ आपट्याच्या लेखनानें मराठी कादंबरीला वैभवाचे दिवस दाखविले. समाजाभिमुखता व कलात्मक आनद या मराठी कादबरीच्या प्रारभकाळीं निर्माण होऊन नतर विकास पावलेल्या दोन भिन्न वाटा हरि नारायणाच्या लेखननिर्मितींत एकत्र आल्या व एकजीवन होऊन गेल्या. त्यामुळें मराठी कादबरीच्या वैभवाला, सामाजिक जीवनातील परिणाम-कारकतेला व लोकप्रियतेला आगळा बहर आला

मराठी कादबरीच्या या वैभवशाली बहाराच्या काळात मराठींत स्त्रियानींहि कादबरी लेखन केलें. काशीबाई कानिटकर या हरिभाऊच्या समकालीन लेखिकेनें मराठी कादबरीला चागले दिवस दाखविण्यासाठीं वैशिष्ट्यपूर्ण हातभार लावला. काशीबाईची भाषा सफाईदार होती. ध्येयवाद उल्लेखनीय होता. रसिकता अभिजात होती अभिरुची सुसस्कृत होती. निरीक्षण सूक्ष्म होतें वर्णनें उठाव-दार होतीं. व्यक्तिरेखा–विशेषत. स्त्रियाच्या–जिवत होत्या. लेखणींतील जिव्हाळा आणि कथनशक्ति डोळ्यात भरणारी होती.

त्यामुळें काशीताई कानिटकराच्या लेखनानें पुढील वीस पचवीस वर्षातील स्त्रियाच्या लेखन निर्मितीची नादी गाईली. त्याच्या लेखनातील गुणविशेषाचाच आविष्कार त्याच्या पुढील पिढीच्या स्त्रियाच्या कादबरी लिखाणातून झाला.

इ. स. १९२० नतरच्या काळात कादबरीचा विकास झपाट्यानें होत गेला. वाचकवर्गाची खूप वाढ झाली. त्यात स्त्रियाचा भरणा अधिक होता थोडयाबहुत शिकलेल्या स्त्रिया आवडीनें कथा कादबऱ्या वाचू लागल्या. त्यामुळें त्याना वाचनाची गोडी तर लागलीच पण त्याच्या विचारानाहि एक प्रकारचें वेगळें वळण लागलें. आणि त्या सदर्भात निरनिराळ्या लेखिका कादबरी लेखन करायला पुढें आल्या. स्त्रीजीवनातील समस्याचें स्त्रियाच्याच दृष्टिकोनातून विवरण होऊ लागलें. म्हणजे जे स्त्रियानाच बोचेल व जें पुरुष लेखकाना शोधूनहि दिसणार नाहीं, अशा अनुभूतींची एखादी स्पर्शछटा तरी त्याच्या कथामध्यें दिसून येऊ लागली. वस्तुनिष्ठ मनोवृत्तींतून त्यानीं आपले लेखन केलें.

वाढत्या शिक्षणाबरोबरच स्वतत्रपणें विचार करण्याची नजर स्त्रीच्या लेख-णीला लाभल्याकारणानें तिची कल्पनाहि पल्लेदार झाली. जीवनाविषयीं बुद्धिनिष्ठ-

पणानें व विश्लेषणपूर्वक विचार करण्याची कुवत तिच्यामध्यें आली त्यामुळें वैवाहिक जीवनातील समस्यावर स्त्रियानीं स्वाभाविकच अधिक भर दिला व आपल्या खास अनुभवाचें व परिचयाचं जग कादबरींतून चित्रित केलें

वैवाहिक जीवनातील अनेक समस्याच्यामुळें उद्भवणाऱ्या सुखदु खाची–विशेषत दु खाची–जबाबदारी स्त्रीसुलभ न्यायानें सामान्यत ती बहुअशी मुलीच्या आईबापावर लादली जाते, हें लक्षात घेऊन स्त्रियानीं आपल्या कादबरीची नायिका निरपराध, दुर्दैवी व असाहाय्य अशी चित्रित करण्याचा प्रयत्न केला तेव्हा या सदर्भात जानकीबाई देसाईच्या गृहलक्ष्मी ( १९१५ ), सौभाग्यतिलक (१९१८), मूळ नायिका ( १९२५ ) या कादबऱ्या किंवा कमलाबाई सोहनींची वादळा-पूर्वी ( १९३४ ), शातावाई नाशिककराची लग्नाचा बाजार ( १९२९ ), कमलाबाई बबेवाल्याची बधमुक्ता ( ११३० ) किंवा इदिराबाई सहस्रबुद्धे याच्या रूपातरित कथा अवश्य पहाता येतील.

यापैकीं काहीं कादबऱ्यावर मामा वरेरकराच्या लेखनाची छाप पडलेली दिसून येते, तर काहींच्यावर फडक्याच्या लेखनाचा सस्कार घडलेला आढळून येतो. म्हणजे काहींनीं वरेरकराच्या कादबऱ्यातील सुधारणाप्रिय वृत्ति व ध्येयवाद उचललेला आहे, तर काहींनीं रचना व वर्णन पद्धतीच्या बाबतींत फडक्याची लेखन पद्धति स्वीकारलेली दिसते तरीपण स्त्रियानीं या प्रातात जें लेखन केलें आहे त्यात स्त्रीजीवनविषयक म्हणून जी वेगळी दृष्टि वापरलेली आहे ती कोठेंच लपलेली नाहीं.

इ. स. १९२० नतरच्या कालखडात एकदरीनें कादबरी वाङ्मयाच्या प्रातात जो विकास घडून आला आणि ज्या प्रकारचें वळण या वाङ्मयप्रकारानें उचललें, त्याबद्दल मराठींतील एक श्रेष्ठ कादबरीकार कै वा. म जोशी यानीं आपल्या " विचार सौंदर्यात " सागितलें आहे कीं—

" हरिभाऊ आपट्यानीं मराठी कादबरीला अद्भुततेच्या बालोचित कल्पना विहारापासून परावृत्त करून वास्तवतेच्या भूमिकेवर आणून तेथील रमणीय, चिंत नीय व लक्षणीय दृश्याचा तिला नाद लाविला, आणि तिच्या क्रीडेला व्यवस्थित, कलायुक्त व विचारगर्भ स्वरूप दिलें नतर " रागिणी "नें तिला काहींसें अतर्मुख करून किंचित् गभीर स्वरूपाच्या अत कलहाकडे मधून मधून लक्ष देण्याचा थोडासा नाद लाविला प्रो फडके यानीं तिची सुशिक्षित श्रीमताशीं ओळख करून देऊन सुसस्कृत प्रेमलीला तिला शिकविल्या, आणि त्यानीं तिची कलादृष्टि विशेष जागरूक व आग्रही केल्यानें कलानैपुण्यामुळें उत्पन्न होणारी " जादुगिरी " तिच्या डोळ्या पुढें चमकू लागली खाडेकरानीं उपमा उत्प्रेक्षादि अलकारानीं तिला सजविली, पण अलकारोन्मत्त न करता तिला जीवनाकडे केवळ क्रीडादृष्टीनेंच नव्हे तर हळुवार चित्तानें पाहाण्याची सवय लावली ना ह. आपटे यानीं तिला ससारविषयक सदुपदेशाचे पाठ दिले. विभावरी शिरूरकरनें तिला लालित्ययुक्त औचित्याभाव

# सौ. कुमुदिनी रांगणेकर–प्रभावळकर

इ स १९३० च्या आसपासचा काळ असा होता की, त्यावेळीं स्त्रियांचें शिक्षण वेगानें वाढू पहात होतें. पुरुषाच्या बरोबरीनें काहीं काम करण्याची जिद्द स्त्रिया बाळगून होत्या पुरुषमंडळी लेखन करतात तसें लेखन करावयाची त्यांची आशा आकांक्षा होती त्यामुळें स्वाभाविकच पुरुषी थाटाच्या लेखनाचा छाप त्यांच्या अनुकरणाच्या प्रवृत्तीमुळें त्यांच्या लेखनावरहि पडत असे कुमुदिनी प्रभावळकर–रांगणेकर–ह्या लेखिका याच प्रकारच्या लेखन करणाऱ्यांपैकीं एक होत त्यांनीं त्या मानानें आजवर पुष्कळच लेखन केलेलें आहे

कर्तव्याची जाणीव ( १९३२ ), अनियमित जग ( १९३४ ), निर्माल्या तील कळी ( १९३५ ), शकुनी मोहर ( १९३७ ), एकेरी गाठ ( १९३७ ), निसर्गाचा नियम ( १९३७ ), कुस्करलेलं हृदय (१९३८), कल्पना (१९३८), बेसूर संगीत ( १९३८ ), पुष्प–पराग ( १९३८ ), रस्सीखेंच ( १९३९ ), विरलेलं वस्त्र ( १९४० ), परतदान ( १९४३ ), मनीषा ( १९५४ ), पुनर्जीवन ( १९५४ ), माळावरील फूल ( १९५४ ), प्रीतीचा गोल घुमट ( १९५७ ), छाया प्रकाश ( १९५८ ), आणखी उठाठेव ( १९६१ ) या कुमुदिनीबाईंच्या एकूणवीस कादंबऱ्या आहेत !

या कादंबऱ्यांचे विषय अनेक आहेत आईवडिलांची आपल्या मुलीला आंतरजातीय विवाह करण्यास मिळणारी कर्तव्यदक्ष अशी मोकळीक, मूल्यभावापेक्षा प्रेमभावाचें माहात्म्य अधिक असतें, पैशापेक्षा प्रीति श्रेष्ठ ठरते, वेश्येच्या अपत्य जीवनातील शीलाचें महत्त्व, घटस्फोट, विषम विवाह, निसर्गाची हार, प्रीति व मोह, मत्सर, स्त्रीत्वाचें सौंदर्य, रहस्यमय जीवन, विशुद्ध प्रीति, विनोद जोडपें आणि विनोदी जीवन इत्यादि अनेक विषयांनीं कुमुदिनीबाईंच्या या कादंबऱ्या नटलेल्या आहेत

अशा सामाजिक कादंबऱ्यांच्या जोडीलाच कुमुदिनीबाईंनीं " शकुनी मोहोर " ही ऐतिहासिक कादंबरीहि लिहिलेली आहे या कादंबरींत अठराव्या शतकातील रजपुतांचें जीवनचित्रण आलें असून त्या काळाला साजेल असा रण संग्रामहि आलेला आहे आपल्याच विश्वासघातकी वाटणाऱ्या माणसाबरोबर मनाच्या दुबळेपणामुळें विवाहबद्ध होणारी नायिका लेखिकेनें येथें रंगविलेली आहे !

कुमुदिनीबाईंची भाषा चटकदार आणि सहजसुलभ झालेली आहे कथा नकाच वैशिष्ट्यपूर्ण विषय निवडण्यात त्यांची चांगलीच हातोटी दिसून येते. विषयाबद्दल त्यांना वाटत असलेली सहृदयता त्या विषयाच्या झालेल्या मांडणीवरून दिसून आल्याविना रहात नाहीं मात्र कुमुदिनीबाईंच्या या लिखाणात स्त्रीच्या लेखणीचें म्हणून वेगळें असें वैशिष्ट्य फारसें सापडत नाहीं !   ● ● ●

आजवरच्या लेखिकानी निर्माण केलेल्या वाङ्मयात महसा न आढळणारे समरप्रसग व पुरुप पात्राचें उत्तम प्रकारचें स्वभावलेखन या गोष्टी येथें बऱ्याच प्रमाणात दिसून येतात.

आनदीबाईंनी समरप्रसग रेखाटण्यात दाखविलेले अप्रतिम कौशल्य "उर्मिले" मधील "काळरात्र" या प्रकरणात दिसून येईल. निसर्गाच्या क्रौर्याच्या पार्श्वसगीतावर मकरदाच्या कृष्णकृत्याचें रेखाटलेलें चित्र या दृष्टीनें खरोखरच अत्यत उल्लेखनीय असें आहे या ठिकाणीं काहीं भयकर वाटणारे प्रसग स्त्रीहृदयातून फारसे आविष्कृत होत नसले, तरी ते जेव्हा आविष्कृत व्हाव याचा प्रयत्न करतात, तेव्हा किती कुशलतेनें प्रगट होतात, याची कल्पना येते

एखाद्या व्यक्तीविषयीं स्त्रीच्या हृदयात प्रेम निर्माण झालें आणि ती व्यक्ति सहजासहजीं तिला आपलीशी करता आली नाहीं, तर त्या व्यक्तीच्या प्राप्तीसाठीं ती किती सकटें निर्माण करते आणि आपणहून त्यात उडी टाकून कशी बाहेर पडू शकते, याचें चित्र लेखिकेनें "जगद्वी बडखोरी" चित्रित करताना मल्लिकेच्या द्वारें रेखाटलें आहे

आनदीबाईच्या लेखणींतून उतरलेलें विविध पात्राचे स्वभावलेखन अतिशय हृदयस्पर्शी आणि परिणामकारक झालेलें आहे पाश्चात्य जीवनाशीं एकजीव झालेली परतु परिस्थितीनें बदलेली उर्मिला असहाय स्थितीत असता प्रथम तिला गावरान वाटणारा सदानद जेव्हा ती जवळून पाहते व त्याचे विशाल अत करण जाणते तेव्हाची विश्वासानें त्याच्या खाद्यावर मान टाकणारी उर्मिला आनदीबाई जेव्हा जिव्हाळ्यानें रगवितात, तेव्हा पुरुषाच्या ठायीं असणारा सद्भावहि त्या विसरत नाहींत हें विशेष होय विद्येनें विभूषित असूनहि साधी रहाणी पत्करलेला, शेतकरी जीवन जगणारा, सर्वांना आपल्या प्रेमळ वागणुकीनें हवा हवासा वाटणारा, मकरदाच्या द्वेषाला न जुमानता त्याला सुसरीच्या तडाख्यातून सोडविताना जिवावरचा प्रसग ओढरून वागणारा, सुधाताईंशीं बधूच्या नात्यानें अगदीं मोकळ्या मनानें वागणारा आणि अखेरीस अविवाहित स्थितींत माता होऊ पहाणाऱ्या उर्मिलेला प्रेमानें जवळ घेऊन आणि तिला आपल्या विशाल अत करणाचा आधार देत "पण मी तुला पतित समजतच नाहीं" असें आपुलकीन सागणारा थोर अत करणाचा सदानद आनदीबाईंनी खरोखरच फार चागल्या प्रकारें रगविलेला आहे मकरदासारखा खलनायकहि लेखिकेच्या लेखणींतून तितक्याच प्रभावानें उतरलेला आहे.

स्त्रियामध्यें असणारे दोष उघडपणें उर्मिलेसारख्या स्वभावरेखाद्वारें माडून आनदीबाईंनीं स्त्रियाच्या लेखनाला वास्तवतेचें मैदान आणखीनच खुलें करून ठेविलें आहे त्याचप्रमाणे मुख्य कथानक व उपकथानकें याची सुदर सागड लेखिकेनें घालून दाखविलेली आहे.

• • •

पण छे, अरविंदाचें समाधान झालं नाहीं जोरानें शोषण करूनहि त्याचें समाधान झालें नाहीं तिचेंहि समाधान झालें नाहीं तिचें सर्वांग विचलित झालें डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहू लागले ती हताश झाली ' नाहीं अचल, मातेचा पान्हा यायला फार मोठी किंमत द्यावी लागते आपल्याच देहात्म्याची ती एवढीशी दुसरी प्रतिमा अंगाला बिलगली असता, निर्माण होणारी आत्मीयता—ममता—मातृत्व—अशा कृत्रिमतेनें जोडून उत्पन्न नाहीं होणार मग काय करू ? माझ्या चित् शक्तींचा गोळा—माझा मुलगा—माझ्या जीवनाचं सारसर्वस्व ओतलेला माझा अरविंद मला हवा आहे " ती अगदीं परकेपणानें मांडीवरील मुलाकडे पहात होती तो रडत होता ती शून्य मनानें हळूहळू मांडी हलवीत होती त्याच्या रडण्याचे सूर तिच्या कानात घुमायचे, तिच्या हृदयात पीळ पाडायचे, तिची चेतना ठिकाणावर नव्हती "

" विरलेलें स्वप्न " ( १९३५ ) ही विभावरीबाईंची दुसरी कादंबरी परंतु या पुस्तकाला कादंबरी न म्हणता लेखिकेनेंच दैनंदिनी म्हटलं आहे पात्राच्या स्वतंत्र आत्मविष्कारामधून या कादंबरीची रंगसंगती घडलेली आहे प्रेम-भंगासारख्या दु:खात्मक घटनेवर हा कथाभाग आधारलेला आहे भावकथा म्हणून हल्लीं जो कथाप्रकार मराठी वाङ्मयात रूढ होत आहे त्याप्रकारची ही लेखन पद्धति आहे

विभावरीबाईंच्या या कलाकृतींत भावनांचा जो आविष्कार झाला आहे, त्याचें स्वरूप बऱ्याच अंशीं काव्यमय आहे सर्वसामान्य माणसापेक्षा बुद्धिमान माणसांचें विचारच येथें अधिक आढळतात

स्त्रीच्या दृष्टिकोनातून रंगलेलें हें रोहिणीचें जीवन विभावरीबाईंनीं खरोखरच हृदयंगम रीतीनें व्यक्त केलें आहे वैराग्यचे विचारहि असेच चित्ताकर्षक झालेले आहेत

" बळी " ( १९५० ) ही विभावरी शिरूरकराची अगदीं अलीकडची कादंबरी त्यांच्या मागच्या दोन्ही कादंबऱ्यांपेक्षा निराळी आहे या कादंबरींत लेखिकेनें बहुजनसमाजाच्या खालच्या थरात असणाऱ्या मांग गारुडी जीवनाचें चित्रण केलेलें आहे मांग गारुड्याच्या जीवनाची भरपूर माहिती येथे आलेली असली, तरी म्हणावी तशी कलात्मक घडण तिच्याभोंवतीं निर्माण झालेली दिसत नाहीं

पण या कादंबरींतील वातावरण मात्र एखाद्या प्रबंधासाठीं भरपूर प्रमाणांत गोळा केलेली माहिती एकत्र गोवून द्यावी तसें वाटतें ! तरीपण अगदीं मागास-लेल्या मांग गारुड्यासारख्या जमातीचा सूक्ष्म रीतीनें अभ्यास करून प्रवृत्त्या चोर म्हणून समजल्या गेलेल्या लोकांच्या जीवनावर केलेलें लेखन म्हणून ' बळी ' उल्लेखनीय होईल या कादंबरींतील उदार वात्सल्याच्याच भावनेनें चितारलें

# विभावरी शिरूरकर

स्त्रियांच्या मनामध्यें ज्या बऱ्यावाईट अशा सर्वप्रकारच्या भावना येतात, त्यांचें अगदीं वास्तव स्वरूप निःसंकोचमनानें चित्रित करण्याबद्दल विभावरी वाङ्मयाचें वैशिष्ट्य आहे. चार माणसांत आपलें लिखाण वाचलें जाणार तेव्हां स्त्री स्वभावाला धरून ठराविक मर्यादेपर्यंतच लेखनांतील विषयाचा उठाव करण्याची जुनी पद्धत होती. त्या काळात स्त्रीला पुरुषांच्या बरोबरीनें समाजांत स्थान दिलें जात नसे. त्यामुळे स्त्रीच्या विचारांत आणि आचारांतहि संकोच निर्माण झालेला होता. त्याचा परिणाम अर्थात् वाङ्मयावरहि झालाच. पण नंतरचा काळ बदलला. स्त्रिया सुशिक्षित झाल्यामुळें आणि परदेशातील स्त्रीजीवनाचा त्यांनीं ग्रंथावरून अभ्यास केल्यामुळें त्यांच्यामधील "आपण एक स्त्री आहोत" म्हणून असलेली संकोच वृत्ति अजून मर्यादशील अवस्थेंत असली तरी कमी होत चालली आहे. त्यामुळे स्त्रीच्या मनात परिस्थितीने निर्माण झालेल्या आघातांनीं होणारी विचाराची खळबळ वास्तव स्वरूपात रंगविण्याची ताकद स्त्रीच्या लेखणींत येऊं लागली आहे. विभावरी वाङ्मयानें अशा प्रकारचें लेखन बेधडकपणे केलें आणि स्त्रीच्या मनांतील खरीखुरी भावना उघड बोलून दाखविण्याची कला आत्मसात् करून तिचा आविष्कार आपल्या लेखनांतून केला. "हिंदोळ्यावर" (१९३४) या कादंबरीकडे या दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्याचें प्रत्यंतर आल्यावांचून रहात नाहीं.

ही कादंबरी कथानकाच्या दृष्टीनें जितकी आकर्षक आहे, तितकीच ती तिच्यांत दिसून येणाऱ्या लेखन गुणांनींहि चित्तवेधक झालेली आहे. प्रसंग-लेखन, स्वभावलेखन, वर्णनशैली आणि आकर्षक भाषा या विविध अंगांनीं ह्या कादंबरीची परीक्षा केली, तरी ती सरस आहे असाच निर्वाळा द्यावा लागेल.

या कादंबरींत विभावरीबाईंनीं नवऱ्यानें टाकलेल्या अचला नामक स्त्रीची कहाणी दिलेली आहे. अशा स्थितींत "अचले"च्या मनात चाललेलें द्वंद्व येथे लेखिकेनें फार मार्मिक रीतीनें दाखविलें आहे. निसर्गनियमाना धरून होणारें "अचले"चें वागणें स्वाभाविक घडत जातांनाच येथें दिसून येतें.

हें लेखन एका स्त्रीच्याच लेखणींतून उतरलें आहे असें निश्चितपणें म्हणतां येईल असा हा प्रसंग पहा—

"अचलेने सभोंवार पाहिले. राधिकेला यायला अवकाश होता. तिनें झटकन् अरविंदाला आपल्या मांडीवर घेतलें. अरविंदानें "उंहु उंहु" केलें. सावन्न मिळालें कीं झालें. त्याला आईत व इतरांत फरक कळत नव्हता. खायला देते ती आई. त्या ओठाच्या स्पर्शानें अचलेच्या अंगावर रोमांच आले. सर्व अंगांतून वसल्या तरी लहरी एका ठिकाणीं केंद्रित झाल्या. तिनें डोळे घट्ट मिटले. पण—

परंतु कि येकदा जें व्यक्त करावयाचें आहे तें स्पष्ट करून सांगण्याची दखल त्यांनीं घेतली नसल्यामुळें 'निखळलेल्या हिरकणी' चा व्हावा तसा परिणाम वाचकाच्या मनावर होऊं शकत नाहीं. म्हणजे या कादंबरींत लेखिकेनें रंगविलेला एका तरुण मुलीच्या ठिकाणाचा अपवादात्मक न्यूनगंड वाचकाच्या मनाची पकड घेऊं शकत नाहीं त्यामुळें अशा लेखनात अनुभूतीचा अपुरेपणा जाणवतो रचना सौष्ठवहि नजरेंत भरत नाहीं

"माळरानात" ही कादंबरीहि राजकीय वातावरणावर आधारलेली अशी आहे. राजकारणाच्या क्षेत्रात आढळणाऱ्या निवडणुकी, प्रचार वगैरेंचा येथें भरपूर वापर आढळतो वकिली न चालणारा श्रीधर राष्ट्रभक्त बनून बेकार जीवन कसा जगतो, ते येथें दिसून येतें. कथानकाच्या दृष्टीनें या कादंबरीचा नंबर बराच खालीं लागेल.

कथानकाच्या दृष्टीनें गीताबाईंची "ललिता" ही कादंबरी चांगली आहे. हें कथानक साधें असलें तरी मनोहर आहे. परंतु "आयुष्याचा गाडा तो यदृच्छेने जाईल तिकडे जाऊ देत होता. पैसे मिळाले तोंवर शिकला, नोकरी दिसताच त्यानें ती घेतली. दुसऱ्यांनीं लग्न ठरविताच हा बोहल्यावर उभा राहिला. वादळी वाऱ्याची झळ त्याला नव्हती. शिक्षणसनात अगूनहि विचाराच्या मान्यातून तो सुटला होता पत्नी या वस्तूचा त्यानें कधीं विचारच केला नव्हता. त्याला आत्मपरीक्षण माहीत नव्हतें व तत्त्वज्ञानाची मुळींच आवड नव्हती." लेखिकेनेंच वर्णन केलेल्या नीलकंठाच्या अशा स्वभाव परिवर्तनामुळें एक मोठा दोष येथें निर्माण झाला आहे. एकच व्यक्ति दोन भिन्न स्वरूपात कशी वावरू शकते हें मोठें गूढच आहे आणि तिनें तसें का वागावें याचेंहि लेखिकेनें स्पष्टीकरण दिलेलें नसल्यानें गोंधळागोंधळ निर्माण झालेला आहे.

गीताबाईंच्या कादंबऱ्यांची अशी ओळख करून घेतल्यानंतर त्यांच्या लेखनाचा डोळ्यात भरणारा व उठून दिसणारा प्रमुख गुण म्हणजे त्यांनीं आपल्या वाङ्मयाची केलेली सुरुवात आणि शेवट हा होय. विस्मय आणि उत्कंठा वाचकाच्या मनात एकसारखी कार्य करीत असली, तरच त्या ललित कलाकृतीचें खरें यश लेखकाच्या पदरात पडतें, असा सर्वसामान्य नियम आहे. लेखन विषयात प्रवेश करताना वाचकाचें लक्ष चटकन् आपल्याकडे वेधून घेणें आणि अखेरीस आणखी आता पुढें काय झालें असेल अशी हुरहूर त्याच्या मनात रहाणें असें लेखन करण्यातच लेखकाचें खरें यश दिसून येतें गीताबाई त्या दृष्टीनें बऱ्याच भाग्यवान् ठरलेल्या आहेत.

• • •

गेलेलें आबाच्या जीवनाचें चित्रण सुंदर झालें आहे. या कादबरीचा आणखी एक ठकळ विशेष म्हणजे यात प्रकट झालेले वात्सल्य जेवढें गाढ आहे तितकीच त्यात तटस्थता व अलिप्तताहि आली आहे ! त्यामुळें आबाचें चित्रण हें एका जमातीचें प्रातिनिधिक चित्र म्हणूनच नव्हें, तर मानवी जीवनातील एका घोर व मूलभूत समस्येची अभिव्यक्ति करणारें चित्र म्हणून ठळकपणे नजरेंत भरते.

मनोवृत्तींमधील या भिन्नतेबरोबरच या कादबरींतील विभावरींची भाषा पूर्वींच्या मानाने बरीच साधी झालेली आहे. तसेंच पूर्वींच्या त्यांच्या लेखनातील हळुवार रेखीवपणानें इथे काटेकोरपणा पत्करलेला आहे. इथला सूक्ष्म पण तीव्र उपरोध पूर्वींच्या उफाळलेल्या व्याख्यानबाजीपेक्षा उल्लेखनीय आहे. इथली विचार-सरणी अग्रसेर आहे. तरी परतु विभावरींच्या पूर्वींच्या लेखनातील चित्तवेधक रचनासौष्ठव स्त्रीजीवनातील खळबळजनक उठावदार चित्रण व स्त्रीच्या लेखणीचें वैशिष्ट्य मात्र येथें आढळून येत नाहीं. त्याचप्रमाणें श्री. रणजित देसाई याच्या अशाच विषयावरील " बारी " या कादबरीचें सर्वांगीण वैशिष्ट्यहि येथें दिसून येत नाहीं.

• • •

## गीता साने

निखळलेली हिरकणी ( १९३६ ), हिरवळीखालीं ( १९३६ ), वठलेला वृक्ष ( १९३६ ), लतिका ( १९३७ ), वादळापूर्वी ( १९३७ ), आविष्कार ( १९४६ ), माळरानात ( १९४६ ) व दीपस्तंभ (१९४९ ) या कादबऱ्या गीता साने यानीं लिहिलेल्या आहेत. त्यांच्या लेखनाचा भार मनोविश्लेषणावर त्यानीं अधिक ठेवलेला असल्यामुळें मनोलेखनाची व स्वभावलेखनाची कला त्याना चागलीच साधलेली आहे. त्यानीं आपल्या कादबरींतील निरनिराळ्या प्रकरणाना वेगवेगळीं नावें दिलेलीं असून कादबरीचे आकर्षण वाढविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. रचनासौष्ठवाच्या दृष्टीने त्याचें लेखन तितकेंसें यशस्वी झालेलें दिसून येत नाहीं. परतु त्यांच्या लेखनाला आरभापासूनच लाभलेला साधेपणा व रोखठोकपणा मात्र परिणामकारक झालेला आहे. तसेंच त्यांच्या वृत्तीमधील वस्तुनिष्ठा व स्त्रीजीवनविषयक आकसहि अधिक उल्लेखनीय आहे.

स्त्रीजीवनाला आवश्यक वाटणाऱ्या स्वातत्र्याच्या विचारावर आधारित लेखन गीता साने यानीं केलेलें आहे. त्यांच्या लेखनानें राजकीय विचारप्रणालींचा विचार केला आहे. सामाजिक जीवनाच्या मनोविश्लेषणावर त्यानीं भर दिला आहे. स्त्रीजीवनाकडे त्यानीं जिव्हाळ्यानें पाहिलेलें आहे.

परंतु कित्येकदा जें व्यक्त करावयाचें आहे तें स्पष्ट करून सांगण्याची दखल त्यांनीं घेतली नसल्यामुळे 'निखळलेल्या हिरकणी' चा व्हावा तसा परिणाम वाचकांच्या मनावर होऊं शकत नाहीं म्हणजे या कादंबरींत लेखिकेनें रंगविलेला एका तरुण मुलीच्या ठिकाणाचा अपवादात्मक न्यूनगंड वाचकांच्या मनाची पकड घेऊं शकत नाहीं त्यामुळे अशा लेखनात अनुभूतीचा अपुरेपणा जाणवतो रचना सौष्ठवहि नजरेंत भरत नाहीं

"माळरानात" ही कादंबरीहि राजकीय वातावरणावर आधारलेली अशी आहे राजकारणाच्या क्षेत्रात आढळणाऱ्या निवडणुकी, प्रचार वगैरेंचा येथें भरपूर वापर आढळतो वकिली न चालणारा श्रीधर राष्ट्रभक्त बनून बेकार जीवन कसा जगतो, तें येथें दिसून येतें कथानकाच्या दृष्टीनें या कादंबरीचा नंबर बराच खालीं लागेल

कथानकाच्या दृष्टीनें गीताबाईंची "लतिका" ही कादंबरी चांगली आहे हें कथानक साधें असलें तरी मनोहर आहे परंतु "आयुष्याचा गाडा तो यदृच्छेनं जाईल तिकडे जाऊं देत होता पैसे मिळाले तोंवर शिकला, नोकरी दिसताच त्यानें ती घेतली दुसऱ्यानीं लग्न ठरवितांच हा बोहल्यावर उभा राहिला. वादळी वाऱ्याची झळ त्याला नव्हती शिक्षणसत्रात असूनहि विचाराच्या मान्यापासून तो मुक्त होता पत्नी या वस्तूचा त्यानें कधीं विचारच केला नव्हता त्याला आत्मपरीक्षण माहीत नव्हतें व तत्त्वज्ञानाची मुळींच आवड नव्हती" लेखिकेनेंच वर्णन केलेल्या नीळकंठाच्या अशा स्वभाव परिवर्तनामुळें एक मोठा दोष येथें निर्माण झाला आहे एकच व्यक्ति दोन भिन्न स्वरूपात कशी वावरू शकते हें मोठं गूढच आहे आणि तिनें तसें का वागावें याचेंहि लेखिकेनें स्पष्टीकरण दिलेलें नसल्यानें सावळागोंधळ निर्माण झालेला आहे

गीताबाईंच्या कादंबऱ्याची अशी ओळख करून घेतल्यानंतर त्यांच्या लेखनाचा डोळ्यात भरणारा व उठून दिसणारा प्रमुख गुण म्हणजे त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांची केलेली सुरवात आणि शेवट हा होय विस्मय आणि उत्कंठा वाचकाच्या मनात एकसारखी कार्य करीत असली, तरच त्या ललित कलाकृतींचें सरें यश लेखकाच्या पदरात पडतें, असा सर्वसामान्य नियम आहे लेखन विषयात प्रवेश करताना वाचकाचें लक्ष चटकन् आपल्याकडे वेधून घेणें आणि अखेरीस आपली आता पुढें काय चालें असेल अशी रुखरुख त्याच्या मनात रहाणें असें लेखन करण्यातच लेखकाचें खरें कसब दिसून येतें गीताबाई त्या दृष्टीनें बऱ्याच भाग्यवान् ठरलेल्या आहेत

• • •

# सौ. शांताबाई नाशिककर

एक सहृदय लेखिका म्हणून शांताबाई नाशिककर यांचा लौकिक आहे. स्त्रीजीवनात येणाऱ्या बऱ्यावाईट प्रसंगाचें मनोवेधक चित्रण करण्यात त्यांची लेखणी बरीच वाकबगार आहे. स्त्रियांच्या प्रश्नासंबंधीं, स्त्रीच्या दृष्टिकोनातून विचार करून त्यांनीं लेखन केलें आहे. त्यामुळें त्यांच्या लेखनात सहजता आणि सहृदयता हे दोन गुण विशेष सान्ध्यानें आढळतात. आजपर्यंतचें स्त्रियांचें समाजातील स्थान ध्यानात घेणें व अनुषंगानें त्याच आपल्या लेखनात चित्रण करीत असतानाच क्रांतिकारक विचाराची पेरणी करणे या बाबतींत शांताबाईंनीं बरेंच कौशल्य दाखविलेलें आहे. पुरुषांच्या बरोबरीनें आम्ही लेखन करू शकतों या हिरीरीनें आपल्या लेखनाकडे त्यांनीं पाहिलें आहे असें दिसत नाहीं. पुरुषांचे अनुकरण केवळ न करता त्यांनीं स्त्रियांचे प्रश्न किंवा काहीं सामाजिक प्रश्न स्त्रीच्याच भावनेनें रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. या दृष्टीनें पाहिलें तर " माझी थोरीच लेणीं " ( १९४३ ) ही शांताबाईंची कादंबरी सर्वोत्कृष्ट ठरेल. या कादंबरीच्या बाबतींत स्वतः लेखिकेनेंच म्हटल्याप्रमाणें ती एक आत्मचरित्रवजा कादंबरी आहे. प्रकाशकांनीं नमूद करून ठेवल्याप्रमाणे " ही कादंबरी म्हणजे गेल्या पिढीतील सुखवस्तु आणि सुधारक अशा मध्यमवर्गांतील स्त्रीचें आत्मचरित्र आहे. महाराष्ट्रीय मध्यम वर्गाच्या गेल्या पन्नास वर्षांचा सामाजिक इतिहास त्यात आपोआपच चित्रित झाला आहे आजच नव्हे तर पुढें केव्हाहि ही कादंबरी वाचणाराला गेल्या अर्धशतकातील महाराष्ट्रीयांचे आचारविचार, राहाणी, सामाजिक रूढि, विधवा स्त्रियांची परिस्थिति, त्यांच्याकडे पहाण्याचा समाजाचा दृष्टिकोन इत्यादींची उपयुक्त आणि मनोरंजक माहिती मिळण्यासारखी आहे. "

कादंबरीला आवश्यक असणाऱ्या कोणत्याहि अंगातून या कादंबरीकडे पाहिलें तरी शांताबाई यशस्वी झालेल्या दिसतात.

समाजजीवनाचें एक चित्र या दृष्टीनें कादंबरीकडे पुष्कळदा पहाण्यात येते. आणि स्त्रियांनीं केलेल्या लेखनात या सामाजिक जीवनाचा विशेष आविष्कार घडलेला दिसून येतो.

मुकुंदराव, सुमति, ताई व इंदिराबाई यांचीं स्वभावचित्रें चांगलीं झालेलीं आहेत. स्त्रीजीवनातील घडामोडींचा धावता इतिहास सुमतीच्या स्वभावचित्रात उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झालेला आहे. प्रेमविवाह, पुनर्विवाह, द्विभार्याविवाहाचा प्रश्न आणि समाजकार्य या विविध प्रकारामधून मुकुंदराव आणि सुमति यांच्या जीवनातील महत्त्वाचा भाग रंगविला गेला असून तो चटकदार झाला आहे.

शांताबाईंची भाषा येथें अतिशय सफाईदार, घरगुती आणि ओघवती झालेली आहे. लेखिकेची वर्णनशैली चटकदार असून त्यांनीं म्हटल्याप्रमाणें ही

कादंबरी वाचीत असताना " काळाच्या डोंगरात प्रत्येक जीव आपल्या जीवनाची बरी वाईट लेणीं खोदून ठेवीत असतो डोंगराच्या उदरात ताऱ्याप्रमाणें अगणित लेणीं खोदलेलीं आहेत

सर्वच आकाशातील तारे म्हणजे देवदेवतांचीं लेणीं असतील का? असेलहि तसें. स्वर्गातल्या देवदेवतांचीं लेणीं आकाशाच्या डोंगरात आणि आमचीं लेणीं पृथ्वीवर " या कल्पनेचा आस्वाद घेण्याचा मोह अनावर होतो आणि अखेरीस लेखिकेनें कोरून ठेवलेलें हें मानवी जीवनाचें लेणें खरोखरच हृदयगम झालें आहे, अशी मनाची खात्री पटते

ध्येयवादी कौस्तुभ आणि कर्तव्यापेक्षा प्रेम श्रेष्ठ मानणारी कीर्ति याच्या जीवनसत्रावर आधारलेली " कीर्ति " ( १९४२ ) ही शाताबाई नाशिककराची दुसरी एक कादबरीहि वैशिष्टयपूर्ण झाली आहे. येथेहि लेखिकेची वर्णनशैली चागली असून स्वभावलेखन उठावदार झालेलें आहे. भाषा साधी व घरगुती असली तरी सस्कृत वाङ्मयाचा पगडा लेखिकेच्या मनावर बराच बसला असावा, असें पुढील प्रकारच्या वर्णनावरून दिसून येतें—' उन्हातान्हात हिंडून श्रम केल्यामुळें त्याचें श्यामलवर्ण झालेलें मुख आता वेदना जर्जरतेमुळें एखाद्या जलहीन पाडुर मेघखडाप्रमाणें दिसत होत "

या कादबरींतील सर्व वातावरण श्रीमती थाटाचें असून त्यात सुखभानी माणसें आलेलीं आहेत. त्यामुळें हें जीवनचित्र सर्वसामान्य मध्यमवर्गानें दिसत नाहीं. वाचकाला परिचित अशा जगापासून आपण थोडें दूर जात आहोंत असें वाटण्याचा सभवच येथें अधिक त्याचप्रमाणें अस्पृश्योद्धाराचा प्रश्न थोडया प्रमाणात का होईना हाताळण्यासाठीं दादासाहेबाना अस्पृश्य बनविलें असावें अशी दाट शका मनात येते. या कादबरींतील वैवाहिक समस्या व आदर्शवाद यात मात्र अगदींच कृत्रिमता आलेली दिसून येते

" चिखलातलें कमल " या कादबरींत शाताबाईंनीं अविवाहित मातेच्या मुलीशीं चागल्या घराण्यातील मुलाचा प्रेमविवाह घडत असल्याचें दाखविलें आहे समाजाला सुखासुखी न पटणाऱ्या प्रश्नाला लेखिकेनें हात घातला आहे. त्या दृष्टीनें येथे विषयाचें वैशिष्टय दिसून येतें.

" लग्नाच्या बाजारात " शाताबाईंनीं समाजातील हुडयाची घातुक पद्धति, समाजाकडून विधवाचा होणारा छळ आणि विवाहित अशा हिंदु स्त्रीचें दुबळें जीवनचित्र यांचीं हृदयस्पर्शी चित्रें रेखाटलेलीं आहेत.

शाताबाईंची " हाच का धर्म " ही कादबरी हिंदु समाजात आढळून येणारी प्रचलित रूढि, आचार, विचार व विधी इत्यादींच्या आधारानें कथानकाची गुफण करून " 'हिंदुधर्म' म्हणून ज्याला आपण समजतों तो हाच का ? " असा प्रश्न वाचकासमोर टाकून विचार करावयास लावते.

सामाजिक कादंबऱ्याबरोबर शाताबाईंनी काहीं ऐतिहासिक कादबऱ्याहि लिहिल्या आहेत.

" साम्राज्यासाठीं " या कादबरींत इतिहास प्रसिद्ध अशा मध्वाचार्यांच्या साहाय्यानें व सल्ल्यानें नरसिंगरायानें पट्टारायाला मारून विजय नगरच्या साम्राज्य-गादीवर शिवरायाला स्थापन केल्याचा कथाभाग आहे.

" कौमुदी " मध्यें विमनगरचे राणा चद्रसेन आणि कमलपूरचा राणा रामसिंग याची नात व सुवर्णगिरीच्या कृष्णरायानें अपत्यवत् प्रेम करून वाढविलेली कौमुदी याच्या प्रेमविवाहाचें चित्र आलेलें आहे.

ऐतिहासिक कादंबरीस आवश्यक असलेला सत्य स्वरूपातील इतिहास आणि तो चटकदार बनविण्यासाठीं लागणारें कलाकौशल्य लेखिकेनें या ललित-कृतींत फार चागलें दाखविलें आहे. या कादबरींत कथानकाला धरून आलेला बारीक सारीक भाग वाचीत असताना लेखिकेच्या इतिहासाच्या सखोल अध्ययनाची प्रचीति येते.

ऐतिहासिक कालाला अनुसरून त्यावेळचा रजपुताचा आणि मुसल्मानाचा परस्परासबधींचा द्वेषभाव आणि रजपुताची आपआपसातील लढाई येथें लेखिकेनें रगविलेली आहे. परतु सारे वातावरण काहीं तुरळक भाग सोडला, तर सहजगत्या घडत गेल्यामुळें समरप्रसगानीं नटलेल्या इतिहासाला वाचक पारखा होऊन बसतो! हरिभाऊनीं आपल्यानीं खुलविलेलें इतिहासाचें प्रत्येक दालन नजरेसमोर घेतलें की, इथें फारच फिकेपणा वाटायला लागतो. घनघोर रणसग्रामाचे ताडवनृत्य दर्शविण्याची कला लेखिकेच्या ठायीं असती, तर हरिभाऊच्या बरोबरीचें स्थान त्याना प्राप्त व्हायला फारशी अडचण पडली नसती.

एकदर नाशिककरबाईंचें हें कादबरीलेखन पाहिलें म्हणजे त्यानीं केलेलीं घरगुती प्रसगाचीं चटकदार वर्णनें, साध्या व सफाईदार घरगुती भाषेचा वापर आणि विशेषत. स्त्रीहृदयात आढळून येणारें भावनाचें वादळ चटकन् नजरेंत भरतें. साध्या सुध्या चारसहा शब्दामधूनहि एखादा व्यक्ति-विशेष चित्रित करण्याचें प्रभावी साधन लेखिकेनें कौशल्यानें सपादन केलें असून त्याचा वापर करण्यातहि ती यशस्वी झाली आहे.

परिणामकारकतेच्या दृष्टीने शाताबाईंचें लेखन चागलें असलें तरी त्यात दु.खद घटनानाच विशेष स्थान दिलें गेल्याची स्पष्ट जाणीव वाचकाला व्हावी इतक्या त्या त्याच्या लेखनात आलेल्या आहेत. शिवाय मध्यम वर्गाचेंच चित्र रेखाटण्यात त्याची लेखणी प्रामुख्यानें गुतली आहे. त्यामुळें काहीं अशीं त्याचें लेखन एकागी झालें आहे असें म्हणावें लागतें. समरप्रसगाची उत्कटता जर त्याच्या लेखणीनें निर्माण केली असती, तर त्यानीं अनुभवावर आधारून केलेलें हें लेखन अधिक उठावदार झालें असतें, यात वाद नाहीं. • • •

# सौ. मालती दांडेकर

स्वत चें शालेय शिक्षण फारसे झालेलें नसतानाहि लेखनाची हौस मनात बाळगून ज्यानीं भरपूर लेखन केलेलें आहे अशा अलिकडच्या लेखिकात मालतीबाई दाडेकर याचा प्रामुख्यानें समावेश करावा लागेल

मातृमदिर ( १९४१ ), तेजस्विनी ( १९४३ ), वज्रलेप ( १९४५ ), कृष्णरजनी ( १९४७ ), काटेरी मार्ग ( १९४८ ), ससारात पदार्पण (१९४९) व हिरा आणि गारगोटी ( १९५० ) या मालतीबाईच्या कादबऱ्या आहेत. त्याच्या लेखनामागची बौद्धिक झेप व अनुभवाचें क्षेत्र तसें मर्यादित आहे. त्याचप्रमाणें आजच्या काळच्या कादबरीस आवश्यक असलेले मनोविश्लेषणहि त्यानीं हाताळलेलें नाहीं राजकारणाची जशी त्याना ओढ नाहीं तशीच ती दलित वर्गाच्या सहानुभूतीचीहि नाहीं. मध्यम वर्गातील स्त्रियाच्या वैवाहिक समस्यांचें चित्रण स्त्रीमनाच्या भूमिकेंतून करण्याचें क्षेत्रच तेवढें त्यानीं आवडीनें निवडलेलें दिसतें एवढ्या या क्षेत्रात मात्र त्याची लेखणी जाणतेपणानें व सहजतेनें वावरताना दिसून येते. घरगुती ल्हान सहान प्रसगाची जुळणी व वातावरणाची निर्मिति त्याना चागली साधली आहे.

मालतीबाईच्या कथालेखनामागें एक स्पष्ट असा हेतु दिसून येतो. तो म्हणजे त्याच्या कथा प्रश्नप्रधान आहेत हा होय म्हणजे एखादा विवाहविषयक प्रश्न त्या वाचकाच्यापुढे ठेवतात व त्या प्रश्नाच्या विविध अगाचें दर्शन निरनिराळ्या पात्राच्या वृत्तींमधून घडविण्याचा यशस्वी प्रयत्न करतात. परतु त्यामुळें त्याचें लेखन कटाळवाणें मात्र होत नाहीं. त्याचें लेखन सहानुभूतीनें माखलेलें आहे. त्याचे कादबऱ्यातील प्रश्न हे व्यवहारातील वस्तुनिष्ठेनें हाताळलेले आहेत.

स्त्रियाच्या जीवनात येणाऱ्या कठोर दु खाची कहाणी मालतीबाईनीं आपल्या कादबऱ्यामधून चित्रित केलेली आहे. या त्रिविध दु खाकडे मालतीबाईनीं अतिशय जिव्हाळ्यानें पाहिलेलें आहे आणि सहृदयतेनें लिहिलेलेंहि आहे, असें त्यानीं आपल्या प्रत्येक कादबरीस प्रस्तावादाखल लिहिलेल्या माहितीवरून दिसून येतें.

आजन्म अविवाहित राहणाऱ्या कुमारिकाचा वर्ग अलिकडे दिवसेंदिवस समाजात वाढत्या प्रमाणात दिसून येत आहे. अशाच एका समाजसेवेंत आयुष्य घालविणाऱ्या कुमारिकेच्या जीवनाची कथा मालतीबाईनीं "मीना"च्या आयुष्यात गोवून देऊन "मातृमदिरा"त सागितलेली आहे. "तेजस्विनी"त मालतीबाईनीं सन्मणावस्थेंतून जाणाऱ्या "क्षमा" नावाच्या एका ज्ञानदान घराण्यातील स्वाभिमानी, बुद्धिमान आणि तडफदार स्त्रीची कथा रगविली आहे. माणसाला आपल्या आयुष्याची नौका हाकारीत असताना पदोपदीं निर्माण होणारा भावनाचा खेळ, परिस्थितीचें बदलतें स्वरूप, आर्थिक स्थितीची चलबिचल, ९ ~

सासूशीं आणि मित्राशीं द्यावा लागणारा बरावाईट सामना इ. शीं किती धडाडीनें आणि हिंमतीनें झुजावें लागतें याची कल्पना क्षमेच्या स्वभावरेखेवरून येथें दिसून येते. अडचणींशीं झगडून आणि परिस्थितीला जिंकून जीवन यशस्वी करणाऱ्या "मीरा"चें जीवनचित्र "कृष्णरजनी"त मालतीबाईंनीं दाखविलें आहे. स्त्रीचा स्वभाव किती सोशीक असतो आणि ती किती कर्तव्यदक्ष असतें याची कल्पना "मीरा"च्या स्वभावरेखनावरून लक्षात येते. "वज्रलेप"मध्ये लेखिकेनें जुलमी विवाहाचीं कठोर व वज्रलेपवत् दुःखें मूकपणें सोसणाऱ्या "छाये"चें जीवनचित्र रेखाटलें आहे व "काटेरी मार्ग"मध्यें नवऱ्यानें टाकलेली बायको घटस्फोटाविना दुसरें लग्न करते, अशी क्रांतिकारक हकीकत दिलेली आहे.

मालतीबाईंच्या कादंबऱ्याचा हा प्रवास अशा रीतीनें मुख्यतः सामाजिक जीवनचित्राच्या मार्गावरून झालेला आहे. सामाजिक जीवनात स्त्रीच्या वाट्याला येणाऱ्या दुःखाची सागता उघड करून सागण्याचा, तिच्या मनाला त्या दुःखानें होरपळून जाताना होणाऱ्या यातनाचा, त्यानीं येथें अतिशय जिव्हाळ्यानें आविष्कार केलेला आहे. स्त्रीला सोसावे लागणारें व तिच्या मनात खुपत रहाणारें दुःख ती उघडपणें बोलून दाखविण्याचें धैर्य करीं दाखवितें, हें पहायचें असेल तर "काटेरी मार्ग"मधील विवेचन मनोवेधक ठरेल.

पुष्कळदा स्त्रियाना सासुरवास सोसावा लागतो. त्याची झळ काहीं स्त्रियाना इतकी सोसावी लागते कीं जीव नकोसा व्हावा! अशाच एका दुर्दैवी स्त्रीच्या आत्मचरित्रातील भाग "कृष्णरजनी"त मालतीबाईंनीं सुदर शब्दात्न सागितलेला आहे.

स्वभावरेखनाची कला मालतीबाईंना चागली साधलेली आहे जीवनातील बारीकसारीक सारे धागेदोरे लक्षात घेऊन मानवी मनाची घडण चितारण्याची कला त्यानीं आत्मसात् केली आहे. आणि याचें ठळक उदाहरण म्हणून "वज्रलेप"-मध्यें काढलेलें छायेचें स्वभावचित्र घेता येईल.

मालतीबाईंनीं आपल्या "मातृमंदिरा"त स्त्रीजीवनाची एक विशिष्ट बाजू दर्शविली आहे. एखाद्या व्यक्तीबद्दल तरुण मुलीला किती नितात आदर वाटू लागतो, आणि तो आपला पति व्हावा म्हणून तिच्या मनात किती उत्कंठा दाटू लागते, या गोष्टी रगवीत असतानाच, तीच व्यक्ति जर आपल्याच लहान भगिनीची प्रेममूर्ति ठरेल तर उघड्या डोळ्यानीं त्याचा संसार पहात असताना तिच्या मनाला किती यातना होतात, याची कल्पना "मीना"च्या स्वभावरेखेत मालतीबाईंनीं दिलेली आहे. परतु मुख्य गोष्ट म्हणजे आपल्या भगिनीच्या सुखासाठीं आणि स्वतःच्या सुखासाठीं म्हणून "मीना" अविवाहित राहून समाजसेवा करते, हें दाखविण्यात स्त्रीच्या हृदयातील निःसीम प्रेमाची आणि त्यागाची भूमिका विशेष सामर्थ्यानें येथें आलेली आहे. प्रा. फडक्याच्या "अटकेच्या

बंटात " नेमका याच्या उलट भाग दिसून येतो. परिस्थिति बहुतेक सारखीच परंतु अखेर मात्र वेगळी. आयुष्यभर भावांसाठीं स्वतःच्या सुखाची राखरांगोळी करणारी फडक्यांची नायिका मोहाच्या एखाद्या क्षणार्धांत विवाहबद्ध होते, याचें आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं.

मालतीबाईंची भाषा अगदीं घरगुती, साधी, सोपी आणि ओघवती आहे. परंतु एक स्त्रीच पुरुषाचेंहि जीवनचरित्र रेखाटीत आहे असा भास निर्माण करण्याइतपत ती कधीं कधीं बायकीहि होऊन बसलेली दिसते !

तथापि स्त्रीस्वभावानुसार मालतीबाईंनीं आपल्या 'मातृमंदिर' या कादंबरीमध्यें पाऊल वाटेला अंगणांतील रांगोळ्यांच्या रेघांची जी उपमा दिली आहे, ती फारच आकर्षक झालेली आहे.

• • •

## कृष्णाबाई मोटे

" माद्रू, आयुष्यात धावतां धांवता मला धाप लागली आहे. मला विश्रांतीची जरुरी आहे आणि माझ्यासारखीला ती दुसरी कशांत मिळणार ?

आतापर्यंत शीलाला तूं आपली म्हणून वाढविलीस अशीच यापुढेंहि वाढव. पण—तिला मी खरी तिची कोण हे कळावें अशी माझी फार इच्छा आहे.

तिनें " एकूण ही माझी आई होती अं ? " एवढें म्हटलें तरी पुरे ! मी तिला कशी वाढविली असती याची मला कल्पना नाहीं. पण माझें आयुष्य मी जगलें, हार खाल्ली नाहीं. वाऱ्यावादळांशीं झुंजत, हांसत मलाच खाऊं पहाणाऱ्या लाटांवर आरूढ होऊन जगलें. हा काहीं कमी अनुभव नाहीं. एवढं खरं कीं, तुझ्यांत आढळून येणारें समाधान मात्र मला कधींच मिळूं शकलें नाहीं.

माझ्याजवळ संपत्ति अशी फार नाहीं. माझें आयुष्य हीच माझ्या मुलीला फक्त शेवटची देणगी म्हणून मी तुझ्याजवळ ठेवून जात आहें."

अशा प्रकारच्या मनोवृत्तीनें लिहिलेल्या "मीनाक्षी"च्या जीविताची कहाणी चित्तवेधक रीतीनें कृष्णाबाई मोटे यांनीं "मीनाक्षीचें जीवन" मध्यें सांगितलेली आहे. या पुस्तकाचें स्वरूप आत्मचरित्रपर आहे, हें या प्रस्तावातील वरील भावनाविष्कारावरूनच दिसून येतें. या कादंबरीचें वातावरण अतिशय मोकळें असून वर्णनशैलीहि चटकदार आहे.

या कादंबरीची भाषा चटकदार आहे, वर्णनशैली आकर्षक आहे आणि भावनाविष्कारहि काळजाला जाऊन भिडणारा आहे.

• • •

# सौ. सिंधू गाडगीळ

" क्षितिजापार " ही सिंधू गाडगीळ याची भावकथावजा कादंबरी आहे. मराठी वाङ्मयात वैमानिक जीवनावर लेखन करून या लेखिकेनें आपलें एक स्वतंत्र स्थान मिळविलेले आहे. ठराविक घरगुती जीवन रंगविण्यातच बहुतेक लेखिकानीं जास्त प्रगति केली आहे, या विधानाला हा अपवाद ठरेल यात वाद नाहीं. वैमानिकविद्येशीं ऐकूनहि परिचय नसणाऱ्याच स्त्रिया अधिक. परंतु सौ गाडगीळ यानीं त्या विषयावर अभ्यास करून लिहावें, ही गोष्ट खरोखरच कौतुकास्पद आहे.

येथें लेखिकेनें इतकी चटकदार भाषा वापरली आहे आणि विमान विद्येतील इतक्या हकीकती दिलेल्या आहेत कीं, ही कथा वाचीत असताना वैमानिकाच्या खडतर जीवनाची कल्पना आल्यावाचून रहात नाहीं

जो प्रसंग समोर दिसेल तो भाडभीड न ठेवता जसाच्या तसा निर्भयपणे व नि.संकोचपणे लिहिण्यात सौ. गाडगीळ चांगल्याच वाकबगार आहेत.

शोत्रा आणि वैमानिक यांचीं स्वभावचित्रें येथें चांगलीं साधलेलीं आहेत. ब्रह्मदेश–आसामच्या सरहद्दीवरील नाग लोकांचें येथें रानटी जीवन रंगवीत असता त्या लोकांच्या काहीं चालीरीतीहि दिल्या आहेत हिंदु संस्कृतीहून त्या भिन्न असल्यामुळें वैमानिकाला वाटणारा विस्मयहि येथें उत्कटतेनें दिग्दर्शित केलेला आहे. सासरीं जाण्याची कल्पना सागताना शोत्रा म्हणते, "एक मूल झाल्याशिवाय नाहीं जात नवऱ्याजवळ नादायला आमच्यात ! .आमच्या जमातीची रीतच आहे ती ..बायकोचें मूल सभाळणें म्हणजे अनैतिक झाल वाटतें !..."

या कादंबरीचा शेवट मात्र स्वाभाविकपणें झालेला दिसत नाहीं. आपण या जगातून नाहींसे झालों आहोंत या कल्पनेनें आपल्या पत्नीनें पुनर्विवाह केला ही कल्पना न आवडून, स्वत च्या प्राणाचीहि पर्वा न करता विमान विद्येच्या प्रगतीसाठीं हा वैमानिक चंद्रलोकावर उड्डाण करण्यास प्रवृत्त झालेला लेखिकेनें दाखविला आहे !

रानटी लोकांच्या जीवनाचें चित्रण या कादंबरींत चांगलें झालेलें असून लेखिकेची भाषाहि चित्ताकर्षक व खुमारेदार आहे.

० ० ०

# प्रेमा कंटक

माणसाचा जीवनक्रम ज्या प्रकारचा असतो त्या प्रकारचा ठसा त्याच्या लेखनावर उमटणे अगदीं स्वाभाविक असतें, याची कल्पना प्रेमा कंटक याच्या

कादंबऱ्या वाचताना येते. स्वतः प्रेमा कंटक यांचें आयुष्य राजकीय जीवनात गेल्यामुळें त्यांनीं गांधीवादाचा पुरस्कार करण्यासाठीं आपलें लेखन केलें आहे.

काम आणि कामिनी ( १९३७ ) व अग्नियान ( १९४२ ) या दोन कादंबऱ्या प्रेमाबाईनीं लिहिल्या आहेत. या लेखनाची पार्श्वभूमि राजकीय आहे. यांपैकीं पहिलींत गांधीजींनीं प्रतिपादिलेल्या वैवाहिक ब्रह्मचर्याच्या तत्त्वाचें चित्रण करण्याचा प्रयत्न झाला असून दुसरींत जीवनविषयक आदर्शनिष्ठा दाखविण्याचा प्रयत्न केला गेला आहे. विषयाच्या दृष्टीनें हें लेखन तसें एकदम लक्षात येण्याजोगें असले तर रचनेच्या दृष्टीनें काहीं वेगळें तत्त्व येथें स्वीकारलेलें दिसून येत नाहीं. स्वभावलेखन किंवा व्यक्तिरेखाचें चित्रण करण्यात मात्र प्रेमाबाईनीं चांगलेंच यश मिळविलेलें आहे. विशेषतः अग्नियानमधील वहिनीचें स्वभावलेखन उठावदार व स्त्रीच्या लेखणीचें वैशिष्ट्य दर्शविणारें झालें आहे. वर वर पाहिलें तर वृत्तीनें अगदीं बेफिकीर वाटणारी वहिनी वेळप्रसंगीं अंतःकरणानें किती प्रेमळ आणि कार्यक्षम आहे याचे चित्रण लेखिकेनें मोठें सुरेख केलेलें असून तें कलापूर्णहि झालें आहे.

रोहिणीच्या या आत्मवृत्तात ( अग्नियान ) ती मॅट्रिक झाली तेव्हापासूनच्या तिच्या मानसिक उत्क्रांतीच्या व जीवनानुभवाच्या अवस्था मोठ्या समरसतेनें चितारल्या गेल्या आहेत.

या कादंबरींतील वैचारिकता, चिंतनशीलता, आदर्शवाद व वस्तुनिष्ठा याचा झालेला सुंदर समन्वय व प्रगल्भ भाषाशैली यांच्यामुळें हें लेखन भारदस्त व भरीव झालें आहे.

कथानकाच्या दृष्टीनें प्रेमाबाईंच्या लेखनात कसलेंच नाविन्य आढळत नसलें तरी एकात्म स्वीकारलेल्या तत्त्वप्रणालीचा प्रचार उल्लेखनीय आहे. त्याचप्रमाणें येथें करण्यात आलेलें भाव-भावनाच्या समस्यांचें चित्रण आणि आदरनिष्ठेची उभार हीं मराठी कादबरींत मानाचें स्थान मिळविणारीं अशीं झालेलीं आहेत.

परंतु या लेखनात सूचित झालेला निराशावाद मात्र प्रेमाबाईसारख्या गांधीवादी लेखिकेच्या दृष्टीनें आश्चर्यकारक वाटतो. तरीपण त्यामुळें परिणामकारकतेच्या दृष्टीनें ही गोष्ट हानीकारक न होता आकर्षक झाली आहे.

## शांता ज. शेळके

मराठींतील चांगल्या लेखिका म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो, त्यांच्यामध्यें शान्ता ज. शेळके यांना चांगले मानाचें स्थान मिळालेलें आहे. शान्ताबाईनीं भरपूर काव्य व लघुकथा लेखन केलेलें आहे. त्याचप्रमाणे विझती ज्योत, मायेचा पाझर,

ओढ, सुखाची सीमा, कोजागिरी, स्वप्नतरंग, तालपुष्कर, नव्या जगात इत्यादि कादंबऱ्याहि लिहिलेल्या आहेत. याखेरीज कांहीं अनुवादित लेखनहि या प्रांतात शान्ताबाईंनीं यशस्वीरीत्या केलेलें दिसून येतें.

बहुजन समाजातील कोष्टी जमातीचें जीवनचित्रण करण्याचा शांताबाईंनीं "विझती ज्योत" आणि "ओढ" या कादंबऱ्यामधून यशस्वी प्रयत्न केलेला आहे. कथानकास जानपद वातावरणाची पार्श्वभूमि असल्यामुळें बराच उठाव आलेला आहे. लेखिका स्वत च ह्या कोष्टी जमातीची असल्यामुळें त्या लेखनास अनुभवाची सुंदर जोड मिळालेली आहे. त्यामुळें सत्य चित्रणाच्या दृष्टीनेंहि या कादंबऱ्या सरस झालेल्या आहेत.

"ओढ"मध्यें कोष्ट्याच्या जमातींतल्या एका श्रीमत, मानधन आणि प्रतिष्ठावान् कुटुंबाचे अखेर तुकडे कसे झाले ती हृदयस्पर्शी कहाणी मी या कादंबरींत निवेदन केली आहे." असें खुद्द लेखिकेनेंच सांगितलेलें आहे. कथानकाच्या दृष्टीनें ही कादंबरी चांगलीच रंगत गेलेली आहे. त्याचप्रमाणें या कादंबरींतील अभिमानी मोरूभाऊ, घराण्याच्या प्रतिष्ठेला जगणारे बाबा, हट्टी गोपी, दुर्दैवी सरस्वती, सरल मनस्क रंगनाथ या स्वभावरेखा उत्तम साधलेल्या आहेत. त्यातल्या त्यात हट्टी पण समजूतदार गोपीचें आणि कमालीची सहानुभूति वाचकाच्या मनात निर्माण करणारें सरस्वतीचें चित्र विशेष हृदयंगम झालें आहे. त्यावरून लेखिकेनें ह्या स्त्रियांची अंतःकरणें काळजीपूर्वक वाचलेली आहेत असें दिसून येतें.

या दोन्ही कादंबऱ्यामधून कोष्टी जमातीमधील अनेक चालीरीतींचा समावेश केलेला असल्यामुळें, ते ते विशिष्ट प्रसंग अधिक आकर्षक झालेले आहेत. शांताबाईंची भाषा अतिशय चटकदार आणि ओघवती असल्याचें त्याच्या सर्व कादंबऱ्यामधून दिसून येईल. "स्वप्नतरंग"मधील स्वप्नाळु जीवनाच्या चित्रणापेक्षाहि या कोष्टी जीवनाशीं लेखिका अधिक समरस झालेली आहे, असें या कादंबऱ्याच्या भाषेवरूनच दिसून येईल. "कोजागिरी"मधील लेखिकेचें भाषासौंदर्य तर अप्रतिम झालेलें आहे. तथापि विविध कादंबऱ्यामधून झालेला शृंगाररसाचा परिपोष कांहीं कांहीं वेळा फारच उत्तान झालेला असून लेखिका अशा प्रसंगाचें चित्रण करताना अधिक वहावते असें दिसतें! वास्तवतेला मात्र कुठेहि बाध येत असलेला दिसत नाहीं!

● ● ●

## शकुंतला परांजपे

"घराचा मालक" (१९४८) ही शकुंतला परांजपे यांची पहिलीच कादंबरी. सामान्यतः प्रत्येक कादंबरींत आढळणारा ठराविक थाटाचा प्रेमाचा त्रिकोण न उभारता आठ दहा वर्षांच्या चादणीच्या व म्हाताऱ्या रावजीच्या प्रेमळ

जीवनावर ही कथा उभारलेली आहे. अतिशय खेळकर आणि मोकळें वातावरण हा या कादंबरीचा जसा प्रमुख विशेष तसाच चांदणी व रावजी यांच्या स्वभावलेखनानें आलेलें वास्तव सौंदर्य हाहि एक महत्त्वाचा विशेष आहे. लहान मुलाचें मानसशास्त्र शकुंतलाबाईंनीं अत्यंत खुल्या दिलानें येथें व्यक्त केलेलें आहे.

आपल्या वडिलांच्या व रावजीच्या मायेच्या उबेंत लहानाची मोठी झालेली चांदणी, लहान मोठ्या मांजरांच्या गोतावळ्यांत रमून जाऊन सुखी झालेली चांदणी, शाळेंतील बाईंवर भक्ति करीत असलेली चांदणी, त्याच बाई आपली आई होणार या नादांत आनंदून गेलेली चांदणी, त्यानंतर आपल्या वडिलांचें व आईचें वाटतें सलोख्याचें वागणें बघून "आपण आतां बाजूला तर पडलों नाहीं!" या शंकेनें काळवंडून जाऊन मनांत एक बारीकशी अढी निर्माण झालेली चांदणी, एका बाजूला आईवडिलांची कडक शिस्त आणि दुसऱ्या बाजूला रावजींचें नितांत प्रेम या द्वंद्वांत गुदमरून गेलेली चांदणी, रावजीला घरातून हाकलून दिल्याचें ध्यानांत येतांच त्याच्या शोधासाठीं स्वतःचा जीव पाखडणारी प्रेमळ चांदणी, तो परत आल्यावर हर्षातिरेकानें टाळ्या पिटून त्याचें स्वागत करणारी चांदणी, आईनें दिलेली भारी भावली न घेतां रावजीनें दिलेली चिंध्याची बाहुली घेऊन नाचणारी चांदणी, खरोखरच लेखिकेनें अत्यंत सहृदयतेनें, हळुवारपणें व अचूकतेनें चित्रित केली आहे. हरिभाऊंची एखादी कलाकृति सोडली तर चांदणीच्या या स्वभावरेखेला मराठी सारस्वतांत दुसरी तोड नाहीं इतकी ती हृदयंगम झालेली आहे. स्वभावलेखन हाच या कादंबरीचा आत्मा आहे. साध्या आणि सरळ घरगुती वातावरणात घरमालकाची चिमुरडी पोर आणि गडी यांच्यामधील परस्परांतील नितांत प्रेम–माया–हाच या कादंबरीचा गाभा आहे.

शकुंतलाबाईंनीं अर्पण पत्रिकेच्या निमित्तानें म्हटल्याप्रमाणें अनुभवाची भर्जरी झालर या कथेला लाभल्यामुळें एक वास्तवचित्र म्हणूनहि या कादंबरीस विशेष प्राधान्य आहे. लक्ष्मीबाई टिळक यांचेप्रमाणेंच मनांत येईल तें जमेच्या तर्गे लिहिण्यांत शकुंतलाबाईंची लेखणी निष्णात आहे. दोघींच्याहि भाषेंतील प्रसंगानुसार निर्माण होणारा नर्मविनोद आणि अवखळपणा सारखाच आहे. एक प्रकारच्या करुण रसाचा जिवंत पाझरहि दोघींच्या लेखनांत सारख्याच प्रगल्भतेनें नजरेस पडेल. मात्र कधीं कधीं लक्ष्मीबाईंप्रमाणें मनाचा तोल सावरून लेखन करणें शकुंतलाबाईंना जमत नाहीं! त्यामुळें त्यांच्या लेखनाला त्या दृष्टीनें थोडा बाध आल्यासारखा होतो.

शकुंतलाबाईंची ही कादंबरी वाचली असतां एखाद्या स्त्रीच्या मनावर परकीय संस्कृतीचा, भाषेचा, वाङ्मयाचा वगैरेहि संस्कार न होतां तिनें मराठींत

लेखन करावें म्हणजे जी खरीखुरी वास्तवता व अभिजातता निर्माण व्हावी, त्याचें प्रत्यंतर आल्याचें समाधान मिळतें.

• • •

## लीला देशमुख

मध्यम वर्गातील सुशिक्षित स्त्रीच्या विविध प्रश्नावर लीला देशमुख यांनी मोठ्या खेळीमेळीनें कादंबरीलेखन केलेलें आहे. त्याच्या कादंबऱ्याचा प्रमुख विशेष म्हणजे खेळीमेळीचें वातावरण आणि पात्रांचीं आकर्षक नावें. स्वप्ना, श्रद्धा, भारती, डार्शी, राजेश्वरी इत्यादि वैशिष्टयपूर्ण नावें लेखिकेनें आपल्या लेखनात योजिलीं असून तीं वाचणाराच्या चटकन् नजरेत भरल्याविना रहात नाहींत.

"दोन घडीचा डाव" मध्यें लेखिकेनें द्वितीय विवाहाचा प्रश्न हाताळलेला आहे.

"दूर कोठें तरी–" मध्येंहि याच प्रश्नाचा ऊहापोह करण्यात आलेला असला तरी येथे मुख्य विषय तो नव्हे. या कादंबरींत लेखिकेला एका सुशिक्षित पण ध्येयवादी तरुणीचें चित्र रेखाटावयाचें आहे. विशिष्ट ध्येय मनात बाळगून अमेरिकेला जायला निघणारी या कादंबरीची नायिका स्वप्ना आपलें ध्येय झुगारून "रजनी" शीं विवाहबद्ध होत असल्याचें लेखिकेनें दाखविलें आहे! एकमेकांच्या ध्येयाची पूर्ति करूं इच्छिणाऱ्या ह्या दूर कोठेंतरी असलेल्या दोन जीवांच्या मीलनाची घटना मोठ्या कौशल्यानें लेखिकेनें रंगविली आहे. स्वप्ना ही येथें कवयित्री असल्याचें लेखिका सांगते पण तिच्या काव्याचा मागमूस मात्र कोठेंच लागत नाहीं हें आश्चर्यच आहे! मात्र रजनीचें लेखकाचें चित्रण व्यवस्थित झालेलें आहे.

"पूर्वेचा वारा" या कादंबरीत लीलाबाईंनीं मधून मधून चित्रकलेची माहिती दिली असून चित्रकार अब्बाचें स्वभावचित्रहि चांगलें रेखाटलेलें आहे. लेखिकेची भाषाशैली चटकदार असून वर्णनशैलीहि आकर्षक आहे.

• • •

## सौ. सुमति धनवटे

लेखनाची आवड, मनाची हौस, सामाजिक जीवनाबद्दल जिव्हाळा, ध्येयवाद व वास्तववाद याचा समन्वय करीत जीवनाच्या मूल्याचा होणारा विचार, अन्यायाची चीड आणि दिलदार मनोवृत्तीचें चित्रण या पार्श्वभूमीवर सुमति धनवटे यानीं आपले कादंबरीलेखन केलेलें आहे. त्यांची कादंबरी नागपूर भागातील निसर्गाशीं एकजीव झालेली आहे आणि तिनें वरच्या वर्गातील–श्रीमंत घराण्यातील-

सुवट् नाचा प्रामाणिकपणें विचार केला आहे.

जयपराजय ( १९५१ ), प्रकाशाकडे ( १९५४ ), वादळज्योत ( १९५६ ) व ज्ञातरसाज ( १९५७ ) ह्या सुमतीबाईंच्या कादंबऱ्या आहेत. त्यानीं काहीं ल्पुकथा लेखनहि केल आहे परतु कादंबरीकार म्हणूनच मराठींतील वाचकाना त्या परिचित आहेत.

स्वत सुमतीबाई ह्या एक ससारी स्त्री व समाज कार्यकर्त्या असल्यामुळे प्रीतिकथा रगविताना त्यानीं एक वेगळी दृष्टि आपल्या कादंबरीसाठीं वापरलेली आहे. त्यामुळें उच्चवर्णीय समाजजीवनाचें दर्शन घडत असतानाहि कादंबरींतून त्यानीं ठेवलेला अनौपचारिक मोकळेपणा मोठा आल्हादकारक वाटतो. तत्राच्या दृष्टीनें सुमतीबाईंचें लेखन काहीं ठराविक चाकोरींत बसणारें नसलें, तरी त्यानी स्वत ची म्हणून जी एक वेगळी लेखनपद्धति अवलंबिलेली आहे ती विशेष आहे. जागोजाग त्यानीं पेरलेल्या विचाराच्या हिरवळी व कल्पनाच्या फुलवेली त्यामुळेच नजरेत भरतात शिवाय ध्येयवाद व वास्तववाद याचा समन्वय घालण्याचा जो त्यानीं येथे प्रयत्न केला आहे तो लक्षात घेण्याजोगा आहे कारण खऱ्या जीवन-मूल्याच दर्शन घडविणें हा आपल्या लेखनामागचा एक प्रमुख हेतु त्यानीं मानला आहे.

सुमतीबाईंची लेखनाची भाषा हळुहळू सुधारते आहे. माडणी आकर्षक होते आहे त्यामुळें त्यानीं याच विश्वासानें आपलें लेखन चालू ठेवलें, तर मराठींत त्याची कादंबरी उल्लेखनीय ठरेल असें वाटते.

मराठी कादंबरीच्या विकासाच्या दृष्टीनें या लेखिकाच्या खेरीज सुधा साठे, डॉ सुमति क्षेत्रमाडे, शिरीष अत्रे, नलिनी शहा इत्यादींनीं कादंबरी लेखनास आपला हातभार लावलेला आहे.

● ●

कादंबरीच्या क्षेत्रातील स्त्रियाची ही कामगिरी यापरीनें लक्षात घेता काहीं गोष्टी ठळकपणें लक्षात येतात गेल्या पाचपन्नास वर्षांत किंवा गेल्या शतकातहि महा राष्ट्रातील स्त्रीजीवन कोणत्या सामाजिक परिस्थितींतून पुढेंपुढें सरकत राहिलें व जगत गेलें यांचें बरेंचसें स्पष्टपणें पडलेलें प्रतिबिंब या लेखनातून दिसून येतें. त्याचप्रमाणें त्या त्या कालमानाप्रमाणें लेखिकाचा शैक्षणिक दर्जा, लेखनाचें कौशल्य, विचाराची पातळी व दृष्टिकोण या सबधींहि कल्पना येते त्यामुळें लेखनाची निर्माण क्षमता व प्रतिभा ही स्त्री जीवनाला लाभणाऱ्या विशेष परिस्थितीवर अवलंबून असते याचाहि इथें उलगडा होतो.

या कादंबरी निर्मितीमध्यें बहुतेक सर्व लेखिकाची नजर ही प्रामुख्यानें स्त्री जीवनाच्या कथानींच मानवेली वा मर्यादित झालेली आहे. त्या त्या काळातील स्त्रीजीवनविषयक जशा प्रमुख प्रश्नाचाच त्यानीं येथें अधिक विचार केला आहे.

या अलिकडच्या काळात स्त्रीशिक्षणाचा झालेला वाढता विस्तार, कुटुंब व व्यक्तिजीवनात झालेला बदल, आर्थिक क्षेत्रात घडलेलें परिवर्तन, सामाजिक सुधारणा, स्त्रियांना मिळालेला सामाजिक दर्जा वगैरे लक्षात घेता लेखिकांनीं लिहिलेल्या या लेखनाचें क्षेत्र विस्तारलें वस्तुनिष्ठ चित्रणहि विकास पावलें त्यात भारदस्तपणा आला. कल्पनेची भरारी वाढली. स्वत चें मनोभाव स्पष्टपणें व्यक्त करण्याचें आगळे धैर्य उभारीत आले ! त्यामुळें मराठीला हा विकास लाभदायक ठरला.

परंतु प्रेमा कंटकाचा एक अपवाद सोडला, तर भारत स्वतंत्र होण्याच्या संग्रामकाळातील मराठी जीवनाचें चित्रण या स्त्रियांनीं केलेलें नाहीं ! त्याचप्रमाणें शांता शेळकेंचा अपवाद सोडला तर कोणीं बहुजन समाजाच्या सुखदु खाचाहि विचार केलेला दिसत नाहीं. त्यामुळें स्त्रियांनीं लिहिलेली कादंबरी एका मर्यादित क्षेत्रातून वावरलेली आहे. काहीं अशी एकांगी जीवनाचाच तिनें विचार केला आहे.

त्यामुळे अण्णाभाऊ साठ्यांची ' फकिरा ' किंवा खांडेकरांची ' ययाति ' अगर दिघ्यांची ' पड रे पाण्या ' किंवा ' सराई ' स्त्रिया निर्माण करू शकल्या नाहींत ! हा विचार मी केवळ भाषाशैली लक्षात न घेता सामाजिक जीवनाच्या चित्रणाच्या दृष्टीनें देखील येथें मांडते आहे.

कला विलासाच्या दृष्टीनें स्त्रियांनीं लिहिलेल्या या कादंबरी लेखनाकडे जर आपण पाहिल तर मात्र येथें त्याप्रमाणें समाधानकारक वातावरण आढळून येईल, असाच या कादंबऱ्यांचा साजशृंगार साधलेला आहे. तथापि अपवाद म्हणून चारदोन कादंबऱ्या सोडल्या तर येथून तेथून एकजात सारें मध्यमवर्गाचेंच वातावरण या कादंबऱ्यातून विखुरलेलें दिसून येईल ! शांता शेळके यांच्या कोळी जीवनावरील कादंबऱ्या या अपवादात मोडत असल्या, तरी श्री दिघ्यांच्या " सराई " चें हृदयंगम गावरान स्वरूप तेथे आढळत नाहीं. सामाजिक चाली रीतींची विशिष्ट बाजू सोडून दिली तर तेथें जानपद असें काहींच उरत नाहीं. शिवाय तेथील निसर्गाचें वर्णन देखील फारच मर्यादित झालेलें आहे

प्रा. ना. सी. फडके यांच्या कादंबऱ्यामधून विखुरलेले रचनाकौशल्य आणि भाषावैभव स्त्री कादंबरीकारांच्या लेखनातहि बरेचसें आढळत असलें, तरी मनर-प्रसंगाचा तितकासा चित्तवेधक उठाव एखादा अपवाद सोडला तर फारसा कोठेंहि आढळत नाहीं ! स्त्रीमनाच्या मानसशास्त्राच्या दृष्टीनें तयार होणारा स्वभावरेखा फडक्यांच्या " जादुगार " मधील " इंदुमती " च्या आणि श्री खांडेकरांच्या " दोनध्रुव " मधील " वत्सले " च्या रूपानें फारच चांगला निर्माण झालेला आहे. स्त्रीचें खरेखुरें चित्र येथें आपणास पहावयास सापडतें हें खरें असा तरी विभावरीच्या " अचले " ची सर या स्वभावरेखास आलेली नाहीं ! मातृहृदया-तील वात्सल्याचा येथे होणारा विलोभनीय स्फोट स्त्रीच्याच लेखणीनें करू जाणें,

इतका अप्रतिम वठलेला आहे तीच गोष्ट या विविध कादबऱ्यामधून सर्वत्र विखुरलेल्या घरगुती वातावरणाबद्दलहि सागता येईल

कादबरीस आवश्यक असणाऱ्या सर्व वैशिष्ट्यानीं या कादबऱ्या भरगच्च असलेल्या दिसतात तथापि या सर्व कादबऱ्यातून एखादा अपवाद सोडला तर एखाद्या विषयाबद्दल किंवा एखाद्या विशिष्ट अनुभूतीबद्दल स्त्रियाच्या लेखणीनें तो तितक्या उत्कटत्वानें विचार केलेला नाहीं, हें केव्हाहि कबूल करावें लागेल. कादबरीकाराला आपलें लेखन करताना, वर्णित विषयाशीं एकजीव होताना, जी मनाची बेहोष होऊन जाणारी अवस्था असावी लागत, आणि बेधडकपणें तिचा आविष्कारहि करण्याची आवश्यकता लागत, ती स्त्रीमध्यें अजून यावयाची आहे आजवरच्या तिच्या सामाजिक जीवनामधील ज्या अवस्थेंतून ती गेली आहे, त्या अवस्थेचा आणि तिच्यावर समाजानें लादलेल्या बधनाचा विचार लक्षात घेता, तिचा भावनाविकार अस्फुट अवस्थेंत दिसावा, यात काहीं जगावेगळ खास घडलेलें नाहीं

पाश्चात्य देशातील लेखिकानीं ज्या कादबऱ्या लिहिल्या आहेत आणि जागतिक लौकिक कमावला आहे, त्याचें कारण पाहिलें, तर त्याचें सामाजिक जीवनच त्याना जास्त सहाय्यभूत झालें आहे, असे म्हणावें लागेल तिकडील स्त्री आणि पुरुष याच्यामधील सामाजिक मूल्यें आणि त्याचें समाजामधील स्थान हें केव्हाहि आपल्यापेक्षा निराळें आहे त्या लेखिकानीं पुष्कळदा स्वत च्या आयुष्यातील अनुभूतींचाच फार मोकळ्या मनानें आविष्कार केलेला आहे पण आपल्याकडे तसें नाहीं "अमुक एक बेधडकपणें लिहिलें तर काय होईल" ही धास्ती अजून आमच्या लेखिकाना वाटत असावी ! शकुतला परांजपे याची "घराचा मालक" ही कादबरी ह्या धास्तीची मर्यादा ओलाडून पुढ गेलेली असली, तरी इतर सर्व कादबऱ्याना तोच दृष्टिकोन लावता येणार नाहीं

आमच्याकडील स्त्रीच्या मनावरील भारतीय सस्कृतीचा पगडा आणि सामाजिक बधनें यात ढिलेपणा आल्याविना सुदर व कलापूर्ण कादबरीची क्रिया कळून अपेक्षा करता येणार नाहीं पण त्यासाठीं विभावरीसारखी बडखोरी अगात आणणें जरूरीचें आहे, हेंहि स्त्रियानीं विसरून चालणार नाहीं शिक्षणाच्या वाढी बरोबरच कल्पनाविस्तारहि व्हायला हवा आहे, हें स्त्री कादबरीकाराच्या ध्यानात येत नसावें असें दिसतें घरगुती प्रसगाचा अतिशय उत्तम आविष्कार आणि पुरुषाना जमणार नाहीं अशा स्त्रीसुलभ भावनाचा अप्रतीम आविष्कार त्यानीं केलेला आहे यात वाद नाहीं पण त्याचबरोबर त्याचे कल्पनावैभव तथें कोतें पडलें आहे हेंहि मान्य करावें लागेल आनदीबाई जयवत याची "उर्मिला" आणि श्री. बोरकराची "भावीण" या दृष्टीनें पडताळून पहाण्यासारखी आहे. स्त्री जीवनाकडे पहाण्याची या दोन लेखकाची दृष्टि निराळी असली आणि दोन्हीं

मधील सात्त्विक वातावरणहि उल्लेखनीय असले, तरी बोरकरांची कल्पना कारण भर तरी सरस ठरण्याची शक्यता आहे! तीच गोष्ट काशीबाईंच्या आणि हरिभाऊंच्या कादम्बऱ्यांमध्येंहि दिसून येईल शिवरामपंत पराजप्यांच्या "गोविंदाच्या गोष्टी "मधील कल्पना वैभवाची चमक तर येथें फारशी कोठेंच आढळत नाहीं असें म्हणावें लागेल!

या सर्व विवेचनावरून एक प्रमुख निष्कर्ष असा काढता येईल कीं, स्त्री आणि पुरुष यांच्या कादम्बऱ्यांमध्यें गुणदोषांचें प्रमाण कमीजास्त असलें तरी त्या एकमेकांना पूरक झालेल्या आहेत

तथापि एक गोष्ट मात्र खरी कीं, श्री वि स. खाडेकरांची पौराणिक जीवनावर आधारलेली "ययाति" सारखी कादंबरी किंवा उद्धव ज शेळके यांची विदर्भांतील बोलीमधून गोरगरिबांचें जीवन चित्रण करणारी "धग" सारखी कादंबरी अद्याप स्त्रियांच्या हातून लिहिली गेली नाहीं. कारण एखाद्या वर्णित विषयाचा अतिशय खोलवर जाऊन विचार करण्याची सवयच स्त्रीमनाला अद्याप लागलेली दिसत नाहीं. फार काय त्यांनीं सामाजिक, राष्ट्रीय किंवा आतर राष्ट्रीय अशा घडामोडींचा सूक्ष्मतेनें विचार करून त्याबाबत आपली सखोलपणे भूमिकाहि तयार केलेली दिसत नाहीं काटेरी जाळीं गुपणें त्यांच्या मनालाच सहन होत नसावें! त्या कारणानें एखादा विशिष्ट असा मनाजोगता चटकदार भाग उचलून त्यांनीं त्यावरच आपलें लेखन प्रामुख्यानें आधारलें आणि कादंबरींतील जीवनचित्रण केलें! त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांच्या कादंबरीनें एखादा दुसरा अपवाद सोडला तर फारशी लोकप्रियता मिळविली नाहीं किंवा सामाजिक सुधारणाचा आधारभूत ग्रंथ म्हणूनहि मान राखला नाहीं स्वाभाविकच त्या कादम्बऱ्यांना अक्षर वाङ्मयात स्थान राहिलें नाहीं आणि जागतिक कीर्तीचाहि वाटा उचलता आला नाहीं!*

---

* "None of these seriously attack the complexities, social, national and international save incidentally and as it were to illustrate life on the surface and character as moulded by special experience they are of great value historically, clever and sympathetic studies of a unique era in the march of civilization, but like all art most true in detail to its period they lack permanence and universality"

R Brimley Johnson, Some contemporary Novelists (Women)

o o o

# नाटक

विविध प्रकारची श्रेष्ठ कलाकृति आपल्या वाङ्मयाच्याद्वारें निर्माण करणाऱ्या मराठी वाङ्मयाला जर कोणी एखाद्या अफाट वृक्षाची उपमा दिली, तर मग कथा किंवा कादंबरी ही त्या वृक्षाला आच्छादून टाकणारी पालवी ठरेल. काव्य हा त्या वृक्षाला आलेला मुगधी व गोड फुलोरा होईल. आणखी नाटक हें त्या मोहोरातून निर्माण होणारें परिपक्व फळ दिसेल!

नाटक ही एक स्वतंत्र अशी कला आहे. माणसाच्या अंगीं उपजतच असलेली ती एक स्वाभाविक प्रवृत्ति आहे. त्या कारणानें कादंबरी ही जर एखाद्या निर्झरासारखी वळसे घेत झुळझुळ वाहत राहिलेली दिसली, तर नाटक हें एखाद्या धबधब्यासारखें एकदम कोसळलेलें दिसून येतें. नाटक म्हणजे मानवी जीवनात आढळणारा संघर्ष, झगडा, झोंबाझोंबी, द्वंद्व, युद्ध! म्हणून नाटक हें केवळ वाचून भागत नाहीं तर तें प्रत्यक्ष पहावें लागतें. माणसाचें मन गुंग करून सोडणारी ती एक उत्कृष्ट कलाकृति असते. कृति हा तिचा आत्मा असतो आणि गति हें तिचें शरीर असते. आणि म्हणूनच नाटकाइतकें जीवनाचें रसोत्कट प्रतिबिंब दुसऱ्या कोणत्याहि वाङ्मय प्रकारात पडलेलें आढळून येत नाहीं!

एकदम हजारों लोकांच्या मनावर करणाचा ताबा घेण्याची ताकद फक्त नाटक ह्याच एकमेव वाचनीय कलाकृतींत आहे. त्यामुळें नाटक पहाताना प्रेक्षक एकदम नाटकातील विषयाशीं तादात्म्य पावतो. नाटकातील पात्राच्या सुखदुःखाशीं एकजीव होऊन जातो! आणि मग एका वेगळ्याच जीवनात त्याचा प्रवेश होतो. रोजचें आपलें जीवन सोडून त्याचें मन नाटकातील जीवनातच बराच काळ तरंगत रहातें! क्वचित प्रसंगीं त्यास आपलेंहि भान अशा वेळीं रहात नाहीं.

त्यामुळें नाटक हा वाङ्मयप्रकार इतर वाङ्मय प्रकाराच्या मानानें अधिक प्रभावी आहे हें प्रेक्षकाच्या व वाचकाच्या तेव्हाच लक्षात येतें. अभिनयाची उत्तम जोड संगीत आणि भाषणातून जीवन मूल्याची खैरात करीत, रंगभूमीवरील नाटक हें समोर बसलेल्या प्रेक्षकांना मानवी जीवनातील एक चांगली गोष्ट सांगत असतें. ही गोष्ट मानवी जीवनमूल्याचें चित्ताकर्षक भाष्य करते. जागतिक भावनेचा आविष्कार करते. आपल्या देशाचें अंतःकरण खोडून दाखवते. चालू घडीच्या प्रभावी प्रश्नाचा उलगडा करते. त्या कारणानें नाटक पहाणाराला भाषेची पारखी करावी पडत नाहीं. अभिनयाच्या द्वारेंच प्रेक्षक सारे अदाज बांधू शकतो. कारण त्याच्यापुढें जिवंत काव्य उभें असतें. मानवी जीवनमूल्याचा प्रत्यक्ष घडणारा साक्षात्कार तो पहात असतो. आणि म्हणून नाटक हें लेखकाच्या बुद्धिवैभवाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून त्याच्या मनात भरतें.

मराठी रंगभूमीचा व नाटकाचा इतिहास तसा उल्लेखनीय आहे. अगदीं

प्रारंभींच्या कालातील संस्कृत वाङ्मयात लोकप्रिय झालेली नाट्यकला मराठीच्या प्रांतात पहिल्यादा भाषांतराच्या रूपानें अवतरली असली, तरीहि नंतर तिनें स्वतःचे म्हणून चांगलेंच मंदिर उभारलें आहे. इंग्रजींतील नाटकाचा तिच्यावर सुरवातीला परिणाम झालेला असला, तरी तिनें आपलें म्हणून खास वैशिष्ट्य हें नेहमींच राखलें आहे.

गेल्या शंभर वर्षांतील नाट्यकला या संदर्भात लक्षात घेता एक गोष्ट ठळकपणें लक्षात येते ती अशी कीं, नाट्यकला, नाटककार व नटनटी यांच्या विषयीं समाजाच्या कल्पना खा झपाट्याने बदलत गेलेल्या आहेत. नाटकासाठीं लागणारे विषय, पडदे, पोषाख, देखावे वगैरेंतहि कालमानाप्रमाणें ओघानेंच बदल झालेला आहे. तसेंच सुरवातीच्या गद्य नाटकाला आता संगीताचीहि सुंदर जोड मिळालेली आहे.

इ. स. १८४३ मध्यें जन्म पावलेली गद्यमय नाट्यकला इ. स. १८८० मध्यें संगीताचा साज अंगावर ल्याली. या नाट्यकलेची सेवा प्रामुख्यानें इ. स. १८७५ ते १८८५ मध्यें त्रिलोकीकरानीं व विशेषतः किर्लोस्करानीं मोठ्या ईर्षेनें केली आहे. यानंतरच्या काळात नाट्यवाङ्मयाचा विकास इतिहास, कला व वाङ्मय या तिन्ही दृष्टींनीं चांगलाच होत गेल्यामुळें किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी, वरेरकर, अत्रे व रांगणेकर इत्यादि नाटककारानीं मराठी नाट्याची भरघोस अशी सेवा केली.

त्यामुळें प्रणयकथेची रम्यता व हृदयंगमता सुंदर रीतीने प्रगट करतानाच मानवी मनाला मोहिनी घालणारे सर्व गुण अंगीं धारण केलेलें सौभद्र नाटक, जन्मापासूनच लोकप्रिय विषय धारण करून मानवी मनाला चटका लावून सोडणारें शारदा नाटक, कल्पनारम्य कथानकाने आपली गोडी कायम टिकविणारें मानापमान नाटक, पतिव्रतेचा प्रभाव सांगणारें पुण्यप्रभाव व एकच प्याला नाटक, अद्‌भुतरम्यतेने मनाला भुरळ पाडणारें राजसंन्यास नाटक, नाट्यरचनेचें चातुर्य दाखविणारें वरेरकराचें 'करीन ती पूर्व' हें नाटक, किंवा अत्र्याचीं घराबाहेर, उद्याचा संसार अगर जग काय म्हणेल हीं नाटकें आणि रांगणेकराचें 'कुल-वधू' हें नाटक, हीं सर्व नाटकें मराठी रंगभूमीवर नेहमींच यशाची चढती कमान घेऊन लोकप्रिय झालीं. त्यांच्यामुळें मराठी रंगभूमीचा व नाट्यकलेचा विकास झाला. प्रतिभासंपन्न लेखकानीं मराठी रंगभूमी गाजविली.

मराठींतील वरील नाटककाराच्या जोडीलाच मराठी नाट्यकलेची सेवा करण्याची संधि कांहीं स्त्रियानींहि घेतलेली आहे. संख्येच्या मानानें त्यांची ही सेवा फारच थोडी आहे. तरीपण जी आहे, तिचाच केवळ या प्रकरणात साराशानें विचार केलेला आहे.

० ० ०

# गिरिजाबाई केळकर

मराठींत नाटक लिहिणारी पहिली स्त्री या नात्यानें गिरिजाबाई केळकर यांची योग्यता फार मोठी आहे. मागील कालखंडामध्यें त्यांच्या " पुरुषांचें बंड " या नाटकाचा उल्लेख आलेला आहेच. त्यांनीं आजवर एकूण पाच नाटकें लिहिलेलीं आहेत. त्यापैकीं " पुरुषाचें बंड ", " आयेषा " व " हीच मुलीची आई " हीं सामाजिक नाटकें असून " राजकुंवर " हें ऐतिहासिक नाटक आहे.

" पुरुषाचें बंड " मध्ये स्त्रियांच्या योग्यतेचें समर्थन आलेलें असून " आयेषा " त एखादी स्त्री मनात आणील तर अंगीकृत कार्यांत आपलें सर्वस्व राखून एखाद्या योगिनीप्रमाणें आपलें चारित्र्य किती दिव्य असल्याचें दाखवूं शकते, याचें दिग्दर्शन लेखिकेनें केलेलें आहे. " हीच मुलीची आई " या नाटकांत वरेरकरांच्या " हाच मुलाचा बाप " याच्या उलट परिस्थिति रंगविलेली आहे. पण या सर्व नाटकांपेक्षा " राजकुंवर " ( १९२४ ) हें नाटक लेखिकेनें फार चांगलें लिहिलेलें आहे.

" शिवाजीची मुलगी गणोजी शिर्क्यांना दिलेली होती व शिर्क्यांची मुलगी शिवाजीनें सून करून घेतली होती, ही गोष्ट ऐतिहासिकच आहे. तसेंच संभाजीचें शिरकाणहि महशूरच आहे. फक्त राजकुंवरसारखी तेजस्वी मुलगी शिवाजीला होती कीं नाहीं एवढाच काय तो प्रश्न. पण तो इतिहाससंशोधक पहातील. मला फक्त तें पात्र आवडलें व त्याबरोबरच कितीतरी सुंदर राजकारणातील तत्त्वें दिसूं लागलीं. तीं दाखविण्याकरिता मीं हें नाटक लिहावयास घेतलें " अशी खुद्द लेखिकेचीच या नाटकाविषयींची भूमिका आहे.

" राजकुंवर " या नाटकात " वीर कुलोत्पन्न राजकन्या देशाच्या विपन्न कालीं कर्तव्यच्युत झालेल्या पतीस दूर सारून रजपूत राजकन्येप्रमाणें स्वदेशाकरिता जिवाचें किती रान करितें, तें गतकालाचें चित्र उभारलेलें आहे......ज्या ऐतिहासिक प्रसंगावर त्यांनीं हें नाटक लिहिलें आहे तो अत्यंत ओजस्वी व तेजस्वी आहे. " ( प्रस्तावना—के. म. सोनाळकर ).

इ. स. १९५७ च्या नागपंचमीला गिरिजाबाई केळकरांनीं " मंदोदरी " हें नाटक मराठी रसिकांच्या स्वाधीन केलें आहे. या नाटकात श्रीमति केळकरांनीं पतिव्रतेचा महिमा सांगण्याचा जिवापाड प्रयत्न केला आहे. सीतामाई व लंकाधीश्वराची राणी मंदोदरी या दोघीहि खऱ्या पतिव्रता असल्याची गोष्ट या नाटकानें सांगितली आहे. खरा पत्नीधर्म सांगण्याच्या भरात लेखिकेनें जो भावनाविष्कार केला आहे तो अगदीं घरगुती व भावनाप्रधान असा आहे. त्यामुळें वीरश्रीला शोभणारी भाषा या नाटकाला लाभलेली नाहीं ! संवाद देशीच त्यामुळेच सटेनेजा झालेले नाहींत. तरी परंतु एका स्त्रीनें दुसऱ्या स्त्रीचें स्त्रीहृदय ओळखावें

म्हणून मदोदरीची येथें प्रकट झालेली भूमिका नव्यानेंच मराठी वाङ्मयात आलेली दिसते. त्याचप्रमाणें रावण व मदोदरीकडून सीता पवित्र असल्याची रामापुढें दिली गेलेली ग्वाही व खुद्द सीतामाईचें या नाटकातील स्वभावचित्रहि उल्लेखनीय आहे

● ● ●

## शकुंतला परांजपे

शकुंतला परांजपे या मोठ्या रसिक नाट्यभक्त आहेत. त्यांनी फ्रेंचमधून मराठींत अनुवादित केलेलीं " सोयरीक " व " चढाओढ " हीं प्रहसनें मार्मिक आणि विनोदी होतीं. पण " संगीत पाघरलेल्या कातडीं " लिहिताना मात्र त्याना तितकेसें यश मिळालेलें नाहीं असलें कृत्रिम कल्पनारम्य कथानक एखादा कवि कदाचित् चागलें रगवू शकेल. शकुंतलाबाईंचा मुख्य आत्मीय गुण अत्यत मोकळा पण निरागस विनोद हा आहे.

शकुंतलाबाईंच्या भाषातरित प्रहसनामध्यें जी ठसकेबाज भाषा आणि नाट्याला योग्य अशी गुताागुत आलेली आहे ती या त्यांच्या स्वतत्र नाटकात दिसून येत नाहीं. परस्परावरील प्रीति सफल होण्यासाठीं चित्रकला व लेखनकला याच्या पुरस्काखालीं इच्छित कार्य सफल होणारी कथा येथें आलेली आहे! या नाटकाची भाषा पात्रानुरूप आणि सोईची असली, तरी " भिंतीणीच्या बोरातील " लेखिकेचें व्यक्तिमत्त्व आणि लालित्य येथें दिसून येत नाहीं.

● ● ●

## सौ. दया पटवर्धन

" सात पाहुण्या ' या पुस्तकात दया पटवर्धन यानीं आपल्या सात एकाकिका प्रसिद्ध केलेल्या आहेत. " वाचकाचें व प्रेक्षकाचें मनोरजन करुन त्याची काहीं वेळ करमणूक व्हावी, या हेतूनेंच या नाटिका लिहिल्या आहेत. " अशी या नाटिकाची मूळ कल्पना येथें प्रस्तावनेंतच सागितलेली आहे. त्यामुळें केवळ करमणुकी पलीकडे या नाटिकाचें इतर वैशिष्ट्य दिसत नाहीं.

या नाटिकासाठीं निवडलेले विषय सर्वसामान्य लोकाच्या रोजच्या जीवनातील आहेत. पात्राचीहि सहज ओळख पटावी इतकी ती ओळखीच्या जगातील दिसून येतात! त्याच्या भोवतीं निर्माण केलेले प्रसग गमतीचे असून ते वाचकाना परिचित वाटणारे आहेत. उदाहरणार्थ " प्रेमवेडा " मधील वमता सारखे मित्राच्याच पत्नीवर प्रेम करुन फसणारे कित्येक कॉलेज तरुण वाचकाना

सत्यसृष्टींत भेटणें शक्य आहे ! त्याचप्रमाणें या नाटिकांतील पात्रांना जबाबदारीची जाणीवहि एकंदरीनें कमीच दिसते. "नाटकांतील पात्रें साधीं, सरळ मनाचीं तरुण मंडळी आहेत त्यांच्यावर ओढवलेले प्रसंग गमतीचे पण क्षुल्लक आहेत" (प्रस्तावना) कृति हा नाटकाचा आत्मा समजण्यात येत असला, तरी गति हें त्याचें शरीर असतें हें अचूकपणें ओळखून लेखिकेनें या नाटिकांचें तंत्र सांभाळलेलें दिसून येत नाहीं.

● ● ●

# सौ. मालतीबाई बेडेकर
# ( वाळूताई खरे )

"ही नाटिका नाट्यतंत्राकडे मुळींच लक्ष न पुरवता केवळ स्त्रीपात्राकरवीं करमणूक करण्याच्या उद्देशानें लिहिली आहे." आपल्या "पारध" नाटकाच्या पहिल्याच पानावर मालतीबाई बेडेकर यांनीं असें सांगून ठेवलेलें आहे. त्यामुळें त्याच्या या नाटिकेविषयीं नाट्यकलेच्या दृष्टीनें पहाण्याचें कारणच उरत नाहीं. जुन्या आणि नव्या विचारसरणींच्या स्त्रियांमधील संसाराबद्दलची चर्चा यांत प्रामुख्यानें आलेली आहे.

लेखिकेची या नाटिकेंतील भाषा चटकदार व संवादलेखनहि चांगले झालें आहे, तरी पण या नाटिकेंत खरें नाट्य तितक्या प्रभावानें आढळत नाहीं "अलौकिक संसार"मध्यें मात्र सौ. मालतीबाई बेडेकर या त्या मानानें बऱ्याच यशस्वी झाल्या आहेत

● ● ●

# सौ. सुधा साठे

"एकच गांठ" या संगीत नाटकांत सुधा साठे यांनीं प्रत्येक स्त्रीला आपल्या आयुष्यात केव्हा ना केव्हा तरी लग्नचक्रातून एकदा जावेंच लागतें व "हजार वळसे अन् एकच गांठ" या म्हणीप्रमाणें तिला या प्रसंगाला तोंड द्यावें लागतें, या गोष्टीची कल्पना रंगविली आहे त्यासाठीं विवाहाचे अनेक जुने नवे प्रकार त्यांनीं संभाषणद्वारेंच चर्चिलेले आहेत.

सुधा साठे यांची भाषा घरगुती आहे. पात्रांच्या मनाच्या ठेवणीनुसार लेखिकेनें विचारांची पेरणीहि चांगली केली आहे. पण जिवंत नाट्याला लागणारा संग्राम मात्र येथें कोठेंच फारसा आढळत नाहीं

● ● ●

# उमाबाई सहस्रबुद्धे

" संगीत काहूर " आणि " लोकराज्य " हीं दोन नाटकें उमाबाई सहस्रबुद्धे यानीं लिहिलीं आहेत. त्यापैकीं पहिल्या नाटकात स्वत लेखिकेनें सांगितल्याप्रमाणें " अकल्पित योगायोगानें मनात उद्‌भवणाऱ्या सशयी काहूरानें गोंधळ घालून सर्वांनाच त्याची थोडी थोडी झळ लागली आणि सूज्ञ मनानीं ती विझवली. " असा या नाटकाचा कथाभाग आहे. आणि " लोकराज्य " या नाटकात लेखिकेनें संस्थानातील लोकशाहीच्या अवतारासाठीं निर्माण होणाऱ्या घडामोडीं बरोबरच रहस्यमय व अद्‌भुतरम्य प्रेमविवाहाची जोड दिलेली आहे. श्री धुंडिराज-शास्त्री विनोद यानीं लखिकेला धन्यवाद देताना म्हटलें आहे कीं, " संगीत लोकराज्य नाटकातील पात्राचा स्वभावपरिपोष चागला वठला आहे शब्दयोजना साधी पण समर्पक व मार्मिकहि आहे. राजकीय, शैक्षणिक व संस्थान विषयक प्रश्न नाजुकपणें हाताळले आहेत. " तसेंच या नाटकाबद्दलचें आपलें मत व्यक्त करताना मामासाहेब वरेरकर ह्यानीं म्हटलें आहे कीं, " नाटक हें लोकशिक्षणाचें प्रभावी माध्यम आहे. या कसोटीला प्रस्तुत नाटक उपयुक्त असून नव्या बैठकीवर आधारलेलें आहे. प्रेक्षकाना खेंचून धरण्याचें सामर्थ्य यात असून प्रयोगदृष्ट्या नाटक आकर्षक होईल.

उमाबाईंची नाट्यलेखनकला अद्याप सुरवातीच्या प्रयोगावस्थेंत आहे. " त्याचा सराव जसजसा वाढत जाईल तसतशी भाषेची सफाई, रचनेचें चातुर्य व प्रयोगक्षमता हे गुण त्याचेमध्यें अधिक येत जातील " * असे म्हणावयास हरकत नाहीं.

• • •

# सौ. कृष्णाबाई मोटे

" माझी गुणाची पोर " हें तीन अंकी छोटें नाटक कृष्णाबाई मोटे यानीं लिहिलें असून या नाटकात मनानें वरलेला पति मिळवावा कसा याचें मोठें मनोरजक चित्रण आलेलें आहे. या नाटकाची सुरवात हरितालिकेच्या पूजेपासून झाली असल्यामुळे जुन्या व नव्या विचाराची सुंदर सांगड येथे लेखिकेनें घालून दिली आहे. लेखिकेची भाषा चागली असून संवादहि ठीक आहेत.

• • •

---

* लोकराज्य, प्रस्तावना, डॉ. के ना. वाटवे

# सौ. मुक्ताबाई दीक्षित

मराठीतील एक विचारवंत व सुसंस्कृत लेखिका म्हणून नावलौकिक मिळविलेल्या सौ मुक्ताबाई दीक्षितांनी ' जुगार ', ' अचलिया ' व ' ससार ' हीं नाटकें लिहिलीं आहेत. पैकीं अचलिया व ससार याना स्वतंत्रपणापेक्षा आधारच मोठा आहे. त्यामुळें त्याचा इथें विचार केलेला नाहीं ' जुगार ' हें नाटक मात्र स्वतंत्र असून सपत्नीकाचें लग्न हा या नाटकाचा विषय आहे.

मुक्ताबाईंची या नाटकातील भाषा प्रौढ आहे, सोपी व प्रासादिकहि आहे सवाद तात्त्विक चर्चेकडे झुकलेले असले तरी परिणामकारक आहेत. लेखनाचा दर्जा वरच्या प्रतीचा आहे या लेखनामध्यें लेखिकेची भूमिका विचारप्रधान आहे. समाजातील एका अनिष्ट प्रथेला आळा घालण्याचे काम नुसत्या कायद्यापेक्षा चटकदार सवाद आणि विनोदी व गभीर प्रसगाचें मिश्रण साधून या नाटकानें केलेलें आहे.

या निरनिराळ्या लेखिकाच्या शिवाय सौ सुमति धनवटे ( धुळीचे कण ), शशिकला आळदकर ( आकाश दिवा, तारू लागलें किनारीं ), सौ. उमाबाई भट ( पत्त्याचा बगला ), सौ. कुमुदिनी रागणेकर ( बच्यू लक्ष्मन, इच्छा नगरी, स्पर्धेचा निकाल ), सौ. ज्योत्स्ना भोळे ( आराधना ), सौ. विमल काळे ( मृगजळ ) इत्यादींनींहि मराठी नाट्यकलेच्या विकासासाठीं आपल्या नाट्य लेखनाद्वारें प्रयत्न केलेला आहे.

स्त्रियानीं लिहिलेलीं हीं निरनिराळीं नाटकें लक्षात घेता एक गोष्ट ठळकपणें दिसून येते ती अशी कीं, नाट्यलेखनक्षेत्रांत स्त्रीची लेखणी अद्यापि फारच नवशिकी आहे. पुरुष लेखकाच्या दृष्टीनें ती फार मागें आहे त्यामुळें एखादा अपवाद सोडला तर मराठीतील ' शारदा ' नाटकाची किंवा " सौभद्रा "ची बरोबरी कोणत्याहि स्त्रीच्या नाटकानें केलेली नाहीं ! एवढेंच नव्हे तर खुद्द स्त्री जीवनातील जिव्हाळ्याचे प्रश्न देखील पुरुष लेखकाच्या प्रमाणें नाटकाच्या माध्यमाचे द्वारें समाजापुढें प्रभावीपणें माडणें आचार्य अत्रे याचेप्रमाणें स्त्रियाना जमलेलें नाहीं ! '

नाटककाराला उत्तम नाटक लिहित असताना तिऱ्हाइताच्या भूमिकेवरून जीवनाचें उत्तम चित्र रगवावयाचें असतें. मानवी जीवनाचें प्रतिबिंब नाटकामध्यें हुबेहूब रीतीनें वठवून दाखविण्याची त्याच्यावर जबाबदारी असते स्त्रियाना नेमकें हेंच जमत नाहीं. तिऱ्हाइताच्या भूमिकेवरून विचार करणें स्त्रियाना जमत नाहीं. त्यानीं जें जें लिहिलें त्यात स्वानुभवाची जोड फार आहे. कल्पनेपेक्षा सत्यचित्रणच त्यात विशेष आहे. स्वत च्या . जिव्हाळ्यानें लेखन करणें हा स्त्रीचा खरा मनोधर्म आहे. बदल हा केवळ बदलासाठीं म्हणून पुरुषाला हवा असतो. स्त्रीला बदल नको असतो. तिला जुनें टिकवावेंसे वाटतें. त्यामुळें " नाटक हें

व्यक्तीसाठीं नसून गर्दीसाठीं आहे " ह्या तत्त्वानुसार समाजातील सर्व थरामधून येणाऱ्या हजारों प्रेक्षकांची मनें नाटककाराला आपल्याकडे खेंचून घ्यावयाची कला स्त्रीला साधत नाहीं. नाटकाला जगी स्फोटक द्रव्यासारखा कडाडणारा समरप्रसग हवा असतो नाटक हें एकदम धबधब्याप्रमाणें कोसळत असतें ! स्त्रीच्या मनाचा पिंडच या वातावरणाला पोषक असा नाहीं त्यामुळेंच नाट्यलेखनात ती यशस्वी होऊ शकली नाहीं, असें म्हणावें लागेल एखाद्या निर्झरणीप्रमाणें वळसा घेत घेत झुळु झुळू वहाणाऱ्या कादबरीला पोषक असाच स्त्रीचा मनोधर्म आहे तिला सवादलेखन जमतें पण त्यात नाट्य फार कमी असतें त्याचेंहि कारण हेंच असावें !

स्त्रियानीं लिहिलेल्या नाटकाचा फार तर एखादा दुसरा प्रयोग यशस्वी झाल्याचेंच ऐकिवात येतें ! आणि हे प्रयोग देखील प्रामुख्यानें महिलामडळाच्या एखाद्या स्नेहसमेलनाच्या निमित्तानें झालेले असतात ! गडकरी, अत्रे, खाडिलकर, वरेरकर आणि अगदीं अलीकडचे रागणेकर या नाटककाराच्या नाटकाना मराठी रगभूमीवर जी लोकप्रियता आहे, ती लोकप्रियता स्त्रियाच्या कोणत्याहि नाटकाला मिळालेली नाहीं त्या दृष्टीनें पाहिलें, तर उत्तेजनाभावीं स्त्रीनें विशेष जिव्हाळ्यानें नाट्यलेखन केलें नसावें, असेंहि म्हणता येईल !

एकदरीनें विचार केला असता येथें एकच गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते, आणि ती म्हणजे नाट्यलेखनास लागणाऱ्या प्रभावी मनोवृत्तीचाच स्त्रीच्या ठिकाणीं अभाव आहे, ही होय.

● ● ●

# निबंध

जगातील प्रतिभाशाली व सामर्थ्यसपन्न भाषापैकीं मराठी भाषा ही एक आहे. तिचा प्राचीन काळ वैभवसपन्न आहे तिची त्यावेळची काव्यसपत्ति अलौकिक आहे. गद्यसपत्तीचा बोलबाला त्या काळात फारसा झालेला दिसत नाहीं. जुन्या काळचें कहाणीवाङ्मय आणि बखरवाङ्मय यानीं मात्र आपलें खास वैशिष्ट्य अद्याप शाबूत ठेवलेलें आहे.

तथापि मराठी गद्याचा खरा विकास झाला तो इग्रजी राजवट सुरु झाल्यानतर, असा एक लोकभ्रम फोफावला गेला होता. दरम्यानच्या काळात जुन्या रुमाललेल्या मराठी राजभाषेचा नव्या इग्रजी भाषेच्या प्रभावाखालीं लोकाना विसर पडला होता ! परतु विष्णुशास्त्री चिपळोणकरानीं ह्या लोकभ्रम नाहींसा करण्याचा विडा उचलला मराठीला लाभलेलें सस्कृतचें बोजड वळण काढून टाकून नव्या मराठीचें दर्शन त्यानीं समाजाला घडविलें त्या कामीं कृष्ण

शास्त्री चिपळोणकर यांनीहि श्रम घेतले होतेच. त्या कारणानें परक्या भाषेंतील भाषातरित वाङ्मयानेंहि दिशाभूल पावलेल्या मडळींचा भ्रमनिरास होणें सोईचें झालें. एवढेंच नाहींतर इंग्रजी वाङ्मयाचा विचार करताना " इग्रजी वाङ्मयाचें अध्ययन करावयास गेलों तर एकाऐवजीं शेंकडों टीका, प्रतिटीका, चर्चा, टिप्पणी ग्रथ, साराश ग्रथ, चरित्र ग्रंथ, कोश ग्रथ आपल्या सहाय्यास सिद्ध असतात. फक्त वाचावयाचें व मनन करावयाचें! मराठींत तसें नाहीं. सारा धर्मशाळेंतला ससार! त्यामुळें जी वेडीवाकडी शिधासामुग्री मिळेल त्यावर भात पिठलें साधेल तसें उरकून दिवस साजरा करावा लागतो. आज आमची मराठी अशी पोरकी दिसली तरी ती थोरामोठ्यांची कुलीन, शुद्ध सत्त्व आहे, तिचें कोड परमेश्वर पुरविणारा आहे! *" ही कल्पनाहि मागें पडली आणि मराठींतील गद्यवाङ्मय–विशेषतः निबधवाङ्मय झपाट्यानें लोकमान्य होत गेलें. विष्णुशास्त्री चिपळूणकरापासून तो साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकरापर्यंत अनेक निबधकारांनीं उल्लेखनीय कामगिरी केली.

दरम्यानच्या काळात इ स. १८५७ सालीं मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली. देशी भाषेची त्या कारणानें हकालपट्टी झाली. तसेंच गोडबोले, लेले, राजवाडे प्रभृतींच्या लेखनानें सस्कृताचा उतारा मराठींत आणला. कोल्हटकर चिपळूणकरांनीं मराठी निबधाला चागले दिवस आणले. मोरोबा, हळबे, रिसबूड वगैरेंनीं मराठी कादबरीला सजविलें. आणि विशेषत. इ. स. १८७४ त मालाकारांनीं मराठीचा खरा जयजयकार केला. मराठीचा गेलेला मान पुन्हा मिळाला.

" समाजाला निद्रेंतून जागें करणें जीवनातल्या मूल्याचा निर्णय आणि प्रामाणिक दृष्टीनें विचार करायला त्याला शिकविणें, जें असत् आणि अमगल आहे त्याच्यावर तर्कशुद्ध प्रहार करणें, जें सत् आणि मगल आहे त्याचा सावेश पुरस्कार करणें " ‡ हें निबध लेखकाचें मुख्य कार्य मराठींतील सतांनीं पूर्वीच केलें होतें.त्याला पुढें चागले दिवस येत गेले. आणि मराठींत डौलदार निबधाची रचना भरघोसपणें होत गेली.

सुरवातीच्या निबधाचें स्वरूप विचारप्रवर्तक होतें. टिळक, आगरकर, केळकर, पराजपे किंवा अच्युतराव कोल्हटकर हे साहित्यिक असूनहि पत्रकार असल्यामुळें त्यांनीं आपल्या निबधाच्याद्वारें आपल्या विचाराचाच प्रामुख्यानें प्रचार केलेला दिसून येईल. अर्थातून त्याचे हे विषय त्यांनीं आपल्या भोंवतालच्या राजकीय धुमाकुळींतून निवडले. देशाची त्या वेळची परिस्थितीच अशी होती कीं, या क्षेत्राशिवाय विषयाची निवड करणें त्याना शक्यच होऊ नये! त्यामुळें त्याच्या

---

* द. वा. पोतदार. मराठी गद्याचा इग्रजी अवतार. पा. १७

‡ वि. स. खाडेकर. प्रास्ताविक, वासतिका.

निबंधाची घडणहि गंभीर स्वरूपाची झाली आहे. ह्या निबंधाची रचना होत असताना त्या निबंधकाराचें पांडित्य, तर्कशुद्ध विचारसरणी आणि विलक्षण आवेश इत्यादि गुण जणुं पणालाच लावले जात! ह्या निबंधांतून कसल्याहि प्रकारचा ललित आत्माविष्कार होत नव्हता हें विशेष होय.

१९२० नंतर वाङ्मयाचें एकंदर युगमान पालटलें. जीवनाकडे पहावयाची माणसाची दिशाहि बदलली. पत्रकार आणि साहित्यिक या दोन भूमिका एकत्रित होऊन निर्माण होणारा निबंध हळू हळू लुप्त होत चालला. पत्रकार हा साहित्यिक एक वेळ असू शकेल पण साहित्यिक हा पत्रकार असेलच असें मात्र सांगवत नाहीं. त्यामुळें पत्रकार आणि साहित्यिक हे दोन वर्ग बदलत्या कालक्रमणानुसार विभक्त होत गेले. अगदीं लहान किंवा क्षुल्लक वाटणाऱ्या घरगुती विषयावरहि पुष्कळ लोक निबंधरचना करूं लागले. लेखकाच्या याच मनःप्रवृत्तीमधून लघुनिबंधाचा जन्म झाला.

निबंधाची व्याख्या तयार करतांना आर्लो बुईल्यम्‌ हा प्रसिद्ध निबंध-शास्त्रज्ञ म्हणतो कीं "विचाराची स्वैर व आनंददायक मांडणी, त्या विचाराच्या प्रतिपादनांतील कलाविलासाची शोभा आणि अल्पावकाशांतूनच प्रकट होणारे मनाच्या विशालतेचे पडसाद इत्यादींनीं युक्त असलेला लेख म्हणजे निबंध होय."*
अर्थात्‌ प्रत्येक निबंधकाराला हें म्हणणें सर्वस्वीं मान्य होईलच असें नाहीं. पण त्यावरून निबंध या कला प्रकाराबद्दल कल्पना यावयास हरकत नाहीं एवढी ही व्याख्या समर्पक आहे. निबंधाची अगदीं सुटसुटीत व्याख्या पहावयाची असेल तर जे. बी. प्रीस्टले यांचें पुढील मत पहावें. त्यांच्यामतें "शेगडीजवळ बसून गप्पा मारणारा तत्त्वज्ञ म्हणजेच निबंधकार होय"

आणि त्याच दृष्टीनें स्त्रियांनीं लिहिलेल्या या कालखंडातील निबंधाचेकडे पहावयास हरकत नाहीं.

● ● ●

## गिरिजाबाई केळकर

जुन्या काळच्या एक नामवंत लेखिका या दृष्टीनें गिरिजाबाई केळकर यांचा उल्लेख करण्यांत येतो १९२० पूर्वीं त्यांनीं लेखनाला आरंभ केलेला असला तरी अद्यापहि त्या लेखन करीत आहेत. त्यांच्या विचारांना लाभलेलें एक प्रकारचें जुनें वळण अद्यापहि आहे असें त्यांच्या अनेक निबंधांवरून दिसून येईल.

"संसार सोपान" या पुस्तकांत त्यांनीं एकत्र कुटुंब पद्धतीची बाजू

---

* साहित्यदर्शन पान १३.

माडलेली आहे. मुलींना संसाराला उपयुक्त असें व्यावहारिक शिक्षण परंपरेनें मिळत असतें असें त्यांचें म्हणणें आहे; आणि एकत्र कुटुंबामध्येंच तें शक्य आहे असें त्यांनीं मोठ्या कौशल्यानें दर्शविलें आहे. अलीकडच्या काळामधील वाढत्या स्त्रीशिक्षणामुळें व स्त्रीपुरुषामधील समानहक्काच्या जाणिवेमुळें जो स्त्रीच्या मनाचा एक वेगळा कल होत चालला आहे, त्यामुळें गृहिणी या नात्यानें स्त्रियांच्या कर्तृत्वशक्तीची हानी होत आहे असे गिरिजाबाईंनीं स्पष्टपणें येथें नमूद केलेलें आहे.

घरातील प्रत्येक कामाकडे घरमालकिणीने जातीनें लक्ष घालावें असें लेखिकेचें म्हणणें आहे. त्याशिवाय घराची निगा नीट राखली जाणें शक्य नाहीं असेंहि त्याना सुचवावयाचें आहे.

या पुस्तकातील अठराव्या प्रकरणात लेखिकेनें खाजा, तिखट खाजा, शंकरपाळीं, जिलबी, लाडवात दळ, बाळंतणीचा खाजा, साखरपाण्याच्या वड्या, नानकटाई, करंज्या, चिरोटे, शेवया, गव्हले, खीर, खाजोऱ्या, सर्व प्रकारच्या पोळ्या, उसळ, माहिमी हलवा, पारोटे, बट्टया इत्यादि प्रकार गव्हापासून करता येत असल्याची उपयुक्त माहिती दिलेली आहे व ती आकर्षकहि आहे.

जुन्या पिढीच्या स्त्रियांची प्रतिनिधि म्हणून गिरिजाबाईंना संबोधण्यात येतें. त्यांनीं स्वानुभवावर आधारलेलें लेखन करून त्यामध्यें सामान्यत: जुन्या परंतु चांगल्या चालीरीतींची बाजू हिरिरीनें मांडून नव्यासीं मिळतें घेण्याचें धोरण ठेवलेलें आहे. स्त्रीशिक्षण, सोवळें ओवळें, त्यातील मानपान व रुसवे फुगवे, प्रौढ विवाह, तरुण पिढी इत्यादींबद्दल माहिती देऊन कालमानाप्रमाणें योग्य तो बदल असावा, असें मोठ्या खुबीनें त्यांनीं सूचित केलेलें आहे.

गिरिजाबाईंची भाषा सोपी, प्रौढ आणि घरगुती असून त्यांनीं आपले विचार विविध प्रकारच्या निबंधांतून काहींसा जोरदारपणानें पण सुबोध वाटतील अशा आपुलकीच्या जिव्हाळ्यानें मांडलेले आहेत. त्यांची विषयांची मांडणी करण्याची पद्धति आकर्षक आहे. शिवाय त्यांनीं केलेला घरगुती प्रसंगाचा उठावदार मनोवेधक झालेला आहे, यात शंका नाहीं.

● ● ●

## लक्ष्मीबाई प्रधान

" माजघरांतील चर्चा " या पुस्तकात श्री. लक्ष्मीबाई प्रधान यांनीं स्त्रियांना उपयुक्त अशा निरनिराळ्या विषयावर संवादरूपानें चर्चा केलेली आहे. " ऋषिपंचमी कीं रुढिपंचमी ", " कायद्याचें अज्ञान ", " रोगाचें बीज ", " डॉ. देशमुखांचें शील "," गृहरचनेंतील सौंदर्य दृष्टि " " वाटसरूंचें महत्त्व "

वगैरे विषय या चर्चेत आलेले आहेत. येथें प्रस्तावनेंत काशीबाई कानिटकरांनीं म्हटल्याप्रमाणें "लेखिकेनें प्रत्येक गोष्टींत मनुष्य स्वभावाचें चित्र उत्तम रेखाटिलें आहे, व हल्लीं प्रचलित असलेल्या अनेक वेडगळ चालीरीतींना स्त्रियांनीं रूढीमुळें कसें विकृत स्वरूप दिलें आहे हें फार मार्मिकपणानें दाखविलें आहे." या सर्व लेखांतून मनोरंजक उपदेश ध्वनित झालेला असून लेखांची भाषा प्रौढ व साधी अशी उतरलेली आहे. अनुभवाची पार्श्वभूमि याहि लेखांना लाभलेली असल्यामुळें वाचकास ओळखीचें जग भेटल्याचा आनंद होतो.

० ० ०

## बाळूताई खरे

"अलंकार-मंजूषा" हा कु. बाळूताई खरे यांचा प्रबंध एक उल्लेखनीय ग्रंथ म्हणून येथें नमूद करावा लागेल.

या प्रबंधामध्यें लेखिकेनें दर्शविलेलें प्राविण्य खरोखरच प्रशंसनीय आहे अलंकारशास्त्रासारख्या अवघड विषयावरील सर्व मतांची अभ्यासपूर्वक छाननी करून शिवाय कांहीं अलंकारांचें एकत्रीकरण करण्याची नवीन सूचना करावयाचें हें काम साधें नव्हे. अलंकारशास्त्राचा अगदीं खोल्वर असा अभ्यास करून येथें लेखिकेनें अलंकाराच्या लक्षणाची अतिशय सूक्ष्म अशी चर्चाहि केलेली आहे हें विशेष होय.

अरेबियन नाईटस्मधील रत्नाच्या चमचमाटानें मनुष्य भांबावून जावा आणि त्यांतील कोणतीं रत्नें उचलून घेऊं आणि कोणतीं नकों याबद्दल त्याच्या मनांत संभ्रम निर्माण व्हावा, तशीच स्थिति अलंकारशास्त्रज्ञाची होत असावी, असें लेखिकेनें उपसंहारांत म्हटलें आहे. त्याबद्दल लिहितांना लेखिका म्हणते, "प्रत्येक अलंकार शास्त्रज्ञाला काव्यांतील विविध सौंदर्यानें असेंच भांबावल्यासारखें झालें. या सौंदर्याचा सन्मान करूं तरी कसा व कोणत्या आदरपूर्वक पदवीनें ! बरें तें सौंदर्य तरी एका तऱ्हेचें थोडेंच ! त्याच्या कितीक कला त्या सौंदर्यस्थलाचें कौतुक करून प्रत्येकांतील सूक्ष्म विभिन्नता लक्षांत घेऊन कौतुकानें सूक्ष्म सौंदर्यकलेचेंहि व्यवच्छेदन करून शास्त्रज्ञांनीं तिला एकेक नामपदवी दिली ' आणि त्याच पदवीची यथार्थता तिनें आपल्या शक्तीप्रमाणें येथे पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. सखोल अभ्यास आणि विचारप्रवर्तक लेखन यादृष्टीनें या ग्रंथाचें मोल विशेष आहे.

० ० ०

## गोदावरी केतकर

"भारतीय नाट्यशास्त्र" या ग्रंथांत गोदावरी केतकर यांनीं नाट्यशास्त्राच्या अंगोपांगांची विवेचक व सविस्तर चर्चा केली असून ती मराठींतील नाटकाच्या

उदाहरणानीं समजावून सागण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे नाट्यासारख्या एका महत्त्वाच्या आद्य प्रथाचें मराठींत सुलभ आणि सुसगत विवेचन करणारा प्रबंध या दृष्टीनें या मराठी नाट्यशास्त्राची योग्यता मोठीच आहे यात शका नाहीं

● ● ●

## वेणूताई पानसे

"हरि नारायण आपटे—चरित्र व वाङ्मय विवेचन" हा वेणूबाई पानसे याचा ग्रथ अलकार मजुषाचे सुमारास प्रकाशित झाला आहे या ग्रथात वणूबाईंनीं हरिभाऊच्या वाङ्मयाबद्दल परीक्षणात्मक असें बरेंच लिहिलेलें आहे हरिभाऊबद्दलच्या ज्या जिव्हाळ्यानें त्यानीं त्याच्या चरित्राचा असा या ग्रथाचा जो पूर्वार्ध लिहिला आहे, तो जिव्हाळा या वाङ्मयीन विवेचनाच्या उत्तरार्धात मात्र उतर लेला नाहीं असें दिसून येते एक तर हें विवेचन फार विस्तारपूर्वक झालेले असल्यामुळें कटाळवाणें झालें आहे, आणि दुसरें म्हणजे हरिभाऊचें चरित्र सागत असताना त्यात मधून मधून वाङ्मयाचाहि उल्लेख आल्यानें पुनरुक्तीचा दोष देखील ठिकठिकाणीं निर्माण झालेला आहे तथापि हरिभाऊचें वाङ्मय अभ्यासून हें लेखन झालेले आहे हें मान्य करण्याइतपतची बारीकसारीक वाङ्मयीन माहिती या ग्रथात आलेली आहे. हरिभाऊच्या निकटच्या मडळींतील एका पदवीधर लेखिकेनें त्याच्या वाङ्मयाचें केलेलें हें विवेचन यापेक्षाहि चटकदार व्हायला हवें होतें कारण हरिभाऊच्या जीवनाचें जिवत दर्शन ज्या लेखणीनें घडविलें तीच लेखणी त्याच्या वाङ्मयाचेंहि खरेखुरें दर्शन का घडवू शकली नाहीं, किंवा तींत थोडीफार का होईना कमतरता का यावी, हें कोडें न उलगडण्यासारखेंच दिसतें ! कदाचित् लेखिकेनें हरिभाऊचें जीवन जेवढें जवळून पारखून घेतलें तितकें त्याचें वाङ्मय अभ्यासिलें नसण्याचाहि सभव आहे !

"प्रगतिपथावर" या आपल्या पुस्तकात वेणूबाईंनीं हायस्कूल फॉर इडियन गर्ल्स्, हुजुरपागा, या सस्थेच्या ५० व्या वर्षाच्या सुवर्ण महोत्सवप्रसगीं सस्थेनें केलेल्या कार्याचा समग्र इतिहास दिलेला आहे या पुस्तकाची माडणी एकदरीनें चागली झालेली आहे

● ● ●

## सौ. कमलाबाई टिळक

स्त्रियाचें शिक्षण जसें वाढलें तसा त्या विविध विषयावर विचारप्रवर्तक लेखन करू लागल्या हें बाळुताई खरे किंवा वेणूताई पानसे याच्या लेखनावरून दिसून

आलेंच आहे. कमलाबाई टिळकांनीं त्याच्याप्रमाणेंच अभ्यासपूर्ण असें लेखन केलें आहे. पण त्याचा विषय मात्र निराळा आहे. समाजातल्या सामाजिक जीवनात स्त्रियाना जो अन्याय सहन करावा लागला, किंवा आजवरच्या रूढींच्या नियमांनीं त्याना समाजात जे कमी प्रतीचें स्थान मिळत गेलें, त्याची चर्चा करणारें पुस्तक कमलाबाईंनीं लिहिलें. " स्त्री जीवनविषयक काहीं प्रश्न " या पुस्तकात त्यांनीं स्त्रीजीवनात उद्भवणाऱ्या अनेक प्रश्नांची चिकित्सापूर्ण छाननी केलेली आहे आणि ती करीत असताना त्यांनीं हिंदी स्त्रीच्या जीवनाची परराष्ट्रीय स्त्रीच्या जीवनाशीं विशेष उल्लेखनीय तुलनात्मक माहिती मधून मधून दिलेली आहे,

या पुस्तकात वेदकालीन स्त्रीजीवनापासून तों आजतागायतच्या स्त्रीजीवनाचा आढावा घेण्यात आलेला आहे. त्यासाठीं लेखिकेनें धार्मिक ग्रंथामधील अनेक उतारे आधारादाखल म्हणून घेतलेले आहेत हें सर्व विवेचन येथें विस्ताराच्या दृष्टीनें मोठें व चटकदारहि झालेलें आहे.

" स्त्री ही कुटुंबराज्याची स्वामिनी आहे " हें लक्षात घेऊन स्त्रीशिक्षणाचा व विवाहाचा प्रश्न लेखिकेनें अनेक उदाहरणें देऊन व कायद्याचे आधार घेऊन सविस्तर चर्चिलेला आहे. ह्यातील " स्त्रियांचे कायदेशीर हक्क " या विषया-संबंधाचीं दोन प्रकरणें विशेष आस्थापूर्वक लिहिलीं गेलीं असून एका स्त्रीनेंच आपल्या जीवनातील ह्या महत्त्वाच्या भागाचें सखोल विवेचन केलें आहे हें या प्रकरणाचें महत्त्वाचें अंग होय. वास्तविक, हिंदु कायद्याचा, विशेषतः एकदरीनें सर्व कायद्याचाच प्रश्न स्त्रीच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचा आहे. पण नेमक्या त्याच भागावर दुर्दैवानें स्त्रीची लेखणी एखादा अपवाद सोडला तर खर्ची पडलेली दिसत नाहीं त्या दृष्टीनें लेखिकेचें हें विवेचन केव्हाहि स्वागतार्ह आहे यात वाद नाहीं, आणि तें विवेचन सविस्तरहि झालेलें आहे ही समाधानाची गोष्ट होय.

या पुस्तकाचा बराचसा भाग परदेशीय वातावरण रंगविण्यात गेल्यामुळें आपल्याकडील स्त्रियांबद्दलचें विवेचन मात्र काहीं अंशीं अपुरें झालें आहे, असें या पुस्तकातील कोणत्याहि भागावरून दिसून येईल. तथापि या पुस्तकाची भाषा ओघवती असून विचार मांडण्याची पद्धति चित्ताकर्षक आहे. लेखिकेची कल्पनेची भरारी बडखोर वृत्तीची असून आघाडीवरील योद्ध्याच्या हिरीरीनें तिचें चित्रण झालेलें आहे.

• • •

## डॉ. चंद्रकला हाटे

डॉ. चंद्रकला हाटे यानीं स्त्रीजीवनातील विविध प्रश्नावर १९२८ पासून तों आजतागायत अनेक मासिकामधून लेख लिहिलेले आहेत. विशेषतः स्त्री किंवा

किर्लोस्कर या मासिकामधून त्यांनीं विपुल लेखन केलें. परंतु आजवरच्या लेखिका-प्रमाणें केवळ प्रपंचकथा न सांगता स्त्री ही एक पुरुषाप्रमाणेंच मनुष्य आहे या दृष्टीनें तिच्याकडे बघून अलीकडच्या काळातील स्त्रीजीवनाबद्दल त्यांनीं आपले विचार व्यक्त केलेले आहेत. डॉ. हाटेनीं आपल्या " हिंदु स्त्री आणि तिचें भवितव्य " या ग्रंथात आपले हे विचार स्पष्टपणें मांडलेले आहेत.

पुरुषाप्रमाणेंच स्त्री ही एक मानवी प्राणी असून तिनें आपल्या भवितव्याच्या सुखासाठीं पुरुषावर अवलंबून न राहता किंवा आपल्या हक्कासाठीं त्यांच्याकडे मागणी न करता आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावरच इच्छित कार्याची सफलता मिळवावी असें चंद्रकलाबाईंनीं अनेक लेखांमधून व्यक्त केलेलें आहे.

चंद्रकलाबाईंनीं विवाहासंबधींहि भरपूर लेखन केलें असून त्यात सन्मित्राच्या उच्च भूमिकेवरच वैवाहिक आयुष्याची यशस्विता अवलंबून असते, असें सुचविलें आहे.

कायद्याच्या बाबतींतहि लेखिकेनें अभ्यासपूर्ण लेखन केलें असून त्यात येणाऱ्या प्रत्येक कलमाची सुंदर छाननी केलेली आहे. वास्तविक हा भाग लेखिकेच्या आवडीचा दिसतो, परंतु तो तिने फार थोड्या प्रमाणात हाताळलेला आहे असें म्हणावें लागेल.

हिंदुस्थानची भावी राज्यघटना* डोळ्यासमोर ठेवून लेखिकेनें ह्या घटनेंतील स्त्रियांचें स्थान ठरविताना स्त्रीला तिच्या व्यक्तित्वाची वाढ करून देईल, असें हक्काचें स्थान तिला समाजात मिळावें, असें आग्रहानें प्रतिपादन केलेलें आहे.

" उपासमार कीं नियोजन ? अर्थात् हिंदी लोकसंख्येचा प्रश्न " हें एक महत्त्वाचें पुस्तक डॉ. हाटे व कु. कोल्हटकर या दोघींनीं मिळून लिहिलेलें आहे. हिंदुस्थानच्या आर्थिक प्रश्नाकडे सरकारचें व लोकांचें लक्ष ज्यावेळीं विशेष खेंचलें गेलें त्या काळात हें पुस्तक प्रकाशित झालेलें आहे. या पुस्तकाचे प्रस्तावनाकार श्री. श्री. गो. बेरी यांनीं म्हटलें आहे कीं, " मराठी भाषेंत हिंदी लोकसंख्येच्या प्रश्नावर लिहिलेलें हें पहिलेंच पुस्तक आमच्या अवलोकनात आलें. " आणि त्या दृष्टीनें मराठी सारस्वतात या पुस्तकाचें स्थान विशेष आहे असें म्हणावयास हरकत नाहीं

१९११ पासून आपल्या देशाच्या लोकसंख्येची वाढ दरसाल पस्तीस ते चाळीस लाखाच्या दरम्यान होते आहे. त्या दृष्टीनें आपल्याकडील लोकांचें सरासरी आयुर्मान फार कमी आहे आणि त्यामुळें आपल्या देशाच्या उत्पादनास काहीं मदत होण्याऐवजीं देशावर उलट पोषणाचाच भार पडत आहे ! जीवनकलहाच्या तीव्रतेची जाणीव होऊन या लेखिकानीं हा प्रश्न हाताळला असावा. या लेखिकानीं

---

* डिसेंबर १९४०

या विषयाचें सर्व बाजूंनीं मोठें मार्मिक विवेचन केलेलें आहे. त्यासाठीं अनेक प्रकारच्या तक्त्यांची व कोष्टकांची भरपूर योजना येथें केलेली असून, त्यावरून विविध प्रांतांतील अनेक जातींची तुलनात्मक माहिती वाचकांसमोर ठेविली आहे त्यामुळें या विषयाची सर्वसामान्य वाचकालाहि ओळख पटावी इतकें या ग्रंथाचें विवेचन सुंदर झालेलें आहे शिवाय या ग्रंथाची भाषाहि सोपी व सहज समजेल अशी उतरलेली आहे, आणि हाच या पुस्तकाचा प्रमुख गुण म्हणावयास हरकत नाहीं

इतर देशाच्या मानानें हिंदुस्थानच बालमृत्यूचें व मातांच्या मृत्यूचें प्रमाण जास्त असल्याचें दाखवून त्यास कारण म्हणून आपल्याकडील लोकांच्या रहाणीचा कनिष्ठ दर्जा व दारिद्र्य यांची माहिती येथें लेखिकांनीं दिलेली आहे.

या ग्रंथाच्या उत्तरार्धात हा वाढता लोकसंख्येचा प्रश्न सोडविण्यासाठीं-संख्या व संपत्ति यांचें समीकरण घडविण्यासाठीं—लोकांचा रहाणीचा दर्जा सुधारावा म्हणून सामाजिक व आर्थिक नियोजनानें एकत्रीकरण करण्याची योजना सुचविलेली आहे त्याचबरोबर संपत्तीच्या वाढीच्या प्रमाणात लोकांची कार्यक्षमता वाढण्यासाठीं सार्वजनिक आरोग्य व शिक्षणप्रसार अवश्य असल्याचें येथें नमूद केलेलें आहे

एकदरीनें या ग्रंथाचा दर्जा बराच वरचा आहे हें कोणासहि मान्य होईल नाहीं एखादी स्त्रीलेखिका एखाद्या कठिण विषयावर विचार करून उत्तम ग्रंथ निर्मिति करून पुरुषवर्गालाहि त्या ग्रंथाची मान्यता समाधानानें देण्यास प्रवृत्त करू शकते, हें अशा ग्रंथावरून म्हणावयास हरकत नाहीं

चंद्रकलाबाईच्या या निबंधामधून स्त्रियांच्या सामाजिक सुधारणेबद्दलचा व सामाजिक दर्जाबद्दलचा जिव्हाळा फार उत्कटत्वानें दिसून येत आहे त्यांची विचारसरणी जशी पुरोगामी आहे तशीच भाषाहि आकर्षक आहे स्त्रीजीवनातील विविध प्रश्न हाताळताना लेखिकेनें कायद्याच्या कक्षेंत येणारा भाग अधिक लिहावयास हवा होता येवढें मात्र वाटतें.

• • •

## सौ. मालतीबाई दांडेकर

सौ. मालतीबाई दांडेकर यांनीं स्त्रीजीवनावरील विविध प्रश्नांची चर्चा करणारीं अशीं एकूण चार पुस्तकें लिहिलीं आहेत या पूर्वीच्या स्त्रियांनीं स्त्रियांच्या जीवनाचा जो विचार केला आणि त्या विषयीं जें लेखन केलें तीच भूमिका याहि लेखिकेची आहे. मात्र या पुस्तकाच्या परिसरात येणारें स्त्रीजीवन आजच्या काळातील आहे येवढा फरक येथें प्रामुख्यानें नमूद करावा लागेल.

"अमोल आहेर" या पुस्तकाचें स्वरूप पत्रात्मक आहे नववधूनें

आपल्या नव्या संसारात धांदल गडबड न उडवता चांगल्या रीतीनें कसें वागावें याची शिकवण या आहेराच्याद्वारें सौ. मालतीबाईंनीं दिलेली आहे. विशेषत आजच्या काळात फक्त राजाराणीच्या कुटुंबाचाच थाट ठेवणाऱ्या सुशिक्षित मुलींना या पुस्तकानें मार्गदर्शन घडावें असा लेखिकेचा हेतु आहे.

"तरुणींचे प्रश्न" हें मालतीबाईंचें अलिकडचें पुस्तक याच प्रकारचें आहे. मालतीबाई आपल्या लेखनाची भूमिका प्रत्येक पुस्तकाला जोडलेल्या स्वत.च्या प्रस्तावनात नमूद करून ठेवतात, हा त्यांच्या लेखनाचा एक विशेष होय. माझें लेखन मी अमुक एक हेतु मनात धरून लिहिलें किंवा अमुक एका विशिष्ट दृष्टिकोनातून माझ्या विचाराना मीं चालना दिली, हें खुद्द लेखकानेंच नमूद केल्यानतर त्याविषयीं वादळ निर्माण व्हायचें कारण उरत नाहीं, आणि शिवाय वाचकालाहि आपले विचार पुस्तकातील विचारांशीं तोलून पहायला सोपें जातें. तेव्हा मालतीबाईंची ही वैशिष्ट्यपूर्ण भूमिका खरोखरच वाखाणण्यासारखी आहे.

या पुस्तकात मालतीबाईंच्या भाषेची घडण मोठी डौलदार झालेली आहे. एखादा रुपाया किंवा नाणें फरसबंदी जमिनीवर टाकावें आणि त्याचा झकार किंवा छिन्छिनाद् कानात घुमून समाधान व्हावें तसा ह्या भाषेचा नाद आहे. येथें मालतीबाईंनीं आपल्या पूर्वीच्याच पुस्तकातील काहीं प्रश्नाची उजळणी केली आहे हें मान्य केलें, तरीहि आजच्या तरुणींच्या गुणाबरोबरच दोषाचेंहि निर्भयपणें दिग्दर्शन केलेलें आहे, हे विशेष होय. शिवाय स्त्रीजीवनात येणाऱ्या बहुतेक सर्व बारीक सारीक प्रश्नाची छाननी करण्याचा लेखिकेनें येथें अभ्यासपूर्वक प्रयत्न केलेला आहे.

"आकर्षक ससार" ह्या पुस्तकाची उभारणी मालतीबाईंनीं "स्त्रीन स्त्रीच्याच दृष्टीकोनान लिहिलेल अन् आज घडीपर्यंतची विस्कळित समाजरचना हिशेबात घेऊन ससाराची आकर्षकता कशी कायम ठेवावी हें दर्शविणार पुस्तक अद्यापहि वाङ्मयदालनात दिसत नव्हत ! ती उणीव हें माझ पुस्तक अल्पांशान तरी भरून काढील असा विश्वास वाटतो" या दृष्टीनें केली आहे.

कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीनें व विशेषत पतिपत्नींनीं एकमेकाशीं व नातलगाशीं कसें वागावें आणि गृहाला नदनवनाचें स्वरूप कसें आणावें, हें सागण्याची लेखिकेनें येथें पराकाष्ठा केली आहे तथापि या चारहि पुस्तकातून त्याच त्याच विषयाची व विचाराची पुनरावृत्ति अनेकदा झाल्यानें काहीं विवेचन सगळीकडेच कटाळवाणें झालेलें आहे. कदाचित् एकाच विषयाकडे विविध दृष्टिकोनातून पाहिल्याचा हा परिणाम असावा !

ह्या पुस्तकातून मालतीबाईंनीं स्त्रीजीवनात येणाऱ्या मतवैकल्यासारख्या अनेक जुन्या चालीरीतींची व आजच्या स्त्रीजीवनातील नोकरीसारख्या अनेक प्रश्नाची मोठी मनोवेधक माडणी केलेली आहे

" लोकसाहित्याचें लेणें " हा मालतीबाईंचा लोकगीतावरील प्रबंध मोठा उल्लेखनीय आहे. या प्रबंधात मालतीबाईंनी निरनिराळ्या विषयावरील ओव्या संपादित केलेल्या असून विषयवार त्याची रसग्रहणात्मक मांडणी केलेली आहे.

मालतीबाईंनी या ओव्या प्रामुख्यानें सातान्याकडील मराठमोळ्या व शेतकरी स्त्रियान्याकडून घेतलेल्या असल्यानें या प्रबंधाला एक निराळें वैशिष्ट्य प्राप्त झालेलें आहे.

• • •

# सौ. उषा देशमुख

स्त्रियांच्या सर्वांगीण उन्नतीबाबतचे जोरदार विचार मांडणारी लेखिका म्हणून सौ. उषा देशमुख याना मानाचें स्थान मिळालेलें आहे. समाजकारणाचा आणि राजकारणाचा अभ्यास करून त्यांनीं अनेक लेख लिहिले असून त्याची विचारसरणी समाजवादी धोरणाची आहे.

उपासमारीचें कारण शोधून काढून त्यावर उपाय सुचविताना उषाबाईंनीं दर हजार माणशीं शेतकीवर होणारा सरकारी खर्च, शेतीवर अवलंबून राहणाऱ्या हिंदी लोकांचें प्रमाण आणि अन्न निर्मितीच्या जमिनीच्या लागवडीचे दर माणशीं प्रमाण याचीं कोष्टकें दिलीं आहेत.

" पहाटे पूर्वीचा काळोख "० या लेखातील संपत्ति निर्माण करणारे आणि संपत्तीची मालकी गाजविणारे एक होतील, तरच भविष्यकाल सुखावह होण्याची आशा लेखिकेनें दर्शविली आहे.

हिंदी महिलांच्या जीवनक्रांतीचें थोडक्यात दिग्दर्शन करविताना " नवी सृष्टि, नवी दृष्टि " या लेखात ( स्त्री ऑक्टोबर १९४६ ) उषाबाईंनीं भारतीय महिलांची सृष्टि पूर्वकालिन महिलांच्या पराक्रमी मार्गदर्शनानें जागृत झाली असल्याचें समर्पकरीं या दर्शविलेलें आहे. याशिवाय स्वतंत्र हिंदुस्थानमधील स्त्री व पुरुष समान भूमिकेवर यायचे असतील, तर त्यांनीं समाजवादी धोरणाचा पुरस्कार केला पाहिजे, असेंहि त्यांनीं सुचविलेले आहे.

" अष्टीला मी काय पाहिलें "* या लेखात ऑगस्ट आंदोलनातील स्मृति लेखिकेनें एकत्र गुंफल्या आहेत. त्या काळात मनानें खंबीर असलेल्या भारतीय स्त्रीच्या मनाची घडण चांगली होत असल्यानें आपलें मत हृदयद्रावक वर्णनानीं लेखिकेनें पटवून दिलें आहे.

---

० स्त्री, एप्रिल १९४१,
* स्त्री, ऑगस्ट १९४६.

" नव्या युगाची महाराष्ट्रीय महिला "× या लेखात उषाबाईंनी आपलें राष्ट्र स्वतंत्र झाल्यावर एका नवीन युगास सुरवात झाल्याचें दर्शविलें आहे.

● ● ●

## रोहिणी भाटे

" नूपुराच्या किंचित् रुणझुण नादानेंहि जिच्या अंगावर आज रोमांच उभे राहतात, तळव्यावर साधा जरी बोल वाजूं लागला तरी स्वतःच्या पावलांना ताब्यांत ठेवणें जिला आज जड जातें, समोर चालू असलेलें कोणतेंहि नृत्य पाहतांना स्वतःच्या अंगाअंगातून जागी होणारी नृत्याची स्फूर्ति जी लपवून ठेवूं शकत नाहीं, वाद्यवृंदाच्या सेळकर संगीतांतून उमटणाऱ्या सादेला जिच्याकडून आपोआपच तालबद्ध प्रतिसाद मिळू पाहतो, त्या माझ्यासारख्या मुलीच्या आयुष्यांत डोकावून पाहून त्या नृत्यविषयक आवडीचें मूळ कोणी शोधूं म्हटलें, तर तें मात्र कठीण आहे खरोखरच माझ्यांत ही आवड कशामुळें उत्पन्न झाली हें कोडें मला नक्की उकललें नाहीं " अशा प्रकारची स्वतःची नृत्यविषयक पार्श्वभूमि सांगणाऱ्या रोहिणी भाटे यांचे पूर्वी विविध नियतकालिकांतून लिहिलेले नृत्या वरील लेख आता " माझी नृत्यसाधना " या पुस्तक रूपानें प्रकट झालेले आहेत. हे विचार मोठे आकर्षक आणि सेळकर वृत्तीनें हाताळलेले आहेत

वास्तविक आजवर नृत्याची कला विशेषतः स्त्रियांनीं आत्मसात् केलेली आहे. परंतु त्या विषयावर अभ्यासपूर्ण असें लेखन कोणीं केलेलें नव्हतें. ती बाजू या लेखिकेनें काहीं अंशीं का होईना सावरली, ही विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणावी लागेल. रोहिणी वागळे यांनींहि या विषयावर काही स्फुट लेखन केलेलें आहे

" माझा नृत्यव्यासंग" या लेखात रोहिणी भाटे यांनीं आपल्या नृत्या बद्दलची मनोरंजक माहिती दिलेली आहे

" काहीं नृत्यनाट्यप्रयोग " या लेखात लेखिकेनें विविध नृत्यकाराच्या नृत्याची सचित्र माहिती दिलेली आहे, आणि ती देत असतांना त्या त्या विशिष्ट नृत्यकाराचें त्या कलेंतील वैशिष्ट्यहि सूक्ष्म निरीक्षण करून आकर्षक पद्धतीनें दर्शविलें आहे नृत्यावरील अशाच इतर लेखांमधून रोहिणीबाईंनी कथाकली, भरतनाट्य, मणिपूर व कथक या नृत्यांच्या चार मार्गांचा इतिहास, आजचें स्वरूप आणि शास्त्र व कला यांची होत असलेली फारकत या दृष्टीकोनातून सविस्तर माहिती दिलेली आहे.

" दाक्षिणात्य नृत्य पद्धतीचे दोन प्रवर्तक " या लेखात रोहिणीबाईंनी

× स्त्री, जून १९४९.

श्री. गोपीनाथ व सौ. तंगमणी या श्रेष्ठ कलावंताची व त्यांच्या नृत्यकलेतील वैशिष्ट्याची समर्पक रीतीनें माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे.

नृत्याबद्दलची कमालीची आस्था, वर्णनातील खेळकरपणा, वेंचक शब्दांची आकर्षक मांडणी आणि ओघवती 'सफाईदार भाषा हे या लेखिकेचे प्रमुख विशेष म्हणतां येतील.

● ● ●

# सौ. कुसुमावती देशपांडे

मराठींतील एक उत्कृष्ट टीकाकार आणि लघुकथा लेखिका म्हणून प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांचा लौकिक आहे. आजपर्यंत त्यांनीं जशा अनेक लघुकथा लिहिल्या तसेंच अनेक विषयावरील टीकालेखहि लिहिले. त्याचप्रमाणें कुसुमावतींच्या या लेखनाबाबतहि अनेकांचे टीकालेख प्रकाशित झाले.

इंग्रजी वाङ्मयाचा कुसुमावतींचा अभ्यास विशेष आहे. त्यामुळें त्यांनीं विपुल वाचन केलें आहे. इतरांच्या टीकालेखनाचा चिकित्सक दृष्टीनें विचार केलेला आहे. आपल्या लेखनामधून मराठींतील व इतर भाषेंतील लेखकांच्या विचाराचें तुलनात्मक विवेचन केलेलें आहे.

" पासंग " आणि " मराठी कादंबरीचें पहिलें शतक " हे कुसुमावतींचे प्रकाशित निबंधसंग्रह आहेत. यापैकीं दुसऱ्या संग्रहात मराठी कादंबरीचें अभ्यासपूर्ण समालोचन कुसुमावतींनीं केलेलें असून पहिल्यामध्यें निरनिराळ्या विषयावरील आपले विचार प्रगट केले आहेत. या लेखनामधून कुसुमावतींचा अभ्यास, गाढा व्यासंग, सडेतोड विचारसरणी आणि एखाद्या विषयाकडे सूक्ष्म दृष्टिकोनातून व सर्वांगीण बाजूंनीं पहावयाची पद्धति दिसून येते. कुसुमावतींची भाषा सफाईदार असून मांडणी रेखीव आहे.

" संधिकाल " या लेखात स्वतंत्र भारतातील संधिकालाचें थोडक्यात विवेचन केलें आहे. " आम्ही कोण " या केशवसुताच्या कवितेवरील कुसुमावती-बाईंचा मर्मग्रहणात्मक लेखहि अत्यंत उद्बोधक आहे.

कुसुमावती देशपांडे यांचा " माध्यान्ह " हा लघुनिबंध त्यांच्या इतर लघु निबंधाच्या मानानें मोठा आकर्षक आहे. " लेखिकेची मनोवृत्ति मूलतः कवीची आहे. तिला आलेली एक अशागान अनुभूति .. रसरखीत दुपार पाहून कल्पना, भावना आणि विचार यांना मिळालेली चालना .. अतिशय रेखीवपणानें या निबंधात आविष्कृत झाली आहे "*

---

* धनुर्धारी ९ एप्रिल १९४९.

सूक्ष्म निरीक्षण, कल्पनासौष्ठव आणि निसर्गाशी एकजीव होण्याची शक्ति या लेखिकेच्या गुणानी या लघुनिबंधाला एक प्रकारची विशेष हृदयगमता आलेली आहे.

• • •

## दुर्गा भागवत

एखाद्या विषयाचे संशोधन करून व सखोल अभ्यास करून त्या विषया-संबंधीचे आपले मत सडेतोडपणाने सांगण्याची हातोटी ज्याना साधलेली असते, अशा काही लेखकाच्या यादीत दुर्गा भागवत याचा समावेश करता येईल. दुर्गाबाईंचे बहुतेक सगळे लेखन संशोधनपर असून समाजशास्त्र व मानव वंशशास्त्र हे त्यांच्या लेखनाचे प्रमुख विषय आहेत. लोकसाहित्याचाहि अभ्यास दुर्गाबाईंनी केलेला असून या विषयावरील त्यांची निरनिराळी पुस्तकेंहि प्रकाशित झालेली आहेत. " लोकसाहित्याची रूपरेखा " व " ऋतुचक्र " ही दुर्गाबाईंची पुस्तके या संदर्भात लक्षात घेता त्यांच्या लेखनाची कल्पना यावयास हरकत असू नये. आठदहा वर्षांमागे ' सत्यकथा ' मासिकात डॉ केतकरांचे लेखनासंबंधी दुर्गाबाईंनी लिहिलेली लेखनमाला त्यांच्या चिकित्सकवृत्तीची साक्ष देते. डॉ. केतकरांचे वाङ्मय ज्यानी वाचले नसेल त्यानाहि त्याची ओळख घडावी एवढे हे लेखन सडतोड विचारसरणीने प्रेरित झालेले व सखोल अभ्यासाने भरलेले दिसून येते.

" डॉ. केतकरांचे साहित्य दर्शन " या लेखामध्ये दुर्गाबाईंनी डॉ. केतकरांच्या वाङ्मयामुळे घडलेल्या त्यांच्या जीवनदर्शनाचे आपल्या मनावर कसकसे संस्कार होत गेले, याचे मोठे मार्मिक व समर्पक विवेचन केलेले आहे आणि ते आकर्षकहि झालेले आहे.

" एका जगाची कल्पना आणि डॉ. केतकर "* या लेखात दुर्गाबाईंनी डॉ. केतकरांची भूमिका ही प्रचारकाची किंवा समाजसुधारकाची नसून ती समाज संशोधकाची होती असे स्पष्टपणे नमूद केलेले आहे.

" राजारामशास्त्री भागवत " या चरित्रग्रंथात दुर्गाबाईंनी शास्त्रीबुवांच्या वाङ्मयाची करून दिलेली ओळख अशीच सखोल व सविस्तर आहे. एखाद्या विषयात जाता येईल तितके जास्तीत जास्त खोलात जाणे हाच या लेखिकेचा प्रमुख विशेष असून त्या अनुरोधानेच त्यांचे सर्व लेखन झालेले दिसून येते.

" ही नर्मदा सुंदरी " ( धनुर्धारी दिवाळी अंक १९४९ ) या लेखात दुर्गाबाईंनी नर्मदाकाठच्या रानटी परंतु रम्य जीवनाची ओळख करून दिली आहे.

---

* नवभारत, एप्रिल १९४९.

"आदिवासींचें मृत्युजय तत्त्वज्ञान "× हाहि दुर्गाबाईंचा एक लेख या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. तो त्यांनीं फार जिव्हाळ्यानें लिहिला आहे हें विशेष होय

सौ. लीला दुबे, एम्. ए. यांनीं लिहिलेल्या " हिंदुस्थानातील आदिवासी लोकांचें भवितव्य " या लेखात दुर्गाबाईंप्रमाणेंच जिव्हाळ्याचा भाग आला असून आदिवासींच्या रोजच्या जीवनाचें सविस्तर चित्रण झालेलें आहे. श्री. भानू शिरधनकर यांचाहि याच विषयासंबंधींचा लेख महत्त्वपूर्ण वठला आहे. या सर्वांच्या लेखामधून आदिवासींबद्दलचा जिव्हाळा आणि त्यांच्या भवितव्याबद्दलची आस्था सहानुभूतीपूर्वक प्रतीत झालेली दिसून येते

• • •

## पिरोज आनंदकर

आपण एक स्त्री आहोंत आणि म्हणून स्त्रिया जें जे करतील तें तें सगळे चांगलेंच आहे असें न मानता तिच्या अंगीं असणाऱ्या गुणाबरोबर तिच्या दोषाचाहि निर्भयपणे विचार करणाऱ्या ज्या काहीं थोड्या स्त्रिया आहेत त्यापैकीं पिरोज आनंदकर या एक प्रमुख होत. पिरोजबाईंनीं स्वत शिक्षिकेचा पेशा पत्करलेला असल्यामुळें त्यांचा अनेक विद्यार्थिनींशीं व स्त्री पालकांशीं संबंध आला आहे. त्यामुळें स्वाभाविकच त्यांनीं मुलींचें व स्त्रियांचें मानसशास्त्र अनुभविलें आहे व अभ्यासिलेंहि आहे. एवढेंच नाहींतर त्यासंबंधीं त्यांनीं अनेकदा लेखनहि केलेलें आहे.

अगदीं अलिकडे " स्त्री " मासिकातून प्रकाशित झालेली त्यांची " इंद्रधनुष्याचा पूल " ही लेखमाला विशेष लोकप्रिय झाली असून या लेखमालेंतून त्यांनीं तरुण मुलींच्या जीवनातील अनेक प्रश्नांचा सूक्ष्मपणें विचार केलेला आहे.

पिरोजबाईंचा स्वभाव विनोदी आहे. भाषा गोड आहे. मांडणी साधीच पण रेखीव आहे. लेखनविषयाशीं त्यांचे ठायीं जिव्हाळाहि आहे. म्हणजे टसाद्या प्रश्नावर भरपूर विचार करून मग लेखन करावयाचें अशी त्यांच्या लेखणीची बैठक आहे. त्यामुळें त्यांचें लेख वाचता क्षणींच वाचणाराच्या मनाची पकड घेतात. एवढेंच नाहींतर त्यातून काहीं निश्चित घेण्यासारखें आहे असें वाचकांना–विशेषतः स्त्रियांना–वाटल्याशिवाय रहात नाहीं.

" महाराष्ट्रीय स्त्रीची सौंदर्यदृष्टि "* या लेखात वस्तुस्थितीचें चित्रण करण्याचा लेखिकेनें प्रयत्न केला आहे. निरनिराळ्या जातींतील स्त्रियांच्या सौंदर्य

× मौज, दिवाळी, १९४९. * मनोहर, सप्टेंबर १९१८.

दृष्टीनें तोलून पाहिलें तर महाराष्ट्रीय स्त्री याबाबत उदासीन असल्याचें लेखिकेनें येथें दर्शविलें आहे.

" महाराष्ट्रीय महिलाची बदलती वेषभूषा " ०या लेखात लेखिकेनें वरील लेखाप्रमाणेंच चिकित्सक दृष्टीनें सकच्छापासून विकच्छ साडीचा धावता पण मोठा मनोरंजक इतिहास सांगितलेला आहे. हा इतिहास सांगत असताना आजच्या स्त्रीच्या जीवनावर सिनेमातील जीवनाची छाप पडली असल्याचें अनेक उदाहरणानीं पटवून देण्याचा त्यानीं प्रयत्न केला आहे.

" मराठी वाङ्मयात बालवाङ्मयाचे स्थान "* हा लेख लिहिताना पिरोजबाईनीं " विसावें शतक हें मुलाचें शतक आहे " असें समजण्याची जगातील सुधारलेल्या राष्ट्रांची कल्पना मनासमोर ठेवून लेखन केलें आहे. बालमनाचा योग्य तो विकास होईल अशा प्रकारचें वाङ्मय लिहिलें जाणें इष्ट आहे असें त्यानीं येथें ठासून सांगितलें असून जाता जाता मुलाना पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें, मुलाना आवडणाऱ्या वाङ्मयाचे प्रकार, मुलानीं आतापर्यंत वाचलेल्या विषयानुरूप पुस्तकाची शेंकडेवारी आणि मुलाना कोणतीं पुस्तकें आवडतात इत्यादींचीं पत्रकेंहि त्यानीं दिलेलीं आहेत. आणि त्यावरून निष्कर्ष काढताना शेवटीं त्यानीं अशी आशा व्यक्त केली आहे कीं, प्रतियशश लेखकानीं व प्रकाशकानीं बालवाङ्मयाकडे विशेष लक्ष पुरवून मराठी भाषेच्या वैभवाचें हें नवीन दालन उघडण्याचें श्रेय मिळवावें.

० ० ०

## डॉ. कमलाबाई देशपांडे

डॉ. कमलाबाई देशपांडे यांचें " अपौरुषेय वाङ्मय अर्थात् स्त्रीगीतें " हें प्रबंधात्मक पुस्तक वैशिष्ट्यपूर्ण आहे. " अपौरुषेय वाङ्मय म्हणजे स्त्रियाकडून त्यांच्या जीवनक्रमात उपयोगात आणलें जाणारें वाङ्मय. हें मुख्यत. स्त्रियानींच रचलेलें आहे. कांहीं ठिकाणीं पुरुषानीं भर घातली नसेलच असें नाहीं. उदा. झोपाळ्यावर बहिणी ओव्या म्हणत असता भावानें त्याना काहीं ओव्या जोडून दिल्या असतील...स्त्रियांच्या जीवनावर आधारलेले, स्त्रियांचेकडून खेळ, सण, उत्सव इत्यादि प्रसंगीं उपयोगांत आणलें जाणारें, स्त्रियांच्या दृष्टिकोनातून व प्रामुख्यानें स्त्रियानीं रचलेलें वाङ्मय म्हणजे ' अपौरुषेय वाङ्मय .. '

" जसें सुचलें तसें रचलें । आणि रचलें म्हणून ठसलें ॥ हीच याची पद्धति; हाच याचा इतिहास. " अशी आपल्या या लेखन प्रयत्नाची माहिती " विषय

० स्त्री, ऑगस्ट, १९४९, * स्त्री, मार्च १९४७.

प्रवेशा "त देऊन या अपौरुषेय वाङ्मयाची योजना पुढील रूपकालंकारात त्यांनी गोवून टाकली आहे.

'गार्णी' हीं स्त्रियाचे वेद, 'दळण्याचें जातें' हें त्याचें यज्ञकुण्ड व प्राचीन ऋषि ज्याप्रमाणें यज्ञ कुण्डामध्यें हविर्भाग अर्पण करून त्याचे जोडीला परमेश्वराच्या स्तुतिपर सूत्रें म्हणत व मनोवांछिताची याचनाहि करीत, त्याचप्रमाणें या जात्याच्या यज्ञकुण्डामध्यें 'दाण्याचा घास' हा हविर्भाग अर्पण करून त्याचे बरोबरच ईश्वरस्तुति व वांछित प्रार्थना ओव्यांचे रूपानें करीत."

या प्रबंधात कमलाबाईनीं उखाणे, खेळातील गार्णी, फेराची गार्णी, ओव्या इत्यादींबद्दल सोदाहरण व सविस्तर विवेचन केलें असून तें त्याच्या काल-खंडासहित अत्यंत समर्पक असें झालेलें आहे. काव्यशास्त्रदृष्ट्या लेखिकेनें या काव्याचें केलेलें रसग्रहण मोठें मार्मिक झालेलें आहे.

कमलाबाई देशपांडे यांनीं लिहिलेल्या लघुनिबंधापैकीं "आकाशातील कानोसा" हा "स्त्री" मासिकांतील लघुनिबंध फारच चित्ताकर्षक आहे. गुरुवर्य अण्णासाहेब कर्वे यांचे सुवर्ण महोत्सवानिमित्त मुंबई नभोवाणी केंद्रावर झालेलें भाषण स्वर्गामध्यें प्रक्षेपित होत असल्याचा हा अद्भुतरम्य प्रसंग आहे. या लेखात कमलाबाईंची भाषा चटकदार असून कल्पनेची भरारीहि विलक्षण आकर्षक आहे

डॉ. कमलाबाई देशपांडे यांनी "स्त्रीजीवनावर"वर लिहिलेला लहानसा पण सर्व बाजूनीं बारीक सारीक विचार करणारा प्रबंधहि उल्लेखनीय आहे या लेखनातील वातावरण जसें जिव्हाळ्याचें आहे तशीच त्याची भाषाहि मोठी खेळकर आहे. तसेंच या लेखनात अधूनमधून आलेलीं संस्कृतातील वचनें व घरगुती उदाहरणेंहि घेण्यासारखीं आहेत.

डॉ. कमलाबाईनीं अगदीं अलिकडे केलेला स्त्रीजीवनविषयक कायद्याचा अभ्यास व त्यासंबधीं केलेलें लेखन वैशिष्ट्यपूर्ण झालेलें आहे.

० ० ०

## मुक्ताबाई दीक्षित

मुक्ताबाई दीक्षितांनीं तसें पाहिलें तर फारच थोडं लेखन केलेलें आहे तथापि त्यांनीं जें लिहिलें तें मात्र एकाद्या विषयावर संपूर्ण विचार करून असें लिहिलें आहे स्त्री जीवनाची बाजू मांडताना त्यांनीं वस्तुस्थितीचे अनेक दाखले देऊन आपल्या विचाराना बळकटी आणण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्या दृष्टीनें त्यांची "आधुनिक स्त्रियांची मानसिक उत्क्रांति"* हा लेख जरूर पहाण्यासारखा आहे.

---

* मौज, रौप्य महोत्सव अंक, १९४७

स्त्रियाच्या ह्या मानसिक उत्क्रांतीमुळें तिच्या जीवनक्षेत्रात जो बदल झाला आणि तिच्या ठिकाणीं जी लढाऊ वृत्ति आली त्याचें कारण दर्शविताना लेखिकेनें पुढीलप्रमाणें समर्पक उत्तर दिलें आहे, " जीं दुःखें माझ्या आईनें सोसलीं तीं माझ्या मुलीच्या वाट्याला येऊ नयेत म्हणून मीं जर धडपड केली नाहीं, तर काळाच्या दृष्टीनें आईच्या कर्तव्याला मी जागलें नाहीं, असा त्याचा अर्थ होईल."

० ० ०

## मालतीबाई बेडेकर

मालतीबाई बेडेकर यानीं निरनिराळ्या विषयावर अनेक लेख लिहिलेले आहेत. मालतीबाईंची विचारसरणी अतिशय सडेतोड आहे याचा प्रत्यय त्यानीं लिहिलेल्या कोणत्याहि लेखावरून येईल. विषय कोणताहि असला तरी त्याबद्दल सखोल विचार करून त्याची सागोपाग चर्चा करणें हा मालतीबाईंच्या लेखाचा विशेष आहे.

इ. स. १९६० च्या 'केसरी' च्या दिवाळी अंकांत सौ. मालतीबाई बेडेकराचा " वाटेचे वाटसर " हा निबधहि या सदर्भांत उल्लेखनीय आहे.

या निबधामध्यें लेखिकेनें स्त्रीजीवनांतील चालू घडामोडींचें विशेष दिग्दर्शन केलें आहे. दारिद्य, असंस्कृति व वासना ह्या तिहींच्या गुतागुतीमुळें निर्माण होणाऱ्या बिकट समस्याची चर्चा मालतीबाईंनीं येथें केलेली असून तिचा आविष्कार मोठ्या प्रभावी रीतीनें झालेला आहे. या ना त्या कारणानें परिस्थितीला बळी पडणाऱ्या अनेक स्त्रियाच्या हकीकती मालतीबाईंनीं मोठ्या हृदयद्रावक रीतीनें सागितलेल्या आहेत. नीति अनीतीच्या प्रश्नाचा त्यानीं जिव्हाळ्यानें विचार केलेला आहे. स्वतःच्या त्या सबधींच्या प्रतिक्रियांना वाचा फोडलेली आहे. त्यामुळें त्याचा हा निबध मोठा विचारप्रवर्तक व आकर्षकहि झालेला आहे.

स्त्री जीवनावर आजपर्यंत जरी अनेक लेखिकानीं लिहिलेलें असलें तरी बदलत्या काळातहि या विषयात अनेक घडामोडी होत असल्यामुळें याच विषयावर नेहमींच लेखन चालू रहातें आहे व राहीलही. या संदर्भात सौ. विद्या बिधये याचे " सुखी संसार ", सौ. रमाबाई पटवर्धन याचें " स्त्रियाचें कल्याण " व सौ. वसुंधरा पटवर्धन याचें " स्त्री-जीवन " हीं पुस्तकें अवश्य पहाण्यासारखीं आहेत. विषय एकच असला तरी या लेखिकानीं त्या विषयाकडे पहाण्याचा आपला दृष्टिकोन निरनिराळा ठेवलेला आहे.

" सुखी संसार " मध्यें सौ. बिधये यानीं आधुनिक दांपत्य जीवनावर प्रकाश पाडणारी वास्तववादी संसार-चित्रें रेखाटलीं आहेत. त्यासाठीं त्यानीं एकूण नऊ विविध समाजस्तराचा उपयोग केलेला आहे. बिधयेबाईंचे विचार

म्हणजे जुन्या आणि नव्या विचाराची मेसळ होऊन येथें प्रकट झालेले दिसतात
आजचे ससार सुखी होण्यासाठीं म्हणून जे अनेक मार्ग लेखिकेनें सुचविले आहेत त्यापैकीं विविध सणामधील चालीरीतींनीं निर्माण होणारें सौंदर्य लुटण्याचाहि एक मार्ग येथें सांगितलेला आहे स्वतंत्र राष्ट्राचे नागरिक म्हणून भावी पिढी तयार होत असताना स्वावलंबनाचे व देशभक्तीचे धडे प्रत्येक मातेन आपल्या मुलाना लक्षपूर्वक देणें इष्ट आहे असेंहि लेखिकेनें येथें सुचवून ठेवलें आहे

“ स्त्रियाचें कल्याण ” या पुस्तकात सौ रमाबाईनीं स्त्रीजीवनातील विविध प्रश्न हाताळून आजच्या काळातील स्त्रीच्या दृष्टीने आयुष्य समाधानात जाण्यासाठी आपले जुन्याला धरून असलेले पण सुधारणाप्रिय विचार प्रकट केले आहेत स्त्री आणि पुरुष या दोघांचेंहि जीवन परस्परावर अवलंबून असल्याचें येथें लेखिकेनें जोरदारपणें सांगितलेलें आहे.

“ आमचें स्त्रीजीवन ” या पुस्तकात वसुंधरा पटवर्धन यानीं आपल्या पुरोगामी विचारसरणींतून जुनेच प्रश्न हाताळण्याचा प्रयत्न केलेला आहे

स्पष्टवक्तेपणा हें या लेखिकेचें प्रमुख वैशिष्ट्य असल्यामुळें त्यानें लेखन पुरुषी थाटानें आहे असें अनेकाचें म्हणणें आहे विभावरी शिरूरकर याच्या वाङ्मयाबद्दलहि असेच गैरसमज निर्माण झाल होते

पुरुषाप्रमाणें स्त्रीनेंहि आर्थिक स्वातंत्र्य उपभोगावें हें सागताना लेखिका म्हणते, “ स्त्रीनें द्रव्यार्जन करावें असें मी म्हणतें याचा अर्थ, प्रत्येक स्त्रीनें जरूर नसताहि नोकरी करावी, असा मात्र नाहीं पण प्रसग पडल्यास श्रीमत नवऱ्याच्या बायकोनेंहि चार पैसे मिळविण्याची समर्थतना आपल्या अगीं आधींच आणली पाहिजे हाच माझ्या म्हणण्याचा हेतु आहे आपल्या आयुष्याच्या बाबतींत आपण अजिबात गाफिल राहिलों, असा पश्चात्ताप वाटण्याची पाळी येऊ नये म्हणून ही सावधानता आहे ” आणि हें सागत असताना गृहकर्तव्यें पार पाडीत असता न-कळत स्त्रीला मिळणाऱ्या आर्थिक स्वातंत्र्याचाहि लेखिकेला विसर पडलेला नाहीं ही समाधानाची गोष्ट होय

विशेषत अपत्य असलेली स्त्री व पोक्त विधवा याचा प्रश्न आणि घटस्फोट इ प्रश्नाची लेखिकेनें अत्यत धीटपणानें चर्चा केली आहे जरूर तेथें घटस्फोटाची त्यानीं आवश्यकता पटविली असून पुनर्विवाहाची बाजू माडलेली आहे

० ० ०

## ताराबाई मोडक

शिक्षणशास्त्रावर विचारपूर्वक प्रयोग करून लेखन करणारी लेखिका या नात्यानें ताराबाई मोडकाची प्रसिद्धि आहे शिक्षण क्षेत्रातील त्याची सेवा अनेक

वर्षांची आहे. त्यामुळें त्यानीं जें जें लिहिलें तें तें सर्व स्वानुभवावर आधारून लिहिले आहे " शिक्षणपत्रिकें ", मधून स्वानुभवावर आधारलेले कितीतरी लेख त्यानीं लिहिलें आहेत. त्याचप्रमाणें मुलासाठीं व पालकासाठीं अशीं अनेक लहान लहान पुस्तकं त्यानीं लिहिलीं असून तीं वाचनीयहि झालेलीं आहेत.

o o o

## डॉ. इरावती कर्वे

मानव वंशशास्त्राचा अभ्यास केलेल्या प्रसिद्ध प्राध्यापिका डॉ. इरावती कर्वे यानीं मराठींत थोडेंच पण वैशिष्ट्यपूर्ण असें लेखन केलेलें आहे

" मराठी लोकाची संस्कृति ", " परिपूर्ति " व " आमची संस्कृति " या त्याच्या प्रकाशित पुस्तकाच्यावरुन त्याच्या सूक्ष्म अवलोकनाची, गाढ्या अभ्यासाची व चटकदार भाषाशैलीची कल्पना येते.

" परिपूर्ति " या पुस्तकात इरावतीबाईनीं फारच सुदर असे ललित निबध दिलेले आहेत. त्यामधून घरगुती असें खेळकर वातावरण व प्रत्येक मराठी वाचकाला ओळखीचे वाटतील असे खास मराठी स्त्रीच्या जीवनात येणारे प्रसंग मोठ्या कुशलतेनें त्यानीं चित्रित केलेले आहेत. या सग्रहातील ' वाटचाल ' व ' परिपूर्ति ' हे दोन ललित निबंध म्हणजे एक स्त्री म्हणून इरावतींनीं वापरलेल्या लेखणीचा परमोच्च बिंदु दर्शवतील एवढे हृदयस्पर्शी झालेले आहेत.

या लेखनात इरावतीबाईनीं खास स्त्री म्हणून आपला जीव ओतलेला आहे. मोकळ्या मनानें घडल्या गोष्टींना बोलकें केलेलें आहे. त्यामुळें त्याचें हें 'परिपूर्ति' पुस्तक वाचणाराच्या मनाला चटका लावून सोडतें.

उरलेल्या इतर दोन पुस्तकातून इरावतींनीं आपले अभ्यासपूर्ण विचार मांडलेले आहेत. त्यावरून त्याच्या व्यासगाची चागली कल्पना येते.

" संस्कृतीची उत्पत्ति, जतन व सक्रमण भाषेच्या द्वारें होतें. भाषा हे संस्कृतीचें एक प्रभावी अग आहे. भाषेशिवाय संस्कृतीची निर्मितीहि होणार नाहीं व सक्रमण तर सर्वस्वी अशक्य आहे. " अशा विचाराची त्यानीं आपल्या या दोन पुस्तकातून जागोजाग पेरणी केलेली आहे. त्या कारणानें त्याचें हें लेखनहि उठावदार झालेलें आहे.

डॉ. इरावती कर्वे याच्याप्रमाणें काहीं महत्त्वाच्या विषयावर काहीं स्त्रियानींहि व्यासगपूर्ण असें निबध वा प्रबध लेखन केलेलें आहे. परंतु अशा लेखिका फारच थोड्या आहेत. आणि मुख्य म्हणजे या प्रकारच्या लेखनातून स्त्री म्हणून त्यानीं काहींसा वेगळा दृष्टिकोन माडलेला आहे असें नाहीं. त्यामुळें या प्रकारच्या लेखनाचा अधिक विचार येथें केलेला नाहीं.

तथापि जाता जाता प्रा. नलिनी पंडित यांच्या " महाराष्ट्रातील राष्ट्रवादाचा विकास " ( १९५५ ) या पुस्तकाचा मी इथें जरूर उल्लेख करीत आहें.

या ग्रंथात प्रा. नलिनी पंडितानीं भारतीय स्वातंत्र्य चळवळीच्या निमित्तानें गेल्या शंभर दीडशे वर्षांत महाराष्ट्रात जे निरनिराळे विचार प्रवाह निर्माण झाले त्याचें विश्लेषण व मूल्यमापन करण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे.

राष्ट्रवाद ही आजच्या युगातील एक प्रभावशाली प्रेरणा आहे. जगातील पुढारलेल्या आणि मागासलेल्याहि देशाच्या आधुनिक इतिहासात या प्रेरणेची अपूर्व करामत पहावयास मिळत. त्यामुळें या सर्व गोष्टींचा प्रा. पंडितानीं विचार केला व स्त्रीच्या लेखणीला एक नवा विषय हाताळण्याची सवय लावली, म्हणून त्यांच्या या ग्रंथाचें वैशिष्ट्य मी अधिक मानतें.

● ● ●

## इंदुमति पंडित

मराठींत स्त्रियानीं जें आजवर अनेक प्रकारचें लेखन केलें त्यापेक्षा अगदीं वेगळ्या प्रकारचें लेखन श्रीमति इंदुमति पंडित यानीं केलेलें आहे. असें समजतें कीं, त्यानीं आपलीं एकूण १६ पुस्तकें व तेराशें लेख केवळ राजकीय भविष्याचें कथन करण्यासाठीं लिहिलेले आहेत ! तेव्हा ही गोष्ट केव्हाहि स्त्रीच्या लेखणीच्या दृष्टीनें उल्लेखनीयच होईल.

आगामी काळ, अनागत काळ, भावी काळ, भविष्यवाणी, मानवयुग, विचार, ग्रहयोग, शुभाशुभयोग भावीग्रहयोग इत्यादि पुस्तकें इंदुमति पंडित यानीं लिहून मराठींत प्रकाशित होणाऱ्या ज्योतिषविषयक ग्रंथात एक वेगळीच भर टाकलेली आहे. इतर ज्योतिषानीं मराठींत जें लेखन केलें तें प्रामुख्यानें व्यक्तिगत व राशीभविष्य सांगणारें असें केलें. परंतु इंदुमतींनीं केवळ राजकीय भविष्याचेंच कथन केलें हे विशेष होय.

इंदुमतींनीं हिंदी, गुजराथी व इंग्रजी या भाषातूनहि राजकीय भविष्य लिहून जागतिक कीर्तीचा मान मिळविलेला आहे. तसेंच एकाच विषयावर एवढें भरपूर लेखन करून पुरुषांनीं लिहिलेल्या या विषयावरील लेखनास सुरक्षेच्या दृष्टीनें मागें टाकलेलें आहे !

● ● ●

## स्फुट लेखन

मराठी भाषेंत अलीकडे पुष्कळशीं मासिकें चालू असलेलीं दिसून येतात. गेल्या २५-३० वर्षांच्या कालात जीं विविध प्रकारचीं मासिकें निघत गेलीं

त्यामधून अनेक लेखिकांनी लेख लिहिले आहेत. त्यापैकी स्त्रीच्या लेखणीचें वैशिष्ट्य दर्शवितील असे काहीं लेख येथें पहावयाचे आहेत.

"शिशु"* ह्या लेखात काशीबाई कानिटकर यानीं लहान मुलाच्या जोपासनेचा प्रश्न चर्चिलेला आहे. काशीबाईच्या लेखनाला अनुभवाची विपुलता भरपूर आहे त्यामुळे आपले विचार माडताना त्यानीं नेहमींच वस्तुस्थितीचें सत्य चित्र रगविण्याकडे आपल्या लेखणीचा कल ठेविलेला आहे

"स्त्रियाचा सामाजिक दर्जा" या लेखात कृष्णाकुमारी या लेखिकेनें आपले विचार मोठ्या जोमदारपणें माडलेले आहेत.

पुरुषापेक्षा स्त्रीचा सामाजिक दर्जा कमी लेखण्यात येतो. परतु तसें म्हणणें योग्य नव्हे. हें सुचवितानां "मातेच्या रूपानें पुरुषजातीला जन्म देणाऱ्या, पत्नी रूपानें त्याची जन्माची मैत्रिण होणाऱ्या आणि कन्या रूपानें त्याच्या उदरीं जन्म घेणाऱ्या व या तिन्ही अवस्थात त्याना सात्त्विक प्रेमाची साक्ष पटवून पुत्र, पति व पिता अशा चढत्या पदवीस पोंहोचविणाऱ्या स्त्रियाना हलक्या दर्जाच्या समजणें म्हणजे पुरुषानें आपला पुरुषार्थ विसरण्यासारखेंच आहे" असें म्हटलें आहे पतीच्या जीवनाशीं समरस होऊन वागणारी पत्नीहि एक जीवनशक्ति आहे असें लेखिकेचें म्हणणें आहे.

"आम्हाला पाहिजे तरी काय? ×" या दीर्घकाव्यातील लेखात कु. जशोद विशेकर या तरुणीनें "चूल आणि मूल हें स्त्रियाचें कार्यक्षेत्र आहे." या रानडींच्या ठाकरसी विद्यापीठातील भाषणाला मोठें बडखोर उत्तर दिलें आहे.

"जीवन पथावरील पुरुषाच्या बरोबरीचे सायीदार, सहचर बनायचे आहे आम्हाला. यापुढें घर हें स्त्रीच्या चोवीस तास कामाच्या निवाऱ्याचें, आनदाचें आणि स्फूर्तीचें स्थान व्हायला पाहिजे." असें त्या सागतात.

या स्त्रियाचे हे विचार म्हणजे स्त्री जीवनातील क्रातिकालाचे आणि वाढत्या कार्यप्रवृत्तीचे निदर्शक होत. स्त्री ही स्वत विषयीं अधिक विचार करू लागल्याचें आणि आपलें सरें कार्यक्षेत्र ओळखू लागल्याचेंच हें प्रतीक म्हणता येईल.

माहेर ही स्त्रीच्या अत्यत आवडीची चीज आहे. या गोष्टीबद्दल तिला वाटणारा जिव्हाळा पुरुषाच्या अत करणाला ओळखता येणें शक्य नाहीं इतका तो हृदयगम आहे, इतका तो कळण्यासहि कठीण आहे त्याची उपमा त्यासच म्हणतात तसें हें आहे. या विषयावर अनेकांनीं भावपूर लिहिलें पण "स्त्रिया व माहेर" या सरस्वतीबाई भिडे याच्या लेखाची सर त्यास यायची नाहीं

---

* गृहलक्ष्मी, मार्च १९२८.
‡ गृहलक्ष्मी, नव्हेंबर १९२७.
× नवशक्ति दसरा अंक १९४५.

स्त्रियांना आपल्या माहेराबद्दल वाटणारें प्रेम जितकें नैसर्गिक तितकेंच स्वभावसहज असतें. त्याची पूर्वपारंपरिक खात्री पटवितांना लेखिकेनें कण्वदुहिता शकुंतला, सीतादेवी, हिमनगकन्या पार्वती या पौराणिक स्त्रियांच्या कथांचा आधार घेतला असून " पुण्याहून बोरघाटानें खालीं आलें म्हणजे, खोपवलीचें जें एक सुंदर तळें लागतें तें भाऊसाहेब पेशवे ह्यांच्या पत्नी पार्वतीबाईसाहेब यांची माहेरास जातांना गैरसोय होऊं नये म्हणूनच केवळ बांधलें गेलें ! " असा ऐतिहासिक आधारहि देऊन टाकला आहे ! याशिवाय विविध भाषेंतील काव्यकल्पना देखील अनुषंगानें येतील तशा सांगून टाकल्या आहेत.

माहेराकडे स्त्री कां धाव घेते याचें विवेचन करतांना लेखिका म्हणते, " मौंजिबंधनाच्या वेळीं मातृभोजनांत आईकडून मिळालेला घांस जसा मुलाच्या जिव्हेवर आजन्म घोळत रहातो, तद्वत् विवाहदिनाचे आदले दिवशीं आईनें प्रेमानें वाढलेलें आग्रहाचें भोजन मुलीच्या जिव्हेवर निरंतर टिकतें व तेंच तिला मधून मधून माहेरीं आणण्यास कारणीभूत होतें...

...हिंदु स्त्रियांना माहेर विशेष प्रिय होण्याचें कारण म्हटलें म्हणजे स्थानांतर व तदनुषंगिक लाभणारी स्वतंत्रता होय. . पहिली गोष्ट म्हणजे तिच्या पाठीमागची चूल सुटते व कांहीं अशानें मूलहि सुटतें. कारण, प्रेमळ आजा व आजी यांच्या सहवासांत, मुलें जवळ जवळ आईला विसरतात असें म्हटलें तरी चालेल. त्याहून अधिक म्हणजे गोड शैशवावस्था पुनरपि प्राप्त होते. सासरीं असणारें कृत्रिम गांभीर्य व मौन ह्यांना फांटा मिळतो. एकंदरींत बाळपणाचा काळ आनंदाचा. .यावेळीं स्त्रीचे उद्योगहि ह्या शैशवावस्थेला अनुसरूनच होतात."°

" स्त्रियांचें नामकरण "* या लेखांत इंदिरा आनेगांवकर यांनीं स्त्रीच्या दृष्टिकोनांतून केलेली या विषयाची आटोपशीर पण चित्तवेधक छाननी महत्त्वाची आहे. स्त्रियांचें नांव लग्नांत बदललें जातें. त्या रूढीला अनुसरून लिहीत असतां त्या म्हणतात, " ...लग्नप्रसंगीं मुलींनीं आपलें सर्वस्व पतीला अर्पण करावयाचें असतें...म्हणून कां नांव बदलावें? आपला आत्मभाव विसरावा? आपलें आडनांव बदलणें हें पतिगृहाला आपलें मानण्याचें संपूर्ण चिन्ह आहे आपलें नांव बदलणें म्हणजे आत्मीयता विसरणें आहे. या विषयाकडे स्त्रीनेत्यांनीं पाहिलें पाहिजे. प्रत्येक जाणत्या समजुतदार नोवरीला विचारा . लग्नप्रसंगीं नांव बदलण्याच्या वेळीं तिच्या मनाला थोड्या तरी वेदना झाल्याशिवाय राहिल्या नाहींत असें अनुभवास येईल."

कांहीं डॉक्टर लेखिकांनीं, म्हणजे डॉक्टरकीचा व्यवसाय करीत असतां स्त्रीरोगांवर लेखन केलेल्या लेखिकांनीं, जें थोडें फार लेखन केलें आहे तें महत्त्वाचें

---

° गृहलक्ष्मी, मार्च १९३०. * गृहलक्ष्मी, मार्च १९२८.

आहे. आजवर अनेक डॉक्टरांनीं या विषयावर लिहिलें आहे. परतु स्त्रीरोग चिकित्सक डॉक्टरबाईंनें आपल्या अनुभवाच्या चष्म्यातून केलेलें हें लेखन विशेष मोलाचें आहे. अनुभव आणि जिव्हाळा हा या लेखाचा विशेष म्हणता येईल. स्त्रियामध्यें असलेले दोष व स्वत च्या आरोग्याबद्दलची अनास्था या लेखिकानीं स्पष्ट सागून निरोगी जीवनाचे धडे दिलेले आहेत. डॉ. सुमति क्षेत्रमाडे, डॉ. काशी अवसरे व डॉ. सुशिला बेडेकर याचे या विषयावर अलीकडे प्रसिद्ध झालेले "स्त्री" मधील लेख खरोखरच महत्त्वाचे आहेत त्यातल्या त्यात "प्रत्येक स्त्रीला हें माहीत असावें" *हा डॉ सुशिला बेडेकर याचा लेख प्रत्येक स्त्रीनें पारायणें करून वाचावा इतका उत्कृष्ट झालेला आहे मुलगी वयात आल्यानतर तिच्या शरीरात पडत जाणारीं स्थित्यतरें व त्याची कारण परपरा येथें लेखिकेनें फारच कुशलतेनें चित्रित केली आहे.

● ● ●

## लघुनिबंध

निबधाप्रमाणेंच काहीं लेखिकानीं लघुनिबधहि लिहिलेले आहेत. मात्र निबधाच्या मानानें त्याच्या लेखनाचें हें क्षेत्र अगदींच मर्यादित आहे. हाताच्या बोटावर मोजता येतील एवढ्याच लेखिकानीं ह्या प्रातात लेखन केलें आहे.

वास्तविक लघुनिबध हाहि एक निबधाचाच प्रकार, परतु त्यात विचाराच्या भारदस्तपणापेक्षा सहानुभूतीच्या जिव्हाळ्यानें केलेलें हितगुजच अधिक असते हरघडी डोळ्यासमोर दिसणाऱ्या अगदीं सामान्य गोष्टी आणि पदोपदीं येणारे बारीक सारीक विविध अनुभव अथवा सहजासहजीं कुठेंहि आढळतील असे सामान्यच पण निवडक प्रसग याचीं सोप्या व चटकदार भाषाशैलीनें रेखाचित्रें काढण्यातच लेखकाला अतिशय समाधान वाटत असते. लघुनिबधाचा उदय लेखकाच्या याच मनोवृत्तीमधून होत असतो

"काव्य, विनोद व तत्त्वज्ञान याच्या मधुर समिश्रणानें प्राप्त होणाऱ्या रम्य, वास्तव परतु अतर्मुख अशा दृष्टीनें लघुनिबधकार जगाकडे आणि जीवनाकडे पाहात असतो °" तथापि ह्या तिन्ही गुणाचा लाभ प्रत्येक लघुनिबधकाराला झालेला असतोच असें मात्र नाहीं प्रत्येकाचें व्यक्तित्व आणि अनुभूतीचें क्षेत्र भिन्न असलें तरी ह्या दोन्हींच्या समिश्र मनोवृत्तीमुळें रगणारा लघुनिबधच चटकदार होत असतो. त्यामुळें येथें असें म्हणता येईल कीं, लेखकाचें व्यक्तित्व

---

* स्त्री, आरोग्य विशेषाक १९४९.

° वि. म. कुलकर्णी—प्रास्ताविक, वासतिका.

जेवढें संपन्न, समतोल, सत्कारक्षम आणि बहुविध असेल तेग
निश्चित असते.

"दृष्टीच्या आडच्या सृष्टींत" या पुस्तकात सौ. कृष्णाबाई मो
उपेक्षिताचे अंतरंग किंवा त्याच्या भोंवतालचें जग म्हणा हवें तर, वाचका
दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. वृत्तातनिवेदन किंवा गुजगोष्ट अ
स्वरुप आहे. अशा प्रकारचे स्त्रीने लिहिलेलें लघुनिबंधाचें हें बहुधा प
असावें. वास्तविक यापूर्वीच्या सौ. केळकरांच्या लेखातून अधून
गोष्टीचा अवतार झाला होता, परंतु येथें सर्व लेखच त्या पद्धतीचे आ
काय तो फरक.

आतापर्यंत स्त्रियानीं जें लेखन केलें त्या लेखनाचे क्षेत्र बहुधा म
होतें. परंतु काळ जसा बदलला तसा बहुजनाकडे व श्रमजीवी लोकाकडे लेख
दिवसेंदिवस जास्त वळत गेली. हें पुस्तक त्याच वृत्तीचें एक दृश्यफल म्ह

परिस्थितीमुळें दरिद्री जीवनाची होत असलेली थट्टा मोठ्या 
येथें चित्रित झालेली दिसून येते. लेखिकेचें सूक्ष्म निरीक्षण आणि आकर्
यामुळें या पुस्तकाचें अंतरंग मोठें मनोरंजक झालेलें आहे.

आपल्या देशाप्रमाणेंच सौ. कृष्णाबाई मोटे यानीं येथें प
दृष्टिआडच्या सृष्टीचीहि मोठ्या कौशल्यानें ओळख करून देण्याचा प्रयत्न कें

स्त्रीस्वभावाला अनुसरून अशी भाषेची घडण लेखिकेनें सर्वत्र
आहे. दृष्टीआडची रम्य सृष्टि आणि सहानुभूतीनें तिचें लेखिकेनें केलेलें ि
चित्रण हा या पुस्तकाचा गाभा आहे.

१९४२ सालीं "स्त्री" मासिकात प्रसिद्ध झालेली "
अंतरंगात" ही इंदिराबाई मायदेव यांची लेखमाला लघुनिबंधाच्या धाटणी
बहुजन समाजातील स्त्रियाचें जीवनदर्शन घडविणारीं एकूण आठ दृ
या लेखमालेंत दर्शविलेलीं आहेत. इंदिराबाईंची भाषा चटकदार अ
लेखनहि आकर्षक असल्यामुळें हीं दृश्यें चित्तवेधक झालीं आहेत. "
धाकट्या बहिणीला मदतीला म्हणून आणली तर ती आपली मा
पटकावून बसली !" अशी माहिती देणारें या लेखमालेंतील अखेरचें 
हृदयंगम वठलेलें आहे.

डॉ कमलाबाई देशपाडे, शान्ता ज शेळके व वसुधरा पटवर्धन यानींहि लघुनिबंध लिहिलेले आहेत ( कमलाबाई देशपाडे याच्या या लेखन प्रकाराबाबत मागे उल्लेख आलेला आहेच ) वसुधरा पटवर्धनाचें "मी भटकते आहे (१९५९) हे पुस्तक या लेखनप्रकारात मोडतें या पुस्तकातील लेखन फारच प्रदीर्घ झालें असून पुनरावृत्तीचा दोष अधून मधून आढळून येतो 'चाहुल' या लघुनिबधात–ललित निबधात–चेटूक, उपाययातना व देवभेव यावर भर दिलेला आहे आणि "मी म्हातारी झाले" या लघुनिबधात शस्त्रक्रियेनतर क्लोरोफॉर्मच्या धुदींत स्वर्गीय आनदाचा होणारा भास रगविलेला आहे

शान्ताबाई शेळके याचें "शब्दाच्या दुनियेंत" (१९५९) हें ललित निबधाचें पुस्तक तसें आकर्षक झालेलें आहे लेखन आटोपशीर असून येथें वर्णन केलेली 'मनातील बाग' लहानपणच्या अनुभवानीं मोठी ठानदार सजलेली आहे

स्त्रियानीं लिहिलेल्या निबधलेखनाचें स्वरूप हें असें आहे अपवाद म्हणून काहीं थोडे निबध सोडले, तर ह्या निबधापैकीं बहुधा सर्व निबध स्त्रियाच्या सामाजिक व घरगुती प्रश्नावरच आधारलेले दिसून येतील आपल्या घरगुती जीवनाबद्दल आणि आपणाला मिळालेल्या सामाजिक स्थानाबद्दल स्त्रियाना विशेष आस्था वाटत असते, आणि म्हणून त्यानीं आपल्या ह्या मनोवृत्तीनुसार निबधाचे विषय निवडले हें मान्य करूनहि असें म्हणता येईल कीं, त्याचें हें निबधलेखन अतिशय मर्यादित क्षेत्रापुरतें झालेलें आहे

• • •

टीका लेखनाच्याबाबतींत तर कुसुमावती देशपाडे, डॉ इरावती कर्वे, कमलाबाई टिळक, मालूताई खरे, याच्यासरीख फारसें कोणी लक्षच दिलेलें दिसत नाहीं शिक्षणक्षेत्रात अनेक स्त्रिया काम करीत असल्या, तरी त्या बाबतींत देखील ताराबाई मोडकाइतकी आस्था कुणींच दाखविली नसावी, इतकें थोडें लेखन या प्रातात झालेलें आहे पाकशास्त्र, भरतकाम, शिवणकाम इत्यादींवर अनेक महिलानीं लिहिलें असल, तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें तें लेखन महत्त्वाचें नाहीं व त्यामुळेंच त्या ग्रथाचा समावेश या विवेचनात आलेला नाहीं

वास्तविक देशाबद्दलची प्रीति पुरुषाप्रमाणच स्त्रीलाहि वाटावयास हवी पण त्या दृष्टीनेंहि स्त्रियानीं फारसा विचार केलेला दिसत नाहीं त्यामुळें विष्णुशास्त्री चिपळूणकर याच्याप्रमाणें देशप्रीतीनें भारलेलें किंवा शिवरामपत परांजपे याच्या सारखें पारतत्र्याचें जळजळीत चित्र निर्भिड ओतून टाकणारे निबध यांहि कालखडात स्त्रिया लिहू शकल्या नाहींत ! तीच गोष्ट मालू शिरधनकर यानीं "शिलेंगर" मध्ये अधूनमधून लिहिलेल्या शिकारीच्या रोमहर्षक हकीकती सागणाऱ्या निबधानाहि लागू पडेल

कायद्याच्या बाबतींत खरें म्हणजे स्त्रियांनीं विशेष जागरूक रहायला हवें आणि त्या दृष्टीनें लेखनहि करणें इष्ट आहे. पण चंद्रकला हाटे, कमलाबाई देशपांडे किंवा कमलाबाई टिळक यांच्याखेरीज कायद्याच्या कक्षेत येणाऱ्या प्रश्नांवर फारसें कोणीं लिहिलेलें दिसत नाहीं.

धार्मिक बाबतींत स्त्रिया स्वतःला फार गुरफटून घेतात असें त्यांच्या रोजच्या जीवनांत आढळून येणाऱ्या उपासातापासावरून किंवा व्रतवैकल्यावरून म्हणता येईल. असें असताना मग त्यानीं या विषयावर निबंध लिहून आपले विचार कां मांडले नसावेत याचें आश्चर्य वाटतें !

अगदीं अलीकडचा काहीं काल सोडला तर असे दिसून येतें कीं, घरकामापलिकडे स्त्रियानीं इतर क्षेत्रामध्यें पाऊल टाकून फारसा विचारच केलेला नव्हता. अर्थात् हा स्त्रीचा दोष नसून परिस्थितीचा होता हें मान्य करावयास हवें आहे. कारण स्त्री ही पुरुषापेक्षा कमी प्रतीची असून तिचें क्षेत्र फक्त घरापुरतेंच मर्यादित आहे अशी समाजाने आजवरच्या रूढीप्रमाणें चालत आलेली समजूत उराशीं बाळगलेली होती आणि स्त्रियानींहि मुकाट्यानें त्या कल्पनेचा स्वीकार केला होता ! त्यामुळें स्वाभाविकच या विचारसरणीचा त्यांच्या लेखनावर परिणाम झाला असावा. त्यांनीं आपलें जग अत्यंत मर्यादित करून घेतलें आणि मुख्य म्हणजे आजवरच्या रूढीने घातलेल्या चाकोरींतून बाहेर पडण्याचा काहींसा प्रयत्न केला ! परंतु हा त्यांचा प्रयत्न कृतीपेक्षा त्यांच्या कल्पनेतच अधिक तरंगत राहिल्यामुळें त्यांच्या विचाराची बडखोरी त्यांच्या लेखनातून म्हणावी तशी प्रकट झाली नाहीं.

स्त्रियांच्या मनाची ही ठेवणच त्याना मिळणाऱ्या सामाजिक दर्जाला व त्यांच्या लेखन निर्मितीला प्रामुख्यानें कारणीभूत झाली. त्यामुळें आजच्या वैज्ञानिक युगामध्यें विज्ञानासंबधींचें भरीव लेखन करणें त्याना जमलेलें नाहीं ! किंवा एखादा दुसरा अपवाद सोडला तर मराठीला ललामभूत होईल असा ग्रंथहि त्यांच्या हातून लिहिला गेलेला नाहीं ! ! त्यांनीं लिहिलें तें सारे–थोडासा अपवाद सोडला तर–स्त्री जीवनाला धरून असेंच लिहिलें. परंतु जे लिहिलें तें मात्र खास स्त्रीजीवनाचा आविष्कार करणारें असें लिहिलें. त्यामुळें त्यांचें हें निबंधलेखनहि मराठी सारस्वतास भूषणावह होईल यात शंका नसावी

० ० ०

## चरित्र वाङ्मय

आपल्या जीवनात येणाऱ्या एखाद्या थोर व कर्तबगार व्यक्तीबद्दल मनांत आदर निर्माण होणें व त्या व्यक्तीच्या जीवनाबद्दल आकर्षण वाटणें हा मानवी

मनाचा एक प्रमुख गुणधर्म आहे. आणि त्यामुळेंच माणूस जन्माला आल्यापासून आपल्याजवळ काहीं ईर्षा बाळगून आहे व कार्यप्रवृत्तहि झालेला आहे, होतो आहे व होईल देखील.

थोर पुरुषाची किंवा स्त्रियाची अद्भुतरम्य अगर अचाट वाटणारीं कृत्यें हीं निश्चयास जरीं पात्र असतात तरींच तीं आपल्या अवाक्याबाहेरचींहि वाटतात. त्यामुळें एखाद्या विशिष्ट माणसाचें चरित्र लिहावयास ज्यावेळीं एखादा लेखक तयार होतो त्यावेळीं त्या विशिष्ट माणसाबद्दल त्याचें मन मोठ्या आपुलकीनें व जिव्हाळ्यानें विचार करीत असतें. एकमेकांतील नात्याचें विवेचन करणें मग अशा वेळीं त्याच्या लेखणीला विशेष आवडतें. आणि त्यामुळें ह्या चरित्रलेखनास कलात्मक वाङ्मयामध्यें महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें

चरित्रनायक आणि चरित्रकार याच्या परस्परामधील नात्याचें अधिक विवेचन ललित वाङ्मयाच्या प्रारभकालाच्या मागील प्रकरणात आलेंच असल्यानें येथें ही पुनरावृत्ति मुद्दामच केलेली नाहीं

चरित्रनायकाचें जीवनदर्शन चरित्रकारास घडलें असता तो किती आत्मीयतेनें लेखन करू शकतो, याची कल्पना काशीबाई कानिटकर यानीं लिहिलेल्या "डॉ आनदीबाई जोशी" याच्या चरित्रावरून मागें आलेली आहेच. त्याच गोष्टीचें आणखी एक प्रत्यतर वेणूबाई पानसे यानीं लिहिलेल्या हरिभाऊ आपटे याच्या चरित्रावरून निश्चितपणें येतें.

• • •

## वेणूबाई पानसे

आजपर्यंत हरिभाऊ आपटे याच्याबद्दल अनेकानीं लिहिलेलें आहे श्री. आजेकर, नि म. केळकर व या ना देशपाडे यानीं लिहिलेलीं त्याचीं चरित्रेंहि प्रसिद्ध झालेलीं आहेत तथापि या सर्वापेक्षाहि वेणूबाईनीं लिहिलेलें हरिभाऊचें चरित्र विशेष उल्लेखनीय असें झालें आहे. हरिभाऊचें खरेंखुरें जीवनदर्शन घडविण्याची यशस्वी कामगिरी वेणूबाईनीं "हरि नारायण आपटे" या आपल्या ग्रथाद्वारें केलेली आहे हरिभाऊ हे कशा प्रकारचे गृहस्थ होते याची कल्पना येथें निश्चितपणें येते. हरिभाऊच्या जीवनातील बारीकसारीक सर्व गोष्टींचा जिव्हाळ्यानें अभ्यास करून वेणूबाईनीं त्याचें जीवनचित्र या ग्रथात रेखाटलेलें आहे.

आत्मीयता हा वेणूबाईच्या लेखनाचा प्रमुख विशेष येथें आढळून येईल. हरिभाऊच्या एका स्नेह्याची मुलगी या नात्यान त्याचा आणि हरिभाऊचा निकटचा सबध आलेला त्यामुळें त्याच्या ह्या चरित्राला विशेष वास्तवता आलेली आहे. हरिभाऊच्या निकटवर्ती असलेल्या सर्व मडळींकडून विचारून व बारीकसारीक

आणखी तेंच सागण्याची गरज नव्हती आणि दुसरें म्हणजे इतकें सविस्तर परीक्षण देण्याचें हे स्थळ नव्हे. चरित्र म्हटलें की, ती विशिष्ट व्यक्ति वाचकाऱ्या डोळ्या-समोर ठेवणें इष्ट असते आणि त्यासाठीं त्या व्यक्तीच्या गुणदोषाची छाननी करताना जरूर तेवढया तिच्या इतर छदाचा उल्लेख केला म्हणजे बस्स होतो

हरिभाऊच्या सामाजिक थोरवीची कल्पना लेखिकेनें अतिशय हळूवारपण दिलेली असून त्यावरून हरिभाऊच्या मनाचा मोठेपणा निश्चित रीतीनें दिसून येतो.

उच्च शिक्षण घेतलें असताना देखील लेखिकेनें या पुस्तकाचें अतरग मराठीच्या साध्या पण ठसठशीत स्वभावाला अनुसरून रगविलें आहे. ही विशेष अशी गोष्ट होय.

हरिभाऊची योग्यता सागताना वेणूबाई लिहितात—

"कादबरीकार या नात्यानें हरिभाऊची योग्यता फार मोठी आहे. त्याच्यापूर्वी व नतरहि त्याच्यासारखा बुद्धिमान् बहुश्रुत रसिक व प्रतिभासपन्न कादबरीकार झाला नाहीं. इग्रजी वाङ्मयाचें त्याचें ज्ञान अत्युत्कृष्ट होतें. त्याचा ग्रथसग्रह विपुल होता. कोणतेंहि नवीन पुस्तक प्रसिद्ध होवो, हरिभाऊ तें प्रथम विकत घेऊन वाचीत त्याना वाचनाचें खरोखरच व्यसन होतें. ते पदवीधर नसूनहि त्याचें वाचन व अध्ययन शेकडों पदवीधराना लाजविण्यासारखें होतें .

हरिभाऊ श्रेष्ठ दर्जाचे वाङ्मयसेवक होते सार्वजनिक कार्याचें त्याचें क्षेत्र विशाल होतें .. त्याची देशभक्ति श्रेष्ठ दर्जाची होती. या सर्व गोष्टींत जरी ते थोर होते, तरी व्यक्ति म्हणून त्याची योग्यता सर्वांत अधिक आहे. पुत्र, पति, पिता, आप्त, मित्र, नागरिक इत्यादि सर्व दृष्टींनीं त्यानीं आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें बजावलें आणि यातच त्याच्या जीवनाचें खरें रहस्य आहे."

० ० ०

# दुर्गा भागवत

"राजारामशास्त्री भागवत" हा दुर्गा भागवत यानीं लिहिलेला अगदीं अलिकडचा असा एक चरित्र ग्रथ आहे. मराठी भाषेच्या निबधकारात मानाची वतनदारी चालविणाऱ्या एका थोर साहित्यिकाचा हा अल्पसा परिचय आहे, येथें खुद्द लेखिकेनें प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें—"हा परिचय, महाराष्ट्राचें लक्ष त्याच्या एका थोर पण विस्तृत विचारवताच्या वाङ्मयाकडे सैन्यण्यास निमित्तमात्र होवो अशी माझी अपेक्षा आहे " शास्त्रीबुवाच्या परिचयापेक्षा त्याच्या वाङ्मयाचाच येथें अधिक परिचय देण्यात आलेला आहे लेखिकेच्या डोळ्यापुढें या चरित्र नायकापेक्षा त्याचें वाङ्मयच प्रामुख्यानें होतें असें यावरून स्पष्ट दिसून येतें या ग्रथाच्या प्रस्तावनेंत शास्त्रीबुवाविषयीं लेखिकेनें आणखी असें सागितलें आहे कीं,

डॉ. दिवेरर म्हणजे उत्तम शिक्षक म्हणून नावाजलेली व्यक्ति. आजन्म शि गणक्षेत्रात एखाद्या तपस्व्याच्या नात्यानेंच त्यानीं आपली भूमिका पार पाडलेली.

अशा प्रकारचीं कितीतरी सुदर शब्दचित्रें या ग्रथात रेखाटलेलीं दिसून येतात डॉ. दिवेकराच्या स्वभाववैशिष्ट्याचीं अनेक उदाहरणें देऊन लेखिकेनें त्याच मूर्तिमत चित्र वाचकासमोर ठेवलेलें आहे असें दिसून येतें.

या पुस्तकाची भाषा अतिशय साधी व ओघवती आहे तसेंच निवेदन पद्धतीहि घरगुती थाटाची आहे. त्यामुळें कित्येक ठिकाणीं वाक्यरचना विस्कळित झालेली दिसून येते. विचाराची प्रगल्भता अगर ते माडण्याची वैशिष्ट्यपूर्ण अशी पाडित्य–प्रचुर पद्धति या पुस्तकात फारशी कोठें आढळत नाहीं. सारें काहीं साधेसुधें व घरगुतीच आहे. त्यामुळें हे दोष येथें गुणाच्या समुदायात आपोआपच लुप्त होऊन गेलेले दिसतात. शिवाय खुद्द लेखिकेनेंच " हृद्गतात " म्हटल्या प्रमाणें " सूर्यास दाखविणारी ही मशाल नव्हे–भक्तिभावानें ओथबलेलें हे निराजन आहे " अशीच या पुस्तकाच्या लेखनाची भूमिका असल्यामुळें त्या दृष्टीनें पाहता लेखिका बरीच यशस्वी झालेली दिसून येते

• • •

## कु. सुलोचना देऊळगांवकर

अलिकडे विविध मासिकातून निरनिराळ्या स्त्री पुरुषाचीं चरित्रें देण्यात येतात या चरित्राचें स्वरूप आकारानें लहान असलें तरी माहितीच्या दृष्टीनें भरीव असतें. सुलोचना देऊळगावकर यानीं विविधप्रकारच्या स्त्रियाची कलात्मक चरित्रें लिहिलीं आहेत.

" निरलस समाज–सेविका "* सेवासदनाच्या लेडी सुपरिंटेंडेंट श्री. जानकीबाई ऊर्फ बनुताई भट याच्या चरित्राची सुरवात सुलोचनाबाई यानीं मोठी आकर्षक केली आहे. बनुताई भटाच्या जीवनाची कल्पना देताना त्या सुरवातीलाच लिहितात—

" नयनरम्य व आकर्षक दिसणाऱ्या भव्य मदिराचा आल्हाददायक कळस हा त्या मदिराच्या पायातील दगडापेक्षा जास्त महत्त्वाचा नसतो. हजारों दगड जेव्हा स्वत ला पायात पुरून घेतात तेव्हाच कळस तयार होऊन जगाला मोहीत करतो सेवामदिराच्या बाबतींत असेंच म्हणावें लागतें. जेव्हा अनेक कष्टाळू, दीर्घोद्योगी व नि स्वार्थी कार्यकर्ते आपापल्या आजन्म सेवेनें अव्याहत कार्य करून स्वत ला त्याच कार्यात गाडून घेतात तेव्हा कुठें समाजाचें लक्ष

* स्त्री, जानेवारी १९४१.

येथर्ते......त्यापैकीं एखादा " कोनशिला लेव " बनून बसतो. आणि त्या मंदिराचा जागता इतिहास जगाला सांगतो. आज अखिल भारतवर्षात सर्वश्रुत असलेल्या पुणें येथील " सेवासदन " संस्थेच्या सेवामंदिराच्या पायातील दगड बनून कोनशिला बनलेल्या एका जिवंत शिलेचा जीवनवृत्तांत सांगावासा वाटतो .."

घडतील तशा व्यक्तीच्या जीवनातील प्रसंगाची नोंद न करता लेखिकेनें आपल्या लेखणीला दिलेलें हें कलात्मक वळण चित्ताकर्षक आहे. अशीं कितीतरी चरित्रें लेखिकेनें लिहिलेलीं आहेत.

पुरुषाच्या मानानें स्त्रियांनीं चरित्रलेखन बरेंच कमी केलें आहे. शिवाय एकदरीनें पाहता आपल्याकडे वाङ्मयाची ही शाखा काहींशी मर्यादितच आहे असें दिसून येतें. तेव्हा संख्येची बाजू सोडली व गुणाच्या बाजूकडे वळलें तर या वाङ्मय प्रांतात स्त्रीची लेखणी पुरुषाच्या लेखणीच्या बरोबरीनें काम करू शकते आहे असें दिसून येईल. भाषेमधील आवेश आणि बडखोर चरित्र नायकाची निवड या बाबतींत स्त्रियांनीं केलेलें चरित्रलेखन एक वेळ पुरुषाच्या मानानें फिकें पडेल. तथापि चटकदार आणि जिव्हाळ्याची भाषा व घरगुती प्रसंगाची रमणीय गुंफण या बाबतींत मागील विभागात आलेलें काशीबाई कानिटकरांचें " डॉ. आनंदीबाई जोशी " याचें चरित्र अणुभरहि कमी प्रतीचें न ठरता उलट थोडें फार का होईना सरसच ठरेल चरित्रलेखन हा वाङ्मयप्रकार अलिकडे आत्मनिष्ठ वाङ्मयात मोडत असल्यामुळें त्याचें मोजमाप हें चरित्रनायकाच्या व चरित्रकाराच्या एकमेकाच्या एकजीव झालेल्या धाग्यादोऱ्यावरूनच करावें लागेल. भाषाशैली हा प्रत्येकाचा व्यक्तिगत गुण असू शकतो, तेव्हा तो काहीं येथें तुलनेनें पहाण्याची जरूरी नाहीं. प्रत्येक चरित्रकार हा चरित्रनायकाकडे आपल्या स्वतंत्र दृष्टिकोनातूनच पहात असतो. त्यामुळें या त्याच्या विशिष्ट दृष्टिकोनावरच चरित्राचें यशापयश मोजण्यात येतें त्या दृष्टीनें स्त्रियांनीं लिहिलेलीं हीं चरित्रें सरस झालेलीं आहेत.

० ० ०

## आत्मचरित्र

स्वतःच्या कर्तबगारीचा विकास घडवून आणण्यासाठीं माणूस जन्मभर सतत काहीं ना काहीं उद्योग करीत रहातो. आपलें इच्छित ध्येय गाठण्यासाठीं अविश्रांत श्रम घेत असतो. तथापि त्याच्याजवळची उमेद या कामीं खर्ची पडत असताना अधून मधून त्याच्या जीवनात असे काहीं प्रसंग उभे रहातात आणि असे काहीं क्षण येऊन जातात कीं, त्या घटकेला त्याच्या नजरेंत त्याचें उभें जीवन उभें रहातें. अनंत आठवणी मनात घोळत रहातात. स्वतःच्या कर्तबगारीची थोरवी ओंठावर घोळू लागते. इतराच्या जीवनाशीं तोलून पहाता

आपलेंच जीवन आपण चांगलें घालविलें असा विचार मनात डोकावतो. त्यामुळें माणसाला ह्या सर्वांचा स्वतःशींच आढावा घेता यावा म्हणून विश्रांतीची गरज भासते. विशेषत. उतार वयात ही जाणीव प्रभावानें होत रहाते. त्या कारणानें जिव्हाळ्याचा असा कोणी ऐकणारा भेटला कीं, मग तो माणूस आपल्या जीवनात जें घडून गेलें असेल त्यातून आपली कर्तबगारी रसभरीतपणें सांगत रहातो. स्वतःबद्दल खरेखुरें बोलणें अशा वेळीं त्याला आवडतें. त्यामुळें. या बोलण्याला एक प्रकारची चव येते. जीवनाला कळा आली आहे असें वाटू लागतें आणि ह्या आत्मकथनानें सांगणारा व ऐकणारा मग सुखावतो, खुशालींत राहातो.

जी मंडळी विचारी असतात, लेखक असतात, समाजसेवक असतात, राजकारणी असतात, समाजात नाव मिळविलेली असतात किंवा त्याना त्याच्या कर्तबगारीमुळें समाजात मोठें स्थान प्राप्त झालेलें असतें, अशा मंडळींना लोकाना-आपल्या जीवनातील प्रसंगाचें केवळ आत्मकथन करणे आवडत नाहीं. बोलण्या-प्रमाणेंच ह्या स्मृतिचित्राना लिखित करून ठेवण्याचा त्याना मोह होतो. अनेक वाचकांचे कानीं व ध्यानींमनीं आपलें आत्मकथन जावें अशी त्याची इच्छा असते. त्यामुळें या आत्मकथनाचें लेखनात रूपांतर होतें व नंतर हा लेखनप्रकार आत्मचरित्र या वाङ्मयप्रकारात मोडला जातो. आत्मचरित्र म्हणूनच नंतर हें आत्मकथन लोकाच्या हातीं जातें.

त्यामुळें स्वतःविषयीं लिहिणें हा विषय जेवढा सुखदायी तेवढाच तो अवघडहि होऊन बसतो. कारण स्वत.बद्दल कांहीं वाईट साईट घडलेलें सांगणें लेखकाला स्वतःलाच पटत नाहीं आणि वाचकाची तर इच्छा होते कीं, ह्या माणसाबद्दल चांगलेंच ऐकायला मिळावे ! * त्या कारणानें लेखक मोठ्या दुहेरी कात्रींत सापडतो व सांगण्यासारखें असेल तेवढ्याच आपल्या पराक्रमाच्या व वैभवाच्या गोष्टी आपल्या आत्मचरित्रात सांगून मोकळा होतो. जुन्या काळच्या आठवणींच्या गुंफणींत दंग होऊन जातो. नव्या पिढीला आपलें वैशिष्ट्य सांगितलें या समाधानात जगालाहि विसरू पाहतो.

मानवाच्या जीवनातील ह्या जुन्या आठवणी—आत्मचरित्र वा आत्मकथन म्हणजे डॉ. कर्वे याच्या आत्मवृत्तास लिहिलेल्या प्रस्तावात म्हटल्याप्रमाणें

---

* " It is a hard and nice snbject for a man to write of himself; it grates his own heart to say anything of disparagement and the reader's ears to hear anything of praise for him. "

—Abraham Cowley

( Jawaharlal Nehru : An Autobiography. )

" . मनुष्याच्या विचाराचे व कृतींचें व हुनेहूब काढलेलें चित्र. जणूं काय प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार रुसो यानें लिहिल्याप्रमाणें जगाच्या शेवटच्या दिवशीं परमेश्वराला आपल्या सर्व जीवितावर जो निकाल द्यावयाचा असतो, त्याकरिता आपण दिलेली जबानी..."

उक्ति वाङ्मयाच्या आरंभीचें मागील प्रकरणामध्यें रमाबाई रानडे यांच्या "आमच्या आयुष्यातील कांहीं आठवणी" या आत्मचरित्रपर ग्रंथाचा विचार केलेला आहेच. प्रस्तुत प्रकरणात लक्ष्मीबाई टिळक, पार्वतीबाई आठवले, आनंदीबाई कर्वे, लीलाबाई पटवर्धन, कमलाबाई देशपांडे आणि ज्ञाता आपटे यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्राचा विचार करावयाचा आहे.

सामान्यतः आत्मचरित्रपर ग्रंथामध्यें स्वत:विषयीं आणि त्या अनुषगानें येणाऱ्या भोंवतालच्या जगाविषयींच प्रामुख्यानें माहिती आलेली असते. त्यामुळें स्वाभाविकच स्त्रियांनीं लिहिलेल्या आणि पुरुषांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रातून त्यांच्या वैयक्तिक जीवनानुसार दिसून येणारा फरक मोठ्या उत्कटत्वानें वेगळा असलेला दिसून येतो.

स्त्रियांचा बहुतेक सारा वेळ आपल्या घरकामात, मुलाबाळांच्या संगोपनात घरधन्याच्या सेवेंत आणि क्वचित् प्रसंगीं पत्करलेल्या सामाजिक कामाच्या निमित्तानें घराबाहेरच्या जगात जात असतो. त्यामुळें त्यांच्या जीवनक्षेत्राला एक प्रकारचा ठराविक आकार आलेला असतो. हें जीवनक्षेत्र पुरुषांच्या मानानें बरेंचसें मर्यादित असते. त्यामुळें स्वाभाविकच याच एका मर्यादित जगाचे पडसाद स्त्रियांच्या आत्मचरित्रात उमटलेले दिसून येतात.

आत्मचरित्र लिहित असताना सर्व लेखक लेखिकांची मूळ बैठक एक असली तरी व्यक्ति तितक्या प्रकृति या सिद्धांताप्रमाणें त्यांच्या लेखनाचें वैशिष्ट्यहि निरनिराळें असलेलें दिसून येतें. कारण "प्रत्येकाच्या आयुष्याचें ध्येय वेगळें, तें ध्येय पार पाडण्यासाठीं लागणारीं साधनें वेगळीं, मार्ग वेगळे आणि त्यामुळें शेवटीं प्राप्त होणाऱ्या यशापयशाचें स्वरूप देखील वेगळें असतें."* त्यामुळें स्वाभाविकच प्रत्येकाच्या जीवनाविषयीं इतरांना कुतूहल वाटत असतें. तें कुतूहल पूर्ण करण्यासाठीं लेखकानें आपल्या आठवणींशीं अतिशय एकजीव झालें तरच तें लेखन प्रभावी ठरतें. नाहींतरी आपलें स्वत:चेंच प्रतिबिंब समोरच्या आरशात पहात असताना मनुष्य जेवढा दंग होऊन जातो तितका दुसऱ्याच्या चित्रानें खास होऊन जात नाहीं ! आणि तसें असतें म्हणूनच आत्मचरित्र लिहित असतान लेखकाला कमालीचा आनंद उपभोगता येत असतो. आजपर्यंतच्या त्याच्या आयुष्यात जें कांहीं बरेंवाईट घडून गेलें असेल तें सर्व काळाच्या पडद्यावर उमटलेलें

*साहित्यदर्शन पान १०२.

असतें. आपल्या जीवनाचा तो ठसा बघूनच लेखकाला आपल्या कर्तबगारीचे पवाडे गावेसे वाटतात.

● ● ●

## पार्वतीबाई आठवले

" माझी कहाणी " ( १९२८ ) या पुस्तकात पार्वतीबाई आठवले यांनी आपल्या घरगुती जीवनातील व अमेरिकेच्या प्रवासातील अनेक प्रसंग रंगवून आपली ओळख करून दिलेली आहे.

पार्वतीबाईचें शिक्षण हिंगण्याच्या स्त्रियांच्या संस्थेत झालेलें आहे. कर्व्यांच्या आश्रमात राहून त्यांनीं आयुष्याचें एक नवें दालन उघडलें. म्हणजे विधवेचें जीवन जगत असतानाच स्वतःच्या पायावर उभे राहून आयुष्याला स्थैर्य येईल अशा प्रकारचें शिक्षण घेतलें.

तसें पाहिले तर स्त्रीजीवनातील विधवाची अवस्था मोठी कठीण असते. सामाजिक बंधनानीं आणि परंपरेनें चालत आलेल्या रूढींनीं त्यांच्या भावनांची एवढी गळचेपी झालेली असते कीं, त्यांची कल्पना त्यांच्याशिवाय इतर कोणाल्हि तेवढ्या तीव्रतेनें जाणवू नये ! स्वतःच्या भावनांना तर त्यांना पदोपदीं मुरड घालावी लागते. समाजामधील आपल्या या विशिष्ट अवस्थेमुळें प्रत्यक्ष वैधव्याचें दुःख देखील त्यांना त्यापेक्षा कमी वाटतें. त्यांची भाषा सोपी आहे. लेखन-शैलीहि चांगली आहे, पण त्यात लालित्याच्या भागापेक्षा ओघानें येणारें भावनाविष्करणच अधिक झालेलें असल्यानें पुस्तक तितकेंसें चटकदार वाटत नाहीं.

● ● ●

## लक्ष्मीबाई टिळक

मराठी साहित्याला आपल्या लेखनानें वैभवाचे दिवस दाखविणारी एक असामान्य व प्रतिभासंपन्न लेखिका म्हणून लक्ष्मीबाई टिळक यांचा परिचय जाणत्या मंडळींना झालेला आहे. त्यांच्या ' स्मृतिचित्रानीं ' ( भाग १ ते ४ ) केवळ मराठी वाचकांचींच मनें जिंकलीं आहेत असें नव्हे तर या स्मृतिचित्रानीं परभाषेंतहि आपलें स्थान राखलेलें आहे. फारसें शालेय शिक्षण न झालेल्या एका बाईच्या पुस्तकाचीं इतर भाषांत भाषांतरें होऊ शकतात हा जसा लक्ष्मीबाई टिळकांच्या लेखनाचा चमत्कार आहे, तसाच आणखी एक अद्भुत चमत्कार

म्हणजे ह्या बाईंना नामवंत साहित्यिकांच्याकडून ' साहित्य लक्ष्मी ' असा मिळालेला किताब होय !

लक्ष्मीबाईंच्या स्मृतिचित्रांना अनुभवाची भक्कम बैठक असून कलात्मक लेखन वैशिष्ट्याची चोळी बांगडी मिळालेली आहे. त्यांची भाषा अगदीं साधी, खेळीमेळीची, घरातली पण भारी धारदार आहे. ओघवती आहे. निश्चितपणानें काहीं सांगण्याची धमक तिच्यात आहे. आत्मविश्वासानें ती सर्वत्र वावरते आहे. त्यामुळें या स्मृतिचित्रांनीं अक्षर वाङ्मयाची मानाची जागा मिळविली आहे. सुसंस्कृत मराठी मनानीं त्यांनीं अस्मिता सांगितलेली आहे. आणि म्हणूनच स्मृतिचित्रांच्या रुपानें लक्ष्मीबाई टिळकांनीं सांगितलेलें आपलें आत्मचरित्र मराठी सारस्वतात आपल्या वैशिष्ट्यानें चमकू शकतें आहे.

तसें पाहिलें तर लक्ष्मीबाई स्वत: फारशा शिकलेल्या नव्हत्या. पण अनुभवाच्या बळावर त्यांनीं आपलें ज्ञान फार मोठ्या प्रमाणात वाढविलेलें होतें. त्यांना लहानपणापासूनच शिक्षणाची कधीं हौस नव्हती श्री. टिळकांना मात्र त्यांनीं शिकावें असें मनापासून वाटत असे. पण टिळक म्हणतात म्हणून आपण शिकायला हवें असें लक्ष्मीबाईंना कधींच वाटलें नाहीं ! त्यांचा स्वभाव निराळा होता. स्वत:च्या व्यक्तित्वाची त्यांना जाणीव झालेली होती. रमाबाई रानड्यांप्रमाणें " असे पति दैवचि ललनांना " असा त्यांचा मनोधर्म नव्हता. टिळकांचें काहीं चुकलें तरी तसें धीटपणें बोलून दाखविण्याची त्यांच्या मनाची तयारी झाली होती !

आत्मचरित्रामध्यें अत्यावश्यक असणारी गोष्ट म्हणजे सत्यकथन ही होय. दुसऱ्याचे बरेवाईट गुण मनुष्य सहज सुलभ रीतीनें सांगू शकत असला, तरी स्वत:चे गुणदोष त्यास तितक्या सहजपणें सांगणें कठिण वाटतें, आणि आपल्या जीवनातील निर्मळ सत्य सांगितलें नाहीं, तर आत्मचरित्राला यावा तसा जिवंतपणा येत नाहीं ! लक्ष्मीबाईंनीं आपल्या लेखनात निर्मळ सत्यकथनाची तर खैरातच करून टाकलेली आहे. त्यामुळें त्यांचें लेखन विशेष प्रभावी झालेलें आहे. आपल्या आयुष्यात जें जें घडलें तें तें सर्व लक्ष्मीबाईंनीं कसलाहि संकोच मनात न बाळगता अतिशय मोकळ्या मनानें लिहिलेलें आहे. तरी देखील अतिशयोक्तीचा वास त्यांच्या लेखनात कोठेंहि आलेला नाहीं हे विशेष होय. आणि त्यांच्या अशाच या गुणांमुळेंच त्यांना ' साहित्यलक्ष्मी " अशी बहुमानाची पदवी मिळालेली आहे.

लक्ष्मीबाईंचें शिक्षण घरगुतीच झालेलें होतें त्यामुळें सर्वसामान्य रीतीनें ज्या स्त्रीला ही शिकलेली बाई आहे, असें समजण्यात येतें, तशी परिस्थिति लक्ष्मीबाईंच्या जीवनात कधींच निर्माण झालेली नव्हती. उलट बाळबोध घराण्यातील जुन्या काळच्या स्त्रीला शोभेल इतपतच केवळ कामापुरतें, लिहिण्या–वाचण्या इतकेंच, त्यांचें शिक्षण झालेलें. त्यामुळें स्वाभाविकच लक्ष्मीबाईंच्या विचारसरणीला परदेशी किंवा परभाषी वाङ्मयातील विचाराचे मोह निर्माण करणारें वातावरण

बाधलेलें नाहीं. म्हणून त्याच्या भोळ्या भाबड्या मनाला जें जें सागावेसें वाटलें तें तें त्यानीं आपल्या साध्याभोळ्या कल्पनेनें मनात एकत्र केलें आणि तितक्याच साध्या रीतीनें लिखाणातहि चितारलें. महात्मा गांधींच्या "सत्याचे प्रयोग' मध्ये आढळणारा मोकळेपणा आणि निर्भयता लक्ष्मीबाईच्या लिखाणातहि पानापानावर आढळून येतो. त्यामुळेंच त्याच्या जीवितार्चे हें चिरस्मरणीय प्रतिबिंब वाचणाराच्या अतःकरणाला जाऊन भिडतें.

खिस्ती धर्माकडे दिवसेंदिवस टिळकाच्या मनाचा कल झुकत चाललेला बघुन लक्ष्मीबाईच्या मनाची चलबिचल सुरू झाली. टिळकाच्या एकदर वागणुकींतील फरक जाणवल्यानतर तर त्याचें मन अधिकच बेचैन झालें. असें का घडावें हें त्याना कळेना. त्यामुळें अशा वेळीं होणारी मनाची अस्वस्थता रगविताना लक्ष्मीबाई सागतातः--

"टिळक आताशीं रोज रात्रीं कोठें तरी जातात. पण कोठे हें कसें कळावें? त्याच्या ह्या वर्तनाचा शोध कोण लावणार? घरवालीच्या मुलाला सागावें तर तो मुलगा लहान. त्यालाहि टिळक रागाच्या भरात मारायचे! तेव्हा एक दिवस मीं विचार केला कीं, स्वतःच त्याचा शोध लावायचा. एक दिवस दत्तूला खायला घालून निजविला होता. आमचें दोघाचें कशावरून तरी भाडण झाल्यानें रात्रीं नऊच्या सुमारास चुलीवर थालिपींठ चढलें होतें. टिळक बाहेर निघाले. जाताना मला म्हणाले, "मी सत्याच्या घरीं जाऊन येतों." दार लावून घेतलें व दाराच्या फटींतून पाहूं लागलें. टिळक बुटाचा कर्र कर्र आवाज करीत सत्याच्या बाजूला वळले. दहापधरा पावलें गेल्यावर ते हळूच मागें परतले व पाऊल न वाजवता विरुद्ध दिशेला चोरट्या पावलानीं चालूं लागले. चादणें स्वच्छ पडलें होतें. थालिपीठाचें पातेलें तसेंच चुलीवर टाकून मीं घराचें दार सताड उघडलें व काहीं अतरावरून झपझप पावलें टाकीत टिळकाच्या मागोमाग चालू लागले. पण पुढें डोक्यात आलें कीं, लोकाच्या घरीं शोभा होण्यापेक्षा दत्तू उठण्याच्या आत घरीं गेलेलें बरें. तेव्हा त्याना ऐकू जाईल अशा बेतान मी म्हणालें, "सत्याचें घर मागेंच राहिलें. ही वाट त्याच्या घराची नाहीं."

हें शब्द कानीं पडताच टिळक मागें वळले. मीहि मुरड कानोला खाल्ला. आता आमची शर्यत सुरू झाली. मला पुढचा रस्ता दिसेनासा झाला. जमीन दुभंग होऊन मी आत गडप होऊन जाईन तरी किती चागलें होईल, असें मला झालें. मी घरीं पोंचलें व सैंपाक घरात जाऊन आतून कडी लावून घेतली.

टिळक येऊन दारावर धक्के देऊ लागले. मी दार उघडीना. शेवटीं दार मोडायचा बेतात आलें तेव्हा मीं तें उघडलें. दार उघडताच टिळकानीं मला यथान्वित चोप दिला. तिकडे थालिपीठ रामरक्षा म्हणत होतें. शेवटीं राग शात झाल्यावर दोघानींहि थटा फराळ केला.

दुसऱ्या दिवशीं माझी सुजलेली पाठ पाहून मात्र टिळकांचें मन अतिशय दु खी झालें......"

आत्मचरित्रामध्ये स्वभावलेखन ही एक महत्त्वाची गोष्ट असते. आपल्या स्वत बरोबरच आपल्या पतीचा स्वभावहि प्रसगानुसार कसकसा दिसून आला याचें वास्तवरीतीनें चित्रण करणें म्हणजे वास्तविक फार अवघड अशी कला आहे. पण या कलेंतहि लक्ष्मीबाईंनीं कमालीचें यश मिळविलें आहे रे. टिळकांची स्वभावरेखा तयार करीत असतानाच त्यांच्या स्वभावातील आणखी एक वैशिष्ट्य सागताना लक्ष्मीबाई म्हणतात,

". मला एक दिवस ते म्हणाले, "चल सोंगट्या खेळू ! सोंगट्या खेळताना मला एक मोठा रोग जडत असे तो म्हणजे हसणे ! टिळकांच्या अगावर डाव उलटू लागला कीं, ते चिडायचे ! त्या दिवशीं खेळता खेळता माझी सरशी होऊ लागली माझ्या हसण्याचा आजार वाढू लागला. टिळकांचा रागाचा पारा चढू लागला तसा माझा आजारहि बळावू लागला व त्या दिवशीं त्या "आजारा" पायीं खरोखरच मृत्यूशीं गाठ पडण्याची वेळ आली होती. पण थोडक्यात बचावलें.

सोंगट्या, पट, फासे थरथर कापू लागली काहींनीं तर खालील गटाराचा आश्रय केला घातलेले बिछाने सैरावैरा धावू लागले सगळ्या सामानानें पड पुकारलें जागच्या जागी काहीं राहिलें असेल तर तें फक्त बायको नि दिवा ! प्रकरण इतकें हातघाईवर आलें कीं, शेवटीं दिव्यानेंहि राम म्हटल आगपेटी केव्हाच पासोडीचा आसरा करून बिछान्याच्या ढिगाऱ्यात तोंड लपवून बसली होती. तरी मला वाटत होती गमत ! मी आणखी जोरजोरानें हसू लागलें

आता या युद्धकांडातील शेवटचा भाग जिन्याला नव्हतें दार ! टिळकांनीं मला अधारात लोटलें.

मी जिन्यातून "घालीन लोटांगण वदीन चरण" करीत खालीं तक्तपोशीत येऊन पडलें टिळकांचा राग मावळला व माझें हास्य पळालें. टिळक घाबऱ्या घाबऱ्या आगपेटी शोधू लागले ती सापडेना शेवटीं अधारातच चाचपडत ते खालीं आले व मला उठवून वर घेऊन गेले मला तो सातवा महिना होता "

लक्ष्मीबाईंनीं टिळकांच्या स्वभावातील अशा प्रकारें दर्शविलेल्या विविध छटा वाचीत असताना टिळकांचें मूर्तिमत चित्र वाचकांच्या नजरेसमोर उभें रहातें. स्वत च्या कल्पना अमलात आणीत असताना वाटेल त्या गोष्टींचा त्याग करणारे, मनानें शात पण तितकेच करारीहि असणारे, वेळोवेळीं विसराळूपणाला जवळ करणारे, आपल्याच नादात गुगून रहाणारे, उदार मनाचे, हौशी आणि प्रेमळ असणारे टिळक लक्ष्मीबाईंनीं मोठ्या हृदयगम रीतीनें या पुस्तकात

रेखाटलेले आहेत. त्यामुळें त्यांच्या लेखनाला एक प्रकारचा मूर्तिमत जिवंतपणा लाभलेला आहे.

लक्ष्मीबाईंची भाषाशैली फारच सुरेख असून वाचणाराचे मनावर भुरळ पाडण्याचें विलक्षण सामर्थ्य त्यांच्या लेखणीनें कमावलेलें आहे. स्वतःच्या जीवनात मनाची अस्वस्थता वाटविणारे अनेक प्रसंग आले असताहि आपल्या विनोदी स्वभावाच्या बळावर लक्ष्मीबाई सहीसलामत त्या प्रसंगातून बाहेर पडल्या आहेत असें त्यांच्या या लेखनावरून दिसून येतें. लक्ष्मीबाईंचे आयुष्य म्हणजेच एक विनोदाचा प्रचंड झरा आहे! विनोदाचा आश्रय करीत असतानाच त्यांनीं आपल्या स्त्रीसुलभ भावनांचा आविष्कार किती तरी चित्तवेधक आणि सहजसुलभ रीतीनें केला आहे.

लक्ष्मीबाईंची भाषा साधी, सोपी, घरगुती, विनोदी व चटकदार असून त्यांची वाक्यरचनाहि सुटसुटीत व रेखीव आहे. मोजक्या शब्दांत उत्कृष्ट शब्दचित्र रेखाटण्याचें त्यांचें वैशिष्ट्य कोणीहि हेवा करण्याइतकें अविस्मरणीय असून कलेच्या दृष्टीनेंहि त्यांच्या लेखनाचा थाट अपूर्व असाच आहे.

० ० ०

# सौ. आनंदीबाई कर्वे

गु. अण्णासाहेब कर्वे यांच्या महिलाश्रमाला व इतर कार्यक्षेत्राला स्वतःच्या पराकोटीच्या कष्टानें कै. सौ. आनंदीबाईंनीं मदत केलेली असून त्यास आनंदभवनाचें स्वरूप प्राप्त करून दिलेलें आहे. ज्या बालकांना कोणीहि जवळ घेणार नाहीं अशा अनेक अनाथ मुलांचें संगोपन त्यांनीं मोठ्या हौसेनें केलेलें आहे. त्याचप्रमाण परिस्थितीमुळे ज्यांच्या जीवनाचा विकास खुंटलेला होता, अशा अनेक अनाथ स्त्रियानाहि त्यांनीं आश्रय देऊन त्यांच्या जीवनात अर्थ निर्माण केलेला आहे. आपल्या या कामगिरीचें चित्रण त्यांनीं आपल्या "माझें पुराण" या आत्मचरित्रात केलेलें दिसून येतें.

त्यावेळच्या समाजात एखाद्या अस्पृश्यापेक्षाहि विधवा स्त्रियांची अवहेलना करण्यात येत असे. तेव्हा अशा स्थितींत जिला धड माणुसकीनें देखील वागविलें जात नसे तिला स्वतःच्या मनाला विरंगुळा मिळावा म्हणून कोण शिक्षण देणार होतें! आनंदीबाईंनीं विधवेचें जीवन कंठीत असताना या परिस्थितीची झळ सोसलेली होती. पण त्यांच्या सुदैवानें त्यांना शिक्षण घेण्यासाठीं अनुकूल अशी परिस्थिति प्राप्त झाली होती.

० ० ०

# श्रीमती गिरिजाबाई केळकर

जुन्या काळातील एक नावाजलेल्या लेखिका म्हणून ज्याचा गौरव मराठी मनानें आजवर केला त्या श्रीमती गिरिजाबाई केळकर यानीं लिहिलेलें "द्रौपदीची थाळी" (१९०९) हें आत्मचरित्र अलिकडे प्रकाशित झालेलें आहे. हें आत्मचरित्र म्हणजे एका संसारी परंतु विद्याव्यासंगी अशा स्त्रीच्या जीवनाची सुंदर कहाणी सांगणारें पुस्तक आहे. इथे लेखिका अगदी घरगुती अशा गृहिणीच्या स्वाभाविक भूमिकेंतून सर्वत्र वावरत असून तिनें मोठ्या प्रामाणिकपणानें आपल्या आयुष्याचा आढावा घेतलेला आहे. आणखी हेंच या पुस्तकाचें प्रमुख वैशिष्ट्य होय.

संसारात येणाऱ्या मुसदु खाशीं तटफ्दार रीतीनें तोंड देत राहून सदा आनंदात रहाण्यातच कशी माणुसकी असते याची गोष्ट हें पुस्तक सांगत आहे. आपल्या घराची रहाणी साधीच परंतु उच्च दर्जाची ठेवून व आल्या गेल्यासह सर्वांची आपुलकीनें व्यवस्था राखून घरात नंदनवन निर्माण करण्याची स्वत लेखिकेनें किती पराकाष्ठा केली व पुढच्या पिढीला आपल्या वागणुकीनें कसा धडा दिला याचे हें एक सुंदर उदाहरण होय.

गिरिजाबाईंचें बाळपण श्रीमंतींत व वैभवात गेलें होतें आणि सुदैवानें पतीच्या सान्निध्यातील काळात देखील श्रीमंतीचा व ऐश्वर्याचा त्यानीं उपभोग घेतला, पण ह्या वैभवानें त्याना भुरळ पाडली नाहीं. आपल्या समाधानात इतरानाहि समाधानी करावें या भावनेनेंच त्यानीं समाजजीवन, संस्कृति व देश यासंबधींचा विचार केला. त्याप्रमाणें वागणूक ठेवली आणि मुख्य म्हणजे गृहस्थाश्रमातील गृहिणीचें कर्तव्यहि चोख बजावलें.

● ● ●

# डॉ. कमलाबाई देशपांडे

*अगदीं प्रौढ वयात शिक्षण घेऊन आत्मचरित्रासारखें लेखन करणाऱ्या* स्त्रियाचा काळ आणि कमलाबाई देशपांडे यानीं प्रत्यक्ष शाळेंत जाऊन लहानपणींच शिक्षणास आरंभ केलेला काळ यात बरीच तफावत असलेली दिसून येते. यावेळीं स्त्री–शिक्षणाची वाढ बऱ्याच प्रमाणात झालेली होती. "मुलींसाठीं" स्वतंत्र शाळा स्थापन झालेल्या होत्या. मुलाच्या बरोबरीनें मुलीलाहि लहान वयात शाळेंत धाडण्यास आरंभ झालेला होता.

कमलाबाईना गृहिणीचें सौभाग्य फार थोडा काळ लाभलें. पण तेवढ्या अवधींतल्या स्वप्नवत् जीवनातील पतीचीं पत्रे त्यानीं "स्मरणसाखळींत" दिलेलीं

आहेत हीं पत्रें मोठीं हृदयगम असून त्यामध्यें श्री देशपांडे यांनीं कमलाबाईंनीं अध्ययन व लेखन करावें असें वारंवार सुचविलेलें दिसून येतें हें विशेष होय

नंतरच्या आयुष्यात कमलाबाईंचें शिक्षण पुण्याच्या कर्वे महिलाश्रमात झालें त्यावेळच्या विद्यार्थी जीवनाची मोठी मनोरंजक हकीकत त्यानीं दिलेली आहे

एक उत्तम प्रकारच्या शब्दचित्रकार म्हणून कमलाबाई देशपांडे याना साहित्यप्रेमी लोक ओळखतात आपल्या सहजसुलभ शब्दसौष्ठवाच्या सहाय्या मुळें वाचणाऱ्या लोकांच्या डोळ्यासमोर मूर्तिमंत चित्र उभें करण्याचें सामर्थ्य त्यांच्या लेखणींत आहे हिंगण्याला काम करीत असताना आपलें काम चोख व्हावें म्हणून त्यानीं आपल्या एकुलत्या एका लहान मुलाला घरीं आईकडेच ठेविलें होतें त्यावेळीं त्याच्या मुलाची नेहमीं अशी इच्छा असावयाची कीं, आपल्या आईनें घरीं रहावें पण तसें करणें कसें शक्य होत नसे, हें सांगताना कमलाबाई मातृहृदयाचें किती सुंदर चित्र रंगवितात !

कमलाबाई देशपांडे म्हणजे साहित्यसम्राट या पदवीचा बहुमान मिळविलेल्या कै तात्यासाहेब केळकराच्या कन्या त्यांच्या लहानपणापासून माहेरीं सारें साहित्य संमेलनासारखें वाङ्मयीन वातावरण अर्थात् त्याचा परिणाम म्हणून म्हणा किंवा कमलाबाईंना अध्ययनाची आवड विशेष म्हणून म्हणा, त्या त्यावेळीं शिकावयाला लागल्या आणि अखेरास पीएच् डी च्या पदवीसाठीं परदेशींहि जाऊन आल्या ! त्या सर्व काळात तात्यासाहेबाच्या स्वभावाचें त्यानीं काढलेलें चित्र खरोखरच हृदयंगम आहे वडील या नात्यानें त्यानीं कमलाबाईंना परदेशात असताना प्रकृतीची काळजी घेण्याबद्दल, शक्य तितक्या काटकसरीनें रहाण्याबद्दल आणि ठरलेल्या मुदतींत परत येण्याबद्दल लिहिलेलीं विविध पत्रें व कमलाबाईंचीं त्याना आलेलीं उत्तरें विशेष उल्लेखनीय आहेत विशेषत अपेक्षेपेक्षाहि कमला बाईंनीं विद्याभ्यासात यश मिळविलें तेव्हा तात्यासाहेबानीं त्याचें जें कौतुक केलें आणि मग आणखीहि हवे तितके पैसे पाठविण्याची इच्छा दर्शविली, हा " स्मरणसाखळी "तील भाग अतिशय जिव्हाळ्याचा आणि वात्सल्याचा निदर्शक असाच आहे

कमलाबाईंच्या या आत्मचरित्रात घरगुती जीवनापेक्षा त्यांच्या बाह्य जीवनाचा व संस्थेच्या कार्याचाच भाग अधिक आलेला असल्यामुळें इतर लेखिकापेक्षा हें पुस्तक निराळें झालेलें आहे कमलाबाईंची भाषा ओघवती आणि सोपी आहे व वर्णनशैलीहि चटकदार आहे आत्मचरित्र लिहावयाचें या दृष्टीनें या पुस्तकाचें लेखन झालें नाहीं आणि ओघानें लिहिता लिहिता त्यास तसें स्वरूप आलें असें खुद्द लेखिकेनेंच सुरवातीच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे ! त्यामुळें या पुस्तकातील बराचसा भाग, विशेषत संस्थेच्या कार्याच्या आढाव्याचा भाग, काहींसा रुक्ष झालेला आहे असें दिसून येईल

# लीलाबाई पटवर्धन

महाराष्ट्राचे प्रसिद्ध कवि कै. डॉ. माधवराव पटवर्धन ऊर्फ 'माधव ज्यूलियन' त्याच्या सुविद्य पत्नी कै. लीलाबाई पटवर्धन यानीं "आमचीं अकरा वर्षें" या आत्मचरित्रात आपल्या वैवाहिक जीवनातील आठवणी एकत्रित केलेल्या आहेत.

माधवराव पटवर्धनानी "माधव ज्युलियन" हें नाव धारण केल्यामुळें बरेंच दिवस त्याच्याबद्दल टीकात्मक कुतूहल निर्माण झालेलें होतें, आणि अशा स्थितीतच लीलाबाईचें त्याच्याशीं लग्न झालें होते ! खुद्द लीलाबाईंच्या मनातहि या कुतूहलानें वादळ निर्माण केले होतें हें विशेष होय !

माधवरावाबरोबर कोल्हापुरास जाऊन स्वतत्र ससार थाटल्यानतर पतीबद्दलचे बरेच बरेवाईट अनुभव लीलाबाईंना भोगावे लागले होते. माधवराव स्वतः कवि असल्यामुळें कित्येकदा आपल्या काव्याच्या नादातच ते गुग होऊन जात ! बिचाऱ्या लीलाबाईंना मात्र त्यामुळें गुदमरून गेल्यासारखे होई.

माधवरावाच्या आणि लीलाबाईंच्या आवडीनिवडी फारच भिन्न असत. त्यामुळें स्वाभाविकच त्या दोघामध्यें वरचेवर वादविवादाचे प्रसग निर्माण होत.

लीलाबाईसारख्या पदवीधर गृहिणीनें भुताखेताबद्दल एवढी धास्ती मनात बाळगावी याचें मोठें आश्चर्य त्याचें आत्मचरित्र वाचताना वाटतें ! स्त्री कितीहि शिकली तरी अशा बाबतींत तिच्या मनाची वाढ अद्याप झालेली नसते असें म्हणावें लागेल !! कदाचित् लीलाबाईसारख्या स्त्रीच्या मनाच्या हळवेपणाचाहि हा परिणाम असणें शक्य आहे !

माधवरावाच्या स्वभाववैशिष्टयाची नोंद करीत असतानाच लेखिकेनें त्याच्या कितीतरी कवितांच्या रचनाकालातील मोठी सुदर हकीकत दिलेली असून असा पति आपणाला लाभल्याबद्दल धन्योद्गारहि काढलेले आहेत.

लीलाबाईंची भाषा सोपी असून त्याच्या लेखनामागे त्याच्या मनात वसत असलेला एक प्रकारचा जबरदस्त जिव्हाळाहि दिसून येतो. तसेंच अधून मधून स्त्रीसुलभ भावनाचा त्यानीं केलेला आविष्कारहि मनोरम आहे.

• • •

# शांता आपटे

सीनेमा–सम्राज्ञी शाता आपटे यानीं आपल्या "जाऊ मी सिनेमात !" या आत्मचरित्रपर ग्रथात सिनेमा व्यवसायात आलेल्या अनुभवावर मोठें क्रांतिकारक आणि धडसोर विचार प्रकट केले आहेत. आजपर्यंत या सिनेमासृष्टीवर लिहिणारानीं तेथें काम करणाऱ्या अवमानितांचीं दुःखें बोलकीं करून जगासमोर

मांडण्याचा फारसा प्रयत्न केलेला नव्हता. शांता आपटे यांची लेखणी या मुद्दया दु साने ओजस्वी रीतीनें या पुस्तकात वाचा फोडीत आहे. मालकशाहीचा जाचक आणि अन्यायी दण्डक धाब्यावर बसवून या सिनेमासृष्टींतील सम्राज्ञीनें येथें क्रांतीची घोषणा केलेली आहे! शांताबाईंचें हे धैर्य कौतुकास्पद आहे.

शांताबाईंनी सिनेमासृष्टींतल्या प्रत्येक मुद्यावर अशी सडेतोड विचारसरणी मांडलेली आहे. या लेखनाच्या बुडाशी जिव्हाळा आहे, तळमळ आहे. त्यामुळेंच त्यांची भाषा ओघवती असली तरी ती काहींशी तिखट आणि झोंबणारी झाली आहे! स्वत च्या घरगुती जीवनापेक्षा आपल्या व्यवसायाच्या जीवनाचें चित्रण करणारें आत्मचरित्रवजा लेखन या दृष्टीनें मागें आलेल्या सर्व आत्मचरित्रांपेक्षा शांताबाईंच्या या पुस्तकाचें वैशिष्ट्य काहीं वेगळेंच आहे, यात शंका नाहीं

या विविध आत्मचरित्राचें हें स्वरूप लक्षात घेता एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेंत भरते, आणि ती म्हणजे स्त्रियांनीं हाताळलेल्या सर्व वाङ्मय प्रकारामध्यें हा आत्मचरित्राचाच भाग विशेष समृद्ध आहे ही होय ह्या वाङ्मयप्रकारात त्यांनीं आपलें अत करण विशेष आपुलकीनें व जिव्हाळ्यानें प्रकट केलेलें आहे. त्यामुळें त्यास एक प्रकारचा जिवंतपणा आलेला आहे.

या निरनिराळ्या आत्मचरित्राच्यामधून हिंदु सस्कृतीच्या घराघरातून वावरणाऱ्या सुसस्कृत घराण्याचा जसा इतिहास आलेला आहे तसाच त्या देशात हीं घराणीं जगलीं आहेत व जगत आहेत त्या भारत देशाचेंहि वास्तवचित्र काहीं प्रमाणात का होईना येथें पहावयास सापडतें त्याचप्रमाणें या सर्व स्मृतिचित्रातून वावरणाऱ्या व्यक्तींनीं भारत देशाच्या जडणघडणीच्या कारागिरींतून त्यास आज आलेलें वैभव प्राप्त करण्यासहि हातभार लावलेला आहे असें दिसून येईल ह्या लेखनातून आणखी एक प्रभावानें प्रकट झालेला गुण म्हणजे प्रीतिरसानीं न्हाऊन निघालेली माणुसकी ही होय शिवाय गेल्या शंभराऊणशें वर्षांतील स्त्री जीवनात घडत आलेला बदल या लेखनातून प्रामुख्यानें प्रकट झाला आहे हें लक्षात घेण्या जोगें व महत्त्वाचें असें आणखी निराळेंच आहे

स्त्रियांच्या या आत्मचरित्रलेखनात प्रामुख्यानें घरगुती जीवनाचा सुदर चित्रपट सत्यस्वरूपात अवतीर्ण झालेला आहे. त्यात कामापुरतें बाहेरचें जीवन आलें आहे. कमलाबाई देशपांडे किंवा शांता आपटे यांचें लेखन याला अपवाद ठरेल कारण त्यांच्या जीवनाची दिशाच इतर लेखिकांपेक्षा निराळी आहे. तरीपण त्यांच्या लेखनातहि स्त्रीस्वभावाला धरून जो जो आविष्कार झालेला आहे त्याची सर इतर प्रसग लेखनास आलेली नाहीं!

श्री तात्यासाहेब केळकर (जीवनयात्रा), माडखोलकर (दोन तपें), अण्णा साहेब कर्वे (आत्मवृत्त), मामा वरेरकर (माझा नाट्यसंसार) इत्यादि लेखकांनीं जीं आत्मचरित्रें लिहिलीं आहेत तीं प्रामुख्यानें त्यांच्या व्यवसायाला धरूनच

आहेत असें दिसतें. त्यात कारणापुरताच घरगुती भाग आलेला असून त्याचा मुख्य भर घराबाहेरच्या त्यांच्या जीवनावरच अधिक आहे. त्यात सामाजिक जीवनाचा इतिहास आलेला नसून त्यांच्या वैयक्तिक कार्यक्षेत्राचाहि इतिहास आलेला आहे.

त्यामुळें त्यांच्या या लेखनास एक प्रकारचें वैयक्तिक स्वरूप प्राप्त झालें आहे ! पण स्त्रियांच्या या लेखनाचें तसें नाहीं. स्वतःबरोबरच त्यांना सामाजिक जीवनाचींहि मूल्यें लक्षात घेऊन जगावें लागलें आहे. त्यामुळें त्यांच्या या प्रकारच्या लेखनाला विशालता प्राप्त झालेली आहे.

भाषेच्या दृष्टीनें या आत्मचरित्राकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं, या लेखिकांची भाषा अतिशय ओघवती, घरगुती सहजसुलभ आणि चटकदार झालेली आहे. Charles M. Schwabs यानीं म्हटल्याप्रमाणें या मनोरम भाषाशैलीमुळे प्रकट झालेले व त्या त्या लेखिकेनें आविष्कृत केलेलें व्यक्तिमत्त्व हें " Personality is to a man, what perfume is to a flower ' अशा प्रकारचें नितांत सुंदर आहे. या लेखिकांच्या भाषासौंदर्याचा एक वैशिष्टयपूर्ण नमुना पहावयाचा असेल तर रमाबाई रानडे यानीं आपल्या पतीविषयीं " स्वतः " असा केलेला उल्लेख, लक्ष्मीबाई टिळकानीं श्री टिळकांना " टिळक " म्हणून मारलेली हाक, आनंदीबाई कर्व्यांनीं अण्णासाहेब कर्व्यांचा " कर्वे " असा केलेला नामनिर्देश, कमलाबाई देशपांडे यांचें " स्वप्नदर्शन " हा काव्यात्मक आविष्कार आणि लीलाबाई पटवर्धनानीं सरळ " माधवराव " असा नावानेंच केलेला माधव ज्यूलियनाचा उल्लेख लक्षात घ्यावा लागेल. खरोखरच हा भाग त्या दृष्टीनें अतिशय चित्ताकर्षक झालेला आहे. कालाच्या ओघाबरोबरच स्त्रियांच्या मनाचा झालेला विकासहि या शब्दानीं सूचित केलेला आहे. अशा वेळीं जिवंत वाङ्मय हें एखाद्या झुंबरातील लोलकासारखें शुद्ध असतें आणि त्यामधून विविध रंगाच्या छटामधून आयुष्याचें जिवंत प्रतिबिंब दृष्टीस पडतें असें म्हटलें, तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं याची खात्री पटते.

स्त्रियानीं हाताळलेला हा लेखनप्रकार निदान एवढ्यापुरता तरी, पुरुषापेक्षा काकणभर का होईना सरस आहे, असें मागें पाहिलेल्या त्यांच्या अंतरंगावरून म्हणावयास हरकत नाहीं. स्त्रीच्या लेखणीनें तिच्या भावनांचा केलेला हा आत्माविष्कार वैशिष्ट्यपूर्ण तसाच अभिमानास्पदहि झालेला आहे ! लक्ष्मीबाई टिळकांना " साहित्यलक्ष्मी " होण्याचा मान त्यांच्या " स्मृतिचित्रा "नींच मिळवून दिलेला आहे. मराठी सारस्वतावर एक अभिनव लेणें चढवून स्त्रियानीं आपलें स्थान येथें वैशिष्टयपूर्ण राखलें आहे, यात शंका नाहीं. जिवंत वाङ्मय निर्माण करावयास लागणारें सर्व प्रकारचें मानसिक स्वातंत्र्य स्त्रियानीं हा कलाप्रकार हाताळताना उपभोगलेलें असल्यामुळें त्यांच्या या कलाकृतींना 'अक्षर वाङ्मयाचें' स्वरूप प्राप्त झालेलें आहे ! वास्तव लेखनाचा एक नमुनेदार आदर्श म्हणून या

आत्मचरित्राकडे अभिमानानें बोट दाखविता येईल इतकें हें लेखन सर्व बाजूंनीं सरस झालेलें आहे यात शंका नाहीं.

• • •

# व्यक्तिरेखा–स्वभावचित्रें–शब्दचित्रें

एखाद्या व्यक्तीचें शब्दांच्या सहाय्यानें उठावदार चित्र रेखाटणें किंवा त्या व्यक्तीच्या स्वभावाला धरून तिला साजिवत करणारें लेखन लिहिणें ही गोष्ट काहींशी अवघड आहे. कारण स्वभावलेखनाची ही कला आत्मसात करावयाची म्हणजे त्या विशिष्ट व्यक्तीचा विशेष अभ्यास करून लहान लहान बारकाव्याच्या सह व ठळक गुणविशेषासह त्या व्यक्तीस साकार करावयाची कला हाताळावयाची. ही कला ललित लेखन करणारांनीं संपादन केलेली असते व तिचा वापर कथा कादंबऱ्यासाठीं त्यांनीं केलेलाहि असतो.

परंतु काहीं लेखक जेव्हा केवळ या कलेच्या आधारावर व्यक्तिरेखांचें, स्वभावरेखांचें वा शब्द चित्रांचेंच तेवढे लेखन करतात, तेव्हा त्यांच्या लेखनास वाङ्मयात एक वेगळें स्थान प्राप्त होतें. हा एक स्वतंत्र असा–लेखन प्रकार म्हणून ओळखला जातो.

ह्या प्रकारच्या लेखनासाठीं सूक्ष्म निरीक्षणाची व मानसशास्त्राच्या अभ्या साची विशेष गरज असते. कारण जें शब्दचित्र लिहावयाचें अगर व्यक्तिरेखा निर्माण करावयाची ती एवढी सरस व्हावी लागते की, तिचा वाचताक्षणीं वाचकाला साक्षात्कार व्हावा, तिचें दर्शन घडावें.

चरित्राप्रमाणेंच कथा, कादंबरी किंवा नाटक यात येणारें स्वभावचित्र त्या व्यक्तीचें सर्वांगीण दर्शन घडविणारें असतें. कथा, नाटक किंवा कादंबरी हा एक मानवी जीवनाचा चित्रपट असतो. अनेक प्रकारचा मनुष्यस्वभाव येथें एकत्र होउन ठळकपणें एकाच व्यक्तीच्या द्वारें आविष्कृत झालेला असतो. त्यासाठीं पुष्कळदा आपल्या पहाण्यातील व्यक्ति नजरेसमोर ठेवून व तिच्या गुणावगुणाना अनुलक्षून तिचें नजरेंत भरणारें वैशिष्ट्य दाखविण्यासाठीं लेखक कल्पनाशक्तीचाहि वापर करीत असतो. स्वभावचित्रालाहि हीच गोष्ट लागू पडते. मात्र मागें म्हटल्याप्रमाणें स्वभावचित्र हें त्या व्यक्तीचें सर्वांगीण दर्शन घडविणारें नसतें, तर विशिष्ट गुणच ठळकपणें दिग्दर्शित करणारें असतें. इतर लेखनप्रकारातून प्रसंगाप्रसंगामधून व्यक्तीचा स्वभाव दाखविलेला असतो, तर स्वभावचित्रात एखाद्या ठळक गुणाच्या अनुषंगानें प्रसंगाचा वापर थोडाफार केलेला असतो, इतकेंच. स्वभावचित्रात ती विशिष्ट व्यक्ति आणि तिचीं ठळक स्वभाव वैशिष्ट्यें

यानाच प्राधान्य असतें व त्या मानानें प्रसंग आणि वातावरण हीं दुय्यम स्थानीं आलेलीं असतात.

श्री. दिवेकरांनीं लिहिलेलीं स्वभावचित्रें प्रत्यक्ष व्यक्तिपरिचयाला व त्याच्या स्वतंत्र दृष्टिकोणाला महत्त्व देऊन लिहिलीं गेलीं आहेत. श्री. घाटे याच्या "काहीं म्हातारे आणि एक म्हातारा" मधील स्वभावचित्रें त्या त्या व्यक्तींच्या सहवासात असताना त्याना आलेल्या अनुभवाच्या छटामधून प्रकट झालेलीं आहेत. श्री. माडखोलकराच्या "माझे काहीं आवडते लेखक" या पुस्तकातील स्वभावचित्रें त्यानीं त्या व्यक्तींच्या वाङ्मयीन परिचयावरून लिहिलीं आहेत. म्हणजे स्वभावचित्रातहि सामान्यतः दोन भाग पाडता येतील. पहिला भाग म्हणजे प्रत्यक्ष परिचयातील व्यक्तींच्या व्यक्तिरेखा आणि दुसरा म्हणजे अवातर माहिती मिळवून लिहिलेल्या व्यक्तिरेखा. मात्र या दोन्ही भागामधूनहि लेखक त्या विशिष्ट व्यक्तींचें स्वभावलेखन आपल्या स्वतःच्या दृष्टीनें दिग्दर्शित करीत असतो हें मुख्यतः ध्यानात घ्यावयास हवें.

स्वभावचित्राचें लेखन करणाऱ्या लेखकाचें अनुभवाचें क्षेत्र व्यापक असावें लागतें, ही गोष्ट मान्य केल्यानतर स्त्रियानीं लिहिलेलीं स्वभावचित्रें त्या दृष्टीनें पडताळून पहाण्यासारखीं आहेत. "हसरा निर्माल्य आणि चिमण्या", "भिंतिणीचीं बोरें" "व्यक्ति तितक्या प्रकृति" आणि "विद्युत्‌रेखा" हीं अनुक्रमें डॉ. कमलाबाई देशपाडे, शकुंतला परांजपे, प्रिं. सुलभा पाणदीकर आणि सौ. मालती दाडेकर यानीं लिहिलेलीं स्वभावचित्राचीं पुस्तकें आहेत. अपवाद म्हणून काहीं चारदोन स्वभावचित्रें सोडून दिलीं, तर या पुस्तकामधील बहुतेक सारीं स्वभावचित्रें स्त्रियाचींच आहेत, आणि त्यापैकीं बरीचशीं अगदीं निकटच्या परिचिताचींच आहेत

सामान्यतः सर्व सामान्य स्त्रियाचें रोजचें जीवन हें प्रामुख्यानें घरामध्येंच जात असतें. म्हणजे तिचें क्षेत्र अगदीं मर्यादित असते, हे उघड आहे. त्यामुळें स्त्रीचा ओढा स्त्रीजीवनाकडे व मुलाकडे विशेष असणे अगदीं स्वाभाविक आहे. घरचीं माणसें, आतेष्ट, इष्टमित्र, पैपाहुणे इत्यादींनींच स्त्रीचें मर्यादित जग व्यापून गेलेलें असतें. त्यापैकीं बहुसख्य स्त्रियाच तिच्या अगदीं निकटच्या सहवासात आलेल्या असतात आणि त्यामुळेंच अशा पुस्तकामधून स्त्रियानीं लिहिलेलीं स्वभावचित्रेंहि स्त्रियाचींच अशीं बहुसख्य आहेत. आपल्या ओळखीच्या जगामधूनच स्त्रियानीं हीं स्वभावचित्रे वेंचलेलीं असल्यामुळें तीं विशेष वास्तव झालेलीं आहेत. अर्थात् त्यात कल्पनेला अजिबातच वाव नाहीं असें मात्र नाहीं. तथापि कल्पितापेक्षा वस्तुस्थिति रगविण्याकडेच स्त्रीच्या मनाचा कल विशेष झुकलेला असतो. त्यामुळें कल्पनेच्या बळावर स्त्रीनें कितीहि लेखन करावयाचें म्हटलें तरी तिचा स्वभाव हा वस्तुनिष्ठ अधिक असतो. व्यावहारिक जीवनातून ती फिरत असते व

म्हणूनच त्याचा परिणाम तिच्या लेखणीवर झाल्यावाचून रहात नाहीं. त्यामुळें एखादा दुसरा अपवाद सोडला तर स्त्रियांनीं लिहिलेल्या या लेखन प्रकारात त्यांचें म्हणून खास असें वैशिष्ट्य दिसून येतें. तसेंच पुरुषांचें अनुकरण न करताना त्यांनीं येथें स्त्री स्वभावाला धरूनच विचारहि केलेला असतो, हें या संदर्भात अवश्य लक्षात घेण्याजोगे आहे.

• • •

## डॉ. कमलाबाई देशपांडे

" दसरा निर्माल्य आणि चिमण्या " या आपल्या पुस्तकात डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं उतारवयातील नऊ स्त्रियांचीं आणि पाच ते पधरा या वयोमर्यादेच्या दरम्यान असलेल्या, शालेय जीवन अनुभवणाऱ्या तेरा छोट्या मंडळींचीं स्वभावचित्रें रेखाटलेलीं आहेत. यांपैकीं बहुतेक सारीं स्वभावचित्रें लेखिकेच्या अगदीं जवळच्या मंडळींपैकीं असावीत असें त्यांच्या अंतरंगावरून म्हणावयास हरकत नाहीं. आपल्या नात्यातील प्रौढ स्त्रियांचीं व हाताखालच्या विद्यार्थिनींचीं स्वभावचित्रें कमलाबाईंनीं येथें मोठ्या कुशलतेनें लिहिलेलीं आहेत.

कमलाबाईंनीं हीं स्वभावचित्रें अतिशय जिव्हाळ्यानें लिहिलीं असून हाच या पुस्तकाचा प्रमुख विशेष म्हणता येईल. कमलाबाईंची भाषा साधी, सोपी व ओघवती असून विचाराची मांडणीहि सुटसुटीत आहे. अधून मधून सर्वत्र विनोदालाहि योग्य तो वाव मिळालेला आहे व्यक्तींच्या वर्णनाबरोबरच तिच्या बोलण्या-चालण्यामधूनहि प्रकट होणारा तिचा स्वभाव येथें लेखिकेनें सहृदयतेने दर्शविलेला आहे. मात्र हीं सर्व स्वभावचित्रें मध्यमवर्गीतीलच आहेत असें त्यांच्या मुखवट्यावरून दिसून येतें. अतिशय मोकळ्या आणि प्रसन्न वातावरणामधून या साऱ्या स्वभावचित्रांना लेखिकेनें रंगविलेलें असल्यामुळें तीं वाचीत असताना अशीं माणसें फक्त मध्यमवर्गातच आढळू शकतात कीं काय? किंवा एखाद्या ठराविक क्षेत्रातील लोकांविषयींच अशा प्रकारचें लेखन करता येतें कीं काय? अशी शंका मनात डोकावल्याविना रहात नाहीं. त्यामुळ एकांगीपणाचा दोष या स्वभावचित्राच्या वाट्याला आला, तर तो कमलाबाईंच्या लेखनाचा दोष होऊ शकत नाहीं. दोषच म्हणावयाचा झाला तर तो त्यांच्या अनुभवाच्या आणि अवलोकनाच्या मर्यादेचा म्हणता येईल.

लहान मुलें म्हणजे देवाघरचीं फुलें असें समजतात. देवाघरच्या बागेंतील हीं टवटवीत दिसणारीं, आपला सुगंध सगळीकडे पसरून इतरांना समाधान देणारीं, हसरीं, खोडकर, परंतु अंत:करणानें निरागस, निष्पाप असलेलीं अशीं चालतीं

बोलतीं फुलें कमलाबाईंनीं रसिकांच्या हवालीं केलीं आहेत. तीं फारच आकर्षक झालीं आहेत, कमलाबाईंच्या लेखणीनें त्याना अमर केलें आहे.

अशा प्रकारच्या मनुष्यस्वभावाच्या विविध छटा दर्शविणारीं कितीतरी हृदयंगम शब्दचित्रें या पुस्तकात आहेत. त्यापैकीं प्रत्येकाची गोडी निराळी, प्रत्येकाचा थाट निराळा, प्रत्येकाची धाटणीहि निराळी. मात्र माळीण किंवा मोलकरीण असा एखादाच अपवाद सोडला तर या शब्दचित्राचा मुखवटा एकजात शहरी थाटाचा दिसेल. मागें सागितल्याप्रमाणें येथून तेथून सारें मध्यमवर्गाचें वातावरण येथें आढळून येईल. त्याचप्रमाणें स्त्रीच्या लेखणीचें खास वैशिष्ट्यहि ‘ लाडु आत्याबाई ’ व ‘ भीमकाका ’ मधील स्त्रियाच्या भोळ्याभाबड्या स्वभाव-लेखनावरून दिसून येईल.

● ● ●

# सौ. मालती दांडेकर

“ विद्युत्‌रेखा ” हें सौ. मालतीबाई दाडेकर याचें अशाच प्रकारचें पुस्तक आहे. यात त्यानीं एकूण पचवीस तरुण स्त्रियाचीं स्वभावचित्रें रेखाटलेलीं आहेत. एखादें ठळक स्वभावचित्र रंगविण्याऐवजीं येथें त्यानीं फक्त त्या त्या व्यक्तीचा थोडक्यात स्वभावविशेष दाखविलेला आहे. एखादा ठराविक प्रसंग किंवा कल्पना घेऊन तेवढ्यावरच त्या व्यक्तीचा स्वभाव दिग्दर्शित करण्यापेक्षा त्या व्यक्तीच्या रोजच्या जीवनक्रमातील हालचालीमधून व बोलण्यामधून तो व्यक्त झाला तर अधिक हृद्य होतो. परतु थोड्या जागेंत अनेक व्यक्तींचा नामनिर्देश करण्याची इच्छा लेखिकेला अनिवार झाल्यानें या स्वभावरेखाना काहींसें त्रोटक स्वरूप आलेलें आहे.

मालतीबाईंना स्त्री-जीवनाबद्दल अतिशय जिव्हाळा वाटतो. हें पुस्तक लिहिताना त्यानीं आपली ही भूमिका पुढील शब्दात व्यक्त केलेली आहे—“सारी सृष्टि अधारलेली आहे व मेघमालानीं आकाश काळें निळें झालें आहे. अशा वेळीं लखलखीत विद्युत्‌रेखा काळ्या ढगातून प्रकटते, काजळलेली सृष्टि तिच्या तेजानें क्षणभर उजळते, डोळे दिपतात—लगेच ती एखाद्या देवतेप्रमाणें गुप्त होते, पण पहाणाऱ्याचे मनावर ती उज्ज्वलरेखा कायमची कोरली जाते. ”

या पुस्तकाला प्रस्ताव लिहिताना साहित्यसम्राट कै. तात्यासाहेब केळकर यानी म्हटलें आहे—“ हीं इतकीं निरनिराळीं वर्णनें करता येण्याइतकें स्त्री-स्वभावाचे नमुने रगविण्याच्या लेखिकेच्या निरीक्षण शक्तीची म्हणजे स्वभावा-स्वभावातील भेद सूक्ष्मपणें, मार्मिकपणें, ध्यानात घेऊन प्रगट करण्याची, कला

खरोखर अभिनदनीय वाटते. पुस्तकाची भाषा ही प्रसादयुक्त, ठसठशीत व उचित आहे. ''

• • •

## शकुंतला परांजपे

शकुतला पराजपे यानीं आपल्या " भिल्लिणीचीं बोरें " या पुस्तकात अनेक स्वभावचित्रें रेखाटलेलीं आहेत. मनात येईल तें अतिशय मोकळ्या मनानें लिहिणें हें शकुतलाबाईंचें नेहमींचें वैशिष्ट्य याहि पुस्तकात आढळतें आपल्या वडिलाचें त्यानीं " हरवलेली छत्री " आणि "घोडा गाडी " या दोन लेखामधून रेखाटलेलें स्वभावचित्र खरोखरच फार सुदर आहे.

" कोंकणातली आजी "* हें स्वभावचित्र चित्रित करताना तर शकुतला बाईंची लेखणी एखाद्या अल्लड तरुणीसारखी नटलेली दिसून येते. आजीच्या आयुष्यातील वाटेल त्या गोष्टी त्यानीं येथें स्पष्टपणें सागून टाकल्या आहेत. त्याच्या आजीचें हें शब्दचित्र फारच हृदयगम आहे यात शका नाहीं आपल्या आजीचें एक वैशिष्ट्य सागताना त्या म्हणतात—" .. आम्ही कोंकणात गेलों कीं प्रत्येकवेळीं आजी एकदा " रघुच्या " जन्माचें पुराण सागे " रघू " म्हणजे आप्पा. ते झाले ते पायाळू जन्मले. मूल रडलें नाहीं, हललें नाहीं, म्हणून मेलें असें वाटून सुइणीनें वारेसकट त्याला सुपात ठेवून तीं आजीनें करायला लागली. आजीनें मुलाची विचारपूस केली सुईण म्हणाली " मुलगा आहे गो चागला. सुरेख, पण मेलेला गो मेलेला. " पण आजी त्याला मरू थोडाच देणार होती. " मेला कशान्! कानपटात देस चागली आणि जाळ लाव त्या वारेला. गार पाणी ओत डोस्कीवर ! " आणि खरोखरच तसें करताच मुलग्यानें भोंकाड पसरलें ..

• • •

## प्रिं. सुलभा पाणंदीकर

" व्यक्ति तितक्या प्रकृति " ( १९५८ ) या आपल्या पुस्तकात सुलभा पाणदीकरानीं एकूण तेवीस शब्दचित्रें दिलीं असून त्यात लिखाणकाल सतरा वर्षांचा असल्याचें प्रस्तावात सागितलेलें आहे त्याचप्रमाणें त्यानीं या सर्व लेखनात भरपूर विविधता आणण्याचाहि यशस्वी प्रयत्न केलेला आहे

---

* विविधवृत्त, दिवाळी अक १९४८

सर्व थरातील मानवाच्या स्वभावविशेषाबरोबरच पशुपक्ष्याचे, झाडाचे व रहात्या घराचेहि स्वभावविशेष लेखिकेने येथें सारख्याच आत्मीयतेनें चितारलेले आहेत हें विशेष होय.

'शाताराम' हा सुलभाबाईंच्या घरचा कामाचा गडी. त्याला आपल्या मोरे घराण्याचा भारी अभिमान. तसेंच 'रामा' या शब्दाचाहि भारी राग. तर अशा या गड्याबद्दल आपुलकीनें लिहिताना लेखिका सागते.—

"त्याच सगळ काम कलापूर्ण आणि अत्यत हौसेन केलेल असत. आणि त्याच्या जोडीला त्याची बालिश वृत्ति असते स्वयपाक घर, जेवण, घरातल्या बाटल्या, भाडीं, कपाटातल्या कपबशा नवीन नवीन धर्तीन लावील, आणि तें काम करता करता पोरपणान भाडयाकडे बोलेल. एखाद्या मोठ्या भाडयास उद्देशून म्हणेल, 'काय रे जाडया, तू इथ कशाला आलास? चल, तुझी जागा खालीं तिथ.' 'या बाई, वर या अशा' अस म्हणून उच अशी बाटली फळी वर ठेवील...

'**पुण्याचा तांगेवाला**' देखील लेखिकेनें मोठ्या गमतीनें चित्रित केलेला आहे. भरपूर वेळ जवळ असतो व करमणूकहि बरीचशी होते या कल्पनेनें टाग्यात बसणाऱ्या सुलभाबाई टागेवाल्याकडून अनेक प्रकारच्या ससारातील गमतीजमतीहि ऐकायला मिळतात असें मोठ्या गमतीनें व सोदाहरण सागतात.

० ० ०

स्त्रियानीं लिहिलेल्या स्वभावचित्राचे स्वरूप हें असे आहे. आत्मचरित्रा इतक्याच ह्याहि लेखनप्रकारात स्त्रियाची लेखणी यशस्वी झालेली आहे. पुष्कळ दिवस अनुभविलेले, डोळ्यानीं पाहिलेलें, बुद्धीनें आत्मसात् केलेलें आणि त्यामुळें जिव्हाळ्यानें लिहून चित्ताकर्षक बनलेलें असें या वाङ्मयाचें एकदर स्वरूप आहे. जिव्हाळ्याबरोबरच सहानुभूति देखील या स्वभावचित्राना लाभलेली आहे.

या स्त्रियाप्रमाणेंच काहीं पुरुषानींहि या प्रातात लेखन केलेलें आहे. श्री. विठ्ठलराव घाटे, श्री. व्यकटेश माडगूळकर, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. रघुवीर सामत इत्यादींनीं अनेक स्वभावचित्रें रेखाटलेलीं आहेत. या लेखिका आणि हे लेखक याच्यात उघड असा दिसणारा पहिला फरक म्हणजे स्त्रियानीं स्त्रियाचींच स्वभावचित्रें प्रामुख्यानें रेखाटलीं आहेत आणि पुरुषाचा कल पुरुषाचींच स्वभावचित्रें रेखाटण्याकडे प्रामुख्यानें झुकलेला आहे हा होय.

स्वभावचित्राला विषय होणाऱ्या व्यक्तींचा सहवास लेखकाला जितका घडेल तितके त्याचे स्वभावविशेष टिपून घेणें त्याला सोपें जातें. कारण त्या

सहवासाच्या बळावरच अमुक एक व्यक्ति अविस्मरणीय म्हणून त्याच्या नजरेंत भरत असते. आणि या बाबतींत प्रत्येकाचें मत भिन्न असणें स्वाभाविक आहे. पुरुष हा पुरुषाच्याच सहवासात अधिक काळ घालवू शकतो व तितक्या प्रमाणात स्त्रीचा सहवास त्यास घडणें शक्य नसतें. घराबाहेरचेंच जीवन पुरुषाला अधिक जगावें लागत असल्यानें हा फरक होणें स्वाभाविक आहे. याच्या अगदीं उलट स्थिति स्त्रीची होते. याबद्दल लिहिताना " विद्युत्‌रेखें "त सौ. मालती दांडेकर म्हणतात, " अविस्मरणीय व्यक्ति फक्त स्त्रियाच असतात असें कसें होईल ? पण स्त्रीजीवनाचीच व्यापक सृष्टि आजवर मी पहात आलें म्हणून या सर्व रेखा मीं त्यातून निवडल्या आहेत. " आणि मला वाटतें कीं, प्रत्येकाच्या बाबतींत हेंच उत्तर मान्य करावयास हरकत नसावी.

वास्तविक लेखनकौशल्याच्या दृष्टीनें हीं सारींच पुस्तकें एकमेकाना हार जाणार नाहींत इतकीं सरस आहेत. पण या लेखनप्रकाराला मुळातच लागणारी अनुभवाची बैठक भिन्न असल्यानें उघड उघड फरक पडलेला दिसून येत आहे. स्त्रियाच्या बहुतेक सर्व स्वभावचित्रामधून घरगुती वातावरण फारच चागलें आलेलें आहे. जुन्या चालीरीतींचा भरपूर सगम येथें झालेला दिसून येईल. स्त्री आणि पुरुष याच्यावरील भिन्न भिन्न जबाबदाऱ्या आणि निसर्गानें त्याच्यावर सोंपविलेली कामगिरी याच्यामधील परस्परातील भिन्नता या स्त्री पुरुषाच्या लेखनातहि आटळून येत आहे. आणि त्याचें प्रमुख कारण म्हणजे प्रत्येकाची अनुभवाची मर्यादित कक्षा हें होय.

स्त्रियानीं अशा प्रकारचें हें वैशिष्ट्यपूर्ण व सुदर वाङ्मय निर्माण करून मराठीची साहित्यसेवा खरोखरच फार चागली केलेली आहे. तसें झालें नसतें, तर स्त्री-जीवनाची एवढी ही सुरेख बाजू विनाकारण अधारात राहिली असती व मराठी साहित्याची हानी झाली असती, असें म्हणावयास हरकत नाहीं. स्त्रियाचा विशिष्ट स्वभाव, मनाचा कल, चालीरीति आणि घरगुती वातावरण इत्यादि या सर्वांची पारख पुरुषापेक्षा केंव्हाहि स्त्रियानाच अधिक असणें स्वाभाविक आहे. त्यामुळेंच स्त्रियाना पुरुषाच्या व्यक्तिरेखा काहीं थोडे अपवाद सोडले, तर म्हणाव्या तेवढ्या विशेषत्वानें लिहिता आलेल्या नाहींत.

• • •

## प्रवास वर्णन

आपल्या नेहमींच्या वास्तव्याची जागा सोडून माणूस परक्या ठिकाणीं प्रवासाला गेला म्हणजे त्या नव्या ठिकाणची हकीकत वर्णन करून घरच्या लोकाना व इष्टमित्राना कळवीत असतो, किंवा ती निदान लिहून तरी काढीत असतो.

नागलोकीं उड्डाण " + या लेखमालेंतून आपल्या परदेशाच्या प्रवासाचें वर्णन केलेलें आहे

लंडनमधील जागेची टंचाई वर्णन करताना एका गृहिणीनें आपलें लहानगें बाळ सूट-केसमध्यें झोंपवल्याची हकीकत लेखिकेनें फार मजेनें वर्णन केलेली आहे त्याचप्रमाणें निरनिराळ्या विमानतळावरील त्यानीं दिलेली हकीकतहि मनोरजक आहे

कॅनेडियन समाजातील वाखाणण्यासारख्या चालीरीतींचा कृष्णाबाईनीं केलेला उल्लेखहि मोठा अनुकरणीय आहे मॉंट्रियालमधील प्रेक्षणीय स्थळें आणि सभेचें कामकाज यांचा उल्लेखहि लेखिकेनें सहृदयतेनें केलेला दिसून येतो

हिंदी स्त्रीजीवनाबद्दल उत्सुकतेनें प्रश्न विचारणाऱ्या युरोपियन महिलांना समाधानकारक उत्तरें देताना लेखिकेनें त्यांच्या गृहजीवनाचेंहि मोठें मार्मिक विवेचन केलेलें आहे

कृष्णाबाईचें हें प्रवासवर्णन सुदर झालेलें आहे त्यांची वर्णनशैली व भाषा शैली आकर्षक असून त्यानीं मोठ्या चिकित्सेनें सर्व विवेचन केलेलें आहे अधून मधून त्यानीं केलेला स्त्रीसुलभ असा भावनाविष्कारहि चित्ताकर्षक आहे

'गृहलक्ष्मी 'च्या अंकांतून **रमाबाई पराजपे** यानीं आपल्या काश्मीरच्या प्रवासाची हकीकत दिलेली आहे त्यांची वर्णनशैली फारशी आकर्षक नसल्यामुळें हें प्रवासवृत्त तितकेसें चित्तवेधक झालेलें नाहीं तथापि त्यानीं काश्मीरच्या प्रवासा तील स्थळाची व स्थलवैशिष्टयाची दिलेली माहिती उद्बोधक आहे उदाहरण म्हणून काश्मीरच्या वैशिष्टयाची त्यानीं दिलेली पुढील माहिती पहाता येईल—

" येथल्या शालीवर केलेलें नक्षीकाम हातानें केलेलें सर्व काम फार अप्रतीम असतें शालीच्या गरम कापडाला " पश्मीना " म्हणतात पश्मीना कमीजास्त दर्जाचा व किंमतीचा असतो उंची पश्मीन्यास " तापता " असें नाव आहे तो पचवीस रुपये वार मिळतो हें सर्व कापड हातमागावरीच असतें काम फार मेहनतीचें व सुदर असतें "

काश्मीरकडील स्त्रियांचें सामाजिक जीवन रगविताना लेखिकेनें त्यांच्या कडून मिळविलेलें अस्वच्छ रहाणीचें कारण मोठें मर्मभेदक असून काळजाला हात घालणारें आहे " बाईजी, आम्ही सर्व जर अशा स्वच्छ रहावयास लागलों तर आम्हाला सर्व लोक ही वाईट चालीची आहे असें समजून आम्हाला घरातून बाहेर घालवितील व नवरा खूप मारील ! " किती विचित्र हें कारण ! आणि माणुसकीचा संदेश जगाला पोंचविणाऱ्या भारताच्या नदनवनातील स्त्रीहृदयाची केवढी ही कुचबणा !

---

+ स्त्री, मे १९४७ ते ऑक्टोबर १९४७.

" त्रिवेंद्रमची सफर " हें कमला फडके यांचे प्रवासवर्णन त्यांच्या इतर कोणत्याहि प्रकारच्या लेखनापेक्षा चित्ताकर्षक झालेलें आहे. हें पुस्तक वाचीत असताना एखादी चित्तवेधक कादंबरी वाचल्याचें समाधान मिळतें. प्रा. फडक्यांच्या " कमलपत्रा "ची आठवण यावेळीं झाल्याविना रहात नाहीं. तसेंच तात्यासाहेब केळकरांच्या " सिमला वर्णना "ची किंवा काणेकरांच्या " धुक्यांतून लाल तान्याकडे " या प्रवास वर्णनाचीहि स्मृति या पुस्तकाच्या वेळीं नकळत व्हावयास लागते, इतकें हें पुस्तक मनोवेधक व सर्वांग परिपूर्ण झालेलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

मदुरेच्या 'मीनाक्षी'च्या देवालयातील मीनाक्षीच्या मूर्तीला तीन स्तन का आहेत याची कमलाबाईंनीं चौकस वृत्तीनें मिळवून दिलेली पौराणिक माहिती मोठी चित्तवेधक आहे. त्याचप्रमाणें उत्तर गोपुराकडील प्रवेश द्वारातील संगीतमय खांबाची माहितीहि आकर्षक आहे.

निसर्गाची कितीतरी सुंदर चित्रें या पुस्तकात लेखिकेनें गद्दयतेनें वर्णन केलेलीं आहेत. तसेंच प्रसिद्ध नृत्यकलाकार उदय शंकर यांच्या नृत्याच्या शिकवणुकीची व प्रत्यक्ष नृत्याचीं चित्तवेधक वर्णनेंहि येथें दिलेलीं आहेत.

प्रत्येक स्थळ, देखावा किंवा व्यक्ति जशीच्या तशी डोळ्यांसमोर उभी करण्याचें सामर्थ्य कमलाबाईंच्या लेखणींनें पानापानावर प्रकट केलेलें आहे. त्याचें सूक्ष्म निरीक्षण, जिज्ञासु वृत्ति आणि मधून मधून त्यांनीं केलेला स्वतःच्या वेष भूषेचा उल्लेख मनोहर आहे. अखेरीस एक स्त्री या नात्यानें त्यांनीं काढलेले पुढील उद्गार या पुस्तकाच्या या वैशिष्ट्यात भर घालणारे व वैशिष्ट्यपूर्णहि आहेतः—

" आम्ही ता. २८ डिसेंबर रोजीं रात्रीं अकराला घरीं पोंचलों. तेव्हा बेबी रोहिणी निजली होती. पण मी तिला मुद्दाम उठवून जवळ घेतलं. माझी कल्पना होती कीं, आम्हाला पाहून तिला आनंद होईल. पण ती अशा कांहीं बावरलेल्या दृष्टीनं आमच्याकडे पाहू लागली कीं, गेल्या दहाबारा दिवसात आम्ही तिच्या दृष्टीस न पडल्यामुळ आम्ही कायमचेच खतम् झालों अस जणू तिनं ठरवल होत व आम्ही पुढें आहोंत हें तिला खरच वाटत नव्हत. पण नंतर चार पाच मिनिटातच तिची नजर पालटली व ती हसून आम्हाला बिलगली. हें पाहताना मला जो आनद झाला तो साऱ्या प्रवासाच्या आनंदाहून जास्त होता."......

कमलाबाईंची प्रवासवृत्त कथन करण्याची ही शैली मोठी अपूर्व आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं मधून मधून रंगविलेले हास्यकारक प्रसंग, संगीत-नृत्यादि कलांतील निष्णात कलावंताचीं वर्णनें, विविध प्रकारचीं आकर्षक व्यक्तिचित्रें आणि

स्वतःच्या व आपल्या अप्पाचा चित्रित केलेला स्वभावविशेष इत्यादि पाहिलें म्हणजे त्यांच्या लेखनशैलीचेंहि वैशिष्ट्य ठळकपणें नजरेंत भरतें.

सोलापूरच्या एक तपस्विनी व विचारवंत समाज कार्यकर्त्या **पंडिता सुमतिबाई शहा** यांनीं मराठींत बरेंचसें लेखन केलेलें नसलें तरी जें थोडें फार लेखन केलें आहे तें मौलिक आहे. त्यांच्या विचारांना आध्यात्माची बैठक आहे. वैचारिक जीवनाची पार्श्वभूमि आहे आणि सुविचारांची संगत आहे. त्यामुळें त्यांचें लेखन एकदम उठून दिसतें. निराळें वाटतें. धार्मिक भावनांनीं निगडित असलें तरीहि तें मोठें सुंदर व आकर्षक असें आढळून येतें.

त्यांच्या 'हृद्गंधा' तील (१९५५) गौरीशंकराचें प्रवासातील वर्णन या संदर्भात अवश्य पहाण्यासारखें आहे.

मुंबईच्या एक प्राध्यापिका, समाजसेविका लेखिका डॉ **चारुशीला गुप्ते** यांनीं लिहिलेलें 'बर्फाच्या दुनियेंत' हें प्रवास वर्णन मोठें वाचनीय आहे. स्वैपाकघरातल्या षड्रसयुक्त साहित्यापासून तों महाविद्यालयातील नवरसयुक्त साहित्यापर्यंत सर्वच विषयात चांगल्या गतीनें वावरणाऱ्या चारुशीलाबाईनीं या प्रवासवर्णनातहि मोठा चांगला रस निर्माण केलेला आहे.

कारण रशियाच्या प्रवासातील अनुभव ज्या शैलीनें चारुशीलाबाईनीं सांगितलेले आहेत ती त्यांची शैली विनोद तर निर्माण करतेच, परंतु ती विशेष काव्यमयहि झालेली आहे. शिवाय स्त्रीजीवनाला शोभेल अशी उपमादृष्टांताची खैरात त्यांनीं अधून मधून केल्यामुळें त्यांच्या लेखनाला मोठें चांगलें आकर्षण प्राप्त झालेलें आहे.

चारुशीलाबाईच्या या प्रवासवर्णनात कुशल लघुनिबंधकाराचे अनेक गुण आहेत, तसेच साहित्य गुणाचा सुगंधहि येथें सर्वत्र दरवळतो आहे. त्यांची दृष्टि येथें चौकसतेनें व रसिकतेनें वावरते आहे. त्यामुळें त्यांचें प्रवासवर्णन वाचतांना तों तो विशिष्ट असा परदेशाचा भाग साइन सगीत नजरेंत भरतो व हेंच या पुस्तकाचें वैशिष्ट्य होय.

*पुरुष मंडळी आठवणी सांगायला लागली म्हणजे बहुतेक विशिष्ट स्थळ* काळातील काहीं ठराविक गोष्टींचाच तेवढा उल्लेख करतात. परंतु याच्या उलट स्त्रियांचेकडून घडतें. त्यांना कित्येक वर्षांपूर्वीच्या बहुतेक सर्व गोष्टी तपशीलावार आठवतात. त्यामुळें त्यांच्या अशा आठवणींच्या वर्णनात स्त्री सुलभ असा नित्य नवा ताजेपणा आढळून येतो

**सौ. विजया जोशी** यांचें "आठवणींचीं कोरीव लेणीं" (१९६०) हें प्रवासवर्णनपर पुस्तक असेंच स्त्री सुलभ भावभावनांचें दर्शन घडविणारें आहे

पुष्कळशा बहारदार व मजेदार आठवणी सांगतांना लेखिकेनें येथें सामान्यांच्या अनुभवाला येणाऱ्या सुनंदु सारखेंहि वर्णन केलेलें आहे. पण त्यात विशेष

मोकळेपणा आहे. स्वाभाविकता आहे. व्यक्तित्वाचा विशेष राखला आहे. उत्साह सर्वत्र कायम ठेवला आहे. आणि मुख्य म्हणजे बाईंच्या स्वभावाला धरून जागोजाग काय सांगू नि काय नको याचा जिव्हाळा कायम राहील हें पाहिलें आहे.

त्यामुळें विजयाबाईंचें हें पुस्तक म्हणजे आठवणींची मोठी सुंदर लेणीं आहेत. लेखनाचा उत्साह, स्मरणशक्तीची कमाल व निरीक्षणाची धमाल हें या पुस्तकाचें वैशिष्ट्य होय.

विजयाबाईंची वर्णनशैली धावतीच पण खोंचक अशी आहे. त्यांना भेटलेल्या व्यक्तींचीं शब्दचित्रें मोठी वाचनीय असून त्यांनीं अधूनमधून वापरलेली बोलभाषाहि उठावदार आहे.

स्त्रियांनीं लिहिलेलीं प्रवासवर्णनें हीं अशा प्रकारचीं आहेत. हा वाङ्मयप्रकार स्त्रियांनीं फारच थोड्या प्रमाणात हाताळलेला दिसून येतो. संसाराची जबाबदारी सांभाळून प्रवास करण्याइतपत म्हणावी तशी फुरसत स्त्रियांना मिळत नसावी ! आणि प्रामुख्यानें त्याच कारणामुळें इतर वाङ्मय प्रकाराप्रमाणें मोठ्या प्रमाणावर स्त्रियांनीं हा वाङ्मयप्रकार हाताळलेला दिसत नसावा.

श्री. काका कालेलकर, तात्यासाहेब केळकर, ना. सी. फडके किंवा अनंत काणेकर इत्यादि लेखकांनीं प्रवास वर्णनपर लेखन पार केलेलें आहे. त्यांचें हें लेखन कलेच्या दृष्टीनेंहि सरस झालेलें आहे. तसेंच हें लेखन करीत असतांना त्यांनीं केलेला कल्पनेचा वापर आणि मिळविलेल्या माहितीची नोंदहि मोठी कौशल्यपूर्ण झालेली आहे. एखादी हृदयंगम कादंबरी वाचावी त्याप्रमाणें हीं प्रवासवर्णनें चित्ताकर्षक झालेलीं आहेत. त्या मानानें एखादा अपवाद सोडला तर स्त्रियांनीं लिहिलेलें हें प्रवास वर्णन अजून थोडें मागें आहे असें दिसून येईल. तथापि हा दोष स्त्रीच्या लेखणीचा नसून तिच्या सामाजिक जीवनाचा आहे असेंच म्हणावें लागेल. घरगुती जीवनाचा भाग मात्र त्यांनीं येथें उत्तम रीतीनें रंगविला आहे; आणि मुख्य म्हणजे जें सांगावयाचें तें विशेष जिव्हाळ्यानें व प्रामाणिकपणानें सांगितलेलें आहे. त्यामुळें स्त्रियांचीं हीं प्रवासवर्णनें वाचनीय झालीं आहेत यांत शंका नाहीं.

• • •

## बालवाङ्मय

आपल्या पुढच्या पिढीला आपल्या घराण्याचे चांगले संस्कार मिळावेत व त्या नव्या पिढीनें सुसंस्कृत होऊन जगापुढें मानानें जावें, ह्या हेतूनें लहान मुलांच्या कानावर चांगलें म्हणून जें असेल तें आवर्जून घालावयाची चाल मराठी मुलुखात पार पार जुनी आहे. लहान मुलांच्या जीवनाला सर्वांगीण रीतीनें स्पर्श करतील

व त्याच्या मनाचा सर्वोत्तम विकास घडवितील अशा गोष्टी तेवढ्यासाठींच वडील-धारी मडळी आपल्या नातवडाना सागत आली आहेत स्वत ऱ्या मनातील गोष्टी रोखीनें न सागताना त्या इतराचे दाखले घेऊन सागितल्या तर बालमनाची चागली पकड घेतील, ह्या भावनेनें वडील मडळींनीं आपल्या लहानग्याना फार पूर्वीपासून कहाण्या सागितलेल्या आहेत. लोककथा ऐकवलेल्या आहेत. दतकथाचे दाखले दिले आहेत. दैवतकथाचे आदर्श त्याचेपुढें ठेवलेले आहेत. अद्‌भुतरसाची खैरात केली आहे. त्यामुळें फार जुन्या काळापासूनच आमचेकडे बालवाङ्मयाची भरघोस अशी निर्मिति होत गेली आहे

अलिकडे इग्रजी व इतर परभाषेंतील वाङ्मयाच्या सहवासामुळें जुन्या काळच्या बालवाङ्मयात आणखी नवीन भर पडत गेली आहे. त्यासाठीं कविता, गोष्ट, परीकथा, गुजगोष्ट, गाणीं, नाट्कली, नाटिका, पत्रें, प्रवासवर्णनें, कादबऱ्या वगैरे अनेक प्रकारचें वाङ्मयीन माध्यम नवीन लेखकानीं स्वीकारलेलें आहे. विशेषत गेल्या पाचपन्नास वर्षात ह्या प्रकारच्या वाङ्मयाची दिवसेंदिवस झपाट्यानें वाढ होत गेली आहे. गेल्या दहा-बारा वर्षात तर हें वाङ्मय सचित्र व चटकदार करण्याकडे मराठी लेखकाच्या मनाचा कल अधिक झुकतो आहे.

ह्या बालवाङ्मयाची जडणघडण ही प्रामुख्यानें बालमानसशास्त्र लक्षात घेऊन होते आहे हें विशेष होय. लहान मुलाना आवडतील अशीं लहान लहान व यमकें साधणारीं वाक्यें, सोपे सोपे वाक्प्रचार, खटकेबाज सवाद, रसानुकूल स्वर रचना इत्यादि वैशिष्ट्ये ह्या वाङ्मय निर्मितीच्या बुडाशीं सामावलेलीं आहेत त्यामुळें सचित्र रीतीनें प्रकट झालेला हा मनोभाव वाचताना किंवा गाताना लहान मुलें आनदानें उड्या मारतात हसत खेळत नाचू लागतात भराभर वाचू पहातात घडाघडा तोंडपाठ करू इच्छितात त्या कारणानें हें बालवाङ्मय वाचायला मिळावें म्हणून लहान मुलाची झिम्मड पडलेली दिसून येते.

छोट्या छोट्या घरगुती गोष्टी, शूरवीराच्या पराक्रमाच्या गोष्टी, अद्‌भुत रम्य व चटकदार गोष्टी, आभाळातील विश्वाच्या मजेदार गोष्टी इत्यादींची खैरात *ह्या बालवाङ्मयात झाल्यामुळें लहान मुलाच्या जीवनात अलिकडे एक प्रकारचें नवेंच* विश्व उभारले जातें आहे ! आणि हेंच ह्या बालवाङ्मयाचें प्रमुख वैशिष्ट्य होय

लहान मुलाच्या विविध प्रकारच्या आवडीनिवडी किंवा छद लक्षात घेऊन बालवाङ्मयाची निर्मिति केली जाते आहे परतु त्यापैकीं बरेचसें वाङ्मय हें पर-भाषेंतील किंवा जुन्या काळातील कथाच्यावर आधारित असेंच असतें. स्वतत्र रीतीनें खास मुलाच्यासाठीं लिहिलेले असें वाङ्मय अद्यापहि त्या मानानें मराठींत कमीच आहे. तरी पण जें थोडें फार आहे ते मात्र चटकदार आहे, लोक मान्य होणारें असें आहे. जुन्या काळच्या हातीमताई किंवा गुलबकावलीसारखा

चटका त्यामुळें बालमनाला लागत नसला, तरी आजच्या काळचा युगधर्म हें वाङ्मय राखू पहातें आहे.

हें बालवाङ्मय निर्माण करताना पुरुषाच्या बरोबरीनें नसला तरी बराचसा हातभार स्त्रियांनीहि लावलेला आहे व या वाङ्मयाच्या प्रांतात आपल्या लेखणीचें वैशिष्ट्य राखण्याचा प्रयत्न केला आहे.

**पिरोजबाई आनंदकर** ह्या स्वत. शिक्षिका असल्यामुळें त्यांनीं लिहिलेलीं "किशोरकथा" व 'बालबहिर्जी" हीं पुस्तकें बालवाङ्मयात आपलें वैशिष्ट्य राखून आहेत. *लहान मुलांच्या जीवनातील नित्याच्या प्रसंगांना अद्भुतरम्यतेची* जोड देऊन पिरोजबाईंनीं लिहिलेल्या कथा मोठ्या सुंदर आहेत व त्यांची भाषाहि चटकदार आहे.

साने गुरुजींच्या 'धडपडणाऱ्या मुला'प्रमाणेंच पिरोजबाईंची 'बालबहिर्जी' ही कादंबरी लहान मुलांत विशेष लोकप्रिय आहे. या कादंबरींतील लहान मुलांच्या खोड्या मोठ्या माणसांनाहि वेड लावतील अशा बहारीनें उतरल्या आहेत

**ताराबाई मोडक** ह्या देखील एक उत्तम शिक्षिका आहेत. त्यामुळें मुलांच्या मनाचा अभ्यास करून त्यांनीं लिहिलेलीं "गोपूदादाचा लाकूड तोड्या", "जादूचा घोडा" व "विक्रम" हीं पुस्तकें चांगलींच लोकप्रिय झालीं आहेत. ताराबाईंची भाषा चटकदार असून लेखनपद्धतीहि आकर्षक आहे.

**आनंदीबाई जयवंत** यांनीं लिहिलेल्या लहान मुलांच्या गोष्टी व विशेषत "नदूचा बद्दू" हें पुस्तक मुलांच्या आवडीचें आहे. कल्पकतेबरोबरच या लेखनात आनंदीबाईंनीं अद्भुततेचीहि जोड दिल्यामुळें त्यांची लेखणी येथें जिव्हाळ्यानें बोलते आहे. त्या कारणानें या पुस्तकातील त्यांची काळ्यानिळ्या ढगाची लढाई बहारीची झाली आहे.

**सौ. मालती दांडेकर** यांनीं लहान मुलांच्यासाठीं कितीतरी पुस्तकें लिहिलेलीं आहेत. त्यापैकीं बराचसा भाग परकीय कल्पनेवर आधारलेला आहे. जवळ जवळ वीस एक तरी त्यांचीं पुस्तकें या प्रकारात मोडतील.

मालतीबाईंनीं मुलांच्यासाठीं काहीं स्वतंत्रहि लेखन केलें असून तें चटकदार झालें आहे. *त्यांच्या 'कमलिनी' मधील भाषा एखाद्या लडिवाळ मुला*सारखी गुज गोष्टी करणारी असल्यामुळें हें त्यांचें लेखन बालजगतात चांगलेंच वैशिष्ट्य राखून आहे.

या संदर्भात उदाहरण म्हणून त्यांच्या 'पुनर्जन्म' या बालकथेतील पुढील वर्णन अवश्य पहाता येईल—

"टमाटा आनंदानं धरंगळत त्या वाटेनं फाटकांतून आत शिरला. मऊ माती अन् लहान लहान रोपं—झुडुपं पाहून मुलगी माहेरीं आल्यासारखं त्याला आनंदाचं भरतंच आलं ! भराभर लोळत तो मऊ ओल्या मातींतून नाचू खेळू

लागला; अन् काय दुर्दैव...! टचकन् एका अणकुचीदार दगडावर तो आदळला .. अन् हाय रे दुर्दैवा. .! फटकन् फुटला तो. रक्त तिथच पडलं न् हृदयाशीं धरून ठेवलेलीं नाजुक बीज तिथ विखुरलीं...!"

"विक्रमाचा विक्रम", "यक्षनगरींतील रम्य कथा", "मोहन माळ", "सोनेरी लोकर" इत्यादि पुस्तकामधून लेखिकेनें अद्‌भुतरम्य कथा दिलेल्या असून "जगातील जमती" मध्ये भौगोलिक माहितीवर आधारलेलें निबंध दिलेले आहेत. विषयाच्या दृष्टीनें मालतीबाईंच्या या प्रकारच्या लेखनात भरपूर विविधता आलेली आहे.

**शान्ता ज. शेळके** यांनीं लहान मुलांच्यासाठीं अनेक लहान लहान पुस्तकें लिहिलेलीं आहेत. परंतु त्यांच्या या लेखनाची बरीचशी भिस्त ही परभाषेतील कथांच्या अनुवादावर असल्यामुळें त्या लेखनाचा येथें विचार केलेला नाहीं. तरीपण एक गोष्ट निश्चितपणें येथें नमूद करता येईल, ती अशी कीं, शान्ताबाईंनीं भाषांतरित केलेलें 'मीनाक्षी' किंवा 'निळा दिवा' हें वाङ्मय भाषाशैलीच्या दृष्टीनें सुंदरच आहे.

**कावेरी कर्वे** यांची 'चिमणी' किंवा 'माझ्या आवडत्या गोष्टी' हीं पुस्तकें मुलांना आवडतील अशींच सुंदर आहेत. त्यांची भाषा चटकदार आहे. लेखनपद्धति ओघवती व बाळबोध आहे.

**सौ. कुमुदिनी रांगणेकर** यांनीं लहान मुलांसाठीं फार थोडें लिहिलें आहे. तरीपण चुरचुरणारा कोंबडा, मिठासारखी आवडती, जादूचें मडकें, कोंडा कुस्करी इत्यादि त्यांच्या कथा गमतीदार आहेत.

**सौ. लीला भागवत** यांनीं अगदीं अलिकडच्या काळात लिहिलेल्या चिट्टकल्या गोष्टी मुलांना फारच आवडतात. त्यांचें हें लेखन अगदींच लहान मुलांच्यासाठीं असल्यामुळें यमकें साधणारीं छोटी छोटी वाक्यरचना त्यांनीं वापरलेली आहे. गोष्टींत विविधता ठेवली आहे. भाषा आकर्षक राखली आहे. शिवाय या सर्वांच्या जोडीला त्यांनीं आपलें सर्व लेखन आकर्षक चित्रांनीं सजविल्यामुळें त्यास विशेष उठाव आला आहे.

लहान मुलांसाठीं लिहिल्या गेलेल्या कथावाङ्मयात डॉ. **चारुशीला गुप्ते** यांचे 'झाजिमा,' **नलिनी देवळे** यांचे 'जिवलग मित्र,' **तारा वैशंपायन** यांचे 'कुकूच कोंबडा,' **विमल कर्णिकांचें** 'फुलपाखरें' **सुशीला सावतांचें** 'आमचा खेळ,' **सुमति पायगांवकरांचें** 'छोटी नीरा' इत्यादि प्रकाशन लक्षात घेण्याजोगें आहे.

काहीं लेखिकांनीं लहान मुलांच्यासाठीं थोरामोठ्यांचीं **चरित्रें**हि लिहिलेलीं आहेत. त्यामध्यें डॉ. चारुशीला गुप्ते यांचीं 'वीररत्न बाजी प्रभु देशपांडे' व क्रांतिवीर वासुदेव बळवंत, यशोदाबाई भटांचीं 'आर्य स्त्री रत्नें,' उषा कोल्हटे

यांचीं ' कथाभारत,' ' समाज विज्ञान,' ' कांहीं उपकारीं माणसें ' हीं पुस्तकें उल्लेखनीय आहेत

मुलांच्यासाठीं स्त्रियांनीं लिहिलेल्या **कविता** मोठ्या सुंदर आहेत. त्यापैकी **इंदिरा संतांची**--

नको नको रे पावसा
असा धिंगाणा अवेळीं
घर माझे चंद्रमौळी
आणि दारांत सायली
नको नाचूं तडातडा
असा कौलारावरून
तांबे सतेलीं पातेलीं
आणूं भाडीं मी कोठून

ही पावसांत सांपडलेल्या राजसबाळाला सांभाळून आणण्यासाठीं विनंति करणारी कविता छानदार आहे. या कवितेंत पितळेची लोटीवाटी मांडून नवऱ्या-बरोबर जेवायला वाढीन म्हणून पावसाला केलेली विनंतिहि उल्लेखनीय आहे.

**शांता शेळके** यांची--

थुई थुई नाच माझ्या अंगणांत मोरा
निळ्या निळ्या पिसाऱ्याचा फुलव फुलोरा
काय तुझ्या पिसाऱ्याचा सांगूं मी दिमाख
निळ्या मखमलीवरी हिरे लाख लाख
रंगीबेरंगी छटांनीं झळाळतें अंग
काय इंद्रधनुष्याचें चोरियलें अंग ?...

ही मोराला बघून प्रकट होणारी कल्पना मुलांना मोठी बहारीची वाटते. त्याचप्रमाणें **अपर्णा देशपांडे** यांची--

थांब ढगा ! थांब ढगा ! येऊं का मी वरी ?
लोळाया ने मला तुझ्या कापसाच्या घरीं
वाऱ्या ! वाऱ्या ! थांब जरा किती पळतोस ?
कळ्या फुलांतील वास सांग कुठें तूं नेतोस ?

ही कल्पनाहि भारी अपूर्वाईची आहे.

**संजीवनी मराठे** यांनीं लिहिलेली--

तूं आहेस बेबी, मी आहे आई
बर का ग आई, हें सिरियस नाहीं !

सकाळ होतांच मी तुला उठवीन
मीच तुझे दांत घांसून घेईन
दुधाचा पेला पाहून रडायचं नाहीं !...
झोपतांना मात्र तूं आई व्हायचं
अंगाई म्हणत थोपटत रहायचं
दुपारचं कांहीं आठवायचं नाहीं,
बरं का ग आई,
हें विसरायच नाहीं !

ही कविता देखील बालमनाला चांगलाच चटका लावणारी व बालमनाला दिलखुलास हंसविणारी अशी शानदार झालेली आहे.

स्त्रियांनीं लिहिलेल्या बालवाङ्मयातील निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांचें स्वरूप हें बहुतांशीं या प्रकारचें आहे. याच प्रकारचें लेखन आणखीहि कांहीं लेखिकांनीं व कवयित्रींनीं केलेलें आहे. पण अद्याप त्यापैकीं संग्रहित न होतां बरेचसें फुटकळ स्वरूपांत राहिलेलें आहे. तसेच लहान मुलांसाठीं अगदीं किरकोळ लेखन करणारांचीहि संख्या पुष्कळ आहे.

बालवाङ्मयाच्या निर्मितीच्या दृष्टीनें स्त्रियांची लेखणी या रीतीनें बरीच समाधानकारक रीतीनें आपलें पाऊल पुढें टाकते आहे असें दिसून येतें. गुणाच्या दृष्टीनें हें लेखन साहित्यसमृद्ध वाटत असलें तरी तें संख्येच्या मानानें मात्र फारच कमी आहे.

साने गुरुजींनीं लिहिलेली 'श्यामची आई,' 'चित्रकार रंगा,' 'धडपडणारीं मुलें,' 'सुंदर पत्रें' इत्यादि अनेक पुस्तकें पाहिलीं म्हणजे स्त्रियानीं या प्रकारचें भरपूर लेखन करायला पाहिजे असें वाटूं लागतें. सुंदर पत्रांतून प्रकट झालेली भारतीय संस्कृति आमच्या स्त्रियानीं हाताळली पाहिजे असें निश्चितपणें मनात येतें.

त्याचप्रमाणें श्री. कृ. भा. बाबर यांच्या 'विद्यार्थी सीताराम' सारखें चरित्रलेखन किंवा वा. गो. आपट्याच्यासारखें 'परिस्तानातील गोष्टी' चें कथालेखन आमच्या लेखिकांनीं करायला हवें आहे. तसेंच श्री. केगेकर किंवा कर्वे यांच्यासारखें शास्त्रीय विषय सोप्या भाषेंतून समजावून देण्याचें कामहि स्त्रीच्या लेखणीनें करणें अगत्याचें आहे. कारण आजच्या विज्ञान युगाची ती एक प्रमुख गरज आहे.

खास मुलांसाठीं म्हणून लिहिलेलें मराठींतील स्वतंत्र वाङ्मय एकंदरीनें कमीच आहे. तशांत स्त्रियानीं लिहिलेलें या प्रकारचें वाङ्मय त्याहूनहि कमी आहे. आणि जें लिहिलें आहे त्यातदेखील स्त्रीचा म्हणून वेगळा दृष्टिकोन आणखीनच अपवादात्मक असा आहे. त्या कारणानें स्त्रियांच्या ह्या लेखनप्रकारानें ठळक वैशिष्ट्य म्हणावें तसें मनांत भरत नाहीं.

त्यामुळें या सदर्भात एक अपेक्षा मनात येते. ती अशी कीं, बालमनाची अविश्रात जोपासना करणाऱ्या स्त्रियानीं पुरुषाच्यापेक्षाहि भरीव कामगिरी या क्षेत्रात करणें अगत्याचें आहे. कारण बालमनाला आकर्षित करणाऱ्या शेंकडों भावभावनाचा त्यानीं बारकाईनें अभ्यास केलेला असतो व त्याची पूर्तता करण्याचे अनुभवहि जिव्हाळ्याने घेतलेले असतात.



७.

# निष्कर्ष

मराठीच्या प्रभातकालापासून तो अगदीं आजतागायत निरनिराळ्या लेखिकानीं लिहिलेलें वाङ्मय हें अशा प्रकारचें आहे. जवळ जवळ गेल्या सात शतकात निर्माण झालेलें हें वाङ्मय अभ्यासित असताना एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेंत भरते ती अशी कीं, या लेखिकानीं वाङ्मयनिर्मिति करीत असताना आपला म्हणून एक स्वतंत्र असा दृष्टिकोन अमलात आणलेला आहे. स्त्री आणि पुरुष समान भूमिकेवरून जाणारे असले, तरी सर आर्थर अण्डरहिल यानीं "नाइन्टीन्थ सेंचरी" मध्यें म्हटल्याप्रमाणें या समानतेचा अर्थ एकरूपता असा होत नाहीं. त्यांच्या मतें स्त्री आणि पुरुष हे केवळ शारीरिक दृष्ट्याच भिन्न आहेत असें नव्हे, तर त्याचा जीवनाकडे पहावयाचा दृष्टिकोनहि भिन्न प्रकारचाच आहे. याच विषयासंबंधीं लिहिताना स्वर्गीय कवि रविंद्रनाथ टागोर यानीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, "यदि स्त्री और पुरुष स्वभावतः एक ही होते तो फिर स्त्री तो एक व्यर्थता ही होती, बिलकुल पुनरुक्ति....यदि स्त्रियाँ ऐसा समझ लें कि पुरुष–स्त्री की भिन्नता केवल शारीरिक भिन्नता है, और मानसिक एवं आध्यात्मिक दृष्टि से प्रकृत रूप में वे बिलकुल पुरुषों के ही समान हैं, और यदि इसी धारणा से (इस प्रकार जीवन को एक-पक्षीय पुरुष-रूप ही देकर) वे काम करें, तो जल्दी या देर में एक-न-एक दिन हमारी सभ्यता बिलकुल गड़बड़ी और अस्तव्यस्तता में डूब जायगी। *"

निसर्गानें स्त्रीवर एक प्रकारची महत्त्वाची अशी मातृत्वाची वेगळी जबाबदारी टाकलेली असल्यामुळें स्वाभाविकच पुरुषांहून निराळे असे तिचे आचार आणि विचार बनत गेलेले आहेत. तिचा बराचसा काळ घरकामात जात असल्यामुळें अगदीं वेदकालापासून, म्हणजे ज्या काळात स्त्रियाना सर्व प्रकारचें भरपूर स्वातंत्र्य उपभोगतां येत होतें, त्या कालापासूनच स्त्री म्हणजे घर आणि घर म्हणजेच स्त्री असें समीकरण होऊन बसलें आहे. त्यामुळेंच वेदकालामध्यें 'जायेदस्तं मघवन् सेदु योनिः।'° असें म्हटलें जात असें आणि अगदीं अलीकडेसुद्धां "गृहिणी

---

* स्त्री-समस्या, पा. ४२५. °ऋग्वेद, मंडल ३४–३५

गृहमुच्यते। " या वचनान्ची सत्यता खुद्द स्त्रियांनींहि मान्य केलेली आहे.

स्त्रियामधील या स्वतंत्र अशा दृष्टिकोनाविषयीं आणि त्याच्या लेखनाविषयीं लिहिताना सुप्रसिद्ध पाश्चात्य कादंबरीकार जॉर्ज ईलियट या म्हणतात कीं,

" स्त्रियांनीं स्त्री म्हणूनच आपलें लेखन करताना विचार केला व अनुभवहि घेतला, त्यामुळें त्यानीं जेव्हा लेखन केलें तेव्हा त्याचें तें लेखन स्त्री-जीवनाचाच आविष्कार करणारें असें झालें. स्वतःच्या जीवनातील अनुभवाच्या बळावर स्फूर्ति घेऊन उठलेल्या त्यांच्या लेखनानें पुरुषाचें अनुकरण न करता आपला म्हणून खास *प्रामाणिकपणा राखला. त्यामुळें वाङ्मय आणि कला याचा अभ्यास करणाराना* त्याच्या आठवणी, पत्रें, कथा, कादंबऱ्या किंवा शब्दचित्रें या वाङ्मय प्रकारानीं आपलें उठावदार व वैशिष्ट्यपूर्ण असें दर्शन घडविलें."*

आणि असे असूनहि ज्या कांहीं थोड्या स्त्रियांनीं पुरुषाचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला त्याचेविषयींहि जॉर्ज एलियट म्हणतात कीं, " स्त्रीसुलभ अशा खास भूमिकेवरून त्यानीं लेखन करण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. त्या कारणानें त्याचें लेखन हे पुरुषी थाटाचें असें झालें."

जॉर्ज ईलियट यानीं पाश्चात्य लेखिकाच्या लेखनाविषयीं दर्शविलेलें हें मत आपल्याकडील लेखिकाच्या लेखनासहि ततोतत लागू पडणारें आहे. वास्तविक पाश्चात्य देशांमध्यें आपल्यापेक्षा कितीतरी दृष्टींनीं स्त्रिया स्वतंत्र आहेत. पुरुषाच्या बरोबरीनें वागण्यास त्याना पुष्कळसा वाव आहे. त्यानीं आपले असे वेगळे *हक्क प्रस्थापित केलेले आहेत. त्यामुळें त्याच्या समाजात स्त्रियाना योग्य तो मान* दिला जातो, अशा स्थितींताहे ईलियटबाईनीं त्याच्याकडील लेखिकाच्या लेखनाबद्दल असें म्हणावें, याचा उघड अर्थ असा आहे कीं, स्त्रीला स्त्री म्हणूनच स्वतंत्र असें वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. स्त्री कितीहि सुधारली आणि तिनें पुरुषाच्या बरोबरीनें हवीं तीं कार्यें पार पाडण्याचा कितीहि प्रयत्न केला, तरी अनुभवानें तिला पटायला लागलें कीं, आपलें खरें कार्यक्षेत्र म्हणजे घरच आहे. कारखाना किंवा इतर दुसरें तिसरें कांहीं नव्हे ! आणि याच तिच्या विशिष्ट भावनेचे पडसाद तिच्या वाङ्मयातहि तिला न कळत पडत असतात.

* " They thought and felt as women, and when they work, their books became the fullest expression of their womanhood. And by being true to themselves, by only seeking inspiration from their own life-experience, instead of servively copying that of man, their letters and memoirs, their novels and pictures have a distinct, nay unique, for the student of art and literature. "

George Eliot, 'Eminent Women series' by Mathilde Blind.

मराठी सारस्वतास भूषणावह होईल असा स्त्रियानीं निर्माण केलेला वाङ्मयाचा एक भाग तर असा आहे कीं, तो केवळ स्त्रियाचाच म्हणून ओळखला जातो. पिढ्यानपिढ्या केवळ पाठातरामुळें टिकून राहिलेला असा " स्त्री गीतें " हा तो वैशिष्ठ्यपूर्ण भाग होय. जानपद ओव्या, उखाणे, खेळातील गाणीं आणि कहाण्या हें स्त्रियाचें असें खास निराळें वाङ्मय आहे. परकीय सस्कृतीचा, भाषेचा, विचाराचा कसलाहि सपर्क न लागलेल्या खास मराठी अत:करणातून निर्माण होणारा हा भावनाविष्कार आहे. या वाङ्मयात स्त्रियानीं आपला आत्मा ओतलेला आहे. त्याच्या अत:करणात वसत असलेल्या आत्मीयतेच्या उमाळ्यातून प्रसुट झालेलें हें अक्षर वाङ्मय आहे. या वाङ्मयास साकार करणारा शब्दन् शब्द स्वयस्फूर्तीनें, रक्ताच्या शाईनें, लिहिला गेलेला आहे. स्त्रियाच्या या अलिखित वाङ्मयानें भारतीय जीवनात माणुसकीचा रग भरलेला आहे ! भारतीय सस्कृतीचें अधिष्ठान म्हणून डौलानें जगाच्या पाठीवर मिरविण्याचें सामर्थ्य या वाङ्मयानें कमावलेलें आहे !

माझे पाच भाऊ । देवळाच्या भिंती ।
गिलावा देऊ किती । आयुष्याचा ॥
पेरा झाला रानातून । मोड काढी वर मान ।
तसें हसें माझें तान्हें । पाळण्यात ॥
वाऱ्यान हालती ग । पानमळ्याची शेवरी ।
दिष्ट नि झाली म्हणूं । माझ्या कुऱ्याच्या चिरी ॥
सासर एवडा वस । नको करूस सासूबाई ।
तुझ्या दारींच्या चाफ्या पाई । दूर देशाची आली जाई ॥

या ओव्यातून गोवलेले उपमा, दृष्टात आणि कल्पना ह्या खास स्त्रियाच्या आहेत. " साहित्यिकाचा आणि कलाकाराचा महान् धर्म कोणता " या विषयासबधीं बोलताना सुप्रसिद्ध साहित्यिक साने गुरुजी एकदा म्हणाले, " स्त्री वाङ्मय हें पृथ्वी मोलाचें वाङ्मय आहे. कालिदास जिवत झाला तर हें वाङ्मय वाचून नाचेल !... " गाईचे कान जसें नागलीचें पान " कोणत्या महाकवीला ही महान् उपमा सुचेल ? "

या ओव्याप्रमाणेंच स्त्रियानीं रचलेले उखाणे आणि गाणीं हीं मोठीं हृद्य आहेत. कहाण्याना तर प्रा. पोतदारानीं " स्त्रियाचे उपनिषद " असें म्हटलेलें आहे. या स्त्रियाच्या वाङ्मयात त्याची स्वत ची भाषा आहे. त्याच्या अत.करणातील भावनाविष्कार येथें त्याच्याच कल्पनामधून प्रकट झालेला आहे. हा वाङ्मय प्रकार पुरुषानीं फारसा हाताळलेला दिसून येत नाहीं. फार तर एखादा दुसरा उखाणा पुरुषानीं रचल्याचें अधूनमधून ऐकावयास मिळतें इतकेंच. आणि या प्रकारच्या

* नवयुग, २५ जून १९५०.

पुढील भाग पहाता येईल'—

" .. अचलेनें सभोंवार पाहिलें. राधिकेला यायला अवकाश होता. तिनें झटकन् अरविंदाला आपल्या मांडीवर घेतलें. अरविंदानें " उहु " " उहु " केलें. खायला मिळालें कीं झाले. त्याला आईत व इतरात फरक कळत नव्हता. खायला देते ती आई. त्या ओठाच्या स्पर्शानें अचलेच्या अगावर रोमाच आले. सर्वांगातून वसल्या तरी लहरी एका ठिकाणीं केंद्रित झाल्या. तिनें डोळे घट्ट मिटले. पण—पण छे, अरविंदाचें समाधान झालें नाहीं. तिचेंहि समाधान झालें नाहीं. तिचें सर्वांग विचलित झाले. डोळ्यातून घळघळ अश्रु वाहू लागले. ती हताश झाली "

हा भावनाविष्कार कल्पनेनें उमगणारा नाहीं ! वात्सल्याची भावनाच अशी आहे कीं, जिच्याभोंवतीं स्त्रीच्या जीवनाचे धागेदोरे गुफलेले असतात. तिच्या रक्ताचा अणुरेणू स्वत च्या मुलासाठीं खर्ची पडायला आनदानें तयार झालेला असतो. मूल म्हटलें कीं, वमालीच्या आनदानें वेहोप होऊन ती त्याच्यासाठीं वाटेल तें करायला तयार झालेली असते आणि त्यामुळेंच " सजीवनी " नें स्वत.च्या मुलाचें " स्वागत " करताना

" ये ग्रहाला बाळराणा जीवनाचा माझिया
स्वागताची सिद्धता ना काय अर्पू मी तया ?
हृदय माझें अथरोनी घालु का शय्या मऊ ?
दाटलें वात्सल्य पोटीं पाजुनीया का शातवू ? "

असें वात्सल्याच्या उमाळ्यानें लिहिलेलें काव्य निर्माण केलें आहे.

" वटसावित्री " चें व्रत फक्त स्त्रियाच आचरणात आणीत असतात. तथापि या व्रताचें माहात्म्य जें " हाच पति जन्मोजन्मीं लाभावा " असें आहे, तें चित्रित करण्याचा अनेक लेखक-लेखिकानीं आजवर प्रयत्न केलेला आहे. परपरेनें हिंदु स्त्रीच्या मनावर होणारे सस्कार त्यानीं प्रतिबिंबित केलेले आहेत पण आजच्या बदलेल्या काळात या जुन्या विचाराना हादरा बसेल अशा प्रकारची कल्पना वमुधरा पटवर्धन यानीं " का झाल अस ? " या आपल्या कथेंत माडलेली आहे आजची मुलगी स्वत च्या दृष्टीनें विचार करू शकते, याची कल्पना विभावरी शिरूरकराच्या " कळ्याच्या निःश्वासा " मधून गोविली गेलेली आहे. परतु या कथेंत त्याहि पलीकडचा असा बडखोर भावनाविष्कार आहे. स्त्री सुशिक्षित असो अगर अशिक्षित असो, तिला अजूनहि पतीबद्दल पूज्यभाव वाटत असतो. पण त्याबरोबरच एखाद्या मुलीच्या इच्छेविरुद्ध लग्न झालें असेल तर, एखादें शल्य तिच्या मनात सतत बोचत असतें. त्याच शल्याची चुणूक वसुधरा पटवर्धन यानीं कशी दर्शविली आहे पहा:—

" वृक्षराज, आज, शेंकडों वर्षें तू पहातो आहेस. *आणि आम्ही स्त्रिया*

कितीतरी वर्षं तुझी पूजा करीत आहोत. पण खर साग, इथं येणाऱ्या सर्व स्त्रिया "जन्मोजन्मीं हाच पति लाभो" अशी तुझी खरीच प्रार्थना करतात काय? तूं वयान वृद्ध असलास तरी दर वर्षी पिकल्या पानाच्या रूपानं तूं आपली चुकीचीं मतं बदलतोस आणि नव्या, चागल्या कल्पनाची पालवी आपल्या फांद्यावर खेळूं देतोस. तुला माझ म्हणणं समजणार नाहीं कां? दिलीपच्या आठवणीनं करपून जाणाऱ्या या दुर्दैवी मुलीच्या अंतःकरणाची तुला दया येत नाहीं का?...इतकीं वर्षं अनुभव घेऊन समजस, प्रेमळ झालेल्या तुझ्या मनाला माझी प्रार्थना आहे कीं, श्रीमताच चागलं होऊं दे. पण देवा, पुढल्या जन्मीं दिलीपची, माझ्या आवडत्या दिलीपची राणी होण्याचा आशीर्वाद मला दे"

हा भावनाविष्कार केवळ स्त्रीमनातूनच बाहेर पडणारा आहे. ज्या भावने-मुळें अंतःकरणाला पीळ पडतो, तिची जाणीव इतराना कल्पनेच्या आधारावर कशी होईल? सहानुभूतीचा पहिला स्पर्श झाल्याशिवाय ललित वाङ्मयाची खरी जोपासना होत नाहीं असें जें समजण्यात येतें, ते येथें ततोतत लागू पडावयास हरकत नाहीं. आणि त्यामुळेंच अशा प्रकारचें हें लेखन, जरी तें अल्प प्रमाणात असले तरीसुद्धा, निःसशय मराठीच्या वैभवशाली भाग्यास हातभार लावणारें असें झालेलें आहे. मराठीला वैभवसंपन्न बनविण्यास या लेखनानें आतड्याना पीळ पडेल इतके श्रम घेऊन मदत केलेली आहे. पुरुषाना जें जमलें नाहीं तें लिहून स्त्रियानीं मराठीचें वैभव या प्रकारें तेजस्वी रीतीनें वाढविलेलें आहे यात शंका नाहीं.

स्त्रियानीं जें जें लिहिलें आहे, तें तें प्रामुख्यानें वैयक्तिक भावनेनें लिहिलेलें आहे. स्वतःच्या भावनाचा जेथें योग्य रीतीनें आविष्कार करता येईल तेथेंच त्यानीं लेखनाचा प्रयत्न केलेला आहे. सामान्यतः असें दिसून येतें कीं, समाजातील सास्कृतिक स्थैर्य टिकविण्याकडेच स्त्रीच्या मनाचा कल विशेष झुकलेला आहे. केवळ वादासाठीं म्हणून वाद घालण्याची तिच्या मनाची तयारीच नाहीं. तिऱ्हाइताची भूमिका घेऊन लेखन करणें तिला जमलेलें दिसत नाहीं. त्यामुळेंच नाट्यलेखनाच्या बाबतींत ती मागें पडलेली दिसून येते. अलीकडे पुष्कळ स्त्रिया उच्च दर्जाचें शिक्षण घेत असताना दिसत असल्या, तरी त्याच्या मागचा प्रपच अजून सुटलेला नाहीं. गृहिणी या नात्यानें अशिक्षित स्त्रीप्रमाणेंच सुशिक्षित स्त्रियानाहि "घर साभाळावें लागतें आहे. त्यामुळें घरप्रपच व मुलें बाळें साभाळून एक तर त्याना हवा तितका लेखनाला वेळ मिळत नाहीं; आणि दुसरें म्हणजे अद्यापहि आमच्या स्त्रियाना पुरुषाप्रमाणें जीवनाच्या विविध क्षेत्रातील अनुभव मिळविण्याची शक्यता समाजामध्ये मिळत नाहीं. पुरुषाना समाजाच्या कोणत्याहि थराल हव्या त्या जागीं व हव्या त्या वेळीं हव्या त्या माणसात मिसळण्याची शक्यता असते. त्याचप्रमाणें स्वतःच्या लेखना साठीं म्हणून परप्रातात अगर परदेशातहि मोकळ्या मनानें पुरुषाना प्रवास

करीत असते . सहजसुंदर भाषेचा धडा स्त्रीपासूनच घ्यावा. हृदयस्पर्शी भाषण अकृत्रिमपणे कसें करावयाचें हें तिच्यापासून शिकावें आणि अर्थालंकार, पदलालित्य, प्रास, अनुप्रास वगैरे साहित्य शास्त्र माहीत नसताहि कार्यक्षम साहित्य निर्माण करण्याची कला तिच्यापासून अवगत करून घ्यावी "×

" ...तुषार पडताना शब्द मुळींच होत नाहीं. कोणी उमे राहून बारीक सपीट चाळीत असता तें जसें हलकेच जमिनीवर पडतें व तें खालीं पडल्याचा शब्द कोणाला ऐकूं येत नाहीं, त्याप्रमाणें तुषारहि कोणाला नकळत पडतो..." पंडिता रमाबाई यांची ही समर्पक उपमा आणि .."या रत्नां सर्व" पसरलेल्या चादच्या आहेत, त्या काहींतरी युक्ति करून वर जावें, आणि आपल्या साडीच्या ओच्यात गोळा कराव्या. म्हणजे मग आपल्याला रत्नेंच रत्नें होतील. एकदा वाटे कीं, तीं सगळीं रत्नें गोळा करून एक ढीग करावा, आणखी मग आपल्या मैत्रिणींना गमत दाखवायला बोलावून सगळ्यानीं तीं मनःपूत उडवावीं, तीं खूप उंच उंच फेकून सागरगोट्यासारखीं झेलावीं, त्याचे सागरगोटे करून या आकाशातच बसून एकमेकींवर आटक्या लावाव्या..." ही काशीबाई कानिटकराची विलोभनीय कल्पना स्त्रियाच्या विशिष्ट भाषासरणीला शोभेल अशीच मनोरम आहे. काशीबाईच्या लेखनाचा गुणगौरव करताना प्रसिद्ध कादंबरीकार हरिभाऊ आपटे यानीं त्याना लिहिलेल्या एका पत्रात स्पष्ट म्हटलें आहे कीं,

" ...खरोखर साधेपणात जी काय मौज आहे ती कशात नाहीं. अव्याज मनोहरत्व हें काहीं निराळेंच आहे. त्याची बरोबरी कशासही यावयाची नाहीं. मी आपणास जेन ऑस्टेनची उपमा देतो याचें कारण तरी आपल्या भाषेचें अव्याज मनोहरत्व हेंच होय....माझी तर आज मित्तीला अशी खात्री आहे कीं, "गृहसौख्य" व "सुखकर दरी" हे दोन भाग जसे तुम्हाला साधले आहेत तसे मला कधींहि साधले नसते....जर जुन्या काळच्या प्रेमळ, सुशील अशा पोक्त स्त्रीचें चित्र मला दाखवा असे कोणी म्हणेल तर मी त्यास चटकन् आपली कादंबरी वाच म्हणून सांगेन..." हरिभाऊचे हे विचार लक्षात घेता स्त्रियानीं घरगुती जीवनाचें क्षेत्र फार उत्तम रीतीनें रंगविलेलें आहे असें दिसून येतें. स्त्रियाच्या लघुकथासंबधीं लिहिताना "हृदयशारदे"च्या प्रस्तावात त्याच्या स्वानुभवप्रेरित लेखनाला उद्देशून कै. वा. म. जोशी यानीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, "लहान मुलींची व बायकाचीं वर्णनें तर बायकानींच करावींत असें वाटू लागलें आहे..."

स्त्रियाच्या आणि पुरुषाच्या लेखनाकडे तुलनात्मक दृष्टीनें पाहिलें, तर असें दिसून येतें कीं, स्त्रियाचें लेखन हें विषयाच्या दृष्टीनें मर्यादित आहे. तसेंच तें अधिक आत्मनिष्ठ असून वास्तवतेच्या दृष्टीनेंहि सरस आहे. मात्र सख्येच्या मानानें अजून तें बरेंच कमी आहे. आणि त्याचें प्रमुख कारण म्हणजे अजून

× चिं. ग. कर्वे, स्त्रीपुरुषामधील भाषाभेद, गृहलक्ष्मी एप्रिल १९२९.

स्त्रियांचें शिक्षण पुरुषांच्या मानानें बऱ्याच कमी प्रमाणात होतें आहे हें होय हे होय. त्यामुळें मध्यम वर्गातल्या पांढरपेशा सुशिक्षित स्त्रियांनींच तेवढी लेखणी उचललेली आहे ! अजून जगाच्या प्रगतीच्या दृष्टीनें निद्रावस्थेत असलेल्या बहुजन समाजातील कितीतरी स्त्रिया अशिक्षित आहेत त्यांचें शिक्षण वाढलें, त्यांना आपल्या भावना कागदावर प्रकट करण्याचे सामर्थ्य कमावता आलें, म्हणजे मग त्यांच्या लेखणींतून बाहेर पडणारें त्या त्या समाजातील जिवंत वाङ्मय मोठ्या प्रमाणावर प्रकाशित होईल त्यांच्या भोळ्या भाबड्या अंतःकरणातील भाव आज ओव्यांच्या रूपानें त्यांच्या ओठावर जिवंत संगीत निर्माण करीत आहे. उद्या त्याच भावनाविष्काराचा स्फोट होऊन त्यांच्या लेखणींतून सुंदर असें अक्षर वाङ्मय निर्माण होईल, अशी आशा करावयास बिलकुल हरकत नाहीं त्याचप्रमाणें आज नाहीं उद्या तरी स्त्रियांची लेखणी कुसुमाग्रजांच्या 'मराठी माती' सारखी वैशिष्ट्यपूर्ण राष्ट्राभिमान दाखवू शकेल, असें म्हणावयास हरकत नाहीं कारण बदलत्या काळातील आजची स्त्री ही पूर्वीच्या मानानें बरीचशी घराबाहेरच्या क्षेत्रात गुंतू लागलेली आहे तशीच ती स्वातंत्र्याच्या लढ्यात भाग घेऊन स्वतंत्र राष्ट्राची एक नागरीक म्हणून प्रभावानें विचारहि करू पहाते आहे. परंतु अद्यापहि क्रांतिकारी विचाराची प्रभावी नोंद स्त्रीच्या लेखणीनें फारशी केलेली नाहीं. त्या दृष्टीनें पुरुषांच्या मानानें स्त्रियांचें लेखन बरेंचसें मागासलेलें असें दिसून येईल ! त्याचप्रमाणें स्त्रियांनीं मराठीच्या विविध दालनांतून बराचसा संचार केलेला असला तरी, पुरुषांनीं मराठी वाङ्मयाचा आढावा घेताना त्यांच्या लेखनास म्हणावें तसें मानानें वागवलें नसलें तरीहि स्त्रियांचें हें वाङ्मय स्वतःच्या प्रभावानें मराठींत स्थान राखून आहे. तरी पण आहे त्याच स्थितींतील या वाङ्मयाचा आजच्या घटकेपुरताच विचार करावयाचा झाला, तर असें म्हणता येईल कीं, अनुभवाची धार असलेलें आणि नितांत रमणीय असें घरगुती जीवन दर्शविणारें हें स्त्रियांचें वाङ्मय मराठी सारस्वताचें वैभव खात्रीनें वाढविणारें असेंच आहे. या वाङ्मयास भावनेची अप्रतिम बैठक आहे, विचाराची खोली आहे, भाषेचा मनोहर साज आहे आणि उल्लेखनीय असें स्वतंत्र स्थानहि आहे. ज्ञानदेवांच्या प्रसिद्ध उक्तीप्रमाणें "माझा मऱ्हाटाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंहि पैजा जिंके" असें अभिमानपूर्वक म्हणावयाचें सामर्थ्य खात्रीनें स्त्रियांच्या या लेखनानें कमविलेले आहे आज त्याचें अस्तित्व एखाद्या लहानशा निर्झरणीप्रमाणें दिसत असलें, तरी उद्याच्या महाराष्ट्रात भव्य सरितापात्राचें स्वरूप त्यास खात्रीनें येईल, आणि स्त्रियांनीं केलेली ही मराठीची साहित्यसेवा आज आहे त्यापेक्षाहि मराठी सारस्वतास अधिक भूषणावह होईल यात शंका नाहीं

० ० ०

# परिशिष्ट

## संदर्भ ग्रंथ


| | |
|---|---|
| साहित्य शिक्षा | प्रेमचंद |
| स्त्री समस्या | श्री. मुकुटबिहारी |
| मराठी साहित्य समालोचन | सरवटे |
| महाराष्ट्र संत कवयित्री | आजगावकर |
| आद्य मराठी कवयित्री | वा. ना. देशपांडे |
| भास्करभट्ट बोरीकर | डॉ. कोलते |
| संत काव्य समालोचन | ग्रामोपाध्ये |
| स्वभाव लेखन | डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे |
| अर्वाचीन मराठी काव्य | रा. श्री. जोग |
| स्त्रीजीवन | साने गुरुजी |
| स्त्रीगीतें | कमलाबाई देशपांडे |
| पाच कथाकार ( प्रस्तावना ) | वि. स. खांडेकर |
| जीवनयात्रा | न. चिं. केळकर |
| आत्मवृत्त | धों. के. कर्वे |
| विचार सौंदर्य | वा. म. जोशी |
| मराठी काव्याची प्रभात | अ. ब. कोल्हटकर |
| मराठी गद्याचा इंग्रजी अवतार | द. वा. पोतदार |
| धुंधुर्मास | वि. स. खांडेकर |
| प्रदक्षिणा | |
| अर्वाचीन मराठी साहित्य | |
| होळकरशाहीतील ऐतिहासिक स्त्रियांचा पत्रव्यवहार, खंड १२ | |
| इतिहास संग्रह–ऐतिहासिक टिपणें–भाग १ व २ | |
| The Feminine Characters | Viola Klein |
| The Way of All Women | M Esther Harding |
| Eminent Women Series | Mathilde Blind |
| Education in Ancient India | Dr Alteker |
| Women and Social Injustice | Mahatma Gandhi |
| Women and Analytical Study | Richard Curle |
| Some Contemporary Novelists (Women) | R. Brimley Johnson |
| With no Regrets | Krishna Hathisingh |
| The Theory of Drama | Allardyce Nicoll |
| Women in Modern India | Fifteen Papers by Indian Women Writers |

## परिशिष्ट २

# व्यक्तिनामसूची

* * *

## परिशिष्ट ३

# विषयनामसूची

* * *